**अलक**, पु० (कः) लांब केस. २ शिकारी कुत्रा.
**अलकनंदा**, स्त्री० (दा) कन्या. सुरनदी.
**अलंकरिष्णु**, वि० (ष्णुः-ष्णुः-ष्णु.) अलंकरणशील, शोभविणारा.
**अलंकर्तृ**, वि० (र्ता-त्री-र्तृ) शोभविणारा.
**अलंकर्मीण**, वि० (णः-णा-णं) काम करण्याविषयीं जो समर्थ तो.
**अलका**, स्त्री० (का) कुबेराची नगरी.
**अलंकार**, पु० (रः) भूषण. २ काव्यालंकार.
**अलंकृत**, वि० (तः-ता-तं) भूषणयुक्त. २ शोभविलेला.
**अलक्त**, पु० (क्तः) लाक्षा, लाख.
**अलक्तक**, पु० (कः) निंदा करणें.
**अलंक्रिया**, स्त्री० (या) भूषणक्रिया, शोभा करणें.
**अलगर्द**, पु० (र्दः) पाणसर्प, विरोळें.
**अलगर्द्ध**, पु (र्द्धः) पाणसर्प. २ कालसर्प.
**अलंजर**, पु० (रः) महाकुंभ, माठ, डेरा इत्यादि.
**अलंबुष**, पु० (षः) व्याकूल. २ अलंबुष नामा दैत्य.
**अलंबुषा**, स्त्री० (षा) स्वर्गींतील वारांगना विशेष. २ न्हाव्याची बायको.
**अलर्क**, पु० (र्कः) पांढऱ्या रुईचें झाड. २ शिकारी कुत्रा. ३ हिंसा करणारा कुत्रा.
**अलवाल**, न० (लं) अळें.
**अलस**, पु० (सः) पादरोग. २ वृक्ष विशेष. ३ वि० (सःसाःसं) आळशी.
**अलक्षण**, पु० (णः) वाईट लक्षणाचा.
**अलक्ष्मी**, स्त्री० (क्ष्मी) दरिद्र.
**अलात**, न० (तं) प्रज्वलित काष्ट, कोलीत.

**अलाबु**, पु० (बुः) काळा भोपळा.
**अलाबू**, पु० (बूः) काळा भोपला.
**अलि**, पु० (लिः) विषकीटक विशेष ज्यास विंचू असें म्ह० तो. २ भ्रमर, भुंगा. ३ सुरा, दारू. ४ पक्षी. ५ स्त्री० (लिः) सखी. ६ पंक्ति. ७ सेतु.
**अलिक**, न० (कं) ललाट, कपाळ.
**अलिंजर**, पु० (रः) महाकुंभ, मठ, डेरा इत्यादि.
**अलिंद**, पु० (दः) दारा बाहेरचा एक प्रदेश.
**अलिन**, पु० (नी) भ्रमर, भुंगा.
**अलिपक**, पु (कः) भ्रमर. २ कोकीळ. ३ वनी० विशेष ज्यास गंठीवन, भटोरा असें म्ह० ती.
**अलिपुष्कर**, न० (रं) द्वीपविशेष.
**अलिप्रिय**, पु० (यः) तांबडें कमळ.
**अलिमक**, पु० (कः) भ्रमर. ५ कोकीळ. ३ बेडूक. ४ कमळांतील केसर. ५ वनी० मोह्याचें झाड.
**अलीक**, वि० (कःका-कं) अप्रिय. २ न० (कं) अनृत, असत्य.
**अलूता**, स्त्री० (ता) आर.
**अल्प**, वि० (ल्पःल्पा-ल्पं) क्षुल्लक. २ थोडें ३ लहान.
**अल्पमारिष**, पु० (षः) शाक विशेष ज्यास तांदुळजा असें म्ह० ती.
**अल्पसरस**, न० (रः) लहान तळें.
**अल्पायु**, पु० (युः) बकरा. २ थोडे आयुष्याचा.
**अल्पिष्ठ**, पु० (ष्ठः) हलकट. २ वि० (ष्ठःष्ठा-ष्ठं) फार लहान.
**अल्पीयस्**, वि० (यान-यसी-यः) फार लहान.
**अवकर**, पु० (रः) केर.

**अवकीर्णिन्**, वि० (र्णी-र्णिनी-र्णि) व्रत भंग झालेला.

**अवकृष्ट**, वि० (ष्टः-ष्टा-ष्टं) निर्गमित, बाहेर घालविलेला.

**अवकेशिन्**, वि० (शी-शिनी-शि) फलरहित.

**अवक्रय**, पु० (यः) मुल्य, मोल.

**अवगंड**, पु ० (डः) रोग विशेष.

**अवगणित**, वि० (तःता-तं) अवमानित, अवमान केलेला.

**अवगत**, वि० (तःता-तं) ज्ञात, जाणलेला.

**अवगीत**, वि० (तःता तं) निंदलेला. २ पु० (तः) सुतार. ३ न० (तं) लोकोपवाद.

**अवगुंठिका**, स्त्री० (का) पडदा.

**अवग्रह**, पु० (हः) अवर्षण, पर्जन्याचा अभाव. २ हत्तीचें ललाटस्थान. ३ आक्रोश. ४ प्रकृतीभाव. ५ हत्तींचा समुदाय. ६ प्रतिबंध.

**अवग्रहण**, न० (णं) अनादर.

**[illegible]वग्राह**, पु० (हः) अवर्षण, पर्जन्याचा अ[illegible] भाव. २ हत्तीचें ललाटस्थान. ३ आक्रोश.

**[illegible]वघट्ट**, पु (ट्टः) खळगा.

**[illegible]चूर्णित**, वि० (तःता-तं) चूर केलेला.

**[illegible]चुलक**, न० (कं) चवरी.

**[illegible]ट**, पु० (टः) भूमिछिद्र, खळगा. २ कूप. [illegible]३ कपटें करून उदर निर्वाह करणारा.

**[illegible]टीट**, वि० (टःटा-टं) चपटया नाकाचा.

**[illegible]टु**, पु० (टुः) मानेवरचा उंच भाग.

**[illegible]मस**, न० (सं) क्षीण अंधकार.

**[illegible]षस**, पु० (सः) शिरोभूषण, मस्तकाभूषण. २ कर्णभूषण.

**[illegible]र**, पु० (रः) अवतरण. २ तीर्थ.

**अवतारण**, न० (णं) भूतादिग्रह. २ वस्त्राची आंचळी.

**अवंति**, पु० (तयः) देश विशेष.

**अवंतिसोम**, न० (मं) कांजीक, कांजी.

**अवतोका**, स्त्री० (का) अकस्मात जिचा गर्भपात झाली ती.

**अवदंश**, पु० (शः) मद्यपानास रुचि येण्याकरतां व्यंजन (भाजलेले हरभेर वगैरे) भक्षण करितात तें भक्षण.

**अवदात**, वि० (तःता-तं) शुक्ल, पांढरा. २ पिंवळा. ३ निर्मळ, स्वच्छ.

**अवदान**, न० (नं) भूतपूर्व चारित्र, पूर्वींचे चरित्र. २ प्रशस्त कर्म. ३ खंडन.

**अवदारण**, न० (णं) कुदळ.

**अवदाल**, पु० (लः) भोंवरा.

**अवदाह**, न० (हं) वनौ० काळया वाळ्याचें मूळ.

**अवदीर्ण**, वि० (र्णर्णार्णं) द्रवलेला.

**अवदोह**, पु० (हः) दूध.

**अवद्य**, वि० (द्यःद्या-द्यं) निकृष्ट, निंद्य.

**अवधि**, पु० (धिः) शिमा, मर्यादा. २ खळगा, बीळ इत्यादि. ३ काळ, अवकाश.

**अवध्य**, पु० (ध्यः) वधावयास जो योग्य नाहीं तो. २ अबद्ध भाषण.

**अवंध्य**, वि० (ध्यःध्या-ध्यं) यथाकाळीं ज्यास फळ येतें तो. (वृक्षादि.)

**अवध्वंस**, पु० (सः) परित्याग. २ निंदा. ३ चूर करणें.

**अवध्वस्त**, वि० (स्तः-स्ता-स्तं) चूर केलेला. २ टाकलेला. ३ निंदा केलेला.

**अवन**, न० (नं) रक्षण. २ तृप्ति. ३ प्रीति.

**अवनत**, वि० (तः-ता-तं) अधोमुख, खालीं तोंड झालेला. २ नम्र

**अवनाट**, वि० (टः-टा-टं) चपट्या नाकाचा.

**अवनाय**, पु० (यः) खालीं नेणें.

**अवनि**, स्त्री० (निः) पृथ्वी.

**अवनी**, स्त्री० (नी) पृथ्वी.

**अवपात**, पु० (तः) खांच.

**अवभृथ**, पु० (थः) यज्ञामध्यें दीक्षा समाप्तीसाठीं जें शेवटीं स्नान करितात तें.

**अवभ्रट**, वि० (टः-टा-टं) चपट्या नाकाचा.

**अवम**, वि० (मः-मा-मं) निकृष्ट.

**अवमत**, वि० (तः-ता-तं) अवमान केलेला.

**अवमर्द**, पु० (र्दः) संपन्न देशास परचक्रांची पीडा.

**अवमानना**, स्त्री० (ना) अनादर.

**अवमानित**, वि० (तः-ता-तं) अवमान केलेला.

**अवयव**, पु० (वः) शरीरादिकांचे जे हस्तपादादि अवयव ते प्रत्येक.

**अवर**, न० (रं) हत्तीचा पाठीमागचा जंघादि प्रदेश. २ वि० (रः-रा-रं) चरम, शेवटचा.

**अवरज**, पु० (जः) कनिष्ठ बंधु.

**अवरति**, स्त्री० (तिः) उपरति, निवृत्ति.

**अवरवर्ण**, पु० (र्णः) शूद्र.

**अवरव्रत**, पु० (तः) सूर्य.

**अवराल**, पु० (लः) वांकडा.

**अवराह**, पु० (हः) जलचर विशेष ज्यास नाडेसावज असें म्हणतात तें.

**अवरीण**, वि० (णः णा-णं) निंदलेला.

**अवरोध**, पु० (धः) राजाचें स्त्रीगृह. २ आच्छादून राहणें.

**अवरोधन**, न० (नं) राजाचें स्त्रीगृह.

**अवरोधा**, स्त्री० (धा) राजस्त्रिया.

**अवरोह**, पु० (हः) वृक्षाच्या फांदीचें मूळ, पारंबा. २ वृक्षाच्या मुळापासून शेवटापर्यंत गेलेली वेल. ३ स्वर्गलोक. ४ उतरणें.

**अवर्ण**, पु० (र्णः) निंदा. २ कुबेरपुत्र.

**अवलग्न**, पु० न० (ग्नः ग्नं) मध्यभाग. २ जामीन. ३ कंबर.

**अवलक्ष**, वि० (क्षः-क्षा-क्षं) शुक्लवर्ण, पांढरा.

**अवलेप**, पु० (पः) संग. २ गर्व. ३ आंगाला लावणें. ४ भूषण.

**अवलेश**, पु० (शः) श्लेष्मा.

**अवलोकित**, पु० (तः) बौद्धभेद. २ लोकनाथ. ३ वि० (तः-ता-तं) अवलोकन.

**अवल्गुज**, पु० (जः) वनौ० जीस बाकुंची, बावंची असें म्ह० ती.

**अववाद**, पु० (दः) निंदा. २ आज्ञा. ३ विश्वास.

**अवश्यं**, अ० निश्चयें करून ह्या अर्थीं. उ० अवश्यंयातारश्चिरतरमुषित्वापिविषयाः २ नित्य. ३ प्रयत्न.

**अवश्याय**, पु० (यः) हींव, थंडी. २ संज्ञा, नांव.

**अवष्टब्ध**, वि० (ब्धः-ब्धा-ब्धं) बद्ध, बांधलेला. २ जवळ. ३ आश्रित.

**अवष्टंभ**, पु० (भः) गर्व. २ सुवर्ण, सोनें. ३ स्तंभ. ४ प्रारंभ.

**अवसक्थिका**, स्त्री० (का) माचा. २ वेष्टन. ३ बासन. ४ रुमाल.

**अवसर**, पु० (रः) प्रसंग, वेळ. २ प्रस्ताव ३ वर्ष. ४ मंत्रभेद. ५ वृष्टी. ६ वाळू

**अवसर्ग**, पु० (र्गः) इच्छा प्रकार.
**अवसान**, न० (नं) समाप्ति.
**अवसाय**, पु० (यः) शेष, बाकी. २ समाप्ति. ३ निश्चय.
**अवसित**, वि० (तः-ता-तं) समाप्त. २ अवगत. ३ तृण घालून रास केलेलें. (धान्यादि.) ४ न० (तं) गेलें. ५ जाणलें.
**अवस्कर**, पु० (रः) विष्ठा. २ गुह्य, उपस्थ.
**अवस्था**, स्त्री० (स्था) कालकृत कांहीं एक विशेष.
**अवहार**, पु० (रः) चोर. २ मगर. ३ द्यूत. ४ युद्ध झाल्यावर तळ देऊन रहाणें. ५ सुसर.
**अवहित्था**, स्त्री० (त्था) आकार गुप्त ठेवणें.
**अवहेलन**, न० (नं) अनादर.
**अवज्ञा**. स्त्री० (ज्ञा) अनादर. २ आज्ञा भंग करणें.
**अवज्ञात**, वि० (तः ता-तं) अपमान केलेला.
**अवाक्पुष्पी**, स्त्री० (ष्पी) शाकविशेष जीस शोपेची भाजी असें म्ह० ती.
**अवाग्भव**, वि० (वः वा-वं) दक्षिण दिशेस झालेला.
**अवाग्र**, वि० (ग्रः ग्रा-ग्रं) खालीं तोंड झालेला.
**अवाक्**, वि० (क्) मुका.
**अवाची**, स्त्री० (ची) दक्षिणदिशा.
**अवाचीन**, वि० (नः ना-नं) दक्षिण दिशेस झालेला. २ विपर्यय.
**अवाच्य**, न० (च्यं) अबद्ध भाषण.
**अवाच्यदेश**, पु० (शः) योनि.
**अवादरंग**, पु० (गः) पिंपळाचें झाड.
**अवार**, न० (रं) नद्यादिकांचें आलीकडचें तीर.
**अवासस्**, वि० (साः साः सः) नग्न, नागवा.
**अवि**, स्त्री० (विः) रजस्वला स्त्री. २ पु० (विः) मेंढा. ३ एडका. ४ पर्वत. ५ सूर्य. ६ नाथ. ७ मूषकंबल, उंदराची कांबळ.
**अविघ्न**, पु० (घ्नः) करवंदाचें झाड.
**अवित**, वि० (तः ता-तं) रक्षित, रक्षण केलेला.
**अविद्धकर्णी**, स्त्री० (र्णी) वनौ० जीस पाडवळी, पाहाडमूळ असें म्हणतात ती.
**अविद्या**, स्त्री० (द्या) अज्ञान.
**अविनीत**, वि० (तः ता-तं) उद्धट, दांडगा.
**अविरतं**, अ० निरंतर.
**अविलंबन**, वि० (नः ना-नं) लौकर जाणारा.
**अविलंबित**, वि० (तः ता-तं) लौकर जाणारा. २ न० (तं) लौकर.
**अविस्पष्ट**, वि० (ष्टः ष्टा-ष्टं) स्पष्ट अर्थ न समजण्याजोगें भाषण.
**अवी**, स्त्री० (वी) रजस्वला स्त्री.
**अवीचि**, पु० (चिः) नरक विशेष.
**अवीर**, पु० (रः) धैर्यरहीत पुरुष.
**अवीरा**, स्त्री० (रा) पतिपुत्ररहीत स्त्री.
**अवेल**, पु० (लः) निषेध वाक्य.
**अवेक्षा**, स्त्री० (क्षा) अवेक्षण, पहाणें.
**अव्यक्त**, पु० (क्तः) विष्णु. २ महादेव. ३ आत्मा. ४ वि० (क्तः क्ता-क्तं) अस्फुट, अस्पष्ट. ५ न० (क्तं) महतत्वादि.
**अव्यक्तराग**, वि० गः गा-गं) अरुण वर्ण, तांबूस, किंचित तांबडा.
**अव्यंडा**, स्त्री० (डा) वनौ० जीस कुवली, कुहिरी असें म्हणतात ती.
**अव्यथ**, पु० (थः) ज्याला कांहीं व्यथा नाहीं तो. २ सर्प.
**अव्यथा**. स्त्री० (था) हिरड्याचें झाड. २

वनौ० जीस पदचारिणी, उत्तर देशीं स्थल कमलिनी असें म्हणतात ती.
**अव्यधिष**, पु० (षः) सूर्य.
**अव्यय**, पु० न० (ऽयं) स्वर्ग. २ ज्यास लिंगादि विकृती होत नाहीं असा जो शब्द तो. ३ पु० (यः) महादेव. ४ विष्णु. ५ न० (यं] कल्याण.
**अव्ययसायवत्**, वि० वती, वत (वान्) निरुद्योगी.
**अव्यवहित**, वि० (तःता-तं) स॰ इत, जवळ.
**अंश**, पु० (शः) भाग, वांटा.
**अंशक**, न० (कं) दिवस. २ पु० (कः) दाईज, भाऊबंद.
**अशन**, न० (नं) भक्षण, खाणें.
**अशनाया**, स्त्री० (या) क्षुधा, भूक.
**अशनायित**, वि० (तःता-तं) बुभुक्षित, भुकेलेला.
**अशनि**, पु० स्त्री० (निःनिः) इंद्राचें आयुद्ध जें वज्र नामें करून प्रसिद्ध आहे तें. २ स्त्री० (तिः) विद्युल्लता, वीज.
**अशित**, वि० (तःता-तं) भक्षित, भक्षण केलेलें.
**अशिर**, पु० (रः) अग्नि. २ राक्षस. ३ सूर्य.
**अशिश्वी**, स्त्री० (श्वी) जीस मूल बाळ नाहीं ती बायको.
**अंशु**, पु० (शुः) किरण. २ प्रभा.
**अंशुक**, न० (कं) बारीक वस्त्र. २ उत्तरीय, अंगावरचें वस्त्र.
**अंशुधर**, पु० (रः) सूर्य.
**अंशुमत्**, पु० (मान्) सूर्य.
**अंशुमती**, स्त्री० (ती) वनौ० जीस सालपर्णी, डाव, डवला, पिठवण असें म्ह० ती.
**अंशुमत्फला**, स्त्री० (ला) कदली, केळ.
**अंशुमालिन्**, पु० (ली) सूर्य.
**अशेष**, वि० (षःषा-षं) समग्र, सर्व.
**अशोक**, पु० (कः) अशोकाचें झाड. २ न० (कं) पारा. ३ वि० (कःका-कं) ज्याला शोक नाहीं तो.
**अशोकरोहिणी**, स्त्री० (णी) वनौ० जीस कुटकी असें म्ह० ती.
**अशोका**, स्त्री० (का) वनौ० जीस केदार, कुटकी असें म्ह० ती.
**अशोच**, पु० (चः) अहंकाररहित.
**अश्मगर्भ**, पु० (र्भः) रत्नविशेष, पाच.
**अश्मज**, न० (जं) ज्यास शिलाजित असें म्ह० तें.
**अश्मंत**, न० (तं) चूल. २ मरण. ३ अशुभ. ४ क्षेत्र. ५ अनवधी.
**अश्मंतक**, पु० न० (कःकं) अपटयाचा वृक्ष. २ मोगरीच्या फुल झाडाचें कांडें.
**अश्मन**, पु० (श्मा) पाषाण, दगड.
**अश्मन**, पु० (नः) अरुण (सूर्याचा सारथी.)
**अश्मपुष्प**, न० (ष्पं) ज्यास शिलाजित असें म्हणतात तें.
**अश्मरिघ्न**, पु (घ्नः) वायवण्याचें झाड.
**अश्मरी**, स्त्री० (री) मूत्रकृच्छ्र रोग.
**अश्मसार**, पु० न० (रःरं) लोखंड. २ पु० (रः) इंद्रनील मणी.
**अश्रप**, पु० (पः) राक्षस.
**अश्रांत**, अ० निरंतर, नित्य.
**अश्रि**, स्त्री० (श्रिः) तरवारीच्या धारेची बाजू.
**अश्री**, स्त्री० (श्री) तरवारीच्या धारेची बाजू.

**अश्रु**, न० (श्रु) नेत्रोदक, डोळ्यांतील पाणी.
**अश्लील**, वि० (लः-ला-लं) शिथिल भाषण
**अश्व**, पु० (श्वः) घोडा. २ पुरुष जाती विशेष. ३ अ० आजच या अर्थी.
**अश्वकर्णक**, पु० (कः) सायल्याचें झाड.
**अश्वत्थ**, पु० (त्थः) पिंपळाचें झाड.
**अश्वत्था**, स्त्री० (त्था) पूर्णिमा तिथी.
**अश्वयुज्**, स्त्री० (क्) अश्विनी नक्षत्र.
**अश्वलाल**, पु० (लः) ब्रम्हसर्प.
**अश्ववडव**, न० (वं) घोडा आणि घोडी यांचा समाहार. २ पु० द्वि० (वौ) ब० वाः घोडे आणि घोड्या.
**अश्ववार**, पु० (रः) घोड्याचा पालक.
**अश्वविक्रयिन्**, पु० (यी) घोडे विकणारा.
**अश्ववित**, पु० (त) नळराज. २ चाबूकस्वार.
**अश्वा**, स्त्री० (श्वा) घोडी.
**अश्वारोह**, पु० (हः) अश्ववाहक, स्वार. २ घोड्यावर बसणें.
**अश्वारोहा**, स्त्री० (हा) वनौ० विशेष.
**अश्वास**, पु० (सः) सुख.
**अश्विन**, पु० द्वि० (नौ) स्वर्गीचे वैद्य जे अश्विनी कुमार ते प्रत्येक.
**अश्विनी**, स्त्री० नी अश्विनी नक्षत्र. २ घोडी.
**अश्विनीसुत**, पु० तः स्वर्गीचे वैद्य जे अश्विनी कुमार ते प्रत्येक.
**अश्वीय**, न० (यं) घोड्यांचा समूह. २ वि० (यः-या-यं) घोड्याला हितकारक पदार्थ.
**अषडक्षीण**, पु० (णः) षट्कर्णी न गेलेला विचार.

**अष्टकांग**, न० (गं) न्यायस्थान.
**अष्टपाद**, पु० (दः) शरभ (प्राणी विशेष.)
**अष्टमूर्ति**, पु० (र्तिः) महादेव.
**अष्टश्रवस**, पु० (सः) महादेव.
**अष्टापद**, पु० न० (दःदं) सोनें. २ सोंगट्यांचा पटः ३ हरीण विशेष.
**अष्टारचक्रवान**, पु० (न्) पूर्वजिन (जैन.)
**अष्टीवत**, पु० (वान) ढोंपर, गुडघा.
**अष्टीवतोधर**, पु० (रः) दानोदक.
**अंस**, पु० (सः) भुजाशिर, खांदा.
**असकृत**, अ० पुनः पुनः ह्या अर्थी.
**असती**, स्त्री० (ती) व्यभिचारिणी स्त्री.
**असतीसुत**, पु० (तः) व्यभिच्यारिणीचा पुत्र.
**असन**, पु० (नः) असणाचें झाड. २ न० (नं) टाकणें.
**असनपर्णी**, स्त्री० (र्णी) गोकर्णीची वेल.
**असमीक्ष्यकारिन**, वि० (री-रिणी-रि-) विचार न करतां कार्य करणारा.
**अंसल**, वि० (लः ला-लं) पुष्ट.
**असंहत**, पु० (तः) सैन्याचा स्थिति विशेष.
**असार**, वि० (रःरा-रं) निर्बळ.
**असि**, पु० (सिः) तलवार, खड्ग.
**असिक्री**, स्त्री० (क्री) राजांच्या स्त्रीगृहीं असणारी व वृद्ध नव्हे अशी जी राजांच्या बायकांनीं निरोप वगैरे सांगोन पाठविण्याच्या कामाची बायको ती. २ नदी विशेष.
**असित**, वि० (तःता-तं) नीलवर्ण, निळा.
**असिताभ्रशेखर**, पु० (रः) बौद्ध भेद.
**असितार्चि**, पु० (र्चिः) अग्नि.
**असिदंष्ट्रक**, पु० (कः) सुसर.
[illegible]

ज्यास शिकलगार, शिकलकर असें म्ह० तो.

**असिधेनुका**, स्त्री० (का) छुरिका, सुरी.

**असिपत्र**, पु० (त्रः) ऊंस. २ तलवारीचें म्यान. ३ नरक विशेष.

**असिपत्रक**, पु० (कः) असिपत्र हा शब्द पहा.

**असिपुच्छक**, पु० (कः) जलचर विशेष.

**असिपुत्री**, स्त्री० (त्री) छुरिका, सुरी.

**असिहेति**, पु० (तिः) खरायोद्धा, निमचेकरी.

**असु**, पु० ब० (सवः) प्राण.

**असुधारण**, न० (णं) प्राण धारण.

**असुर**, पु० (रः) दैत्य. २ सूर्य.

**असुरा**, स्त्री० (रा) रात्र. २ राश (मेषादि.)

**असूर्क्षण**, न० (णं) अनादर.

**असूया**, स्त्री० (या) गुणावर दोषाचा आरोप करणें.

**असृक्धरा**, स्त्री० (रा) चर्म, चामडें.

**असृज**, न० (क्) रक्त. २ योगभेद.

**असेचनक**, वि० (कःका·कं) जी वस्तु पहातां पहातां अधिकाधिक पहावी असें वाटून मनाची तृप्तिच होत नाहीं ती.

**असौम्यस्वर**, वि० (रःरा·रं) ज्याचा स्वर कावळ्याच्या स्वरा सारिखा कर्कश असतो तो.

**अस्त**, पु० (स्तः) अस्ताचल पर्वत. २ वि० (स्तःस्ता·स्तं) प्रेरणा केलेला ३ न० (स्तं) त्यक्त, टाकलेलें. ४ समाप्त. ५ पाप.

**अस्तं**, अ० दर्शनाभाव ह्या अर्थी. उ० सायमस्तमितोरविः

**अस्ताद्रि**, पु० (द्रिः) अस्ताचल.

**अस्ति**, अ० आहे ह्या अर्थी. उ० अस्तिपरलोक मतिर्यस्यस आस्तिकः

**अस्तु**, अ० असूया पूर्वक स्वीकार ह्या अर्थी. उ० तयाभिधस्तावदशेषमस्तुनः २ पु० स्त्री० (स्तुः स्तुः) कोप. ३ पीडा. ४ अ० प्रशंसा. ५ उत्कर्ष. ६ लक्षण. ७ प्रतिक्षेप.

**अस्तुक**, पु० (कः) मोक्ष.

**अस्त्यान**, न० (नं) निंदा.

**अस्त्र**, न० (स्त्रं) शस्त्र. २ धनुष्य. ३ तलवार.

**अस्त्रकंटक**, पु० (कः) बाण.

**अस्त्रिन**, पु० (स्त्री) धनुर्धर. २ शस्त्र धारण करणारा.

**अस्थाय**, न० (यं) अगाधजल.

**अस्थिभक्ष**, पु० (क्षः) कुत्रा.

**अस्थिमाली**, पु० (लीः) महादेव.

**अस्थिर**, वि० (रःरा·रं) चंचल.

**अस्थिविग्रह**, पु० (हः) शिवगण.

**अस्थिसंहार**, पु० (रः) वृक्ष वि०.

**अस्फुटवाच**, वि० (क्) स्पष्ट न बोलणारा.

**अस्त्र**, न० (स्रं) रक्त. २ नेत्रोदक. ३ पु० (स्रः) केंस. ४ कोन, कोंपरा.

**अस्त्रप**, पु० (पः) राक्षस.

**अस्त्रपा**, स्त्री० (पा) जळू. २ डाकिनी, क्षुद्र देवता.

**अश्रु**, न० (श्रु) नेत्रोदक.

**अश्वच्छंद**, वि० (दःदा·दं) परस्वाधीन.

**अस्वप्न**, पु० (प्नः) देव.

**अस्वर**, वि० (रःरा·रं) ज्याचा स्वर कावळ्याच्या स्वरा सारखा कर्कश असतो तो.

**अस्वाध्याय**, पु० (यः) निराकृति.

**अह**, अ० प्रशंसा. २ स्वीकार न करणें ह्या अर्थी.

**अहंकार**, पु० (रः) गर्व.

**अहंकारवत**, वि० (वान्-वती-वत्) अहंकारी.

**अहंति**, स्त्री० (तिः) दान, देणें. २ त्याग. ३ रोग.

**अहन**, न० (हः) दिवस.

**अहंपूर्विका**, स्त्री० (का) मी पुढें होतों अशा आग्रहानें पुढें सरून केलेलें जें युद्ध तें.

**अहंमति**, स्त्री० (तिः) अज्ञान.

**अहमहमिका**, स्त्री० (का) मी समर्थ मी समर्थ असा जो अहंकार विशेष तो.

**अहंयु**, वि० (युःयुःयु) अहंकारी.

**अहर्गण**, पु० (णः) महिना.

**अहर्पति**, पु० (तिः) सूर्य.

**अहर्मुख**, न० (खं) प्रातःकाळ.

**अहल्या**, स्त्री० (ल्या) अप्सरा विशेष. २ गौतमऋषीची स्त्री.

**अंहस**, न० (हः) पाप.

**अहस्कर**, पु० (रः) सूर्य.

**अहह**, अ० अद्भुत, आश्चर्य. २ खेद ह्या अर्थी. उ० अहहबुद्धि प्रकर्षोराज्ञः २ अहहनीतो दूतेनमयाकालः ३ क्लेश. ४ संबोधन.

**अहार्य**, पु० (र्यः) पर्वत.

**अहि**, पु० (हिः) सर्प. २ वृत्रनामा दैत्य, वृत्रासुर. ३ पोटावरचा भोंवरा.

**अहित**, पु० (तः) शत्रु.

**अहितुंडिक**, पु० (कः) गारुडी.

**अहिद्विट**, पु० (टः) गरुड. २ इंद्र ३ मोर. ४ मुंगूस.

**अहिपुत्रक**, पु० (कः) नावेंतील पाणी उपसणारा.

**अहिभय**, न० (यं) प्रधानापासून जें राजास भय तें.

**अहिभुज**, पु० (क्) गरुडपक्षी. २ मयूर, मोर.

**अहीरणि**, पु० (णिः) दुतोंड्या सर्प.

**अहेरु**, स्त्री० (रुः) वनौ० जीस शतावरी असें म्ह० ती.

**अहो**, अ० शोक. २ विषाद. ३ संबोधन. ४ प्रशंसा. ५ आश्चर्य. ६ पद पूरण. ७ गुणाच्या ठिकाणीं दोष लावणें. ८ वितर्क.

**अहोवत**, अ० दया. २ खेद. ३ संबोधन.

**अहोरात्र**, पु० (त्रः) तीस मुहूर्तरूप जो काल विशेष तो. (मनुष्यांचा एक महिना तो पितरांचा एक अहोरात्र, त्यांत शुक्लपक्ष दिवस आणि कृष्ण पक्ष रात्र. तसेंच मनुष्यांचें एक वर्ष, तो देवांचा एक अहोरात्र. त्यांत उत्तरायण दिवस आणि दक्षिणायन रात्र.)

**अक्ष**, पु० (क्षः) तोळा.* २ खेळण्याचें साधन जो फांसा तो. ३ बिबव्याचें झाड. ४ चक्र, चाक. ५ व्यवहार. ६ बेहडा. ७ लवण विशेष ज्यास संचळखार असें म्ह० तें. ८ इंद्रिय. ९ सुरमा. १० पु० (क्षः) जाणलेला जो अर्थ तो. ११ गाडा. १२ रुद्राक्ष. १३ भद्राक्ष. १४ सर्प. १५ गाडीचा कणा, आंस.

**अक्षत**, न० (तं) लाह्या. २ नपुंसक. ३ वि० (तःता-तं) न मारलेला. ४ जव (धान्य विशेष) ५ छिद्ररहित जें तें.

**अक्षता**, स्त्री० (ता) ओले तांदूळ. २ यव

*८० गुंजा = १ तोळा.

**अक्षदर्शक**, पु० (कः) न्यायाधीश.

**अक्षदेविन्**, पु० (वी) फांशांनीं खेळणारा. २ सोंगटीबाज, जुवेबाज इत्यादि.

**अक्षधूर्त**, पु० (र्तः) फांशांनीं खेळणारा. २ जुवेबाज.

**अक्षपाद**, पु० (दः) गौतमऋषी. ५ नैयायिक.

**अक्षमाला**, स्त्री० (ला) रुद्राक्षांची माळ. २ अरुंधति.

**अक्षर**, न० (रं) मोक्ष. २ आकारादि वर्ण. ३ परब्रम्ह. ४ आकाश. ५ धर्म. ६ तप. ७ वस्त्र. ८ मूल कारण. ९ पु० (रः) महादेव.

**अक्षरचरण**, पु० (णः) लेखक.

**अक्षरचुंचु**, पु० (चुः) लेखक.

**अक्षरमुख**, पु० (खः) ज्यानें आध्ययन पढलेलें आहे तो.

**अक्षरविन्यास**, पु० (सः) लिपि.

**अक्षरसंस्थान**, न० (नं) लिपि.

**अक्षररूचक**, न० (कं) लवण विशेष ज्यास सोर मीठ असें म्ह० तें.

**अक्षवती**, स्त्री० (ती) घूत. २ निर्जीव पदार्थांचा खेळ.

**अक्षवाट**, पु० (टः) तालमीची जागा.

**अक्षांति**, स्त्री० (तिः) ईर्षा.

**अक्षिकूटक**, न० (कं) हत्तीच्या डोळ्यांतील बुबुळ.

**अक्षिगत**, वि० (तः ता-तं) द्वेष करावयास योग्य.

**आक्षिन**, न० (क्षि) नेत्र, डोळा.

**अक्षिव**, न० (वं) समुद्रापासून झालेलें मीठ.

**अक्षीव**, न० (वं) समुद्रापासून झालेलें मीठ. २ शेवग्याचें झाड. ३ वि० (वः वा-वं) उन्मत्त झालेला.

**अक्षोट**, पु० (टः) डोंगरी अक्रोडाचें झाड.

**अक्षौहिणी**, स्त्री० (णी) दहा अनीकिनी* सेना.

**अज्ञ**, वि० (ज्ञः-ज्ञा-ज्ञं) मूर्ख. २ जड.

**अज्ञान**, न० (नं) अयथार्थ ज्ञान, भ्रांति. २ मूर्खत्व.

## आ.

**आ**, अ० स्मृति. २ वाक्यपूरण ह्या अर्थी उ० आएवंकिलतत्. २ आएवंमन्यसे. ३ दया. ४ समुच्चय. ५ पु० ब्रम्हदेव. ६ पूजा. ७ मांगल्य.

**आं**, अ० ज्ञान. २ निश्चय. ३ स्मृति. ४ स्वीकार ह्या अर्थी.

**आः**, अ० पीडा. २ कोप ह्या अर्थीं उ० आः शीतं. २ आः पाप किंविकत्थसे. ३ स्मरण. ४ दूर करणें. ५ संताप. ६ वाक्य. ७ दया. ८ समुच्चय.

**आकंपित**, वि० (तःता-तं) किंचित कांपलेला.

**आकर**, पु० (रः) रत्नादिकांची खाण. २ श्रेष्ठ. ३ समूह.

**आकर्ष**, पु० (र्षः) फांसे, सोंगटया वगैरे जे निर्जीव पदार्थ त्यांचा खेळ. २ फांस ३ सोंगटयाचा पट. ४ कोदंडाभ्यास वस्तु. ५ तिरकमठा. ६ आकर्षण.

---

* १ अनीकिनी = { २१८७ हत्ती. २१८७ रथ. ६५६१ घोडे. १०९३५ पायदळ. }

**आकलन**, न० (नं) आकांक्षा. २ बंधन.

**आकल्प**, पु० (ल्पः) अलंकारयुक्त शोभा. २ चिंताप्रकार.

**आकाशमूली**, स्त्री० (ली) जलकुंभी ह्या-च नांवानें प्रसिद्ध आहे.

**आकार**, पु० (रः) आकृति. २ अभिप्राया-नुरूप वागणें.

**आकारगुप्ति**, स्त्री० (प्तिः) शोकादिकें-करून मुखाची ग्लानी झाली असतां तो ग्लानीचा आकार छपावणें.

**आकारणा**, स्त्री० (णा) आमंत्रण, बोला-वणें.

**आकाश**, पु० न० (शःशं) आवकाश, पो-कळी.

**आकीर्ण**, वि० (र्णःर्णा-र्णं) अत्यंत मिश्रित, फार मिसळलेलें.

**आकुल**, वि० (लःला-लं) व्याकूळ.

**आकुला** स्त्री० (ला) मोठी लहरी.

**आकृति**, स्त्री० (तिः) जाती. २ रूप, आ-कार. ३ सामान्य. ४ शरीर.

**आक्रंद**, पु० (दः) युद्धांमध्यें योध्यांचा शब्द. २ रडणें. ३ मित्र. ४ दारुण युद्ध. ५ भाऊ. ६ पीडिताचा शब्द. ७ रक्षण करणारा.

**आक्रीड**, न० (डं) पु० (डः) स्त्रियांशीं क्रीडा करण्याची राजे लोकांची एक रम्य जागा.

**आक्रोड**, पु० (डः) डोंगरी आक्रोडाचें झाड.

**आक्रोश**, पु० (शः) शिव्या देणें.

**आक्रोशन**, न० (नं) शापोक्ति, शिव्या देणें.

**आखंडल**, पु० (लः) इंद्र.

**आखनिक**, पु० (कः) चोर. २ डुकर. ३ उंदीर.

**आखु** पु० (खुः) उंदीर.

**आखुभुज**, पु० (क्) मांजर.

**आखेट**, पु० (टः) शिकार, पारध.

**आख्या**, स्त्री० (ख्या) नाम, नांव.

**आख्यात**, वि० (तःता-तं) उक्त, बोललेलें, सांगितलेलें. २ भाषण केलेलें.

**आख्यायिका**, स्त्री० (का) अनुभूतार्थाचें प्रतिपादन करणारे जे वासवदत्तादि ग्रंथ ते. २ परिच्छेद. ३ कथा. ४ गोष्ट.

**आंग**, न० (गं) कोमल अंग.

**आगंतुक**, न० (कं) अकस्मात आलेला, आगांतुक.

**आगम** पु० (मः) शास्त्र.

**आगस्**, न० (गः) अपराध. २ पाप.

**आगांतु**, वि० (तुःतुःतु) अतिथि.

**आगार**, न० (रं) घर.

**आंगिक**, वि० (कःका-कं) शरीराच्या अवयवा-पासून झालेलें (कर्म) इत्यादि.

**आंगिरस**, पु० (सः) बृहस्पति.

**आगू**, स्त्री० (गूः) स्वीकार.

**आग्नीध्र**, पु० (ध्रः) ऋत्विज विशेष. २ सू-र्य वंशांतील राजा.

**आग्रह**, पु० (हः) शक्ति. २ स्नेह. ३ अनु-ग्रह. ४ तत्परता. ५ घेणें.

**आग्रहायणिक**, पु० (कः) मार्गशीर्ष महिना.

**आग्रहायणी**, स्त्री० (णी) मृगशीर नक्षत्र.

**आघात**, पु० (तः) वधाचें स्थळ.

**आघातन**, न० (नं) वधाचें स्थळ.

**आचमन**, न० (नं) हातावर पाणी घेऊन

स्नान संध्या इत्यादि कांहीं कर्म करते वेळीं जें प्राशन करितात तें.

**आचमनक**, न० (कः) संधेचीपळी.

**आचाम**, पु० (मः) भाताची पेज.

**आचार्य**, पु० (र्यः) जो वेदमंत्रांची व्याख्या करितो तो. २ द्रोणाचार्य. ३ ऋषि.

**आचार्या**, स्त्री० (र्या) वेदमंत्रांची व्याख्या करणारी स्त्री.

**आचार्याणी**, स्त्री० (णी) आचार्याची बायको.

**आचित**, पु० (तः) दहा भार*. २ गाड्यानें वाहण्याजोगा जो भार तो. ३ संग्रह केलेला. ४ वि० (तःता-तं) आच्छादलेला.

**आछादन**, न० (नं) स्वरूप न दिसे असें करणें. २ वस्त्र. ३ वस्त्रादिकें करून जें वेष्टन तें.

**आछुरितक**, न० (कं) साभिप्राय जें अधिक हास्य तें. २ नखानें ओरबडणें. ३ नखसंबंधी व्रण.

**आछोदन**, न० (नं) पारध, शिकार.

**आजक**, न० (कं) बकऱ्यांचा समूह.

**आंजन**, पु० (नः) पाल.

**आंजनेय**, पु० (यः) मारुति.

**आजानेय**, पु० (यः) जो कुलीन म्हणजे जातिवंत घोडा तो.

**आजि**, स्त्री० (जिः) युद्ध. २ समभूभाग, सपाट भूमी.

**आजीव**, पु० (वः) जीवन, जिविका.

**आजू**, स्त्री० (जूः) नरकामध्यें बलात्कारानें टाकणें. बिन पैसा चाकरी करणें असें मुकुटाचें मत आहे. भद्राख्यकरण असें हीं कोणीं म्हणतात.

**आज्य**, न० (ज्यं) तूप.

**आङ्**, अ० किंचित. २ अभिव्याप्ति. ३ मर्यादा ह्या अर्थी. उ० आपिंगलः २ असत्य लोकात्. ३ आसमुद्रं राजदंडः ४ क्रियेशीं ह्या अव्ययाचा संबंध असला तर कांहीं अर्थांतर होतें. उ० आहरति.

**आटि**, पु० (टिः) आडी पक्षी विशेष.

**आटीकन**, न० (नं) वासराचें गमन.

**आटीलक**, न० (कं) मुलांची खेळावयाची जागा.

**आटोप**, पु० (पः) धांदल, घाई.

**आडंबर**, पु० (रः) संग्राम ध्वनि, लढाईमध्यें जो लोकांचा गलबला तो. २ समारंभ. ३ हत्तीची गर्जना. ४ वाद्यांचा शब्द. ५ आरंभ.

**आढक**, पु० (कः) न० (कं) पायली. (गणितावलि ग्रंथांत द्रोण चतुर्थांश म्हणजे दोन पायल्यांस आढक असें म्हटलें आहे.)

**आढकिक**, वि० (कः का- कं) आढक परिमित धान्य रहाण्याचें किंवा उत्पन्न होण्याचें (क्षेत्रादि).

**आढकिका**, स्त्री० (का) तुवरिका, तूर नांवाचें धान्य. २ आढक परिमित धान्याची (जमीन इत्यादि.)

**आढकी**, स्त्री० (की) तूर नांवाचें धान्य.

**आढ्य**, वि० (ढ्यः ढ्या-ढ्यं) धनाढ्य, बहुधनी.

**आणक**, वि० (कः का-कं) अधम, निकृष्ट.

**आणि**, स्त्री० (णिः) गाडीस चाक रहाण्याकरितां कण्याच्या शेवटास जी खिळी असते ती.

**आतंक**, पु० (कः) रोग. २ भय. ३ संताप. ४ शंका. ५ मृदंगध्वनि.

* ८००० गुंजा एक भार.

**आतंचन**, न० (नं) प्रतीवाप, दुग्धादिकांत ताकादि घालणें. २ वेग. ३ तृप्त करणें. ४ वायु.

**आततायिन्**, वि० (यी. यिनी- यि) कवच धारण करून मारण्यास जो उद्युक्त झाला तो.

**आतप**, पु० (पः) सूर्याच्या किरणाची तप्तता. २ (प्रभामात्र असेंही कोणीं म्हणतात.)

**आतपत्र**, न० (त्रं) छत्र, छत्री. २ अबदागीर.

**आतर**, पु (रः) नद्यादिकांच्या उताराबद्दल जें मोल तें.

**आतर्पण**, न० (णं) तृप्ति. २ मंगलाकर्यार्थ आंगाला उटणें लावणें.

**आतापिन्**, पु० (पी) घार (पक्षी) २ आतापी नांवाचा राक्षस.

**आतायिन्**, पु० (यी) घार (पक्षी)

**आतिथि**, पु० (थिः) कुशपुत्र.

**आतिथेय**, वि० (यः या- यं) अतिथींविषयीं दयाळू.

**आतिथ्य**, वि० (थ्यः थ्या- थ्यं) अतिथीकरितां जी वस्तु किंवा कर्म तें. २ अतिथी.

**आतुर**, वि० (रः रा. रं)- रोगी २ व्याप्त.

**आतोद्य**, न० (द्यं) वाद्य.

**आत्तगंध**, वि० (धः धा- धं) ज्याचा गर्व गेला तो.

**आत्तगर्व**, वि० (र्वः र्वा- र्वं) ज्याचा गर्व गेला तो.

**आत्मगुप्ता**, स्त्री० (प्ता) वनौ० जीस कुवली, कुहरी असें म्ह० ती.

**आत्मघोष**, पु० (षः) काकपक्षी, कावळा.

**आत्मज**, पु० (जः) पुत्र, मुलगा.

**आत्मजा**, स्त्री० (जा) कन्या.

**आत्मन्**, पु० (त्मा) देह, शरीर. २ यत्न. ३ कांति. ४ धैर्य. ५ बुद्धि. ६ शरीरादिदेवत आत्मा. ७ स्वभाव. ८ परमात्मा. ९ मन. १० परव्यावर्तन. ११ आकलन. १२ निर्बंध. १३ परिसंख्या. १४ जीव.

**आत्मंभरि**, वि० (रिः रिः रि ) आपलें पोट भरणारा.

**आत्मभू**, पु० (भूः) ब्रम्हदेव. २ मदन, काम.

**आत्मयोनी**, पु० (नी) ब्रम्हदेव. २ मदन, काम.

**आत्मवीर**, पु० (रः) विदूषक.

**आत्रेयी**, स्त्री० (यी) रजस्वला स्त्री. २ नदीविशेष. ३ पु० (यी) आत्रेयी मुनि.

**आथर्वण**, न० (णं) अथर्वांचा समूह.

**आदर**, पु० (रः) आदर. २ आरंभ. ३ सत्कार.

**आदर्श**. पु० (र्शः) दर्पण, आरसा. २ प्रत्यंतर. ३ टीका (ग्रंथांवर वगैरे करितात ती.)

**आदान**, न० (नं) घोड्याचा अलंकार. २ घेणें.

**आदि**, पु० (दिः) आद्य, प्रथम.

**आदिकवि**, पु० (विः) वाल्मीक ऋषी.

**आदिकारण**, न० (णं) मूळकारण.

**आदितेय**, पु० (यः) देव.

**आदित्य**, पु० (त्यः) देव. २ देवांचा गणविशेष. ३ सूर्य.

**आदिदेव**, पु० (वः) विष्णु.

**आदिराज**, पु० (जः) पृथुराजा.

**आदिवराह**, पु० (हः) विष्णु.

**आदिष्ट**, वि० (ष्टः-ष्टा-ष्टं) दाखीवलेला. २ आज्ञा केलेला. ३ न० (ष्टं) मरणचिन्ह. ४ शुभ. ५ उच्छिष्ट.

**आदीनव**, पु० (वः) क्लेश. २ दोष. ३ वाईट परिणाम.

**आदृत**, वि० (तः ता- तं) आदरयुक्त. २ पूजित, मान्य.

**आद्य**, वि० (द्यः द्या- द्यं) प्रथम.

**आद्यमापक**, पु० (कः) शास्त्रसिद्ध. २ तोळा=८० गुंजा.

**आद्यून**, वि० ( नः ना- नं ) बुभुक्षित, भुकेलेला.

**आंधसिक**, पु० (कः) सैपाकी, आचारी.

**आधानिक**, न० (कं) गर्भाधानसंस्कार.

**आधार**, पु० (रः) बांध, धरण. २ अधिकरण. ३ आश्रय.

**आधार्मिक**, पु० (कः) अधर्मानें वागणारा.

**आधि** पु० (धिः) मनोव्यथा, मनास जें दुःख तें. २ धनकोनामाकडे ऋण फिटे पर्यंत रिणकोनाम जी वस्तु विश्वासार्थ ठेवितो ती, गहाण. ३ आपत्ति, विपत्ति. ४ अधिष्ठान. ५ स्त्री० (धिः) आशा.

**आधिमन्यव**, पु० (वः) ज्वराग्नि.

**आधूत**, वि० (तःता-तं) किंचित कंपित, कांहीं कापलेला.

**आधोरण**, पु० (णः) हस्तिपक, महात.

**आध्मात**, पु० (तः) आवाज झालेला. २ दग्ध. ३ ज्यास वातरोग झाला आहे तो.

**आध्यान**, न (नं) स्मरण.

**आनक**, पु० (कः) न० (कं) पटह नावाचें वाद्य. २ पु० (कः) भेरी नावाचें वाद्य. ३ मृदंग. ४ गर्जना करणारा मेघ.

**आनकदुंदुभि**, पु० (भिः) पु० वसुदेव.

**आनत**, वि० (तःता-तं) खालीं तोंड झालेला.

**आनंद**, पु० (दः) हर्ष.

**आनंदथु**, पु० (थुः) हर्ष.

**आनंदन**, न० (नं) स्वागत विचारून कृत जो आनंद तो. २ (आमंत्रण असाही क्वचित पाठ आहे.)

**आनंदपट**, पु० (टः) नूतन स्त्रीचें वस्त्र.

**आनद्ध**, न० (द्धं) मृदंग, पटह असे प्रकारचीं जीं वाद्यें तीं प्रत्येक. २ बद्ध, बांधलेला.

**आनन**, न० (नं) मुख, तोंड.

**आनर्त**, पु० (र्तः) नाचण्याची जागा. २ युद्ध. ३ देश विशेष. (हा पश्चिम समुद्राच्या तिरीं जो द्वारावती देश आहे तो असावा.) ४ जल, पाणी.

**आनाय**, पु० (यः) जाळें.

**आनाय्य**, पु० (य्यः) गार्हपत्याग्नींतून विस्तव आणून जो दक्षिणाग्नि केला तो.

**आनाह**, पु० (हः) मलमूत्रनिरोध, ज्यास मलबद्ध रोग असें म्ह० तो. २ लांबी.

**आनुपूर्व**, न० (र्वं) अनुक्रम.

**आनुपूर्वी**, स्त्री० (र्वी) अनुक्रम.

**आनुपूर्व्य**, न० (र्व्यं) अनुक्रम.

**आन्वीक्षिकी**, स्त्री० (की) गौतम प्रणित तर्कशास्त्र. २ न्यायशास्त्र.

**आन्हिक**, न० (कं) स्नानसंध्यादि नित्यकर्म. २ दिवसास केलेलें (कर्म वगैरे.) ३ भोजन. ४ ग्रंथाच्या संधी ( मोठे भाग.)

**आन्हिका**, स्त्री० (का) नित्यक्रिया.

**आपक्व**, न० (क्वं) पोळी, रोटी. २ अर्ध

शिजलेलें. ३ पिकण्याचे योग्यतेस आलें, पाडाचें. ४ भाकरी.

**आपगा,** स्त्री० (गा) नदी.

**आपण,** पु० (णः) बाजार.

**आपणिक,** पु० (कः) क्रय विक्रये करून उपजीविका करणारा, वाणी.

**आपत्ति,** स्त्री० (त्तिः) आपदा.

**आपत्प्राप्त,** वि० (प्तः-प्ता-प्तं) आपत्ति पावलेला.

**आपद,** स्त्री० (द्) आपत्ति विपत्ति.

**आपदा,** स्त्री० (दा) आपत्ति, विपत्ति.

**आपन्न,** वि० (न्नः-न्ना-न्नं) आपत्ति पावलेला. २ प्राप्त. ३ न० (न्नं) प्रेम.

**आपन्नसत्वा,** स्त्री० [त्वा] गरोदर बायको.

**आपमित्यक,** न० [कं] मोबदला देऊन आणलेली वस्तु.

**आपवरक,** न० [कं] गृहमध्यभाग.

**आपस्,** स्त्री० ब० (पः) उदक, पाणी.

**आपात,** पु० (तः) पतन, पडणें. २ वर्तमानकाल.

**आपान,** न० (नं) मद्यप्राशनार्थ जेथें मंडळी जमली असते ती सभा.

**आपीड,** पु० (डः) शेंडींत किंवा वेणींत गुंफलेलें फूल किंवा माळ.

**आपीन,** न० (नं) गोस्तन, ओटी, कास.

**आपुप्य,** पु० (प्यः) शिजलेला भात.

**आपूपिक,** वि० (कः-का कं) वडे घारगे इत्यादि तळलेले भक्ष्य पदार्थ करणारा.

**आप्त,** वि० (प्तः-प्ता प्तं) विश्वासू. २ स्नेही. ३ बंधुवर्ग. ४ प्राप्त, मिळलेलें. ५ हित.

**आप्ति,** स्त्री० (प्तिः) स्त्रीसंगती. २ उत्तम प्रकारची प्राप्ति.

**आप्य,** वि० (प्यः-प्या प्यं) जलविकार (लाट, भोंवरे इ०) २ न० (प्यं) वनौ० कडु कोष्ठ. ३ गोडें कोष्ठ.

**आप्यायन,** न० (नं) संतुष्ट करणें.

**आप्रच्छन,** न० (नं) स्वागत विचारून कृत जो आनंद तो. २ (आमंत्रण असा क्वचित पाठ आहे.)

**आप्रपदीन,** वि० (नः-ना-नं) पायांच्या शेवटापर्यंत पोंचणारें. (वस्त्रादि.)

**आप्लव,** पु० (वः) स्नान.

**आप्लवव्रतिन्,** पु० (ती) सोडमुंज झालेला जो वेदव्रती तो.

**आप्लाव,** पु० (वः) स्नान.

**आप्लुत,** पु० (तः) स्नान केलेला. २ सोडमुंज झालेला ब्रम्हचारि.

**आबद्ध,** पु० (द्धः) अलंकार. २ वि० (द्धः द्धा-द्धं) बळकट बांधणें.

**आबंध,** पु० (धः) जूं बांधण्याची दोरी जीस जुंकणी, जोतें असें म्ह० ती.

**आबाधा,** स्त्री० (धा) वेदना, दुःख.

**आंबिकेय,** पु० (यः) धृतराष्ट्र.

**आभरण,** न० (णं) अलंकार, भूषण.

**आभाषण,** न० (णं) परस्पर संबोधन पूर्वक जें भाषण तें.

**आभास्वर,** पु० (रः) देवांचा गणविशेष.

**आभिजन,** पु० (नः) कूळ. २ प्रसिद्ध.

**आभीर,** पु० (रः) गवळी.

**आभीरपल्ली,** स्त्री० (ल्ली) गवळ्यांचा गांव किंवा घर.

**आभीरी,** स्त्री० (री) गवळण.

**आभील,** न० (लं) शरीर पीडा. वि० (लः ला-लं) भयंकर.

**आभोग,** पु० (गः) सर्व उपचारांही करून परिपूर्णता. २ यत्न. ३ वरुणछत्र.

**आम**, वि० (मःमा-मं) अपक्व, कच्चें. २ पु० (मः) रोग.

**आमगंधि**, वि० (धिःधी.धि) अपक्व मांसादिकाच्या गंधासारिखा ज्यास गंध आहे तो.

**आमंड**, पु० (डः) एरंडाचें झाड.

**आमंत्रण**, न० (णं) बोलावणें.

**आमंद**, पु० (दः) वासुदेव. २ कोणत्याही कामाविषयीं दक्ष.

**आमंदा**, स्त्री० (दा) खाटेचा भेद, बाजेचा भेद.

**आमनस्य**, न० (स्यं) दुःख. २ वैमनस्य.

**आमय**, पु० (यः) रोग. २ आंतडें.

**आमयाविन्**, वि०(वी विनी-वि) रोगी.

**आमलक**, पु० न० (कः-कं) आंवळीचें झाड. २ आंवळीचें फळ, आंवळा.

**आमलकी**, स्त्री० (की) आंवळीचें झाड.

**आमिष**, पु० न० (षः-षं) मांस. २ लांच. ३ नजराणा. ४ भोग्य वस्तु. ५ संभोग.

**आमिषाशिन्**, वि० (शी-शिनी-शि) मत्स्य मांस भक्षण करणारा.

**आमिक्षा**, स्त्री० (क्षा) तापलेल्या दुधास दह्याच्या योगानें जी विकृति होते ती.

**आमुक्त**, वि० (क्तःक्ता-क्तं) आंगांत आंगरखा वगैरे घातलेला.

**आमुष्यायण**, पु० (णः) विख्यात, २ ज्ञाता.

**आमोद**, पु० (दः) हर्ष, आनंद. २ फारच मनोहर जो कस्तूर्यादिकांचा गंध तो.

**आमोदिन्**, पु० (दी) मुखास सुवासिक करणारें जें तांबुलादि द्रव्य तें.

**आम्नाय**, पु० (यः) गुरु परंपरागत जो सदुपदेश तो. २ वेद.

**आम्र**, पु० (म्रः) आंब्याचें झाड.

**आम्रातक**, पु० (कः) आंबाड्याचें झाड.

**आम्रेडित**, न० (तं) दोन तीन वेळां बोललेला शब्द. उ० सर्प सर्प इत्यादि.

**आम्लिका**, स्त्री० (का) चिंचेचें झाड.

**आम्लीका**, स्त्री० (का) चिंचेचें झाड.

**आयत**, वि० (तःता-तं) दीर्घ, लांब.

**आयतछदा**, स्त्री० (दा) केळ.

**आयतन**, न० (नं) यज्ञस्थानविशेष. २ स्थान, जागा.

**आयति**, स्त्री० (तिः) उत्तरकाळ. २ दैर्घ्य, लांबी. ३ योगसाधन विशेष. ४ प्रभाव. ५ सामर्थ्य.

**आयत्त**, वि० (त्तःत्ता-त्तं) स्वाधीन.

**आयत्ति**, स्त्री० (त्तिः) स्नेह. २ वशीकरण. ३ दीर्घ. ४ पुढें येणारा काळ. ५ बळ. ६ पु० (त्तिः) इंद्र.

**आयःशुलिक**, न० (कं) तीक्ष्णकर्मी.

**आयस्कर**, पु० (रः) हत्तीची मांडी.

**आयस्त**, पु० (स्तः) शिकल केलेले, चकचकीत केलेलें. २ त्यक्त, टाकलेलें. ३ क्लेश दिलेला. ४ रागिट. ५ मारलेला.

**आयाम**, पु० (मः) दैर्घ्य, लांबी.

**आयुध**, न० (धं) शस्त्र.

**आयुधिक**, वि० (कःका-कं) आयुधजीवी, शस्त्रवृत्तीनें उपजीविका करणारा.

**आयुधीय**, वि० (यःया-यं) शस्त्रवृत्तीनें उपजीविका करणारा.

**आयुष्मत्**, वि० (ष्मान् ष्मती-ष्मत) ज्यास पुष्कळ आयुष्य आहे तो. २ पु० (ष्मान्) योग भेद.

**आयुस्**, न० (युः) आयुष्य.

**आयोधन**, न० (नं) युद्ध. २ वध.

**आर**, पु० (रः) मंगळ नांवाचा ग्रह. २ शनी ग्रह.

**आरकूट**, पु० न० (टः-टं) पितळ.

**आरग्वध**, पु० (धः) बाहव्याचें झाड.

**आरति**, स्त्री० (तिः) उपरति, निवृत्ति, शांति.

**आरद्रवस्त्र**, न० (स्त्रं) ओलें वस्त्र.

**आरनालक**, न० (कं) कांजी.

**आरंभ**, पु० (भः) प्राथमिकक्रिया, प्रारंभ. २ त्वरा. ३ वध. ४ दर्प. ५ ग्रंथादिकांची प्रस्थावना. ६ उद्योग.

**आरव**, पु० (वः) शब्द.

**आरा**, स्त्री० (रा) चांबडें कापण्याचें एक शस्त्र ह्यास आरी असें म्ह० ती.

**आरात्**, अ० दूर. २ समीप ह्या अर्थी. उ० आराच्छत्रोः सदावसेत्. २ सत्त्वायंस्थापयेदारात्.

**आराधन**, न० (नं) निष्पादन. २ लाभ. ३ संतोष. ४ पचन. ५ आराधन. ६ सेवा.

**आराम**, पु० (मः) बाग, बागशाई.

**आरालिक**, पु० (कः) सैंपाकी, आचारी.

**आराव**, पु० (वः) शब्द.

**आराक्ष**, पु० (क्षः) गंडस्थल.

**आरु**, पु० (रुः) कर्क राश.

**आरेवत**, पु० (तः) बाहव्याचें झाड.

**आरोग्य**, न० (ग्यं) रोगाभाव, आरोग्य.

**आरोह**, पु० (हः) वस्त्रादिकांची लांबी. २ उंची. ३ चांगल्या सुंदर बायकोची कंमर. ४ हत्तीवर चढणें. ५ चढणें. ६ वृक्षाच्या फांदीचें पाळ, पारंबा.

**आरोहण**, न० (णं) सोपान, पायरी. २ चढणें.

**आरोहा**, स्त्री० (हा) शिडी.

**आर्तगल**, पु० (लः) निळा कोरंटा.

**आर्तव**, न० (वं) स्त्रीरज, न्हाण. २ पुष्प. ३ वि० (वः-वा-वं) ऋतुज (कोणत्याही ऋतुमध्यें झालेला पदार्थ वगैरे.)

**आर्ति**, स्त्री० (र्तिः) धनुष्याचें अग्र. २ पीडा.

**आर्थक**, पु० (कः) प्रारंभ, आरंभ.

**आर्द्र**, वि० (र्द्रः-र्द्रा-र्द्रं) क्लिन्न, भिजलेला, ओला.

**आर्द्रक**, न० (कं) आलें.

**आर्द्रा**, स्त्री० (र्द्रा) आरद्रा नक्षत्र.

**आर्य**, वि० (र्यः-र्या-र्यं) कुलीन. २ सज्जन. ३ श्रेष्ठ.

**आर्यक**, न० (कं) पितृकार्य (श्राद्धादिक अथवा कर्तव्यकर्म.)

**आर्या**, स्त्री० (र्या) पार्वती.

**आर्यावर्त**, पु० (र्तः) विंध्याद्रि व हिमाचल ह्यांमधील देश.

**आर्षभ्य**, पु० (भ्यः) तरुण दशेस आलेला बैल.

**आर्हक**, पु० (कः) नास्तिक विशेष.

**आल**, न० (लं) हरताळ.

**आलंभ**, पु० (भः) वध, ठार मारणें.

**आलय**, न० (यं) गृह, घर. २ केशर.

**आलवाल**, न० (लं) झाडाच्या मुळास जी आळी करतात ती.

**आलस्य**, न० (स्यं) आळस. २ वि० (स्यः-स्या-स्यं) आळशी.

**आलान**, न० (नं) हत्ती बांधावयाचा खांब. २ पु० न० (नः-नं) रज्जु.

**आलाप**, पु० (पः) परस्पर संबोधनपूर्वक जें भाषण तें.

**आलाबु**, पु० (बुः) काळा भोंपळा.
**आलाबू**, पु० (बूः) काळा भोंपळा.
**आलि**, स्त्री० (लिः) सखी. २ पंक्ति. ३ स्वच्छ अंतःकरण. ४ सेतु, पूल. ५ पु० (लिः) याग करणारा.
**आलिंगन**, न० (नं) प्रेमानें कवटाळणें.
**आलिंग्य**, पु० (ग्यः) मृदंग विशेष.
**आलिंजर**, पु० (रः) रांझणी वगैरे मोठें पाण्याचें भांडें.
**आलिंद**, पु० (दः) दाराबाहेरचा एक प्रदेश.
**आलिंपना**, स्त्री० (ना) तृप्ती.
**आली**, स्त्री० (ली) विषकीटक विशेष ज्यास विंचु असें म्हणतात तो. २ पु० (ली) भ्रमर, भुंगा.
**आलीढ**, न० (ढं) धनुर्धरांचा स्थितिविशेष.
**आलु**, स्त्री० (लुः तांदूळ धुण्याची रोवळी) गळती. २ न० (लु) वृक्षादिकांचें मूळ.
**आलू**, स्त्री० (लूः) तांदूळ धुण्याची रोवळी, गळती.
**आलोक**, पु (कः) दर्शन. २ प्रकाश. ३ स्तुतिपाठक जनांचें भाषण. ४ सेवा.
**आलोकन**, न० (नं) अवलोकन, पहाणें.
**आवट्टज**, पु० (जः) वनांतला घोडा.
**आवपन**, न० (नं) पात्र, भांडें.
**आवर्त**, पु० (र्तः) मंडलाकार उदकादिकांचें भ्रमण, भोंवरा. २ चिंतन. ३ आर्वतन.
**आवलि**, स्त्री० (लिः) पंक्ति, ओळ.
**आवली**, स्त्री० (ली) पंक्ति, ओळ.
**आवसित**, वि० (तः ता- तं) तृण घालून रास केलेलें. (धान्यादि)
**आवसु**, पु० (सुः) कुबेर.
**आवाप**, पु० (पः) झाडाच्या मुळास जी आळी करतात ती. २ घालणें. ३ बीजारोपण, पेरणें.
**आवापक**, पु० (कः) मनगटाचें भूषण ज्यास पोंची असें म्हणतात तें. २ झाडास आळी करणारा, माळी.
**आवाल**, न० (लं) झाडाच्या मुळास आळी करतात ती.
**आविः**, अ० प्रसिद्ध ह्या अर्थी.
**आविग्न**, पु० (ग्नः) करवंदाचें झाड.
**आविद्ध**, न० (द्धं) प्रहत. २ वि० (द्धः द्धा- द्धं) वक्र, वांकडा. ३ ज्याची प्रेरणा केली तो, सोडलेला.
**आविध**, पु० (धः) ज्यानें वेध पाडितात तें शस्त्र. (सुई. दाभण.)
**आविल**, वि० (लः ला- लं) मलामिश्र, गढूळ.
**आविष्ट**, पु० (ष्टः) ज्याला पिशाच लागलें आहे तो. २ प्रेत नेलेला.
**आवुक**, पु० (कः) उत्पन्नकर्ता जो बाप तो (नाट्य प्रकरणांत.)
**आवुत**, पु० तः बहिणीचा नवरा. (नाट्यप्रकरण.)
**आवृत्**, स्त्री० (त्) अनुक्रम.
**आवृत**, वि० (तः ता- तं) वेष्टित, रोधलेला, वेढलेला.
**आवेगी**, स्त्री० (गी) वनौ० जीस वरधारा) जीर्ण फंजी असें म्हणतात ती.
**आवेश**, पु० (शः) धांदल, घाई. २ ईर्षा.
**आवेशन**, न० (नं) शिल्पि कामाची शाळा. २ प्रवेश.
**आवेशिक**, वि० (कः का- कं) अतिथी, २ अभ्यागत, दुरून घरीं आलेला. ३ न० (कं) साधारण.

**आशय**, पु० (यः) जलाधार (हौद वगैरे) २ आश्रय. ३ अभिप्राय. ४ फणसाचें झाड.

**आशयाश**, पु० (शः) विस्तव.

**आशर**, (रः) अग्नि. २ राक्षस.

**आशंसितृ**, त्रि० (ता- त्री- तृ) वांछाशील, ज्यास फार इच्छा आहे तो.

**आशंसु**, वि० (सुः सुः सु) वांछाशील, ज्यास फार इच्छा आहे तो.

**आशा**, स्त्री० (शा) दीर्घ तृष्णा, फार इच्छा. २ दिशा.

**आशाबंध**, पु० (धः) इच्छारूप जो पाश तो. सुतेऱ्याचें जाळें.

**आशितंगवीन**, वि० (नः ना. नं) अगोदर जेथें गाई चारीत असत ती जागा.

**आशितंभव**, न० (वं) अन्नादिक पदार्थ.

**आशितंभवा**, स्त्री० (वा) तृप्ति.

**आशिर**, पु० (रः) राक्षस.

**आशिस्**, स्त्री० (शीः) सर्पाची दाढ. २ आशिर्वाद.

**आशीर्विष**, पु० (षः) सर्प.

**आशीविष**, पु० (षः) सर्प.

**आशु**, अ० शीघ्र ह्या अर्थी. उ० आशुगच्छ. २ पु० न० (शुः शु) व्रीहि, भात.

**आशुग**, पु० (गः) वायु. २ बाण.

**आशुव्रीहि**, पु० (हिः) लौकर पिकणाऱ्या भाताची एक जात.

**आशुशुक्षणी**, पु० (णिः) विस्तव.

**आश्चर्य**, न० (र्यं) आनंदविशेष.

**आश्रम**, पु० (मः) ब्रम्हचारी, गृहस्थ, वानप्रस्थ, संन्यासी हे चार आश्रम आहेत ते. २ मठ. ३ वन.

**आश्रय**, पु० (यः) आधार. २ शत्रूनें पिडलेल्यास बळिष्ट राजादिकांचा जो आश्रय तो. ३ खांदा.

**आश्रयाश**, पु० (शः) विस्तव. २ वि० (शःशा-शं) आश्रयनाशक, आश्रयाचा नाश करणारा.

**आश्रव**, पु० (वः) स्वीकार. २ क्लेश. ३ वि० (वःवा-वं) वचनांत वागणारा.

**आश्रुत**, वि० (तःता-तं) स्वीकारलेलें.

**आश्लेषाभव**, पु० (वः) केतुग्रह.

**आश्व**, न० (श्वं) घोड्यांचा समूह.

**आश्वत्थ**, न० (त्थं) अश्वत्थवृक्षाचें फळ.

**आश्वयुज**, पु० (जः) आश्विन महिना.

**आश्वास**, पु० (सः) सुख. २ अनुभूतार्थाचें प्रतिपादन करणारें जे वासवदत्तादि ग्रंथ ते.

**आश्विन**, पु० (नः) आश्विन महिना.

**आश्विनेय**, पु० (यः) स्वर्गींचे वैद्य जे अश्विनी कुमार ते प्रत्येक.

**आश्वीन**, वि० (नःना-नं) घोडा एक दिवसांत जो मार्ग चालतो तो, घोड्याची एक मजल.

**आषाढ**, पु० (ढः) आषाढमास. २ ब्रम्हचर्य व्रताचे ठायीं जो पळसाचा दंड धारण करितात तो. ३ मलय पर्वत.

**आषाढपूर्वज**, पु० (जः) ज्येष्टमास.

**आषाढभव**, पु० (वः) मंगळ नांवाचा ग्रह.

**आषाढा**, स्त्री० (ढा) पौर्णिमा विशेष.

**आसक्त**, (क्तःक्ता-क्तं) तत्पर.

**आसंगिनी**, स्त्री० (नी) वावटळ.

**आसत्ति**, स्त्री० (त्तिः) संगम. २ लाभ.

**आसंदी**, स्त्री० (दी) लहान खाट (बाज.) २ आसन विशेष ज्यास वेत्रासन असें म्ह० तें.

**आसन**, न० (नं) बसावयाचें आसन. २ एकादे ठिकाणीं आपली शक्ति कुंठित झाली तरी कांहीं प्रतीक्षा पहाण्याकरितां तेथेंच रहाणें. ३ हत्तीचा स्कंध, हत्तीचा खांदा. ४ यात्रेहून परत येणें. ५ पु० (नः) जिरें. ६ आसण्याचें झाड.

**आसनपर्णी**, स्त्री० (र्णी) वनौ० गोकर्णीची वेल.

**आसना**, स्त्री० (ना) बसावयाचें आसन.

**आसनी**, स्त्री० (नी) विक्रीचा बाजार.

**आसन्न**, वि० (न्नः-न्ना-न्नं) समीप, जवळचा.

**आसव**, पु० (वः) जें मद्य उंसाच्या रसापासून उत्पन्न होतें तें.

**आसादित**, वि० (तः-ता-तं) लब्ध, मिळालेला.

**आसार**, पु० (रः) सर्व प्रदेशावच्छेदें करून जी सैन्याची व्याप्ति ती. २ निरंतर पर्जन्य धारा.

**आसित**, वि० (तः-ता-तं) अगोदर जेथें गाई असत ती जागा.

**आसुतीवल**, पु० (लः) कन्यापालक. २ यज्ञ करणारा.

**आसुर**, पु० (रः) दैत्य.

**आसुरी**, स्त्री० (री) काळी मोहरी, राई.

**आसेचन**, वि० (नः-ना-नं) अतृप्तिकारक.

**आसेचनक**, वि० (कः-का-कं) जी वस्तु पाहतां पाहतां अधिकाधीक पहावी असें वाटून मनाची तृप्तीच होत नाहीं ती.

**आस्कंदन**, न० (नं) युद्ध. २ तिरस्कार. ३. शोषण.

**आस्कंदित**, न० (तं) घोडा मोठ्या वेगानें धांवत असतां पाहात नाहीं व ऐकत नाहीं अशी जी त्याची चाल ती. भरपल्ला, भरधांव, चवड चाल इत्यादि.

**आस्तरण**, न० (णं) हत्तीच्या पाठीवरचें आस्तरण.

**आस्तीक**, पु० (कः) जरत्कारूचा पुत्र. २ श्रद्धावान्.

**आस्था**, स्त्री० (स्था) सभा. २ प्रयत्न. ३ इच्छा, अपेक्षा.

**आस्थान**, न० (नं) सभा.

**आस्थानी**, स्त्री० (नी) सभा.

**आस्पद**, न० (दं) कृत्य, कार्य. २ स्थान.

**आस्फुजित्**, पु० (त्) शुक्रनामा ग्रह.

**आस्फोट**, पु० (टः) रुईचें झाड.

**आस्फोटनी**, स्त्री० (नी) मण्यादिकांस छिद्र पाडण्यास उपयोगी एक शस्त्र ज्यास सामता वगैरे म्हणतात तो.

**आस्फोटा**, स्त्री० (टा) रान मोगरी. २ विष्णुक्रांत नांवाची वनौ०.

**आस्फोत**, पु० (तः) रुईचें झाड. २ कांचनाचें झाड.

**आस्फोता**, स्त्री० (ता) रान मोगरी. २ विष्णुक्रांत नांवाची वनौषधि. ३ सामान्य स्त्री.

**आस्य**, न० (स्यं) मुख, तोंड. २ पु० (स्यः) मुखांत उत्पन्न होणारे पदार्थ (लाळ वगैरे.)

**आस्या**, स्त्री० (स्या) बसावयाचें आसन.

**आस्रव**, पु० (वः) क्लेश.

**आहत**, वि० (तः-ता-तं) गुणित, गुणलेला २ न० (तं) कधींच न घडण्याची गोष्ट बोलणें ती. उ० एषवंध्या सुतो याति.

**आहतलक्षण**, वि० (णः-णा-णं) शौर्यादि गुणांहीं करून जो प्रख्यात तो.

**आहव**, पु० (वः) युद्ध. २ याग, यज्ञ.

**आहवनीय**, पु० (यः) अग्निविशेष.

**आहार**, पु० (रः) भोजन. २ भक्षणप्रकार. ३ आकर्षण करणें.

**आहार्य**, न० (र्यं) अकस्मात आलेला, आगांतुक.

**आहाव**, पु० (वः) विहिरींतील पाणी काढलेलें ठेवण्यास विहिरीजवळ ठेवलेलें जें टाकें, कुंडी इत्यादि.

**आहिक**, पु० (कः) केतुनामा ग्रह. १ पाणिनीऋषि (व्याकरण करणारा.)

**आहित**, न० (तं) निंदा करणारा. २ पारधी. ३ वायूचा उपद्रव ज्याला आहे तो.

**आहितलक्षण**, वि० (णःणा-णं) शौर्यादिकांहीं करून जो प्रख्यात तो.

**आहितुंडिक**, पु० (कः) गारुडी.

**आहेय**, वि० (यःया-यं) सर्पाचें वीष, अस्थि इत्यादि.

**आहो**, अ० विकल्पार्थी. उ० देव आहो गंधर्वः २ प्रश्न. ३ विचार. ४ संपूर्ण. ५. विद्यमान. ६ सादृश्य. ७ वृद्धि. ८ संबंध.

**आहोपुरुषिका**, पु० (का) गर्वानें मी पराक्रमी, मी पुरुष असें जें आपल्या सामर्थ्याचें प्रकटीकरण तें.

**आन्हिक**, न० (कं) दिवसास करावयाचें कर्म. २ नित्यकर्म. ३ भोजन. ४ ग्रंथ विशेष.

**आव्हय**, पु० (यः) नाम, नांव, संज्ञा.

**आव्हा**, स्त्री० (व्हा) नाम, संज्ञा.

**आव्हान**, न० (नं) आमंत्रण, बोलावणें.

**आक्षपाद**, पु० (दः) नैयायिक, न्याय शास्त्री.

**आक्षारण**, न० स्त्री० (णं-णा) परस्त्री आणि परपुरुष ह्यांच्या मैथुनाविषयीं संय्योग झाला असतां जो लोकोपवाद तो.

**आक्षारित**, वि० (तःता-तं) ज्यावर लोकापवाद आला तो.

**आक्षीव**, पु० (वः) शेवग्याचें झाड.

**आक्षेप**, पु० (पः) निंदा. २ आश्चिर्यकारक प्रश्न. ३. आकष्ट. ४ काव्यालंकार. ५ शंका.

**आक्षेपक**, पु० (कः) निंदा करणारा. २ पारधी. ३ वायूचा उपद्रव ज्याला आहे तो.

**आज्ञा**, स्त्री० (ज्ञा) हुकूम.

## इ.

**इ**, अ० रागानें बोलणें. २ भेद. ३ दूर करणें. ४ दया. ५ पु० (इः) मदन.

**इंग**, वि० (गःगा-गं) जंगम, चर. २ पु० (गः) अभिप्रायानुरूप वागणें. ३ अद्भुत ज्ञान.

**इंगल**, पु० (लः) मोठा निखारा.

**इंगित**, वि० (तःता-तं) जंगम, चर. २ पु० (तः) अभिप्रायानरूप वागणें.

**इंगुद**, पु० स्त्री० (दःदी) हिंगणबेटाचें झाड.

**इंचाक**, पु० (कः) जलविंचू.

**इच्छा**, स्त्री० (च्छा) वांछा.

**इच्छावती**, स्त्री० (ती) ज्या बायकोस द्रव्य मिळविण्याची फार इच्छा असते ती बायको.

**इज्जल**, पु० (लः) जलवेत विशेष, ज्यास इजर असें म्ह० तो.
**इज्य**, पु० (ज्यः) गुरु. २ यज्ञ, याग.
**इज्या**, स्त्री० (ज्या) संगम. २ दान. ३ अर्चा, पूजा. ४ कुंटण स्त्री.
**इज्याशील**, पु० (लः) वारंवार यजन करणारा पुरुष.
**इट्चर**, पु० (रः) स्वेच्छेनें फिरणारा बैल, पोळ.
**इडा**, स्त्री० (डा) गाय. २ भूमि. ३ वाचा. ४ बुध नांवाचा जो ग्रह त्याची स्त्री.
**इडिक्क**, पु० (क्कः) मोठा वानर.
**इडवर**, पु० (रः) स्वेच्छेनें फिरणारा बैल, पोळ.
**इत**, न० (तं) स्मरण झालेलें. २ गेलेलें.
**इतर**, वि० (रःरा-रं) नीच, पामर. २ अन्य, दुसरा. ३ क्रूर कर्म. ४ पांथस्थ.
**इतरत्**, न० (त्) पृथक, निरनिराळे.
**इति**, अ० हेतु. २ प्रकार. ३ प्रसिद्धि. ४ असें. ५ समीप ह्या अर्थी, उ० रामोहंतिती रावणः पलायते. २ विप्रक्षत्रियविट् शूद्रा इति वर्णाः. ३ इति पाणिनिःपाणिनि शब्दो लोके प्रकाशते. ४ क्रमादमुं नारद इत्य बोधि. ५ धर्ममाचरे दिति. ६ स्वरूप. ७ सांनिध्य. ८ विवक्षा. ९ नियम. १० प्रत्यक्ष. ११ प्रकर्ष. १२ अवधारण.
**इतिह**, अ० लोकपरंपरा प्राप्त उपदेश ह्या अर्थी.
**इतिहास**, पु० (सः) प्राचीन वृत्त, पूर्वीचें चरित्र. (महाभारतादि )
**इत्वरी**, स्त्री० (री) व्यभिचारिणी स्त्री.
**इदानीं**, अ० ह्या कालीं ह्या अर्थी. उ० इदानीमस्मिसंवृत्तः २ वाक्यालंकार
**इंदिंदिर**, पु० (रः) भ्रमर
**इंदिरा**, स्त्री० (रा) लक्ष्मी
**इंदीवर**, न०(रं)निळें कमळ.
**इंदीवरा**, स्त्री०(रा) वनौ० जीस सहस्रमूलि असें म्ह० ती.
**इंदीवरी**, स्त्री० (री) इंदीवरा हा शब्द पहा.
**इंदीवार**, न० (रं) निळें कमळ.
**इंदु**, पु० (दुः) चंद्र.
**इंदुकांत**, न० (तं) रुपें.
**इंदुजनक**, पु० (कः) समुद्र.
**इंदुलेखा**, स्त्री० (खा) गुळवेल. २ आंबाडीचें झाड. ३ सोमवल्लरी. ४ चंद्राची कळा.
**इंदुव्रत**, न० (तं) प्रायःश्चित.
**इंद्र**, पु० (द्रः) देवांचा राजा. २ श्रेष्ट. ३ सूर्याचा भेद. ४ योगभेद. ५ आज्ञा.
**इंद्रगोप**, पु० (पः) मृगनक्षत्राच्या वेळेस जे लाल किडे पडतात ते. (बिरबाहुटि.)
**इंद्रजालिक**, पु० (कः) गारुडी, खेळ करणारा.
**इंद्रद्रु**, पु० (द्रुः) वृक्षविशेष ज्यास अर्जुनसादडा असें म्ह० तो.
**इंद्रयव**, पु० न० (वः-वं) कुड्याची शेंग. २ इंद्रजव.
**इंद्रलुप्तक**, पु० (कः) डोकीच्या केशाचा नाशक एक रोग ज्यास चाई असें म्ह० तो.
**इंद्रवारुणी**, स्त्री० (णी) मोठ्या कंवडळीचें झाड.
**इंद्रसुरस**, पु० (सः) सिंधुआरी, निगडी, निर्गुंडी या नांवानें प्रसिद्ध जो वृक्ष तो.
**इंद्रसुरिस**, पु० (सः) **इंद्रसुरस** हा शब्द पहा.

**इंद्रा,** स्त्री० (द्रा) वनौ० ज्यास जंबीर, पांढरामरवा असें म्ह० तो.

**इंद्राणिका,** स्त्री० (का) वनौ० सिंधुआरी, निगडी, निर्गुंडी या नांवानें प्रसिद्ध जो वृक्ष तो.

**इंद्राणी,** स्त्री० (णी) इंद्राची बायको. २ नदी विशेष.

**इंद्रायुध,** न० (धं) मेघाचे ठायीं प्रतिबिंबित जे सूर्याचे किरण धनुष्याकार भासतात ज्यास इंद्राचें धनुष्य असें म्ह० तें.

**इंद्रारि,** पु० (रिः) दैत्य.

**इंद्रावरज,** पु० (जः) विष्णु.

**इंद्रिय,** न० (यं) ज्ञानेंद्रियें (हीं सहामन २ डोळे. ३ कान. ४ जिव्हा. ५ घ्राण, नाक. ६ त्वक, त्वचा.) आणि कर्मेंद्रियें (हीं पांचहात. २ पाय. ३ गुद. ४ उपस्थ. ५ वाचा.) प्रत्येक. २ शिश्न. ३ रेत.

**इंद्रियार्थ,** पु० (र्थः) इंद्रियांचे विषय (ते पांचरूप. २ रस. ३ गंध. ४ स्पर्श. ५ शब्द.)

**इंधन,** न० (नं) जळवण, सर्पण.

**इध्म,** न० (ध्मं) जळवण, सर्पण.

**इन,** पु० (नः) सूर्य. २ प्रभु, राजा. ३ पति.

**इन्वका,** स्त्री० (का) मृगशीर नक्षत्राचे मस्तका जवळ ज्या पांच तारा त्या.

**इभ,** पु० (भः) हत्ती.

**इभनागाख्य,** पु० (ख्यः) नागचाफा.

**इभ्य,** वि० (भ्यःभ्या-भ्यं) धनिक. २ वरिष्ट.

**इभ्या,** स्त्री० (भ्या) हत्तीण. २ वनौ० जीस सालई असें म्ह० ती.

**इरण,** न० (णं) निराश्रय देश. २ खारे मातीचें स्थळ.

**इरंमद,** पु० (दः) विद्युल्लता, विज.

**इरा,** स्त्री० (रा) मद्य. २ भूमि. ३ वाणी, वाचा. ४ जल, पाणी.

**इराचर,** न० (रं) मेघधारा.

**इरिण,** न० (णं) निराश्रय देश. २ खारे मातीचें स्थळ.

**इरीपक,** पु० (कः) चेंडू. २ उशी.

**इला,** स्त्री० (ला) गाय. २ भूमि. ३ वाणी, वाचा. ४ बुध नांवाचा जो ग्रह त्याची स्त्री.

**इलावृत्त,** न० (त्तं) नवखंडांतील एक.

**इली,** स्त्री० (ली) शस्त्र विशेष ज्यास खंडा, गुप्ति इत्यादि म्ह० ती.

**इल्लिश,** पु० (शः) कीटक विशेष ज्यास जलविंचू असें म्ह० तो.

**इल्वल,** पु० (लः) दैत्य. २ मत्स्य.

**इल्वला,** स्त्री० (ला) मृगशीर नक्षत्राचे मस्तकाजवळ ज्या पांच तारा असतात त्या प्रत्येक.

**इव,** अ० साम्य, सादृश्य ह्या अर्थी. उ० इंदुरिंदुरिवश्रीमान. २ अनादर. ३ किंचित. ४ निश्चय.

**इशान,** न० (नं) नक्षत्र.

**इष,** पु० (षः) आश्विनमास.

**इषत्कर,** पु० (रः) लेश.

**इषिका,** स्त्री० (का) हत्तीच्या डोळ्यांतील बुबुळ. २ सोनाराची शलाका जीस सळई असें म्ह० ती.

**इषीका,** स्त्री० (का) **इषिका** हा शब्द पहा.

**इषु,** पु० (षुः) बाण.

**इषुधि**, पु० (धिः) बाण ठेवण्याचा भाता.

**इष्ट**, न० (ष्टं) यज्ञकर्म. २ सांगितलेलें. ३ यथेच्छ ह्या अर्थीं क्रिया विशेषण. उ० इष्टंभुक्तेस्म. ४ संस्कार. ५ वि० (ष्टः-ष्टा-ष्टं) प्रीय. ६ पूजित, पुजलेला. ७ पु० (ष्टः) यज्ञ.

**इष्टकापथ**, न० (थं) काळे वाळयाचें मूळ.

**इष्टगंध**, वि० (धः-धा-धं) सुगंधि. २ न० (धं) काकडी, वाळूक.

**इष्टमुष्**, पु० (ट्) राक्षस.

**इष्टापूर्त**, न० (र्तं) यज्ञकर्म.

**इष्टार्थोद्युक्त**, वि० (क्तः-क्ता-क्तं) अभिमतार्थाविषयीं उद्योग करणारा.

**इष्टि**, स्त्री० (ष्टिः) याग, यज्ञ. २ इच्छा. ३ संग्रहश्लोक.

**इष्वास**, पु० (सः) धनुष्य. २ बाण सोडणारा.

**ईक्षण**, न० (णं) डोळा. २ पहाणें.

**इक्षु**, न० (क्षुः) ऊंस. २ सप्तसमुद्रापैकीं एक.

**इक्षुगंधा**, स्त्री० (धा) वनौ० ज्यास सरांटा असें म्हणतात तो. २ कोळसुंद्याचें झाड. ३ भुईकोहळा. ४ मोळ, लव्हाळे, लवा.

**इक्षुर**, पु० (रः) वनौ० कोळसुंदा ज्यास कोलिस्ता असें म्ह० तो.

**इक्ष्वाकु**, पु० (कुः) दुध्याभोंपळा. २ सूर्य वंशांतील राजे. ३ स्त्री० (कुः) कडू भोंपळा.

## ई.

**ई**, अ० विषाद. २ दया. ३ स्त्री० (ई) लक्ष्मी.

**ईडित**, वि० (तः-ता-तं) स्तुत, स्तवलेला.

**ईति**, स्त्री० (तिः) प्रवास. २ उपद्रव. विशेष. (हा उपद्रव अतिवृष्टी. २ अनावृष्टि. ३ टोळांचा उपद्रव. ४ उंद्रांचा उपद्रव. ५ कीटकांचा उपद्रव. ६ स्वसैन्योपद्रव. ७ परसैन्योपद्रव. याप्रमाणें सात प्रकारचा आहे.

**ईरण**, न० (णं) निराश्रय देश. २ खारे मातीचें स्थळ.

**ईरिण**, न० (णं) **ईरण** हा शब्द पहा.

**ईरित**, वि० (तः-ता-तं) ज्याची प्रेरणा केली तो, सोडलेला, पाठविलेला.

**ईर्म**, न० (र्मं) व्रण, वण.

**ईर्या**, स्त्री० (र्या) योगमार्गाचे ठायीं जी स्थिति ती.

**ईर्ष्यालु**, पु० (लुः) ज्याला ईर्षा आहे तो.

**ईर्ष्या**, स्त्री० (र्ष्या) दुसऱ्याचा उत्कर्ष सहन न करणें, ईर्षा.

**ईलि**, स्त्री० (लिः) शस्त्र विशेष ज्यास खंडा गुप्ति इत्यादि म्ह० ती.

**ईलित**, वि० (तः-ता-तं) स्तुत, स्तवलेला.

**ईली**, स्त्री० (ली) शस्त्र विशेष ज्यास खंडा, गुप्ति, इत्यादि म्ह० ती.

**ईश**, पु० (शः) महादेव. २ स्वामी. ३ समर्थ.

**ईशा**, स्त्री० (शा) पार्वती. २ नांगराचा दांडा ज्यास ईसाड असें म्हणतात तो.

**ईशादंत**, पु० (तः) हस्तिदंत.

**ईशान**, पु० (नः) महादेव.

**ईशितृ**, पु० (ता) प्रभू, स्वामी.

**ईश्वर**, पु० (रः) महादेव. २ प्रभु, स्वामी. ३ मदन. ४ ईश्वर. ५ जीव. ६ नाचणें.

**ईश्वरा**, स्त्री० (रा) पार्वती.

**ईश्वरी**, स्त्री० (री) पार्वती. २ माया.

**ईषत्**, अ० किंचित ह्या अर्थी.

**ईषा**, स्त्री० (षा) नांगराचा दांडा ज्यास ईसाड असें म्हणतात तो.

**ईषत्पांडु**, वि० (डुःडुःडु) धूसर वर्ण, किंचित पांढरा.

**ईषिका**, स्त्री० (का) हत्तीच्या डोळ्यांतील बुबुळ. २ सोनाराची शलाका ज्यास सळई असें म्हणतात ती.

**ईषीका**, स्त्री० (का) **ईषिका** हा शब्द पहा.

**ईहा**, स्त्री० (हा) इच्छा. २ उद्योग.

**ईहामृग**, पु० (गः) लांडगा. २ चक्रवाक पक्षी. ३ रूपक भेद.

## उ.

**उ**, अ० क्रोधार्थी. उ० उआगतः २ शत्रुः ३ दया ४ संबोधन. ५ आज्ञा. ५ पदपूरण. ६ पादपूरण. ७ पु० (उः) महादेव.

**उं**, अ० रोष. २ स्वीकार. ३ प्रश्न.

**उक्का**, स्त्री० (क्का) उल्काग्नि.

**उक्त**, वि० (क्तःक्ता·क्तं) बोललेलें, सांगितलेलें.

**उक्तट**, न० (टं) उताणें निजणें.

**उक्ति**, स्त्री० (क्तिः) भाषण.

**उक्थ**, न० (क्थं) सामांतील एक भेद.

**उखा**, स्त्री० (खा) पात्रविशेष, स्थाली.

**उख्य**, वि० (ख्यःख्या·ख्यं) थाळींत शिजलेलें (अन्न.)

**उग्र**, पु० (ग्रः) महादेव. २ रौद्ररस. ३ शूद्र जातीचे स्त्रीचे ठायीं क्षत्रियापासून उत्पन्न जो पुत्र तो. ४ अक्कलकाढा. ५ वेखंड. ६ ओले तांदूळ. ७ अंत्यज, महार. ८ वि० (ग्रःग्रा·ग्रं) माजलेला.

**उग्रगंधा**, स्त्री० (धा) वेखंड. २ ओंवा.

**उग्रशेखरा**, स्त्री० (रा) गंगानदी.

**उग्रसेनज**, पु० (जः) कंस.

**उचिंगट**, पु० (टः) रागीट पुरुष. २ मासा.

**उचित**, वि० (तःता·तं) योग्य. २ अभ्यस्त. ३ न्याय्य, न्यायाचा. ४ न० (तं) टाकलेलें. ५ थोडें. ६ जाणलेलें.

**उच्च**, वि० (च्चःच्चा·च्चं) उंच. २ पु० (च्चः) विष्णु.

**उच्चटा**, स्त्री० (टा) मोथ्याचा एक भेद ज्यास कोंकणांत फुरडी असें म्हणतात ती.

**उच्चंड**, वि० (डःडा·डं) शीघ्र गमन करणारा.

**उच्चंदा**, स्त्री० (दा) उत्तर रात्र.

**उच्चय**, पु० (यः) निऱ्या.

**उच्चललाटा**, स्त्री० (टा) उंच कपाळाची स्त्री.

**उच्चललाटिका**, स्त्री० (का) उंच कपाळाची स्त्री.

**उच्चार**, पु० (रः) उच्चार. २ विष्ठा, नरक.

**उच्चावच**, वि० (चःचा·चं) बहुविध, लहान मोठा, सरसकट, इत्यादि.

**उच्चैः**, अ० मोठें ह्या अर्थी. उ० श्रृंगमुच्चैर्गिरेरिदं.

**उच्चैर्घुष्ट**, न० (ष्टं) उच्च स्वरानें जो घोष तो.

**उच्चैःश्रवस्**, पु० (वाः) इंद्राचा घोडा.

**उंछ**, पु० (छः) बाजार, रस्ता इत्यादि ठिकाणीं पडलेले धान्याचे कण एकेक निवडून घेणें.

**उच्छ्रय, उच्छ्राय**, पु० (यः) वृक्ष, देवालय इत्यादिकांची उंची.

**उच्छ्रित**, वि० (तःता-तं) उंच. २ उत्पन्न. ३ गर्विष्ठ. ४ फार वाढलेला.

**उच्छ्वास**, पु० (सः) काव्य पुराण नाटक भाग. २ अनुभूतार्थाचें प्रतिपादन करणारे जे वासवदत्तादि ग्रंथ ते.

**उज्जयिनी**, स्त्री० (नी) उज्जनी नगर.

**उज्जृंभित**, वि० (तःता-तं) विकसित. २ न० (तं) चेष्टा.

**उज्वल**, पु० (लः) शृंगाररस. २ प्रकाशित, उजळ. ३ प्रफुल्लित.

**उटज**, पु० न० (जःजं) ऋषींचें घर, पर्णशाला, पर्णकुटी.

**उडु**, स्त्री० न० (डुःडु) नक्षत्र.

**उडुप**, न० (पं) लहान नांव, होडी, पडाव इत्यादि. २ पु० (पः) चंद्र.

**उडुंबर**, पु० (रः) उंबराचें झाड. २ दाराचा उंबरा. ३ नपुंसक.

**उड्डीन**, न० (नं) पक्ष्यांची गति, उडणें.

**उड्डीश**, पु० (शः) ग्रंथ विशेष. २ चंद्र.

**उत्**, अ० प्रश्न. २ वितर्क. ३ कुत्सित. ४ प्रशंसा. ५ दुसरा पक्ष. ६ कदाचित. ७ निंदा. ८ दुसरा. ९ विकल्प नसणें. १० निषेध. ११ प्रकाश. १२ विभाग. १३ प्राबल्य. १४ अस्वस्थ. १५ शक्ति. १६ प्राधान्य. १७ बंधन. १८ भाव. १९ मोक्ष. २० लाभ.

**उत**, वि० (तःता-तं) तंतूनीं विणलेला. २ अ० समुच्चय. ३ विकल्प ह्या अर्थी. उ० उत भीमउतार्जुनः ३ विष्णुरुतशिवःसेव्यः पदपूरण. ५ प्रश्न. ६ नानापक्षपरामर्श, वितर्क. ७ अतिशय.

**उताहो**, अ० विकल्पार्थी. उ० गंधर्वः उताहोब्रम्हच्योच्यते. २ प्रश्न. ३ विचार.

**उत्क**, वि० (त्कःत्का-त्कं) उत्कंठित.

**उत्कट**, न० (टं) तज, दालचिनी. २ वि० (टःटा-टं) मत्त, माजलेला. ३ पु० (टः) मत्त हत्ती. ४ तीव्र. ५ उताणा निजलेला.

**उत्कंठा**, स्त्री० (ठा) उत्सुकता, चिंता.

**उत्कर**, पु० (रः) धान्यादिकांची रास.

**उत्कर्ष**, पु० (र्षः) सर्वांपेक्षां कांहीं एक जो विशेष तो.

**उत्कल**, पु० (लः) देशविशेष.

**उत्कलिका**, स्त्री० (का) उत्कंठा. २ उदकाची मोठी लहरी, मोठी लाट. ३ पुष्पकळी. ४ स्त्रियांचा हावभाव विशेष.

**उत्कार**, पु० (रः) धान्य पेरणारा.

**उत्कूट**, पु० (टः) छत्री.

**उत्कोच**, पु० (चः) भेट.

**उत्क्रोश**, पु० (शः) पक्षि विशेष ज्यास कुररी असें म्हणतात तो.

**उत्खात**, पु० (तः) शस्त्र.

**उत्त**, वि० (त्तःत्ता-त्तं) आर्द्र, ओलें.

**उत्तप्त**, न० (प्तं) शुष्कमांस. २ तप्त, तापलेलें.

**उत्तम**, वि० (मःमा-मं) चांगला. २ मुख्य.

**उत्तमर्ण**, पु० (र्णः) कर्ज देणारा, धनकोनाम.

**उत्तमा**, स्त्री० (मा) गुणांनीं उत्कृष्ट जी बायको ती. २ पुष्कळ दूध देणारी गाय.

**उत्तमांग**, न० (गं) मस्तक.

**उत्तर**, वि० (रःरा-रं) उत्तर दिशेस झालेला. २ श्रेष्ठ. ३ उत्तम. ४ वरती. उ० रत्नानां उत्तरो हीरः ५ पु० (रः) विराटाचा पुत्र. ६ न० (रं) प्रतिवचन, उत्तर.

**उत्तरकुरु**, पु० (रुः) नव खंडांतील एक.

**उत्तरकोशला**, स्त्री० (ला) अयोध्या.

**उत्तरतः**, अ० उत्तरदेश. २ उत्तरकाल ह्या अर्थी.

**उत्तरपक्ष**, पु० (क्षः) सिद्धांत.

**उत्तरा**, स्त्री० (रा) उत्तर दिशा. २ अर्जुनाची सून, विराटाची कन्या.

**उत्तरात्**, अ० उत्तरदेश. २ उत्तरकाल ह्या अर्थी.

**उत्तरासंग**, पु० (गः) उत्तरीय वस्त्र, पांघुरण्याचें वस्त्र.

**उत्तरीय**, न० (यं) पांघरण्याचें वस्त्र.

**उत्तरेण**, अ० उत्तरदेश. २ उत्तरकाल ह्या अर्थी.

**उत्तरेद्युः**, अ० उत्तर दिवसाचे ठायीं ह्या अर्थी. उ० नांदीमुखादुत्तरेद्युर्विवाहः परिकीर्तितः

**उत्तान**, वि० (नःना-नं) उथळ. २ उताणे. ३ पु० (नः) उद्गमन. ४ न० (नं) उताणें निजणें.

**उत्तानपादज**, पु० (जः) ध्रुव.

**उत्तानशय**, पु० (यः) स्तन प्राशन करणारा बालक. २ उताणा निजणारा.

**उत्ताल**, पु० (लः) माजलेला.

**उत्तुष**, पु० (षः) लाह्या.

**उत्थान**, न० (नं) पौरुष,उद्योग. २ तंत्र (याचे चार अर्थ=कुटुंब कृत्य. २ सिद्धांत. ३ उत्तम. ४औषध.) ३ उत्थान, उठणें. ४ पुस्तक. ५ युद्ध. ६ उत्पत्ति. ७ आंगण. ८ हर्ष. ९ मलरोग, हगवण.

**उत्थित**, वि० (तःता-तं) वृद्धिमान, वाढलेला. २ उत्पन्न. ३ उद्युक्त. ४ उठलेला.

**उत्पतवारंक**, पु० (कः) सामान्य पक्षी.

**उत्पतन**, न० (नं) उत्पत्ति. २ वर जाणें.

**उत्पतितृ**, वि० (तात्री-तृ) उत्पतनशील, ज्याचा उडण्याचा स्वभाव तो.

**उत्पतिष्णु**, वि० (ष्णुःष्णु-ष्णुः) ज्याचा उडण्याचा स्वभाव तो.

**उत्पत्ति**, स्त्री० (त्तिः) जन्म.

**उत्पल**, न० (लं) कमळ. २ कडू कोष्ट. ३ गोडे कोष्ट. ४ कोड. ५ फूल.

**उत्पलशारिवा**, स्त्री० (वा) वनौ० जीस उपरसाळ, उपलसरी असें म्ह० ती.

**उत्पात**, पु० (तः) शुभाशुभसूचक जो धमकेत्वादि उत्पात तो. २ हत्या करणारा.

**उत्पादक**, पु० (कः) हरिणविशेष.

**उत्प्रेक्षा**, स्त्री० (क्षा) काव्यालंकार. २ असावधपणा. ३ शंका घेऊन प्रश्न केला तो.

**उत्फुल्ल**, वि० (ल्लः ल्ला- ल्लं) ज्यास फुलें आलीं आहेत तो, प्रफुल्लित.

**उत्स**, पु० (त्सः) जेथें उदक पडून बहुत जमतें तें स्थान. २ (कोणी झन्यासही उत्स असें म्ह०)

**उत्सर्ग**, पु० (र्गः) न्याय. २ दान. ३ त्याग, टाकणें.

**उत्सर्जन**, न० (नं) दान, देणें. २ टाकणें.

**उत्सव**, पु० (वः) उत्साह. २ उद्गति, वर जाणें.३ कोप. ४ इच्छेचा वेग. ५आनंद.

**उत्सादन**, न० (नं) शरीराचा मळ घालविणें.

**उत्साह**, पु० (हः) मनास जो उल्हास होतो तो. २ उद्योग. ३ सूत. ४ दोरा.

**उत्साहवर्धन**, पु० (नः) वीररस. (नाटय प्रकरण.)

**उत्सिक्त**, पु० (क्तः) उद्धट.

**उत्सुक**, वि० (कः का-कं) अभिमतार्थाविषयीं उद्योग करण्यास जो तत्पर तो.

**उत्सृष्ट**, वि० (ष्टः ष्टा-ष्टं) त्यक्त, टाकलेला.

**उत्सेध**, पु० (धः) वृक्षादिकांची उंची. २ देह, शरीर.

**उत्क्षेपण**, न० (णं) पंखा. २ धान्य चुरण्याचें साधन.

**उदक**, न० (कं) पाणी, जल.

**उदक्या**, स्त्री० (क्या) रजस्वला स्त्री.

**उदग्**, अ० दिशा. २ काळ. ३ देश.

**उदग्र**, वि० (ग्रः ग्रा-ग्रं) उंच.

**उदज**, पु० (जः) गाई म्हशी इत्यादि पशूस सोडणें.

**उदंडपाल**, पु० (लः) मत्स्यभेद.

**उदंत**, पु० (तः) वास्तविक लोकवार्ता. २ साधु.

**उदंतिका**, स्त्री० (का) तृप्ति.

**उदधि**, पु० (धिः) समुद्र.

**उदन्या**, स्त्री० (न्या) तृषा, तहान.

**उदन्वत्**, पु० (न्वान्) समुद्र.

**उदपान**, पु० न० (नः नं) विहीर.

**उदमान**, न० (नं) आढक नांवाच्या मापाचा पंन्नासावा भाग.

**उदय**, पु० (यं:) उदय. २ उदयाचल. ३ प्रख्यात होणें.

**उदयन**, न० (नं) उदय.

**उदर**, न० (रं) जठर, पोट. २ युद्ध. ३ रोगविशेष.

**उदरामय**, पु० (यः) अतिसार रोग.

**उदर्क**, पु० (र्कः) पुढें होणारें फळ. २ मदनकंटक.

**उदर्चिस**, वि० (र्चिः र्चिः र्चिः) फार तेजवान. २ पु० (र्चिः) अग्नि.

**उदवसित**, न० (तं) घर.

**उदश्वित्**, न० (त) ज्या ताकांत अर्धे पाणी घातलें असतें तें ताक, ताकवणी.

**उदात्त**, पु० (त्तः) स्वराचा एक भेद. २ दया त्यागादि संपन्न. ३ काव्यालंकार. ४ कृत्य.

**उदान**, पु० (नः) कंठाचे ठायीं असणारा जो शरीरांतील वायु तो. २ हृदयावरील भोंवरा. ३ सर्प.

**उदार**, वि० (रः रा-रं) सरळ मनाचा. २ दाता. ३ महान, मोठा.

**उदासीन**, वि० (नः ना-नं) ज्यास शत्रु आणि मित्र सारखे तो. २ उदासीन. ३ व्यग्रचित्ताचा.

**उदास्थित**, पु० (तः) द्वारपाळ. २ जाणारा. ३ कारभारी. ४ गुप्त हेर.

**उदाहार**, पु० (रः) उदाहरण, दाखला.

**उदित**, वि० (तः ता-तं) उक्त, सांगितलेला. २ बांधलेला. ३ न० (तं) वर निघालेले. ४ आगत, आलेलें.

**उदीची**, स्त्री० (ची) उत्तर दिशा.

**उदीचीन**, वि० (नःना-नं) उत्तर दिशेस झालेला.

**उदीच्य**, पु० (च्यः) शरावती नदी मर्यादक जो पश्चिमोत्तर देश तो. २ क्ली०

ज्याला वाळा असें म्हणतात तो. ३ दिशाविशेष.

**उदुखल**, न० (लं) उखळ.

**उदुंबर**, पु० (रः) उंबराचें झाड. २ उंबरठा. ३ कोडाचा भेद. ४ शिस्न. ५ न० (रं) तांबें.

**उदुंबरपर्णी**, स्त्री० (र्णी) वनी० जीस दांती असें म्हणतात ती.

**उंदुर** पु० (रः) उंदीर.

**उंदुरु**, पु० (रुः) उंदीर.

**उदूखल**, न० (लं) उखळ. २ पु० (लः) गुग्गुल वृक्ष.

**उदूढ**, न० (ढं) स्थूळ.

**उद्गत**, वि० (तःता-तं) वमन झालेलें, ओकलेलें. २ वरती गेलेलें.

**उद्गमनीय**, न० (यं) धुतलेलीं दोन वस्त्रें, धुवट धोत्रजोडा, पंचजोडी इत्यादि. २ वरती जाण्यास योग्य ते.

**उद्गाढं**, अ० अतिशयार्थी उ० उद्गाढ मूर्खः

**उद्गातृ**, पु० (ता) सामवेद पडलेला ऋत्विज.

**उद्गार**, पु० (रः) वमन, ओकणें. २ ढेकर.

**उद्गिरण**, न० (णं) ऊर्ध्व नयन, वर नेणें. २ उन्मूलन, उपटणें.

**उद्गीथ**, पु० (थः) सामवेदाचा ध्वनि. २ प्रणव, ओंकार.

**उद्गूर्ण**, वि० (र्णःर्णा-र्णं) उगारलेलें (शस्त्रादि.) २ उत्तेजित.

**उद्ग्राह**, (हः) उद्ग्रहण, ढेकर,

**उद्ग्र**, वि० पु० (घः) प्रशस्त (या शब्दास लिंगांतर होत नाहीं.) २ पु० (घः) शरीरांतील वायु.

**उद्घन्**, पु० (नः) ज्या लांकडावर दुसरें लांकूड ठेवून तासतात तें खालचें लाकूड. सुताराची घोडी असें म्ह० ती.

**उद्घस**, न० (सं) मांस.

**उद्घाटन**, न० (नं) विहिरींतून पाणी वर काढण्याचें यंत्र (राहाट, लाट, खिन्हाडी इत्यादि.)

**उद्घाटितज्ञा**, स्त्री० (ज्ञा) शुभाशुभ जाणणारी.

**उद्घात**, पु० (तः) प्रारंभ. २ आडखळणें. ३ वायुरोध करण्याचा योग. ४ कालभेद. ५ उंच. ६ मुद्गल. ७ काव्य पुराण नाटक भाग.

**उद्दंतुर**, पु० (रः) उंच. २ भयंकर. ३ दंताळ.

**उद्दान**, न० (नं) बंधन, बांधणें.

**उद्दाम**, पु० (मः) बंदरहित. २ स्वतंत्र. ३ वरुणदेव. ४ दांडगा.

**उद्दाल**, पु० (लः) भोकरीचें झाड. २(पु०) उद्दालकः, उद्दालक ऋषि.

**उद्दित**, वि० (तःता-तं) बांधलेला.

**उद्देश**, पु० (शः) पर्वत. २ हेतु.

**उद्धत**, पु० (तः) उद्धट.

**उद्धरण**, न० (णं) ऋण, कर्ज. २ ओकलेलें अन्न. ३ मुसळ. ४ उपटणें.

**उद्धर्ष**, पु० (र्षः) उत्साह.

**उद्धव**, पु० (वः) उद्धव नांवाचा विष्णुचा प्रधान. २ उत्साह. ३ अग्नि, विस्तव.

**उद्धांत**, वि० (तःता-तं) वमन झालेलें, ओकलेलें.

**उद्धान**, न० (नं) चूल. २ ओकलेलें.

**उद्धार**, पु० (रः) ऋण, कर्ज. २ न० (रं) चूल. ३ उद्धरण. ४ जन्ममरणापासून मुक्त करणें.

**उध्दृत**, वि० (तःता-तं) वर आणलेला. २ उपटलेला.

**उद्भट**, पु० (टः) कांसव. २ सूप. ३ योद्धा.

**उद्भिज**. वि० (जःजा-जं) भुईंतून उत्पन्न होणारे जे वृक्ष, गुल्म, तृण, इत्यादि ते प्रत्येक.

**उद्भिज्ज**, वि० (ज्जःज्जा-ज्जं) **उद्भिज** हा शब्द पहा.

**उद्भिद्**, वि० (दःदा-दं) वरचा शब्द पहा.

**उद्भ्रम**, पु० (मः) उद्वेजन, उद्वेग. २ भोंवडणें. ३ गरागरा फिरविणें.

**उद्यंगी**, स्त्री० (गी) पूर्वपक्ष.

**उद्यत**, वि० (तःता-तं) उगारलेलें (शस्त्रादि.

**उद्यम**, पु० (मः) उद्योग,

**उद्यान**, न० (नं) राज लोकांचें क्रीडा करण्याचें अरण्य, क्रीडावन. २ उपवन, बाग. ३ निःसरण, निघणें. ४ प्रयोजन, कार्य.

**उद्युक्त**, वि० (क्तःक्ता-क्तं) उद्योगास लागलेला.

**उद्योग**, पु० (गः) यत्न विशेष, उद्योग-

**उद्र**, पु० (द्रः) ऊद. २ जलचर विशेष ज्यास पाणमांजर असें म्हणतात तें. ३ जलचर विशेष ज्यास शिशुमार असें म्हणतात तो.

**उद्रथ**, पु० (थः) रथाचा खिळा. २ ताम्रचूड नांवाचा पक्षी, कोंबडा.

**उद्राव**, पु० (वः) पलायन, पळणें.

**उद्वर्तन**, न० (नं) घांसून शरिराचा मल घालविणें. २ वर जाणें. ३ आंगाला लावणें.

**उद्वांत**, वि० (तःता-तं) वमन झालेलें, ओकलेलें. (अन्नादि) २ पु० (तः) मस्ती रहित हत्ती.

**उद्वान**, वि० (नःना-नं) वमन झालेलें, ओकलेलें. (अन्नादि)

**उद्वासन**, न० (नं) वध, ठार मारणें.

**उद्वाह**, पु० (हः) विवाह.

**उद्वाहन**, वि० (नःना-नं) सांगितलेलें. २ न० (नं) विवाह, लग्न.

**उद्वाहनी**, स्त्री० (नी) रज्जु.

**उद्वेग**, न० (गं) सुपारी. २ उद्वेग.

**उधृत**, न० (तं) खाऊन शेष टाकलेलें. २ वांसलेलें.

**उन्न**, न० (न्नं) भिजलेलें. २ मैथून.

**उन्नत**, पु० (तः) अजगर, सर्प. २ उंचपणा.

**उन्नतानत**, वि० (तःता-तं) जो स्वभावतः उंच असून उपाधि वगैरे करून किंचित नम्र होतो तो.

**उन्नतिशय**, पु० (यः) गरूड.

**उन्नय**, पु० (यः) ऊर्ध्वनयन, वर नेणें. २ तर्क.

**उन्नाय**, पु० (यः) वर नेणें. २ तर्क.

**उन्निद्र**, पु० (द्रः) प्रफुल्लित वृक्ष.

**उन्मत्त**, पु० (त्तः) धोतऱ्याचें झाड. (क्वचित धोतिराही म्ह०) २ मुचकुंद. ३ वि० (त्तःत्ता-त्तं) वातपित्तादिककरून चित्तविभ्रम झालें आहे तो.

**उन्मद**, वि० (दःदा-दं) स्वभावतः जो उन्मत्त तो.

**उन्मदिष्णु**, वि० (ष्णुःष्णुःष्णु) स्वभावतः जो उन्मत्त तो.

**उन्मनस्**, वि० (नाःना-नः) उत्कंठित.

**उन्माथ**, पु० (थः) वध. २ मृग, पक्षी, इत्यादि बंदींत सांपडण्याकरितां कांहीं

आमिषादि घालून कपटानें लावून ठेविलेलें यंत्र (जाळें, सांपळा, फांसे, इत्यादि.) ३ घातक.

**उन्माद**, पु० (दः) अंतःकरणाची अनवस्थिति. २ वि० (दःदा-दं) स्वभावतः जो उन्मत्त तो, माजोरेपणा.

**उन्मादन**, पु० (नः) मदनबाण.

**उन्मादवत्**, वि० (वान्. वती. वत्) ज्यास पित्तादिकेंकरून चित्तविभ्रम झाला आहे तो. २ मस्तीस आलेला.

**उन्मान**, न० (नं) तुलामान, तोलणें.

**उन्मुद्र**, पु० (द्रः) प्रफुल्लितवृक्ष.

**उप**, अ० अधिकार. २ हीन. ३ समीप ह्या अर्थी.

**उपकंठ**, वि० (ठःठा-ठं) समीप, जवळचा. २ पु० (ठः) गांवाचा शेवटचा भाग.

**उपकार**, पु० (रः) उपकार.

**उपकारिक**, पु० (कः) उपकार करणारा. २ पिठाचा भेद.

**उपकारिका**, स्त्री० (का) राजवाडा.

**उपकार्य**, वि० (र्यः र्या.र्यं) उपकार. २ उचित.

**उपकार्या**, स्त्री० (र्या) राजवाडा.

**उपकुंचिका**, स्त्री० (का) लहान इलाची. २ काळें जिरें.

**उपकुल्या**, स्त्री० (ल्या) पिंपळी.

**उपक्रम**, पु० (मः) ज्ञानपूर्वक जो आरंभ तो. २ प्रथमारंभ. ३ उपाय पूर्वक आरंभ. ४ धर्म, अर्थ, काम आणि भय, यांहीं करून प्रधानादिकांच्या स्वभावाची परीक्षा. ५ चिकित्सा.

**उपक्रोश**, पु० (शः) निंदा.

**उपगत**, वि० (तःता-तं) प्राप्त. २ स्वीकारलेलें.

**उपगम**, पु० (मः) अंगीकृत, स्वीकारलेलें. २ समीप गमन, जवळ जाणें.

**उपगूहन**, न० (नं) आलिंगन.

**उपग्रह**, पु० (हः) बंदी, अटकाव. २ उपयोग. ३ अनुकूल असणें. ४ उपग्रह.

**उपग्राह्य**, पु० न० (ह्यःह्यं) राजादिकांचे भेटीस जाते समयीं त्यांस जो नजराणा देतात तो.

**उपघ्न**, पु० (घ्नः) जवळचा आश्रय.

**उपचरित**, वि० (तःता-तं) शुश्रूषित, ज्याची चाकरी केली तो.

**उपचाय्य**, पु० (य्यः) अग्नि विशेष.

**उपचित**, वि० (तःता-तं) वाढलेला. २ दग्ध झालेला.

**उपचित्रा**, स्त्री० (त्रा) वनौ० जीस उंदीरकानी असें म्ह० ती.

**उपजाप**, पु० (पः) एके ठिकाणीं जमलेल्यांस विभक्त करणें.

**उपतप्**, पु० (प्) रोगविशेष.

**उपताप**, पु० (पः) रोग विशेष. २ रोग. ३ त्वरा.

**उपत्यका**, स्त्री० (का) पर्वताच्या जवळची भूमि.

**उपदंश**, पु० (शः) गर्मीपासून झालेला रोग.

**उपदा**, स्त्री० (दा) राजादिकांचे भेटीस जाते समयीं जो नजराणा देतात तो.

**उपदानक**, न० (कं) भेट.

**उपधा**, स्त्री० (धा) धर्म, अर्थ, काम आणि भय, यांहीं करून जी आमात्यादिकांचे स्वभावाची परीक्षा ती.

**उपधान**, न० (नं) उच्छीर्षक, उशी. २ विष. ३ प्रेमा, प्रीति. ४ विशेष.

**उपधि**, पु० (धिः) कपट. २ चाक.

**उपधूपित**, पु० (तः) ज्याचें मरण जवळ आलें तो. २ गणपती. ३ महादेव. ४ अस्तमय, संध्याकाळ.

**उपधूपिता**, स्त्री० (ता) पश्चिम दिशा.

**उपनयन**, न० (नं) मौंजी, मुंज.

**उपनाह**, पु० (हः) गवणि. २ विणा, इत्यादिकांच्या शेवटास ज्या काष्टाला तारा बांधितात तें काष्ट, खुंटी.

**उपनिशत्**, स्त्री० (त्) समीप. २ घर.

**उपनिषद्**, स्त्री० (द्) वेदाच्या शेवटचा एक भाग. २ धर्म. ३ एकांत.

**उपनिष्कर**, न० (रं) शहरांतील राजमार्ग. म्हणजे दहा धनुष्यें = चाळीस हात रुंदी ज्या मार्गाची आहे तो राजमार्ग. एक धनुष्याचें प्रमाण ९६ अंगुळें)

**उपन्यास**, पु० (सः) वचनारंभ, बोलण्याचा आरंभ.

**उपपति**, पु० (तिः) मुख्य नवऱ्याशिवाय जो दुसरा पति तो, जार.

**उपपद**, न० (दं) लेश.

**उपपुष्पिका**, स्त्री० (का) जांभई.

**उपप्लव**, पु० (वः) राहु. २ उत्पात. ३ केतु.

**उपबर्ह**, पु० (र्हः) उशी.

**उपभृत**, स्त्री० (त्) होमपात्र विशेष ज्यास स्रुक् असें म्हणतात तें.

**उपभोग**, पु० (गः) भोग, कांहींएक वस्तूपासून सुख अनुभविणें.

**उपम**, वि० (मः-मा-मं) सारखा.

**उपमा**, स्त्री० (मा) सादृश्य. २ उपमिति, सदृश्य ज्ञान.

**उपमान**, न० (नं) उपमितिकरण. २ उपमिति, सदृश्य ज्ञान. ३ ज्याची उपमा द्यावयाची ती वस्तु.

**उपयम**, पु० (मः) विवाह, लग्न.

**उपयाचित**, न० (तं) डाहाळी.

**उपयाम**, पु० (मः) विवाह लग्न.

**उपरक्त**, वि० (क्तः-क्ता-क्तं) राहूनें ग्रासलेला चंद्र किंवा सूर्य. २ व्यसनानें पीडित. ३ दुःखें करून पीडित.

**उपरम**, पु० (मः) उपरति, निवृत्ति.

**उपरक्षण**, न० (णं) रक्षणास ठेवलेल्या पाहारेकऱ्यांचा पाहारा, गस्त इत्यादि.

**उपराग**, पु० (गः) चंद्रग्रहण आणि सूर्यग्रहण हीं प्रत्येक. २ सामान्य. ३ अनीति, वाईट नीति. ४ ग्रहकल्लोळ. ५ व्यसन.

**उपराम**, पु० (मः) उपरति, निवृत्ति.

**उपरि**, अ० वर ह्या अर्थी.

**उपरिष्टात**, अ० वर ह्या अर्थी.

**उपल**, पु० (लः) दगड. २ रत्न.

**उपलब्धार्था**, स्त्री० (र्था) अनुभूतार्थाचें प्रतिपादन करणारे जे वासवदत्तादि ग्रंथ ते.

**उपलब्धि**, स्त्री० (ब्धिः) बुद्धि, ज्ञान. २ प्राप्ति.

**उपलंभ**, पु० (भः) साक्षात्कार.

**उपला**, स्त्री० (ला) वाळू.

**उपवन**, न० (नं) बाग.

**उपवर्तन**, न० (नं) ग्रामसमुदाय, देश.

**उपवस्त**, न० (स्तं) उपवास, उपोषण.

**उपवास**, पु० (सः) उपवास, उपोषण.

**उपविषा**, स्त्री० (षा) वनौषधि विशेष.

**उपवीत**, न० (तं) यज्ञोपवीत.

**उपव्हर**, न० (रं) जवळचा प्रदेश. २ एकांत स्थळ.

**उपशल्य**, न० (ल्यं) गांवाचे शेवटचा जो प्रदेश तो.

**उपशाय**, पु० (यः) एक उठल्यावर दुसऱ्यानें निजावें असे कालनियमित जे पहारेकरी ते प्रत्येक.

**उपश्रुत**, वि० (तःता-तं) स्वीकारलेला.

**उपश्रुति**, स्त्री० (तिः) आकाशवाणी.

**उपसत्ति**, स्त्री० (तिः) सेवा. २ सामान्य स्त्री.

**उपसंपन्न**, पु० (न्नः) यागासाठीं मारलेला पशु. २ जेवते वेळीं तोंडी लावण्याचा पदार्थ. (कोशिंबीर, चटणी इत्यादि.)

**उपसर**, पु० (रः) गर्भग्रहण, गर्भधारण.

**उपसर्ग**, पु० (र्गः) शुभाशुभसूचक उपद्रव. २ रोगभेद. ३ उत्पात. ४ राहू.

**उपसर्जन**, न० वि० (नं) अप्रधान, विशेषण.

**उपसर्या**, स्त्री० (र्या) उपासना. २ ज्या गाईस गर्भ धारणाचा काल प्राप्त आहे ती.

**उपसंव्यान**, न० (नं) नेसलेलें वस्त्र.

**उपसूर्यक**, न० (कं) सूर्याचे सभोंवार कदाचित सूर्याकार तेजाविशेष भासतो तो.

**उपसृष्ट**, न० (ष्टं) मैथून.

**उपस्कर**, पु० (रः) वेसवार. २ मसाला. ३ उपसाहित्य.

**उपस्थ**, पु० (स्थः) योनी. २ शिस्न. ३ वक्षस्थळ.

**उपस्पर्श**, पु० (र्शः) आचमन. २ स्पर्शमात्र. ३ स्नान.

**उपस्पर्शन**, न० (नं) स्नान. २ आचमन. ३ स्पर्श.

**उपहार**, पु० (रः) राजादिकांचे भेटीस जाते समयीं त्यांस जो नजराणा देतात तो.

**उपज्ञा**, स्त्री० (ज्ञा) प्रथमज्ञान. उ० ग्रंथासौपाणिनेरुपज्ञा.

**उपाकरण**, न० (णं) यथाविधी संस्कार करून वेद घेणें.

**उपाकृत**, पु० (तः) यज्ञामध्यें अभिमंत्रण करून मारलेला पशु. २ उपद्रव केलेला.

**उपात्यय**, पु० (यः) अतिक्रम, उल्लंघन.

**उपादान**, न० (नं) इंद्रियांचें आकर्षण. २ (न्यायशास्त्रांत समवायी कारण हाही अर्थ आहे.) ३ हेतु,

**उपादिक**, पु० (कः) जंतु विशेष.

**उपाधि**, पु० (धिः) धर्म विचार. २ कुटुंब पोषणादि व्यापार युक्त जो पुरुष तो. ३ विशेषण. ४ पीडा.

**उपाध्याय**, पु० (यः) पढविणारा पुरुष.

**उपाध्याया**, स्त्री० (या) पढविणाराची बायको. (पूर्वी स्त्रियांस व्रतबंध व वेदाध्यायन ह्यांचा अधिकार होता ह्याविषयीं सावित्री वचन आहे, असें माधवग्रंथांत यमाचें मत आहे.)

**उपाध्यायानी**, स्त्री० (नी) उपाध्यायाची बायको.

**उपाध्यायी**, स्त्री० (यी) उपाध्यायाची बायको.

**उपानह**, स्त्री० (नत) चर्मी जोडा.

**उपाय**, पु० (यः) साम, दान, भेद, आणि दंड हे चार उपाय आहेत ते प्रत्येक. (क्वचित माया, उपेक्षा, इंद्रजाल हे तीन आणि वरचे चार मिळून सात उपाय सांगितलेले आहेत.)

**उपायन**, न० (नं) राजादिकांचे भेटीस जाते समयीं जो त्यांस नजराणा देतात तो.

**उपावृत्त**, वि० (त्तःत्ता-त्तं) श्रमशांत्यर्थ वारंवार भूमीवर पार्श्वभागानें जो लोळतो तो.

**उपांशु**, पु० (शुः) जपभेद. २ अ० जेथें मनुष्य नाहीं तें स्थळ.

**उपासंग**, पु० (गः) बाण ठेवण्याचा भाता.

**उपासन**, न० (नं) बाण सोडण्याचा अभ्यास करणें. २ उपासना. ३ आसन.

**उपासना**, स्त्री० (ना) बाण सोडण्याचा अभ्यास करणें. २ शुश्रूषा.

**उपासित**, वि० (तःता-तं) ज्याची उपासना केली तो.

**उपाहित**, वि० (तःता-तं) संयुक्त केलेला. २ अग्निकृत उपद्रव विशेष.

**उपाक्ष**, न० (क्षं) प्रत्यक्ष.

**उपेंद्र**, पु० (द्रः) विष्णु. २ वामन.

**उपोढ** (ढः) जवळ.

**उपोदिका**, स्त्री० (का) वनौ० जीस वाळी, थोरमयाळ. पोई, माडवीवेल इत्यादि म्ह० ती,

**उपोद्घात**, पु० (तः) प्रकृतार्थ सिध्यर्थ जो विचार तो, किंवा प्रकृतोपयोगिता.

**उपोषण**, न० (णं) उपास.

**उत्पकृष्ट**, वि० (ष्टःष्टा-ष्टं) प्रथम धान्य पेरून नंतर नांगरलेलें (शेत वगैरे.)

**उभयद्युः**, अ० दोन दिवसांचे ठायीं ह्या अर्थी. उ० उभयद्युरुपोषणं.

**उभयेद्युः**, अ० दोन दिवसांचे ठायीं ह्या अर्थी.

**उम**, अ० प्रश्नार्थी.

**उमा**, स्त्री० (मा) पार्वती. २ जवस धान्य विशेष. ३ हळद. ४ कीर्ति. ५ कांति.

**उमागुरु**, पु० (रुः) हिमालय.

**उमापति**, पु० (तिः) महादेव.

**उभ्य**, वि० (भ्यःभ्या-भ्यं) जवस नांवाचें धान्य उत्पन्न होण्याचें (क्षेत्र.)

**उरग**, पु० (गः) सर्प.

**उरछद**, न० (दं) कवच, चिलखत.

**उरण**, पु० (णः) मेंढरूं, मेंढा, एडका, इत्यादि.

**उरणाख्य**, पु० (ख्यः) वनौ० ज्यास टाकळा असें म्हणतात तो.

**उरणाक्ष**, पु० (क्षः) वनौ० ज्यास टाकळा असें म्हणतात तो.

**उरभ्र**, पु० (भ्रः) मेंढा, एडका.

**उररी**, अ० विस्तार. २ अंगिकार ह्या अर्थी. उ० उररी करोति.

**उररीकृत**, वि० (तःता-तं) अंगीकृत, स्वीकारलेलें.

**उरव्य**, पु० (व्यः) वैश्य, वाणी.

**उरस**, न० (रः) वक्षस्थळ. २ श्रेष्ठ.

**उरसिल**, वि० (लःला-लं) विशाल वक्षस्थळाचा, मोठ्या छातीचा.

**उरस्कट**, पु० (टः) नवीन केलेलें जानवें, २ कंठलंबित.

**उरस्य**, वि० (स्यःस्या-स्यं) ज्याला सजातीय स्त्रीशीं विवाह करून तिचे ठायीं झालेलें. (अपत्य.)

**उरस्वत**, वि० ( स्वान्. स्वती. स्वत. ) मोठ्या छातीचा.

**उरी**, अ० अंगिकार. २ विस्तार ह्या अर्थी. उ० उरी करोति.

**उरीकृत**, वि० (तःता-तं) स्वीकारलेला.

**उरु**, वि० (रुःरुःरुं) विस्तीर्ण.

**उरुकालक**, पु० (कः) वृक्ष विशेष.

**उरुबुक**, पु० (कः) एरंडाचें झाड.

**उरुबूक**, पु० (कः) एरंडाचें झाड.

**उरुशक्थि**, पु० (क्थिः) बेंबी.

**उर्जरंत**, पु० (तः) रेडा.

उर्णायु, पु० (युः) मेंढ्याची लोंकर. २ मेंढा.
उर्यूरी, अ० विस्तार. २ अंगीकार ह्या अर्थी.
उर्वट, पु० (टः) वर्ष.
उर्वरा, स्त्री० (रा) सर्व धान्योत्पत्तीची जी भूमि ती. २ (हैमकोशांत सामान्य भूमि.)
उर्वशी, स्त्री० (शी) अप्सराविशेष.
उर्वशीवल्लभ, पु० (भः) पुरूरवा.
उर्वी, स्त्री० (र्वी) पृथ्वी.
उर्व्यंग, पु० (गः) गोमय छत्रिका. २ अळंबें, ज्यांस भुयफोड असें म्हणतात तें.
उलप, पु० (पः) विस्तारलेली वेल. २ समंजस. ३ न० पु० (पं- पः) तृणविशेष.
उलुपिन्, पु० (पी) मत्स्यविशेष. २ स्त्री० (पी) नाग कन्या, अर्जुनाची स्त्री.
उलूक, पु० (कः) घुबड. २ इंद्र. ३ उलुक नामा योद्धा.
उलूखल, न० (लं) उलूखलक, न० (कं) गुग्गुल वृक्ष. २ उखळ.
उल्का, स्त्री० (ल्का) अग्नीची ज्वाळा. २ तेजःपुंज. ३ वीज.
उल्कामुखी, स्त्री० (खी) लांडग्याची स्त्री०. २ कोल्ही.
उल्ब, न० (ल्बं) ज्या चर्मानें कुक्षींत गर्भ वेष्टीत असतो तें चर्म, वार.
उल्बण, वि० (णः णा- णं) स्पष्ट.
उल्मुक, न० (कं) प्रज्वालित काष्ट, कोलीत.
उल्लरोर, पु० (रः) उल्लल, पु० (लः) ज्याचे आंगावर फार केंस तो.
उलाघ, वि० (घः घा- घं) जो रोगापासून सुटला तो, रोगमुक्त. २ कोणत्याही कामाविषयीं दक्ष. ३ आषाढमास.
उल्लिखित, वि० (तः ता- तं) तासलेलें.
उल्लोच, पु० (चः) ऊन न लागावें म्हणून वर बांधलेलें वस्त्र, ज्याला चांदणी, चांदवा असें म्हणतात तें.
उल्लोल, पु० (लः) मोठी लहरी, मोठी लाट.
उशनस्, पु०(नाः) शुक्राचार्य नामा जो दैत्यांचा गुरु तो.
उशीर, न० (रं) काळ्या वाळ्याचें मूळ.
उषण, न० (णं) मिरीं.
उषणा स्त्री० (णा) पिंपळी.
उषर्बुध, पु० (धः) अग्नि, चित्तव.
उषस्, न० (षः) प्रातःकाळ. २ गुग्गुळ. ३ पु० (षाः) कामी पुरुष.
उषा, स्त्री० (षा) स्थाली, तपेलें. २ प्रभात काळ. ३ बाणासुराची कंन्या. ४ अ० रात्रीचा समाप्तिकाळ, पाहांट ह्या अर्थी. उ० उषातनोवायुः.
उषाकाल, पु० (लः) कोंबडा.
उषापति, पु० (तिः) मदन पुत्र.
उषाघन, न० (नं) शोणितपूर.
उषित, वि० (तः ता- तं) दग्ध, जाळलेलें.
उषितंगवीन, वि० (नः ना- नंः) पूर्वी जेथें गाई असत तें स्थान.
उष्ट्र, पु० (ष्ट्रः) उंट.
उष्ट्रवाही, पु० (ही) उंट जुंपलेला रथ.
उष्ट्रिका, स्त्री० (का) पात्रविशेष. २ मातीचें भांडें.
उष्ट्री, पु० (ष्ट्री) हत्तीचा छावा. २ उंटाचा छावा. ३ तांदूळ धुण्याची रोवळी, गळती.
उष्ण, पु० (ष्णः) ग्रीष्मऋतु. २ वि० (ष्णः ष्णा- ष्णं) चतुर, दक्ष. ३ ऊन. ४ जो आळशी नव्हे तो. ५ तीक्ष्ण.
उष्णक, पु० (कः) ग्रीष्म ऋतु. २ आतूर. लौकर काम करणारा.

**उष्णरश्मि**, पु० (श्मिः) सूर्य.
**उष्णवारण**, पु० (णः) छत्री. २ अबदागीर.
**उष्णागम**, पु० (मः) ग्रीष्मऋतु.
**उष्णिका**, स्त्री० (का) द्रवयुक्त ओदन, ज्यास आटवल, पातळ भात, कण्हेरी असें म्हणतात ती.
**उष्णीष**, न० (षं) शिरो वेष्टन वस्त्र, पागोटें, रुमाल इत्यादि. २ पु० (षः) किरीट. ३ न० (षं) लक्षणांतर.
**उष्णोपगम**, पु० (मः) } ग्रीष्म ऋतु.
**उष्मक**, पु० (कः) } ग्रीष्म ऋतु.
**उष्मागम**, पु० (मः) } ग्रीष्म ऋतु.
**उस्र**, पु० (स्रः) किरण. २ बैल.
**उस्रा**, स्त्री० (स्रा) गाय. वनौ० जीस उंदीरकानी असें म्हणतात ती.
**उक्षन्** पु० (क्षा) } बैल
**उक्षाभद्र**, पु० (द्रः) } बैल

# ऊ.

**ऊ**, अ० वाक्यारंभ. २ लक्षण. ३ रक्षण. ४ दया. ५ पु० ब्रम्हदेव.
**ऊं**, अ० प्रश्नार्थी. उ० ऊंगछसि बहिर्धव. २ रागानें बोलणें. ३ विचारणें.
**ऊत**, वि० (तः ता- तं) तंतूंनीं विणलेला.
**ऊति**. स्त्री० (तिः) स्त्रीचें रक्षण.
**ऊधस्**, न० (धः) ओंटी, कास.
**ऊररी**, } अ० विस्तार. २ स्वीकार ह्या अर्थी.
**ऊरी**, } उ० ऊररी करोति.
**ऊरीकृत**, वि० (तः ता- तं) अंगीकृत, स्वीकारलेला.
**ऊरु**, पु० (रुः) गुढग्याच्या वरचाभाग, मांडी.
**ऊरुज**, पु० (जः) वैश्य, वाणी. २ निषाद, भिल्ल ज्यास कोळी असें म्ह० तो.
**ऊरुपर्वन्**, न० (र्व) ढोंपर, गुढगा.
**ऊर्ज**, पु० (र्जः) कार्तिक मास. २ बळ. ३ उत्साह. ४ तेज.
**ऊर्जस्वल**, वि० (लः ला- लं) फार पराक्रमी, फार बळिष्ट.
**ऊर्जस्विन्**, वि० (स्वी- स्विनी- स्वि) फार पराक्रमी.
**ऊर्णनाभ**, पु० (भः) जंतुविशेष ज्यास कोळी असें म्हणतात तो.
**ऊर्णा**, स्त्री० (र्णा) मेंढरें, ससे, उंट इत्यादिकांची लेंव. २ दोन भोंवयांच्या मध्यें मृणाल तंतूसारखे सूक्ष्म व शुभ्र अशा केसांचा जो भोंवरा असतो तो. (हा भोंवरा सामान्य पुरुषास नसतो. जे चक्रवर्ती, सार्वभौमराजे किंवा महा योगी त्यांचें हें लक्षण आहे.) ३ लोकरीचें वस्त्र, धाबळी इ०.
**ऊर्णापति**, पु० (तिः) यम्.
**ऊर्णायु**, पु० (युः) मेंढा, एडका. २ कांबळें.
**ऊर्द्धक**, पु० (कः) मृदंगविशेष.
**ऊर्ध्व**, न० (र्ध्वं) उंच. २ वर. ३ फार वाढलेला (संपत्तीनें वगैरे)
**ऊर्ध्वगपुर**, न० (रं) ऊर्ध्वगपूर नगरविशेष, हरिश्चंद्राचें नगर.
**ऊर्ध्वजानु**, वि० (नुः नुः नु) बसलें असतां ज्याचे गुढगे हनवटीहून उंच दिसतात तो. २ गुढघ्यावर बसणारा.
**ऊर्ध्वरेतस्**, पु० (ताः) महादेव. २ भीष्माचा-

र्य. ३ साधू. ४ आमरण ब्रम्हचर्यव्रत बाळगणारा.

**ऊर्ध्वज्ञ**, वि० (ज्ञः ज्ञा- ज्ञं) ⎫ ऊर्ध्वजानु हा
**ऊर्ध्वज्ञु**, वि० (ज्ञुः ज्ञुः ज्ञु) ⎭ शब्द पहा.

**ऊर्ध्वासित**, पु० (तः) कोरती. २ पडवळीचें झाड. ३ कारली (कारवेल्लः)

**ऊर्मि**, पु० स्त्री० (र्मिः र्मिः) लहरी, लाट. २ प्रकाश. ३ वेग. ४ भंग. ५ वेदना. ६ पीडा. ७ पु० (र्मिः) महादेव.

**ऊर्मिका**, स्त्री०(का) अंगुळीचें भूषण, आंगठी. २ वस्त्रभंग ३ तरंग.

**ऊर्मिमत्**, वि० (मान्. मती. मत्) वक्र, वांकडा.

**ऊर्मिमालिन्**, पु० (ली) समुद्र.

**ऊर्व**, पु० (र्वः) वडवाग्नि.

**ऊर्वारु**, स्त्री० (रुः) कर्कटी, कांकडी.

**ऊष**, पु० (षः) खारीमाती. २ प्रातःकाळ. ३ क्षारदेश. ४ चंदनाद्रि पर्वतविशेष. ५ सायंकाळ. ६ न० (षं) रंध्र. ७ कानाचें छिद्र.

**ऊषण**, पु० (णः) मिरीं.

**ऊषणा**, स्त्री० (णा) पिंपळी.

**ऊषर**, वि० (रः रा- रं) खारमातीची जागा. २ क्षारदेश.

**ऊषवत्**, वि० (वान्. वती. वत्) क्षारदेश.

**ऊषा**, स्त्री० (षा) अजी (बापाची आई)

**ऊष्मन्**, न० (ष्मा) गर्व. २ उष्णकाळांत मनुष्यांस तलखी, काहली असें म्हणतात तो.

**ऊह**, पु० (हः) तर्क.

---

## ऋ.

**ऋ**, अ० निंदायुक्त वाक्य. २ पु० देव. ३ स्त्री० देवमाता.

**ऋक्थ**, न० (क्थं) धन.

**ऋग्**, पु० (ग्) प्रथम वेद.

**ऋच्**, स्त्री० (क्) वेदाची ऋचा.

**ऋचीष**, ⎫ न० (षं) भाकर, पोळी, वडे
**ऋजीष**, ⎭ इत्यादि भाजण्याच्या उपयोगी पात्र (तवा, कढई, इ०)

**ऋजु**, वि० (जुः ज्वीजु) सरळ.

**ऋजुरोहित**, न० (तं) मेघांचे ठायीं प्रतिबिंबित जे सूर्याचे किरण धनुष्याकार भासतात त्यास इंद्राचें धनुष्य असें म्हणतात तें.

**ऋण**, न० (णं) कर्ज.

**ऋणमार्गण**, न० (णं) जामीन.

**ऋणमुक्ति**, स्त्री० (क्तिः) कर्जाची फेड.

**ऋत**, न० (तं) सत्य. २ उंछ आणि शिल हीं दोन मिळून ऋत.

**ऋतधामन्**, पु० (मा) विष्णु.

**ऋति**, स्त्री० (तिः) स्मृती. २ रक्षण.

**ऋतीया**, स्त्री० (या) निंदा. २ करुणा असेंही कोणी म्हणतात.

**ऋतु**, पु० (तु) स्त्रीरज, न्हाण. २ दोन महिने. (हे ऋतु सहा आहेत. मार्गशीर्ष, पौष= हेमंत ऋतु. २ माघ, फाल्गून= शिशिर० ३ चैत्र, वैशाख= वसंतऋतु. ४ ज्येष्ठ, आषाढ= ग्रीष्मऋतु. ५ श्रावण भाद्रपद= वर्षाऋतु. ६ अश्वीन, कार्तिक-- शरदृतु.)

**ऋतुपर्ण**, पु० (र्णः) ज्याणें नळ राजास अक्षविद्या दिली तो सूर्यवंशी राजा.

**ऋतुपर्याय**, पु० (यः) वसंतादि षट् ऋतूं-चा जो अनुक्रम तो.

**ऋतुमति**, स्त्री० (ती) रजस्वला स्त्री.

**ऋतुवृत्ति**, पु० (त्तिः) वर्ष.

**ऋते**, अ० विना, वांचून ह्या अर्थी. उ० ऋते पुण्यात् स्वर्गतिर्न.

**ऋत्विज**, पु० (क्) यजमानानें धन देऊन यज्ञ कर्माचे ठायीं नियुक्त जे अग्नीध्र, होता, ब्रम्हा, इत्यादि षोडश ऋत्विज ते प्रत्येक.

**ऋद्ध**, न० (द्धं) तृण घालून रास केलेलें धान्य. २ वि० (द्धः द्धा- द्धं) मातबर, तालेवार

**ऋद्धि**, स्त्री० (द्धिः) समृद्धि. २ वनौ० जीस केवणी, मुरुडशेंग असें म्हणतात ती.

**ऋनामा**, स्त्री० (मा) देवमाता.

**ऋभु**, पु० (भुः) देव.

**ऋभुक्षन्**, पु० (क्षा) इंद्र.

**ऋश्य**, पु० (श्यः) शीघ्रगमन करणारा ह-रीण विशेष.

**ऋषभ**, पु० (भः) गायनाचे स्वरांतील दुसरा स्वर. २ बैल. ३ औषधिविशेष जीस बेलघांटी असें म्हणतात ती. ४ हा ऋषभ शब्द उत्तर पद असला तर क्व-चित श्रेष्ठार्थक होतो. उ० मनुजर्षभः ५ कानाचें छिद्र. ६ ऋषभ देव.

**ऋषभगति**, पु० (तिः) महादेव. २ बैलाव-र बसून जाणारा.

**ऋषभा**, स्त्री० (भा) मनुष्य श्रेष्ठ स्त्री. २ वनौ० विशेष. ३ विधवा.

**ऋषि**, पु० (षिः) सत्यवक्ता. २ ऋषि, मुनि. (महार्षि, देवर्षि, ब्रम्हर्षि. इत्यादि.) ३ वेद. ४ किरण. ५ तलवार, आयुध.

**ऋषिकुल्या**, स्त्री० (ल्या) नदी.

**ऋष्टि**, पु० (ष्टिः) तलवार.

**ऋष्य**, पु० (ष्य) शीघ्र गमन करणारा मृग विशेष; हा चित्रविचित्र रंगाचा असतो.

**ऋष्यकेतु**, पु० (तुः) अनीरुद्ध.

**ऋष्यगंधा**, स्त्री० (धा) वनौ० जीस वर-धारा, जीर्ण फंजी असें म्हणतात ती.

**ऋष्यप्रोक्ता**, स्त्री० (क्ता) वनौ० जीस कु-वली, कुहिरी असें म्हणतात ती. २ वनौ० जीस शतावरी, सहस्त्र मुली असें म्हणतात ती.

**ऋक्ष**, न० (क्षं) नक्षत्र. २ पु० (क्षः) दिं-डयाचें झाड. ३ आस्वल. ४ पर्वतभेद.

**ऋक्षगंधा**, स्त्री० (धा) वनौ० जीस वरधा-रा, जीर्ण फंजी असें म्हणतात ती.

**ऋक्षगंधिका**, स्त्री० (का) काळा भुई कोहळा.

**ऋक्षर**, न० (रं) उदकाची धार. २ पु० (रः) ऋत्विक.

## ॠ.

**ॠ**, अ० वाक्यारंभ. २ रक्षण. ३ न० व-क्षस्थळ. ४ स्त्री० स्मृति. ५ राक्षस मा-ता. ६ गती. ७ पु० दनु. ८ भैरव. ९ दैत्य.

## ऌ.

**ऌ**, स्त्री० देवता. २ माया. ३ भूमि.

## ॡ.

**ॡ**, स्त्री० देवनारी. २ माता. ३ नारी. ४ स्त्री० पु० आत्मा.

## ए.

**ए**, अ० स्मृति. २ गुणाच्या ठिकाणीं दोष लावणें. ३ दया. ४ आमंत्रण. ५ पु० विष्णु.

**एक**, वि० (कःका-कं) असहाय, एकटा. २ भिन्न, निराळा, दुसरा. ३ मुख्य. ४ केवळ, एक. ५ न० (कं) संख्याविशेष.

**एकक**, वि० (कःका-कं) एकटा.

**एककुंडल**, पु० (लः) बळराम. २ कुबेर.

**एकचक्र**, न० (क्रं) शंभुपुरीदेश वि०. २ हरिग्रह. ३ सार्वभौम. ४ स्त्री० (क्रा) या नावाची नगरी.

**एकचर**, पु० (रः) मत्स्य विशेष.

**एकचारिन्**, पु० (री) शाक्य मुनीदंत. २ बौद्धमती पुरुष.

**एकजन्मन्**, पु० (न्मा) मांडलिक राजा.

**एकतर**, वि० (रःरा-रं) भिन्न, निराळा.

**एकतान**, वि० (नःना-न) एकाग्रचित्त, अनन्यवृत्ति.

**एकताल**, पु० (लः) गायनाचें साहित्य सर्व अन्यून असून जें गायन तें.

**एकदंत**, पु० (तः) गणपती.

**एकदा**, अ० एक काळाचे ठायीं ह्या अर्थी. उ० गवांशतमेकदादत्तं.

**एकदृष्टि**, पु० (ष्टिः) काकपक्षि, कावळा.

**एकदेह**, पु० (हः) बुधनामा ग्रह.

**एकधुर**, वि० (रःरा-रं) एक कार्याचे उपयोगी, एक कार्यभार वाहणारा.

**एकधुरावह**, वि० (हःहा-हं) एक कार्याचे उपयोगी.

**एकधुरीण**, वि० (णःणा-णं) एक कार्याचे उपयोगी.

**एकनट**, पु० (टः) कथा करणारा.

**एकपत्नी**, स्त्री० (त्नी) पतिव्रता.

**एकपद**, न० (दं) तत्काळ.

**एकपदी**, स्त्री० (दी) मार्ग.

**एकपक्ष**, पु० (क्षः) सहाय्य करणारा.

**एकपात्**, पु० (त्) शिव, महादेव.

**एकपिंग**, पु० (गः) कुबेर.

**एकवार**, न० (रं) कमळ.

**एकशफ**, पु० (फः) घोडा.

**एकशफांघ्रिक**, पु० (कः) कळवा.

**एकशृंग**, पु० (गः) विष्णु. २ गेंडा. ३ कृष्ण.

**एकसर्ग**, वि० (र्गःर्गा-र्गं) एकाग्रचित्त, अनन्यवृत्ति.

**एकहायनी**, स्त्री० (नी) एक वर्षाची (गाय.)

**एकाकिन्**, वि० (कीकिनी-कि) एकटा.

**एकांग**, न० (गं) केशर. २ चंदनवृक्ष. ३ बुधनामा ग्रह. ४ अर्धे शरीर.

**एकाग्र**, वि० (ग्रःग्रा-ग्रं) अनाकुल, स्वस्थ. २ एकाग्र चित्त.

**एकाग्र्य**, वि० (ग्र्यःग्र्या-ग्र्यं) स्वस्थ. २ एकाग्रचित्त.

**एकांत**, न० (तं) अतिशय. २ एकीकडे.

**एकांध**, पु० (धः) बुधनामा ग्रह.

**एकाब्दा**, स्त्री० (ब्दा) एक वर्षाची (गाय.)

**एकायन**, वि० (नःना-नं) स्वस्थ. २ एकाग्र चित्त.

**एकायनगत**, वि० (तःता-तं) स्वस्थ. २ एकाग्रचित्त.

**एकाष्ठिल**, पु० (लः) वनौ० रुईमंदाराचें झाड. २ (कोणी थोर बकुळी असें म्हणतात.)

**एकाष्ठिला**, स्त्री० (ला) वनौ० जीस, पाडवळी, पाहाडमूळ असें म्हणतात ती.

**एकीय**, पु० (यः) सहाय्य करणारा.

**एड**, वि० (डःडा-डं) बधिर, बहिरा, भेरा.

**एडक**, पु० (कः) एडका, मेंढा.

**एडगज**, पु० (जः) वनौ० टाकळ्याचें झाड.

**एडमूक**, वि० (कःका-कं) जो बधिर आणि मुका तो. २ वांकडे मनाचा.

**एडूक**, न० (कं) ज्या भिंतींत हाडें किंवा कांहीं कठीण पदार्थ दार्ढ्यासाठीं घातलेले असतात ती भिंत.

**एण**, पु० (णः) ज्याचे डोळे सुंदर असतात तो हरिण.

**एणतिलक**, पु० (कः) चंद्र.

**एत**, वि० (तःता-तं) चित्रवर्ग. २ पु० (तः) आलेला.

**एतर्हि**, अ० ह्या कालाचे ठायीं ह्या अर्थीं. उ० एतर्हिक्रियते कार्यं.

**एध**, पु० (धः) शुष्क तृण, काष्ठ, इत्यादि जळण.

**एधतु**, पु० (तुः) अग्नि. २ पुरुष.

**एधस्**, न० (धः) शुष्क तृण, काष्ठ, इत्यादि जळण.

**एधा**, स्त्री० (धा) समृद्धि.

**एधित**, वि० (तःता-तं) वृद्धिंगत.

**एनस्**, न० (नः) पातक. २ अपराध.

**एरंड**, पु० (डः) एरंडाचें झाड.

**एरिहन्**, पु० (हा) महादेव, शिव.

**एलवालुक**, न० (कं) वाळूक, कांकडी.

**एला**, स्त्री० (ला) इलाचीचें झाड.

**एलापर्णी**, स्त्री० (र्णी) वनौ० जीस कोंलिंदण असें म्हणतात ती.

**एवं**, अ० सादृश्य. २ प्रकार. ३ अंगीकार. ४ निश्चय ह्या अर्थीं. उ० अग्निरेवंद्विजः २ एवंवादिनिदेवर्षौ. ३ एवमेवयथाप्राह. ४ एवंयदाहभगवान्. ५ अर्थ. ६ प्रश्न. ७ दुसऱ्याची कृति. ८ उपमा. ९ इच्छाकरणें.

**एव**, अ० निश्चयार्थी. उ० एवमेव.

**एषणिका**, स्त्री० (का) कांटा, तराजू.

---

## ऐ.

**ऐ**, पु० महादेव. २ अ० बोलावणें. स्त्री० ३ स्मृति.

**ऐकनट**, पु० (टः) कथक (नाचणारे पुरुष.)

**ऐकागारिक**, वि० (कःकी-कं) चोर.

**ऐंगुद**, न० (दं) हिंगणबेटाच्या झाडाचें फळ.

**ऐडविल**, पु० (लः) कुबेर.

**ऐण**, वि० (णःणा-णं) } हरिणाचें कांतडें,
**ऐणेय**, वि० (यःया-यं) } केंस इत्यादि.

**ऐतिह्य**, न० (ह्यं) लोक परंपरागत उपदेश.

**ऐंद्रि**, पु० (द्रिः) वाली नामा वानर. २ जयंत नामा जो इंद्राचा पुत्र तो. ३ कावळा. ४ अर्जुन पांडवांपैकीं.

**ऐंद्रियक**, वि० (कःकी-कं) इंद्रियग्राह्य, इंद्रियानें जाणावयास योग्य.

**ऐंद्री**, स्त्री० (द्री) दरिद्र.
**ऐरावण**, पु० (णः) इंद्राचा हत्ती, ऐरावत.
**ऐरावत**, पु० (तः) इंद्राचा हत्ती, ऐरावत. २ पूर्व दिशेचा हत्ती. ३ नारिंगाचें झाड. ४ ओंटीचें झाड. ५ पाताळांतील सर्पराज.
**ऐरावता**, स्त्री० (ता) } विद्युल्लता, वीज. २ विद्युल्लतेचा भेद. २ ऐरावत हत्तीची स्त्री.
**ऐरावती**, स्त्री० (ती) }
**ऐल**, पु० (लः) पुरूरवा.
**ऐलविल**, पु० (लः) कुबेर.
**ऐलेय**, न० (यं) वाळूक, कांकडी.
**ऐश्वर्य**, न० (र्यं) प्रभुत्व.
**ऐषमस्**, अ० (मः) वर्तमान वर्षी, चालत्या सालीं, यंदा, ह्या वर्षी, ह्या अर्थी. उ० ऐषमोपिकांता नागतः

## ओ.

**ओ**, अ० संबोधन. २ बोलावणें, ह्या अर्थी. ३ पु० ब्रम्हदेव.
**ओं**, अ० अंगीकार, अनुमोदन ह्या अर्थी. उ० ओमित्युक्तवतोयशार्डीणः २ प्रणव. ३ उपक्रम. ४ पु० अनंत. ५ मंगळ.
**ओक**, पु० (कः) } गृह, घर. २ आश्रम.
**ओकस्**, न० (कः) }
**ओंकार**. पु० (रः) वेदाचा आदी जो "ओं" हा शब्द, प्रणव.
**ओंकारा**, स्त्री० (रा) लक्ष्मी.
**ओघ**, न० (घं) नृत्यविशेष. २ पु० (घः) समूह. ३ पाण्याचा प्रवाह. ४ परंपरा.
**ओजस्**, न० (जः) दीप्ति, कांति. २ बळ. ३ प्रकाश. ४ प्रतिबंध. ५ धातूंचें तेज.
**ओड्र**, पु० ड्रः देशविशेष.
**ओड्रपुष्प**, न० (ष्पं) जास्वंदीचें फूल.
**ओतु**, पु० (तुः) मार्जार, माजर.
**ओदन**, पु० न० नः (नं) भात, अन्न.
**ओल**, वि० (लःला·लं) आर्द्र, ओलें. २ पु० (लः) सुरण (कंद)
**ओष**, पु० (षः) जळणें.
**ओषधि**, स्त्री० (धिः) } फळ पिकलें म्हणजे जो निर्जीव होते ती. उ० भात पिकलें म्हणजे काडी निर्जीव होते.
**ओषधी**, स्त्री० (धी) }
**ओषधीश**, पु० (शः) चंद्र.
**ओष्ठ**, पु० (ष्ठः) ओंठ.

## औ.

**औ**, अ० बोलावणें. २ संबोधन. ३ पृथ्वी. ४ पु० शब्द.
**औचित्य**, न० (त्यं) सत्य. २ उचित.
**औदनिक**, पु० (कः) सैपाकी, आचारी.
**औदरिक**, वि० (कःकी·कं) भुकेनें अत्यंत पीडित, भुकेलेला. २ विचार न करितां यथेच्छ खाणारा.
**औदुंबर**, न० (रं) ताम्र, तांबें. २ उंबराचें फळ. ३ रोग विशेष. ४ पु० (रः) यम.
**औपवस्त**, न० (स्त) उपवास.
**औपायिक**, वि० (कःकी·कं) नीतीनें मिळावयास योग्य (द्रव्यादिक.)

**औमीन**, वि० (नःना-नं) जवस नांवाचें धान्य उत्पन्न होण्याचें (शेत.)

**औरभ्रक**, न० (कं) मेंढरांचा कळप.

**औरस**, वि० (सःसी-सं) सजातीय स्त्रीशीं विवाह करून तिचे ठायीं त्यापासून झालेलें अपत्य.

**औरस्य**, वि० (स्यःस्यी-स्यं) सजातीय स्त्रीशीं विवाह करून तिचे ठायीं त्यापासून झालेलें अपत्य.

**और्ध्वदेहिक**, न० (कं) मरण दिवसापासून दहा दिवस पर्यंत जें पिंडदानादि कर्म तें. २ वि० (कःकी-कं) मृताची कीर्ति रहावी म्हणून कर्म करणारा.

**और्ध्वश्रौतासिक**, पु० (कः) शैव.

**और्व**, पु० (र्वः) वडवाग्नि.

**और्वशेय**, पु० (यः) अगस्त्य ऋषि.

**औलूक्य**, पु० (क्यः) सप्त पदार्थ वादी जो कणाद ऋषि तो.

**औशीर**, पु० (रः) चामरदंड, चवरीचा दांडा. २ (शयन आणि आसन ह्या दोंहोस ही संज्ञा आहे, असें स्वामीचें मत आहे.) ३ न० (रं) वाळण्यापासून झालेला (पदार्थ वगैरे.)

**औषध**, न० (धं) रोगहारी जें औषध तें.

**औष्ट्रक**, न० (कं) उंटांचा समूह.

**औक्षक**, न० (कं) बलिवर्द समूह, बैलांचा समुदाय.

---

## क.

**क**, पु० (कः) आत्मा. २ वायु. ३ ब्रम्हदेव. ४ सूर्य. ५ यम. ६ दंभ. ७ मोर. ८ अग्नि. ९ राजा. १० पक्षि. ११ दक्ष. १२ सर्प. १३ प्रकाश. १४ न० (कं) जल, पाणी. १५ सुख. १६ मस्तक.

**कं**, अ० पादपुरण. २ पाणी. ३ मस्तक. ४ सुख.

**कंक**, पु० (कः) यम. २ कपटी ब्राम्हण. ३ धर्मराज. ४ कंकपक्षि( ह्याचीं पिसें बाणास उपयोगी पडतात.) ५ कपट. ६ कंसाचा भाऊ. ७ बगळा पक्षी.

**कंकटक**, पु० (कः) कवच, चिलखत.

**कंकण**, पु० न० (णःणं) मणगटाचें भूषण, कांकण, कंकण्या इ०. २ न० (णं) शुभकार्याच्या वेळेस मनगटास दोरा गुंडाळतात तो. ३ अलंकार.

**कंकणी**, स्त्री० (णी) क्षुद्रघंटिका, घागरी, घुंघुर इ०.

**कंकत**, न० (तं) केंस विंचरणें. २ फणी.

**कंकतिका**, स्त्री० (का) केशमार्जनी, फणी. वनौ० अतिबला (कंकती.)

**कंकत्रोट**, पु० (टः) मत्स्यविशेष.

**कंकाल**, पु० (लः) शरीरांतील अस्थिपंजर, हाडाचा पिंजरा.

**ककुत**, न० (त्) बैलाचा अवयव, कोळें.

**ककुद**, पु० न० (दःदं) प्राधान्य. २ छत्रचामरादि राजचिन्ह. २ बैलाच्या पाठीवरील मांस पिंड ज्यास कोळखांद असें म्ह० तें.

**ककुंदर**, न० (रं) पाठीचे दांड्याचे खालचे बाजूस कंबरे खालीं जे दोन खळगे असतात ते प्रत्येक.

**ककुद्मती**, स्त्री० (ती) कटि, कंबर.

**ककुद्मत**, पु० (द्मान) बैल.

**ककुभ**, स्त्री० (प) दिशा. २ शोभा. ३ कमळाची माळ. ४ वेणीचे केश.

**ककुभ**, पु० (भः) वीणेचा खालचा भोंपळा. २ अर्जुनवृक्ष, अर्जुनसादडा. ३ गायनांतील राग वि०.

**कंकेरुत**, पु० (त) बकपक्षि.

**कंकेलि**, पु० (लिः) अशोक वृक्ष.

**कक्कोलक**, न० (कं) कंकोळ, गवला.

**कक्खट**, वि० (टः टा टं) कठीण, घट्ट. २ समर्थ. ३ स्थूळ.

**कंगु**, पु० (गुः) कांग, राळा.

**कंगू**, स्त्री० (गूः) कांग, राळा.

**कच**, पु० (चः) मस्तकाचा केस. २ कच नामा बृहस्पतीचा पुत्र. ३ केतु नामा ग्रह. ४ शुष्कव्रण. ५ बंध.

**कचंगल**, पु० (लः) समुद्र.

**कचमाल**, पु० (लः) धूर.

**कचा**, स्त्री० (चा) हत्तीण.

**कचाकु**, पु० (कुः) वाईट स्वभावाचा. २ सर्प. ३ मोठ्या संकटानें वश होण्यास योग्य.

**कचाटुर**, पु० (रः) पक्षिविशेष. ज्यास अंबकाक असें म्ह० तो.

**कंचुक**, पु० (कः) चोलक, चोळी, अंगरखा इ०. २ सर्पाची मेंग, कांत. ३ दाण्यावरचें सालपट. ४ औषधविशेष. ५ भालदार. ६ दहिंपीठ.

**कंचुकिन**, पु० (की) सर्प. २ भालदार. ३ चोपदार. ४ कवच धारण करणारा. ५ कृष्णागरु चंदन.

**कचेल**, न० (लं) लेखरचना.

**कच्चर**, वि० (रः रा रं) मळकट, मलीन. २ न० (रं) ताक.

**कच्चित्**, अ० अभीप्सितार्थाचा प्रश्न ह्या अर्थी. उ० कच्चिज्जीवतिमेमाता. २ प्रश्न. ३ मंगल.

**कच्छ**, पु० (च्छः) प्रावर्णाचा पदर, कासोटा. २ नौकांग, नाळ. ३ नदी, ओढा इत्यादिकांचे समीप जो जलप्राय प्रदेश तो. ४ नांदरुखीचें झाड. ५ कांसव.

**कच्छटिका**, स्त्री० (का) कौपीन, लंगोटी.

**कच्छप**, पु० (पः) कांसव. २ नऊ निधींतील एक निधि.

**कच्छपी**, स्त्री० (पी) सारस्वती वीणा. २ लहान एक रोग आहे. ३ कांसवीण. ४ पु० (पी) निधि विशेष. ५ कांसव. ६ पैलवानाचा पेंच विशेष.

**कच्छा**, स्त्री० (च्छा) वनौ० विशेष ज्यास वाराहिकंद असें म्ह० ती. २ कौपीन.

**कच्छुर**, वि० (रः रा रं) ज्यास ओली खरूज झाली आहे तो. २ अधम, नीच. ३ न० (रं) वाईट शरीर.

**कच्छुरा**, स्त्री० (रा) वनौ० ज्यास धमासा असें म्ह० ती.

**कच्छू**, स्त्री० (च्छूः) ओली खरूज.

**कच्छूरा**, स्त्री० (रा) वनौ० ज्यास धमासा असें म्ह० ती. २ वनौ० जीस कापूरकचरी, आंबेहळद असें म्ह० ती.

**कंज**, पु० (जः) ब्रम्हदेव. २ केस. ३ न० (जं) कमळ. ४ अमृत.

**कंजन**, पु० (नः) मदन.

**कंजार**, पु० (रः) पोट. २ सूर्य. ३ ब्रम्हदेव. ४ हत्ती. ५ मुनी, ऋषि.

**कज्जल**, न० (लं) काजळ.

**कज्जलध्वज**, पु० (जः) दिवा.

**कट**, पु० (टः) हत्तीचें गंडस्थळ. २ कटिफलक, कमरेचें फळ. ३ वेळू, माणगे इत्यादिकांचे बिळांनीं केलेले पदार्थ, करंडा इ० ४ कालिगण. ५ अतिशय.

६ प्रेत. ७ समय. ८ क्रियाकार. ९ कमर. १० दंतमध्यभाग. ११ बाण.

**कटक**, पु० न० (कः:कं) सैन्य. २ पु० (कः) प्रकोष्ठाभरण, पोंची. ३ न० (कं) हातांतील सलकडें. ४ पर्वताचा नितंब प्रदेश, पर्वताचा मध्यभाग. ५ चक्र, चाक. ६ समुद्रापासून झालेलें मीठ. ७ हत्तीच्या दांताला शोभार्थ पितळेचें वगैरे जें चक्राकार बसवितात तें. ८ राजधानी.

**कंटक**, पु० (कः) न० (कं) कांटा. २ सुईचें अग्र. ३ लहान शत्रु. ४ रोमहर्ष, रोमांच. ५ मत्स्यादिकांचें हाड. ६ दुर्भाषण. ७ निर्दय पुरुष.

**कंटकफल**, पु० (लः) फणसाचें झाड.

**कंटकारिका**, स्त्री० (का) रिंगणीचें झाड.

**कंटकाशन**, पु० (नः) उंट.

**कटाकिन्**, पु० (की) पर्वत.

**कंटकिफल**, पु० (लः) फणसाचें झाड.

**कंटकटेरी**, स्त्री० (री) हळद.

**कटकोल**, पु० (लः) पिकदाणी. २ सैन्याचा मागचा भाग.

**कटखादक**, पु० (कः) कांचेचा कळस. २ कावळा. ३ कोल्हा.

**कटप्रु**, पु० (प्रुः) राक्षस. २ गंधर्व. ३ महादेव. ४ फांशांनीं खेळणें.

**कटंबरा**, स्त्री० (रा) वनौ० जीस केदार कुटकी असें म्हणतात ती. २ वनौ० जीस कुब्जप्रसारिणी, चांद्र वेल असें म्हणतात ती.

**कटभंग**, पु० (गः) सुंठ. २ राजाचा अतिक्रम करणें. ३ धान्याचा हातानें छेद करणें.

**कटंभरा**, स्त्री० (रा) कटंबरा हा शब्द पहा. २ गाय. ३ हत्तीण. ४ नेपाळ देशोत्पन्न मनःशीला. ५ बेडूक. ६ वनौ० जीस मुरवेल असें म्हणतात ती.

**कटभी**, स्त्री० (भी) वनौ० जीस ज्योतिष्मती, मालकांगोणी असें म्हणतात ती. २ वृक्ष विशेष.

**कटव्रण**, पु० (णः) भीमसेन.

**कटाह**, पु० (हः) बंडे, घारगे इत्यादि तळण्याचें पात्र, कढई, काईल. २ कपाळ. ३ कांसवाची पाठ. ४ वरण. ५ महिषीचें नूतन शिंगें फुटलेलें अपत्य, रेडा, वेगार. ६ द्वीप विशेष. ७ नरक.

**कटाक्ष**, पु० (क्षः) अपांगदर्शन, नेत्रप्रांत भागानें पहाणें. २ नेत्रकटाक्ष.

**कटि**, स्त्री० पु० (टिः) कंबर.

**कटित्र**, न० (त्रं) करदोटा.

**कटिन्**, पु० (टी) हत्ती.

**कटिप्रोथ**, पु० (थः) कटिस्थमांसपिंड, कुला.

**कटिल्लक**, पु० (कः) शाकविशेष जीस कारली, कारती असें म्हणतात ती.

**कटिशृंखला**, स्त्री० (ला) करदोटा.

**कटी**, स्त्री० (टी) कंबर. २ पिंपळी.

**कटीतल**, पु० (लः) बांकडी तलवार.

**कटीरक**, पु० (कः) कंबर.

**कटु**, स्त्री० (टुः) वनौ० जीस केदार, कुटकी असें म्हणतात ती. २ वेल. ३ मोहरी, राई. ४ अप्रिय. ५ पु० (टुः) रसविशेष. तिखट रस. ६ सुगंधी. ७ न० (टु) करण्यास अयोग्य. ८ वि० (टुः ट्वी· टु) मत्सर. ९ तीक्ष्ण.

**कटुक**, न० (कं) सुंठ, मिरीं आणि पिंपळी ह्या तिहींचें कूट.

**कटुकंद**, पु० (दः) शेवग्याचें झाड. २ आलें. (सुंठीची पूर्वस्थिति) ३ लसूण.
**कटुका**, स्त्री० (का) वनौ० जीस केदार, कुटकी असें म्हणतात ती.
**कटुतुंबी**, स्त्री० (बी) दुध्याभोंपळा.
**कटुरोहिणी**, स्त्री० (णी) वनौ० जीस केदार, कुटकी असें म्हणतात ती.
**कटुस्नेहा**, स्त्री० (हा) मोहरी.
**कंटोलवीणा**. स्त्री० (णा) अंत्यजाची किनरी, वीणा.
**कट्फल**, पु० (लः) कुंभ्याचें झाड.
**कट्वंग**, पु० (गः) दिंडयाचें झाड.
**कठ**, पु० (ठः) ब्राम्हण. २ ऋषिविशेष.
**कंठ**, पु० (ठः) ग्रीवाग्रभाग, नरडी, गळा. २ सन्निधान, जवळ. ३ ध्वनी. ४ घोतऱ्याचें झाड. ५ स्वर.
**कंठनीडक**, पु० (कः) घार.
**कंठभूषा**, स्त्री० (षा) गळ्याचें भूषण.
**कंठमणि**, पु० (णिः) कंठमणी, शंख.
**कठमर्द**, पु० (र्दः) महादेव.
**कंठाग्नि**, पु० (ग्निः) पक्षि.
**कंठाला**, स्त्री० (ला) कंटाळ.
**कठिंजर**, पु० (रः) वनौ० जीस आजवेल, बाबरी असें म्हणतात ती.
**कठिन**, वि० (नः ना- नं) कठीण.
**कठिना** स्त्री० (ना) गूळ. २ साखर.
**कठिल्लक**, पु० (कः) वनौ० जीस घेटुळी असें म्हणतात ती. २ शाकविशेष जीस कारली, कारली असें म्हणतात ती. ३ वनौ० जीस आजवेल, बाबरी असें म्हणतात ती. ४ वेडूक.
**कठीन** पु० (नः) निष्ठुर. २ स्तब्ध. ३ न० (नं) स्थाली.
**कंठीरव**, पु० (वः) सिंह.
**कंठोल**, पु० स्त्री० (लः ला) डोण, दोण. वि०. २ पु० (लः) उंट.
**कंठेकाल**, पु० (लः) महादेव.
**कठोर**, वि० (रः रा- रं) कठीण.
**कडंकर**, पु० (रः) सरम, कडबा इत्यादिकांचें भूस.
**कडंगर**, पु० (रः) सरम, कडबा इत्यादिकांचें भूस.
**कडंब**, पु० (बः) देंट.
**कंडनी**, स्त्री० (नी) उखळ.
**कडार**, वि० (रः रा- रं) पिंगटवर्ण. २ पु० (रः) दास.
**कंडू**, स्त्री० (डूः) सुखी खरूज.
**कंडूया**, स्त्री० (या) सुखी खरूज.
**कंडूरा**, स्त्री० (रा) वनौ० जीस कुवली, कुहिरी असें म्हणतात ती.
**कंडोल**, पु० (लः) पाटी, कणंग इ०.
**कंडोलवीणा**, स्त्री० (णा) अंत्यज्याची किनरी, वीणा.
**कण**, वि० (णः णा- णं) सूक्ष्म, बारीक. २ पु० (णः) धान्यांश, कणी, कण.
**कणलाभ**, पु० (भः) जलभोंवरा.
**कणा**, स्त्री० (णा) पिंपळी. २ जिरें. ३ जलचर विशेष ज्यास सुसर असें म्हणतात ती. ४ मक्षिका, माशी.
**कणाटीन**, पु० (नः) पक्षि विशेष ज्याला ताजवा, दय्यर असें म्हणतात तो.
**कणाद**, पु० (दः) कश्यपऋषि.
**कणादय**, पु० (यः) देवर्षयः
**कणिका**, स्त्री० (का) नरवेलाचें झाड. २ परिमाणु.
**कणिश**, पु० न० (शः शं) सस्यमंजरी, कणीस.

कणीचि, स्त्री० (चिः) पुष्पयुक्तलता. २ गुंज. ३ गाडा.

कण्व, पु० (ण्वः) कण्वऋषि. २ न० (ण्वं) तंडुलादि द्रव्यकृत सुरा बीज. ३ पाप.

कतक, पु० (कः) इडाचें झाड.

कतु, पु० (तुः) मदन.

कतृण, न० (णं) तृण वि० ज्यास गंजाण. रोहिस गवत असें म्हणतात तें. २ ज्याचें शरीर फार लहान म्हणजे जो अमानुषप्राय तो.

कत्ति, स्त्री० (त्तिः) त्वचा. २ भूर्जवृक्ष. ३ कृत्तिका नक्षत्र.

कत्तोय, न० (यं) दारू.

कथं, अ० हर्ष. २ निंदा. ३ प्रकार. ४ हर्षानें जी त्वरा ती. ५ प्रश्न. ६ संभावना.

कथक, पु० (कः) कथा करणारा. २ नाचणारा.

कंथा, स्त्री० (था) प्रावरण विशेष, गोधडी. २ मातीची भिंत.

कथाप्रसंग, पु० (गः) वावटळ. २ विषवैद्य, मंत्री. ३ गोष्टीचा खेळ.

कंथावाट, पु० (टः) तट, चांदई.

कथिक, पु० (कः) प्रश्न विचारणारा.

कंद, पु० न० (दःदं) सुरण. २ कमळिणीचा कांदा. ३ कोंवळ्या तृणाचें मूळ. ४ पु० (दः) मेघ.

कंदक, न० (कं) उदक, पाणी.

कदध्वन, पु० (ध्वा) दुर्मार्ग, वाईट मार्ग.

कदन, न० (नं) हनन, वध. २ पाप. ३ मर्दन करणें.

कदंब, पु० (बः) कळंबाचें झाड. २ समुदाय. ३ धान्य वि०. ४ पांढरा शिरस.

कदंबक, पु० (कः) धान्य वि० ज्यास शि- रस असें म्हणतात तें. २ कळंबाचें झाड. ३ न० (कं) समूह.

कदर, पु० (रः) शुक्लखदिर, पांढऱ्या खैराचें झाड. २ करवत. ३ रोमवि०. ४ अंकुश.

कंदर, वि० (रःरा-रं) कत्रिम गुहा, पर्वताचे ठायीं केलेली गुहा. २ अंकुश.

कंदराकर, पु० (रः) पर्वत.

कंदराल, पु० (लः) पर्वतावर झालेला आक्रोड वृक्ष, डोंगरी आक्रोडाचें झाड. २ गजहंड, लाखी पिंपरी.

कंदर्प, पु० (र्पः) मदन, काम.

कंदर्पमुषल, पु० (लः) शिस्न.

कदर्य, वि० (र्यःर्या-र्यं) धर्म न करतां व आपण न भोगितां व पुत्र, स्त्रिया इत्यादि कुटुंबाचें यथास्थित पोषण न करितां जो लोभानें द्रव्यसंचय करितो तो, कृपण.

कदल, न० (लं) कपाळ. २ चंद्र ग्रहण आणि सूर्य ग्रहण हीं प्रत्येक. ३ नूतन अंकूर. ४ मधुर स्वर.

कंदल, न० (लं) पुष्पविशेष.

कदला, स्त्री० (ला) सांवरीचें झाड. २ कदली, केळ. ३ किरण.

कदलिन्, पु० (ली) हरिणवि०. २ केळ.

कंदलिन्, पु० (ली) हरिणविशेष.

कदली, स्त्री० (ली) केळ. २ हरिणवि० ३ पताका, निशाण.

कंदली, स्त्री० (ली) पताका, निशाण. २ हरिण विशेष. ३ खुरटें झाड.

कंदसंज्ञ, न० (ज्ञं) मासाची गांठ. २ माव.

कंदसार, न० (रं) इंद्राचें वन.

**कदाचित्**, अ० कोणेक काळीं, केव्हां तरी ह्या अर्थी. उ० स्मृतिःकदाचिद्भवति.

**कंदु**, पु० स्त्री० (दुः दुः) मद्य निर्माण करण्यास उपयोगी पात्र ज्यास भटी असें म्हणतात तें.

**कंदुक**, पु० (कः) खेळण्याचा चेंडू. २ गिरदी. ३ गालउशी. ४ उशी.

**कंदुकता**, स्त्री० (ता) नित्यकर्म न होणें.

**कदुष्ण**, वि० (ष्णःष्णा-ष्णं) किंचित उष्ण.

**कंदोट**, पु० (टः) कुमुद पुष्प.

**कद्दर**, न० (रं) लोणी.

**कद्रु**, वि०(द्रुः द्रुः द्रु) पिंगटवर्ण, पिंगट रंगाचा. २ स्त्री० (द्रुः) कद्रुनामक सर्पाची माता. ३ पु० (द्रुः) कृपण.

**कद्वद**, वि० (दःदा-दं) कुत्सित भाषण करणारा.

**कंधर**, पु० (रः) मेघ.

**कंधरा**, स्त्री० (रा) ग्रीवा, मान. २ कंठी.

**कनक**, न० (कं) सुवर्ण, सोनें. २ वनौ० ज्यास धोत्रा असें म्हणतात तो. ३ नागचाफा. ४ पळस. ५ कांचनार वृक्ष वि०. ६ वनौ० जीस दारुहळद अ० म्ह० ती. ७ चाफा.

**कनकदंडक**, न० (कं) सुवर्ण दंडाचें छत्र.

**कनकपल**, पु० (लः) सोन्याचें शास्त्र सिद्ध म्हणजे ८० गुंजांचा एक तोळा असे चार तोळे.

**कनकाध्यक्ष**, पु० (क्षः) सुवर्णाध्यक्ष.

**कनकालुका**, स्त्री० (का) सुवर्ण पात्रविशेष.

**कनकाह्वय**, पु० (यः)वनौ० धोत्र्याचें झाड.

**कनिष्ठ**, पु० (ष्ठः) कनिष्ठ बंधु. २ वि० (ष्ठःष्ठा-ष्ठं) अतियुवा, फार तरूण. ३ अल्प, लहान.

**कनिष्ठग**, पु० (गः) बौद्धावतार.

**कनिष्ठा**, स्त्री० (ष्ठा) कनिष्टांगुली.

**कनीनिका**, स्त्री० (का) नेत्र, मध्यगत कृष्ण मंडल, डोळ्यांतील बाहुली. २ कनिष्टांगुली.

**कनीयस्**, पु० ( यान् ) कनिष्ठ बंधु. २ वि० ( यान् - यसी- यः ) अतियुवा, फार तरुण. ३ अल्प, लहान. ४ हलकट.

**कन्यका**, स्त्री० (का) कन्या.

**कन्या**, स्त्री० (न्या) कन्याराशी. २ कुमारिका, आठ वर्षांचे आंतील मुलगी. ३ रहाण्याचें घर. ४ साधारण स्त्री. ५ औषधि वि०.

**कन्यापाल**, पु० (लः) कन्यापालन करणारा. २ शूद्र विशेष.

**कन्याराम**, पु० (मः) बौद्धभेद.

**कंप**, पु० (पः) कांपरा. वायु.

**कपट**, पु० न० ( टः टं ) शठपणा, कृत्रिम.

**कंपन**, न० (नं) कांपणें. २ वि (नःना-नं) कांपणारा.

**कपर्द**, पु० (र्दः) सांबाचा जटाजूट. २ बीयांचा कांदा.

**कपर्दक**, पु० (कः) सांबाचा जटाजूट. २ बीयांचा कांदा.

**कपर्दिक**, न० (कं) कवडी.

**कपर्दिन्**, पु० (र्दी) महादेव.

**कपाट**, न० (टं) कवाड, दार.

**कपाल**, पु० न० ( लः लं ) कपाळ. २ मडक्याचें शकल. ३ समूह.

**कपालभृत्**, पु० ( त् ) महादेव.

**कपि**, पु० (पिः)वानर. २ मधुसूदन. ३ऊद.

**कपिकच्छु**, स्त्री० (च्छुः) वनौ० जीस कुवली, कुहिरी असें म्हणतात ती.

**कपिचंचल**, पु० (लः) सुगंधि द्रव्यविशेष.
**कापिचूत**, पु० (तः) आंबाड्याचें झाड.
**कपिंजल**, पु० (लः) तितिर पक्षि.
**कापित्थ**, पु० (त्थः) कवठीचें झाड.
**कपित्थास्य**, पु० (स्यः) वानर.
**कपिध्वज**, पु० (जः) अर्जुन.
**कपिल**, वि० (लःला-लं) पिंगटवर्ण. २ पु० (लः) कुत्रा. ३ अग्नि. ४ वासुदेव. ५ कपिल ऋषि.
**कपिला**, स्त्री० (ला) सुवासिक द्रव्य विशेष ज्यास रेणुक बीज असें म्हणतात तें. २ आग्नेयदिशेचा पुंडरिक नामा जो हत्ती त्याची स्त्री. ३ शिसव्याचें झाड. ४ रेणुका. ५ कपिला गाय.
**कपिलाश्व**, पु० (श्वः) इंद्र.
**कपिवक्र**, पु० (क्रः) नारद.
**कपिवल्ली**, स्त्री० (ल्ली) वनौ० गजपिंपळी.
**कपिश**, वि० (शः शा- शं) कृष्णमिश्रित लोहित वर्ण, कांहीं काळा, व तांबडा. २ पु० (शः) आरक्त वर्ण. ३ ऊद.
**कपिशा**, स्त्री० (शा) एक फुलझाड ज्यास कुसरी, कस्तुर मोगरा, मधु माधवी असें म्हणतात तें.
**कपिशांजन**, पु० (नः) महादेव.
**कपिशी**, स्त्री० (शी) दारू.
**कपीतन**, पु० (नः) आंबाड्याचें झाड. २ लाखी पिंपरी. ३ शिसव्याचें झाड.
**कपूय**, वि० (यः या- यं) अधम, निंद्य.
**कपोत**, पु० (तः) पारवा. २ खबुतरपक्षि. ३ ओघ. ४ जन विशेष.
**कपोतपालिका**, स्त्री० (का) पक्षि पाळण्याकरितां केलेलें घर.
**कपोतांघ्रि**, स्त्री० (घ्रिः) सुवासिक द्रव्य विशेष ज्यास पवारी असें म्ह० ती.
**कपोल**, पु० (लः) गाल.
**कंप्र**, वि० (प्रःप्रा-प्रं) कांपणारा.
**कफ**, पु० (फः) रक्त विकार विशेष, कफ.
**कफणि**, पु० (णिः) कोंपर.
**कफवर्धन**, पु० (नः) गेळ्याचें झाड.
**कफिन्**, वि० (फी-फिनी-फि) ज्यास कफ झाला आहे तो.
**कफोणि**, पु० (णिः) कोंपर.
**कबंध**, पु० न० (धःधं) मस्तकहीन व क्रियायुक्त शरीर ज्यास धड असें म्हणतात तें. २ न० (धं) जल, पाणी. ३ पु० (धः) राहु नामा ग्रह. ४ उदर. ५ बाहु. ६ राक्षस विशेष.
**कबर**, पु० (रः) केशांचा बुचडा.
**कबरी**, स्त्री० (री) केश बंध रचना, बुचडा. २ शाकवि० जीस कानफोडी, तिळवणी असें म्हणतात ती.
**कंबल**, पु० (लः) कांबळें. २ पांघुरण्याचें वस्त्र. ३ गजराज. ४ न० (लं) कीटक वि०. ५ पाणी.
**कंबि**, स्त्री० (बिः) पळी. २ पु० (बिः) अंश.
**कंबी**, स्त्री० (बी) पळी.
**कंबु**, पु० न० (बुःबु) शंख. २ पु० (बुः) प्रकोष्ठ भूषण, कांकण, पोंची इत्यादि. ३ ग्रीवा, मान. ४ हत्ती. ५ पाण्यांतील लहान शिंप.
**कंबुग्रीवा**, स्त्री० (वा) ज्या मानेवर तीन रेषा आहेत ती मान.
**कंबोज**, पु० (जः) देश विशेष. २ शंख. ३ हत्ती वि०.

**कमठ**, पु० (ठः) कांसव. २ पात्र वि०, चंबु इत्यादि. ३ पात्र, भांडें.

**कमठी**, स्त्री० (ठी) कांसवीण.

**कमंडलु**, पु० (लुः) बैरागी, संन्याशी इत्यादि जे व्रती त्यांचें जलपात्र, कमंडलू. २ कठिणोदक, गार. ३ पिंपरीचें झाड.

**कमंध**, न० (धं) जल, पाणी.

**कमन**, वि० (नःना-नं) कामुक. २ पु० (नः) इच्छा. ३ पंडित. ४ अशोक वृक्ष.

**कमल**, पु० न० (लःलं) कमळ. २ न० (लं) उदक, पाणी. ३ तांबें. ४ मांसपिंड विशेष, फुप्फुस. ५ औषध. ६ पु० (लः) हरिण. ७ ब्रम्हदेव.

**कमला**, स्त्री० (ला) लक्ष्मी. २ उत्कृष्ट स्त्री.

**कमलासन**, पु० (नः) ब्रम्हदेव. २आसन विशेष.

**कमलोत्तर**, न० (रं) कुसुंबा.

**कमलोद्भव**, पु० (वः) ब्रम्हदेव.

**कमितृ**, वि० (ता-त्री-तृ) कामुक.

**कम्र**, वि० (म्रः म्रा- म्रं) कामुक.

**कर**, पु० (रः) किरण. २ हात. ३ राजग्राह्य भाग, दस्त, सारा इत्यादि. ४ कठिणोदक, गार. ५ हत्तीची सोंड

**करक**, पु० स्त्री० (कःका) कठिणोदक गार. २ पु० (कः) कमंडलू. ३ डाळिंबीचें झाड. ४ कुसुंब. ५ पक्षि विशेष. ६ न० (कं) गोमयछत्र. ७ पळसाचें झाड.

**करंक**, पु० (कः) मस्तक. २ नारळाची करटी.

**करकट**, पु० (टः) कुरली, खेंकडा.

करकंटक, पु० (कः) नख.

**करका**, स्त्री० (का) मेघधार.

**करकांभस्**, पु० (भाः) नारळ.

**करग्रह**, पु० (हः) विवाह.

**करघर्षण**, पु० (णः) दही घुसळण्याच्या रवीचा दांडा.

**करज**, पु० (जः) करंजाचें झाड. २ व्याघ्रनख, वाघनख. ३ नख.

**करंज**, पु० (जः) करंजाचें झाड.

**करंजक**, पु० (कः) करंजाचें झाड. २ वाघनख.

**करट**, पु० (टः) काकपक्षि, कावळा. २ हत्तीचें गंडस्थळ. ३ कुसुंब. ४ निंद्य जीवन. ५ अकराव्याचें श्राद्ध. ६ वाद्य विशेष. ७ कुत्सित ब्राम्हण.

**करटिन**, पु० (टी) हत्ती.

**करटु**, पु० (टुः) कंकरेटपक्षि, करटोकपक्षि.

**करंड**, पु० (डः) अमानुषप्राय म्हणजे ज्याचें शरीर फार लहान तो. २ पात्र विशेष, करंडा. ३ पक्षि वि०.

**करण**, न० (णं) साधक तम, कार्य सिद्धीस उत्कृष्ट हेतु. २ शेत. ३ शरीर. ४ इंद्रिय. ५ पु० (णः) शूद्रजातीय स्त्रीचे ठायीं वैश्यापासून उत्पन्न जो पुत्र तो. (याची वृत्ति लिहिणें.) ६ कारण. ७ व्रत. ८ बंध. ९ नर्तन विशेष. १० गायन विशेष. ११ कायस्थ (जाती वि०.) १२ वानर. १३ न० (णं) साधन. १४ वणिजादिकरण. १५ कर्म. १६ क्रियावि०.

**करतालिका**, स्त्री० (का) करताळ (वाद्य वि०)

**करतोया**, स्त्री० (या) नदी विशेष. (ही नदी पार्वतीच्या विवाहामध्यें जें कन्यादानोदक हातावर घातलें त्यापासून झाली असें पुराणांत आहे.

**करपत्र**, न० (त्रं) लाकूड चिरण्याचें एक शस्त्र ज्यास करवत असें म्हणतात तें.

**करपत्रिका**, स्त्री० (का) जलक्रीडा.

**करपात्र**, पु० (त्रः) जलक्रीडा.

**करपाल**, पु० (लः) खड्ग,तलवार.

**करपालिका**, स्त्री० (का) तरवारीसारखें शस्त्र, खंडा, गुप्ती इ०.

**करंब**, पु० (बः) दधियुक्त भृष्ट यवचूर्ण, दहिंपीठ.

**करंबित**, न० (तं)लिप्त. २ योग्य.

**करभ**. पु० (भः) हत्तीचा छावा. २ उंटाचा छावा. ३ मनगटापासून कनिष्टिकेपर्यंत हाताचा मांसल भाग. ४ उंट. ५ दहिं पीठ.

**करंभ**, पु० (भः) दधियुक्त भृष्ट ययचूर्ण, दहिपीट.

**करमट्ट**, पु० (ट्टः) सुपारी.

**करमरी**, स्त्री० (री) बंदी, अटकाव.

**करमर्दक**, पु० (कः) करंवदाचें झाड.

**कररुह**, पु (हः) नख.

**करार्ध**, पु० (र्धिः) करताळ (वाद्य विशेष.)

**करवाल**, पु० (लः) खड्ग, तरवार.

**करवालिका**, स्त्री० (का) तरवारीसारखें शस्त्र, खंडा, गुप्ति इ०.

**करवीर**, पु० (रः) कण्हेरीचें झाड. २ दैत्य विशेष. ३ तरवार,

**करवीरी**, स्त्री० (री) देवमाता. २ उत्तम गाय. ३ पुत्रवती स्त्री.

**करशाखा**, स्त्री० (खा) अंगुली, बोट.

**करशीकर**, पु० (रः) हत्तीच्या सोंडेंतून निघालेला तुशार.

**करशूक**, पु० (कः) नख.

**करहाट**, पु० (टः) कमळणीचा कांदा. २ घोत्याचें झाड.

**करहाटक**, पु० (कः) गेळयाचें झाड.

**करांगण**, पु० (णः) पुष्कळ दाटी झालेला बाजार.

**करारोट**, पु० (टः) सोन्याची आंगठी.

**कराल**. वि० (लःला-लं) भयंकर. २ उन्नतदंतयुक्त, दंताळ. ३ उच्च, उंच. ४ पु० (लः) सायल्याचें तेल. ५ न० (लं) काळी बाभूळ.

**करिणी**, स्त्री० (णी) हत्तीण.

**करिन्**, पु० (री) हत्ती.

**करिपिप्पली**, स्त्री० (ली) गजपिंपळी.

**करिबंध**, पु० (धः) हत्ती बांधण्याचा खांब.

**करिभ**, पु० (भः) कल्पतरु.

**करिमाचल**, पु० (लः) सिंह.

**करिमुख**, पु० (खः) गणपति.

**करिशावक**, पु० (कः) हत्तीचा छावा.

**करीपाग्नि**, पु० (ग्निः) करिषाग्नि विशेष, शेणीचा विस्तव.

**करीर**, पु० (रः) कारवीचें झाड. २ पु० न० (रः रं) वेळूचा अंकूर, कोंब. ३ पु० (रः) घट, कलश, घागर इत्यादि.

**करीरिका**, स्त्री० (का) हत्तीच्या दंताचें मूळ.

**करीरी**, स्त्री० (री) हत्तीच्या दंताचें मूळ. २ लहरी.

**करीष**, पु० न० (ष-षं) शुष्क गोमय, सुकलेलें शेण, गोवरी, भाट शेण इत्यादि.

**करीषाग्नि**, पु० (ग्निः) शेणींचा विस्तव.

**करुण**, पु० (णः) करुणारस (नाट्य प्रकरण.) २ बौद्धावतार. ३ वृक्ष.

**करुणा,** स्त्री० (णा) करुणारस. (नाट्यप्रकरण.) २ दया.

**करेटु,** पु० (टुः) कंकरेट पक्षि, करटोक पक्षि. २ नख.

**करेणु,** पु० (णुः) हत्ती. २ स्त्री० (णुः) हत्तीण. ३ वेश्या.

**करोटि,** स्त्री० (टिः) मस्तकांतील हाड.

**कर्क,** पु० (र्कः) कर्करास. २ ढवळा घोडा. ३ आरसा. ४ तीळ. ५ अग्नि. ६ मातीचा कुंभ.

**कर्कट,** पु० (टः) कर्करास. २ कुरलें, खेंकडा. ३ पक्षि विशेष. ४ कुलीर. ५ वाळूक. ६ सांवरीचें झाड.

**कर्कटक,** पु० (कः) कुरलें, खेकड.

**कर्कटी,** स्त्री० (टी) कांकडी.

**कर्कड,** पु० (डः) कुरलें, खेंकडा.

**कर्कंधु,** स्त्री० (धुः) बोरीचें झाड.

**कर्कंधू,** स्त्री० (धू) बोरीचें झाड.

**कर्कर,** वि० (रःरा-रं) आरसा. २ कठीण. ३ पु० (रः) मुद्गल. ४ चूर्णखंड.

**कर्करांधु,** पु० (धुः) खोल विहीर.

**कर्कराक्ष,** पु० (क्षः) पक्षि विशेष. ज्यास ताजवा, दय्यर असें म्हणतात तो.

**कर्करी,** स्त्री० (री) तांदूळ धुण्याची रोवळी.

**कर्करेट,** पु० (टः) गचाटी, गचांडी.

**कर्करेटु,** पु० (टुः) करढोक पक्षि.

**कर्कश,** पु० (शः) वनौ० ज्यास शुंडारोचनी असें म्हणतात ती. २ गुल्म रोगाचा एक भेद. ३ ऊंस. ४ ओला नव्हे तो. ५ वि० (शःशा-शं) कठीण. ६ साहसिक. ७ दुःस्पर्श. ८ कठोर. ९ कृपण. १० निर्दय.

**कर्कशछद,** पु० (दः) शाकोटवृक्ष.

**कर्कसार,** पु० (रः) दहींपीठ.

**कर्कारु,** पु० (रुः) कोहळा.

**कर्कारुक,** पु० (कः) कोहळा.

**कर्कोट,** पु० (टः) सर्प विशेष.

**कर्कोटक,** पु० (कः) सर्प विशेष. २ बेलाचें झाड.

**कर्चूर,** पु० (रः) कापूर कचरी, आंबेहळद. २ पु० न० (रःरं) सोनें.

**कर्चूरक,** पु० (कः) वनौ० जीस कचर असें म्हणतात ती.

**कर्ण,** पु० (र्णः) कान. २ कर्ण नामा जो सूर्याचा पुत्र तो.

**कर्णगूत,** पु० (तः) कानांतील मल.

**कर्णजलौकस,** पु० (काः) गामवळांजी.

**कर्णजलौका,** स्त्री० (का) गामवळांजी. २ जंतु विशेष.

**कर्णदर्पण,** पु० (णः) कर्णभूषण.

**कर्णधार,** पु० (रः) सुकाणु धरणारा, नावाडी.

**कर्णपाली,** स्त्री० (ली) कर्णभूषण, तानवड.

**कर्णपूर** पु० (रः) शिरसाचें झाड. २ नीलकमळ. ३ वसंतऋतु.

**कर्णमल,** पु० (लः) कानांतील मळ.

**कर्णमोटि,** स्त्री० (टिः) चामुंडा देवी.

**कर्णवंश,** पु० (शः) पलंग.

**कर्णवेष्टन,** न० (नं) कर्णभूषण, कुंडल.

**कर्णादू,** स्त्री० (दूः) कर्णभूषण, तानवड.

**कर्णानुज,** पु० (जः) धर्मराज.

**कर्णास्फाल,** पु० (लः) हत्तीच्या कर्णाचें फडफडणें.

**कर्णिका,** स्त्री० (का) कर्णभूषण विशेष ज्यास ताटंक, तानवड असें म्हणतात तें.

२ हत्तीच्या सोंडेचें अग्र. ३ कमलांतील कोश. ४ हाताची मधली अंगुळी. ५ सामान्य कर्णभूषण. ६ लेखणी.

**कर्णिकार**, पु० (रः) पांगाऱ्याचें झाड.

**कर्णिन्**, पु० (र्णी) पर्वत विशेष.

**कर्णिरथ**, पु० (थः) स्त्रियांस बसण्याकरितां वस्त्रादिकेंकरून आच्छादित केलेला रथ ज्यास बुरख्याची गाडी म्हणतात ती.

**कर्णीसुत**, पु० (तः) कंस. २ आमदैवत्य.

**कर्णेजप**, वि० (पःपा-पं) कानांत दुसऱ्याची निंदा सांगणारा किंवा विसरलेली गोष्ट सुचविणारा.

**कर्तन**, न० (नं) छेदन. २ सूत काढणें.

**कर्तरी**, स्त्री० (री) कात्री, कातर.

**कर्दट**, पु० (टः) कमळिणीचा कांदा. २ चिखल.

**कर्दम**, पु० (मः) चिखल.

**कर्दमी**, स्त्री० (मी) चैत्री पूर्णिमा.

**कर्पट**, पु० (टः) जीर्णवस्त्राचा तुकडा, फडकें. २ स्थान विशेष.

**कर्पर**, पु० (रः) कपाळ. २ शस्त्रभेद. ३ कढई.

**कर्पराल**, पु० (लः) पर्वतावर झालेला आक्रोडवृक्ष, डोंगरी आक्रोडाचें झाड.

**कर्परी** स्त्री० (री) मोरचूद.

**कर्पासी**, स्त्री० (सी) कापसाचें झाड.

**कर्पूर**, पु० न० (रः-रं) कापूर.

**कर्बर**, पु० (रः) राक्षस.

**कर्बरी**, स्त्री० (री) कोल्ही.

**कर्बुर**, पु० (रः) पाप. २ राक्षस. ३ कापूर कचरी, आंबेहळद. ४ न० (रं) उदक, पाणी. ५ सोनें. ६ वि० (रःरा-रं). चित्रवर्ण.

**कर्बुरा**, स्त्री० (रा) कृष्णवृंता शब्द पहा.

**कर्बुरी**, स्त्री० (री) पार्वती. २ पु० (री) राक्षस. ३ पाप. ४ औषधि विशेष.

**कर्बूर**, पु० (रः) कापूरकाचरी, आंबेहळद. २ हरताळ. ३ न० (रं) सोनें.

**कर्बूरक**, पु० (कः) वनौ० जीस कचर असें म्हणतात ती.

**कर्मकर**, पु० (रः) चाकर. २ यम.

**कर्मकरी**, स्त्री० (री) मूर्छा. २ तोंडलीची वेल.

**कर्मकार**, वि० (रःरी-रं) वेतन घेतल्यावांचूनही जो काम करतो तो.

**कर्मकील**, पु० (लः) परीट.

**कर्मठ**, वि० (ठःठा-ठं) कर्मशूर, जो आरंभिलेलें काम शेवटास नेतो तो.

**कर्मण्यभुज्**, पु० (क्) वेतन घेऊन काम करणारा.

**कर्मण्या**, स्त्री० (ण्या) वेतन, चाकरीचा पैसा.

**कर्मंदिन्**, पु० (दी) सन्याशी.

**कर्मन्**, न० (र्म) क्रिया. २ काम.

**कर्मफल**, न० (लं) सुख. २ दुःख.

**कर्मयुग**, न० (गं) कलियुग.

**कर्मशील**, वि० (लःला-लं) सर्वदां कर्माविषयींच जो प्रवृत्त असतो तो.

**कर्मशूर**, वि० (रःरा-रं) जो आरंभिलेलें काम शेवटास नेतो तो.

**कर्मसचीव**, पु० (वः) बुद्धिसचिवाहून अन्य जो कर्मास उपयुक्तसचीव तो.

**कर्मसाक्षिन**, पु० (क्षी) सूर्य.

**कर्मक्षम**, वि० (मःमा-मं) काम करण्याविषयीं जो समर्थ तो.

**कर्मार**, पु० (रः) वेळू. २ जातीवि०.

**कर्मीर**, वि० (रःरा-रं) चित्रवर्ण.

**कर्मेंद्रिय**, न० (यं) हात, पाय, गुद, उपस्थ, वाणी हीं पांच इंद्रियें प्रत्येक.

**कर्वट**, पु० (टः) दोनशें गांवांतील चांगला गांव.

**कर्ष**, पु० ( षः ) आकर्षण. २ पु० न० (र्षःर्षं) पांच गुंजांचा एक मासा असे सोळा मासे. (हा शास्त्रामध्यें एक तोळा म्हटला आहे.)

**कर्षक**, पु० (कः) कृषिकर्म करणारा.

**कर्षणि**, स्त्री० (णिः) व्यभिचारणी बायको.

**कर्षफल**, पु० (लः) वनौ० ज्यास धाटिंग, बेहेडा असें म्हणतात तो.

**कर्षू**, स्त्री० (र्षूः) कुल्या, केलेली लहान नदी. २ जीविका. ३ पु० (र्षूः) करीषाग्नि, शेणीचा विस्तव.

**कल**, पु० (लः) अस्पष्टाक्षर आणि मधुर असा जो शब्द तो. २ न० (लं) वीर्य, रेत. ३ वि० (लःला-लं) अजीर्ण.

**कलंक**, पु० (कः) चिन्ह. २ दोषारोप. ३ लोखंडाचा मळ, कीट.

**कलकंठ**, पु० (ठः) मधुर ध्वनी. २ हंस. ३ पारावपक्षि. ४ कोकीळ.

**कलकल**, पु० ( लः ) कोलाहल. २ सायल्याचे झाडाचा चीक.

**कलंकुर**, पु० (रः) जलभोंवरा.

**कलंज**, पु० (जः) विषानें मारलेला हरीण, पक्षि इत्यादि.

**कलत्र**, न० (त्रं) कटि, कंबर. २ भार्या, विवाहित स्त्री. ३ योनी. ४ किल्ला.

**कलधौत**, न० (तं) सोनें. २ रुपें.

**कलध्वनि**, पु० (निः) कोकीळ. २ मयूर, मोर.

**कलंब**, पु० (बः) बाण. २ देंट.

**कलंबी**, स्त्री० (बी) शाकविशेष जीस कळवी असें म्ह० ती.

**कलंबुट**, पु० (टः) लोणी.

**कलभ**, पु० (भः) हत्तीचा छावा.

**कलम**, पु० (मः) ज्या धान्यास फार पाणी पाहिजे तें धान्य, शेळीचें भात इत्यादि. २ लेखणी. ३ चोर.

**कलमा**, स्त्री० (मा) लेखणी.

**कलरव**, पु० (वः) पक्षिविशेष ज्यास खबुतर, पारवा असें म्हणतात तो.

**कलल**, पु० न० (लःलं) शुक्रशोणित संनिपात, शुक्रशोणितांचें मिश्रीभवन.

**कलविंक**, पु० (कः) चिमणी म्हणून जो लहान पक्षि तो. २ पक्षिविशेष ज्यास फेंचुहार, मस्तकचूड असें म्हणतात तो.

**कलश**, पु० न० (शः शं) तांब्या, घागर इत्यादि.

**कलशि**, स्त्री० (शिः) वनौ० जीस डवला, पिटवण असें म्हणतात ती.

**कलशी**, स्त्री० (शी) वनौ० जीस डवला, पिटवण असें म्हणतात ती. २ कळशी, घागर इत्यादि.

**कलस**, पु० न० (सः सं) तांब्या, घागर इत्यादि.

**कलसी**, स्त्री० (सी) कळशी, घागर इत्यादि.

**कलह**, न० (हं) युद्धाची वेळ. २ तरवारीचें म्यान. ३ अलंकार. ४ पु० (हः) कज्जा.

**कलहंस**, पु० (सः) हंसपक्षिविशेष ज्यास बदक असें म्हणतात तो. २ राजहंस. ३ राजांमध्यें जो उत्तम राजा तो.

**कला**, स्त्री० (ला) चंद्रमंडळाचा सोळावा भाग. २ तीस काष्ठात्मक जो काळ ती एक कळा. ३ शिल्प, गीत, वाद्य इत्यादिकांमध्यें निपूण असणें. ४ अंश. ५ वृद्धि, वाढणें.

**कलांकुर**, पु० (रः) सारस. २ कंस.

**कलाकेलि**, पु० (लिः) मदन.

**कलाची**, स्त्री० (ची) विस्तृतकर.

**कलाटीन**, पु० (नः) पक्षिविशेष ज्यास ताजवा, दय्यर असें म्हणतात तो.

**कलाद**, पु० (दः) सोनार.

**कलानिधि**, पु० (धिः) चंद्र.

**कलानुनादिन्**, पु० (दी) चिमणी म्हणून जो लहान पक्षि तो. २ कपिंजल.

**कलाप**, पु० (पः) भूषण, अलंकार. २ मोराचें पीस. ३ बाण ठेवण्याचा भाता. ४ समुदाय. ५ मेखला, कमरपट्टा. ६ चंद्र. ७ व्याकरण भेद. ८ विदग्ध.

**कलापक**, पु० (कः) तिलक (अलंकार विशेष.)

**कलापी**, स्त्री० (पी) पिंपरीचें झाड. २ पु० (पी) मोर.

**कलांबिका**, स्त्री० (का) द्रव्याचा व्यापार. २ लोकांस जें कर्ज दिलें त्याच्या व्याजानें चाललेली उपजीविका.

**कलाय**, पु० (यः) वाटाणा.

**कलात्रिक**, पु० (कः) कोंबडा.

**कलि**, पु० (लिः) युद्ध. २ कलियुग, ३ कलह. ४ शूर. ५ स्त्री० (लिः) कलिका, कळी.

**कलिका**, स्त्री० (का) फुलाची कळी.

**कलिकार**, पु० (रः) कांटेकरंजाचें झाड. २ पक्षिविशेष ज्यास फेंचुहार, मस्तकचूड असें म्हणतात तो. ३ कलह करणारा.

**कलिकारक**, पु० (कः) कांटे करंजाचें झाड. २ न० (कं) कलह होण्याचें कारण.

**कलिंग**, न० (गं) कुडयाची शेंग. २ कांटे करंजाचें झाड. ३ पु० (गः) पक्षिविशेष ज्यास फेंचुहार, मस्तकचूड असें म्हणतात तो. ४ देश विशेष. ५ वि० (गः-गा-गं) चतुर. ६ कुशल.

**कलिंगा**, स्त्री० (गा) बायको, स्त्री.

**कलिंज**, पु० (जः) बारीक वृक्ष.

**कलित**, न० (तं) जाणलें. २ मिळालें.

**कलिद्रुम**, पु० (मः) धाटिंगाचें झाड. २ बेहेडयाचें झाड. ३ बिब्याचें झाड.

**कलिमारक**, पु० (कः) कांटे करंजाचें झाड.

**कलिल**, वि० (लः-ला-लं) दुरधिगम, दुःप्रवेश.

**कलुष**, न० (षं) पाप. २ वि० (षः-षा-षं) मलमिश्र, गढूळ.

**कलेवर**, न० (रं) देह, शरीर.

**कल्क**, पु० न० (ल्कः-ल्कं) पुरीष, पोटांतील मळ. २ पाप. ३ वि० (ल्कः-ल्का-ल्कं) पापाशय. ४ पु० न० (ल्कः-ल्कं) कानांतील मळ. ५ हत्तीचा दांत. ६ तूप, तेल इत्यादिकांचें शेष. ७ दंभ. ८ धाटिंग वृक्ष. ९ पु० (ल्कः) बेहेडयाचें झाड.

**कल्प**, वि० (ल्पः-ल्पा-ल्पं) सदृश, सारखा. २ पु० (ल्पः) ब्रम्हदेवाचा दिवस (देवांची दोन युग सहस्रें झालीं म्हणजे ब्रम्हदेवाचा एक दिवस होतो. त्यांतील एक युग सहस्र स्थितिकाल आणि एक युग सहस्र प्रलयकाल) ३ प्रलय. ४ रोग रहित. ५ वियोग शास्त्र, विधि. ६ नीति

**कल्पन**, न० (नं) छेद. २ कृति.

**कल्पना**, स्त्री० (ना) तर्क. २ हत्तीवर बसण्याकरितां हत्ति सज्ज करणें.

**कल्पवृक्ष**, पु० (क्षः) कल्पतरु.

**कल्पांत**, पु० (तः) प्रलय काल.

**कल्मष**, न० (षं) पाप. २ हाताचें अग्र. ३ पु० (षः) नरक विशेष.

**कल्माष**, वि० (षःषा-षं) चित्रवर्ण. २ पु० (षः) राक्षस. ३ काळा. ४ अर्जुन. ५ कृष्ण.

**कल्माषकंठ**, पु० (ठः) महादेव.

**कल्य**, न० (ल्यं) प्रातःकाळ. २ कल्याण वचन. ३ उपाय वचन. ४ वि० (ल्यः ल्या-ल्यं) दक्ष, कुशल. ५ सज्ज, सिद्ध. ६ निरामय, निरोगी. ७ वाक्श्रुति वर्जित. मुका आणि भेरा.

**कल्यवर्त**, पु० (र्तः) सकाळचें जेवण.

**कल्या**, स्त्री० (ल्या) शुभवार्ता. २ मद्य.

**कल्याण**, न० (णं) सुखरूपता, कल्याण. २ सोनें. ३ अक्षय स्वर्ग.

**कल्ल**, पु० (ल्लः) भेरा.

**कल्लोल**, पु० (लः) मोठी लहरी, मोठी लाट. २ हर्ष. ३ वैरी.

**कवच**, न० पु० (चं-चः) कवच, चिलखत. २ पु० (चः) वृक्ष विशेष ज्यास गजहंड, लाखी पिपरी असें म्हणतात तो. ३ वाद्य विशेष.

**कवयी**, पु० (यी) मत्स्य विशेष.

**कवर**, न० (रं) लवण. २ आंबट.

**कवरकी**, स्त्री० (की) केशांचा बुचडा. २ कुंभ.

**कवरी**, स्त्री० (री) शाक विशेष ज्यास निवळणी, कानफोडी असें म्हणतात ती.

**कवल**, पु० (लः) ग्रास, घांस.

**कवाट**, न० स्त्री० (टं-टी) कपाट, दार.

**कवि**, पु० (विः) शुक्राचार्य. २ पंडित. ३ वाल्मिक ऋषि. ४ काव्य करणारा. ५ स्त्री० (विः) लगाम.

**कविका**, स्त्री० (का) कडियाळी, लगाम.

**कविज्येष्ठ**, पु० (ष्ठः) वाल्मिक ऋषि.

**कविय**, न० (यं) अश्वमुख बंधनविशेष ज्यास सरोभर असें म्हणतात तें २ लगाम.

**कविर्निधि**, पु० (धिः) कुबेर पुत्र.

**कवोष्ण**, वि० (ष्णः ष्णा- ष्णं) किंचित उष्ण.

**कव्य**, न० (व्यं) पितृ प्रीत्यर्थ दिलेलें अन्न.

**कव्यवालादि**, पु० (दिः) स्वर्गस्थ पितर. २ स्वर्गस्थ पितर भेद.

**कशा**, स्त्री० (शा) अश्वादिकांस ताडनोपयोगी रज्जु ज्यास जेरबंद, चाबूक असें म्हणतात तो.

**कशार्ह**, वि० (र्हः र्हा- र्हं) चाबकानें ताडण करण्यास योग्य.

**कशिपु**, पु० न० (पुः-पु) अन्न. २ आच्छादन वस्त्र.

**कशेरु**, न० (रु) अस्थिविशेष. २ तृणविशेष.

**कशेरुका**, स्त्री० (का) पृष्ठ मध्यगत अस्थिदंड ज्यास पाठीचा कणा असें म्हणतात तो.

**कश्मल**, न० (लं) मूर्छा.

**कश्य**, न० (श्यं) घोड्याचा मध्यभाग. २ मद्य. ३ वि० (श्यः श्या- श्यं) छडीनें ताडण करण्यास योग्य.

॥ दगडावर घांसून सो-

त्याची परीक्षा करितात त्यास कसोटी असें म्हणतात ती.

**कषाय,** वि० (यः या- यं) सुरभि, सुगंधि. २ रक्तवर्ण. ३ पु० (यः) तुरट रस. ४ पु० न० (यःयं) अंगराग, अर्गजा, बुका इत्यादि. ५ घृष्ट चंदन, उटणें. ६ काढा. ७ कडू. ८ रंग. ९ सुगंधि विशेष.

**कष्ट,** न० (ष्टं) शरीर पीडा. २ दुःख. ३ वि० (ष्टः ष्टा- ष्टं) दुरधिगम.

**कष्टकारक,** पु० (कः) संसार.

**कंस,** पु० (सः) कंसनामा दैत्य. २ कांसें. ३ परिमाणविशेष. ४ तैजस द्रव्य. ५ न० पु० (सं- सः) दूध वगैरे प्राशन करण्याचें पात्र.

**कंसाराति,** पु० (तिः) विष्णु.

**कस्तूरी,** स्त्री० (री) कस्तूरी.

**कक्ष,** पु० (क्षः) बाहुमूल, काख. २. शुष्क तृण, गवत. ३ वल्ली, वेल ४ अरण्य. ५ कच्छ.

**कक्षा,** स्त्री० (क्षा) हत्तीच्या मध्यभागीं बांधण्यास उपयोगाची जी चांबड्याची वादी किंवा दोरी ती. २ गृहाचा मध्य भाग. ३ कौपीन, लंगोटी.

**कक्ष्या,** स्त्री० (क्ष्या) हत्तीच्या मध्यभागीं बांधण्यास उपयोगी जी चांबड्याची वादी किंवा दोरी ती. २ कांची, मेखला, कमरपटा. ३ राजगृहादिकांचा आंतील कोठा, मध्यगृह. ४ आंगवस्त्र.

**कक्ष्यावेक्षक,** पु० (कः) राजाचें स्त्रीगृह. २ बागवान, माळी. ३ शिल्पिविशेष ज्यास रंगारी असें म्हणतात तो. ४ तरवार. ५ द्वारपाळ.

**काक,** पु० (कः) काकपक्षि, कावळा. २ दांडगा, निर्लज्ज. ३ वृक्षविशेष. ४ परिमाणविशेष. ५ द्वीपविशेष. ६ न० (कं) मैथूनविशेष. ७ कावळ्यांचा समूह.

**काकचिंचा,** स्त्री० (चा) गुंज.

**काकचिंचि,** स्त्री० (चिः) गुंज.

**काकचिंची,** स्त्री० (ची) गुंजेचें झाड. २ गुंज.

**काकछर्दि,** पु० (र्दिः) पक्षिविशेष ज्यास ताजवा, दय्यर असें म्हणतात तो.

**काकतिंदुक,** पु० (कः) वनौ० कडू टेंभुरणी, काजरा, कुचला असें म्हणतात तीं.

**काकध्वज,** पु० (जः) वडवाग्नि.

**काकनासिका,** स्त्री० (का) वनौ० जीस काकजंघा, कावळी असें म्हणतात ती.

**काकपक्ष,** पु० (क्षः) कुमारचूडा, लहान मुलाची शेंडी.

**काकपीलुक,** पु० (कः) वनौ० जीस कडूटेंभुरणी, काजरा, कुचला असें म्हणतात ती.

**काकपुष्ट,** पु० (ष्टः) कोकीळ.

**काकभीरु,** पु० (रुः) घुबड.

**काकमद्गु,** पु० (द्गुः) पक्षि विशेष ज्यास अंधकाक असें म्हणतात तो.

**काकमाचिका,** स्त्री० (का) वनौ० जीस काकजंघा, कावळी असें म्हणतात ती.

**काकमाची-** स्त्री० (ची) वनौ० जीस काकजंघा, कावळी असें म्हणतात ती.

**काकमुद्गा,** स्त्री० (द्गा) काकमूग, रानमूग.

**काकरुक,** पु० (कः) पक्षिविशेष. ज्यास पेंचापक्षि असें म्हणतात तो. २ स्त्रीजित, स्त्रीनें जिंकलेला. ३ नग्न, नागवा. ४ दंभ. ५ घुबड. ६ भित्रा.

**काकरुहा,** स्त्री० (हा) निबिड वृक्ष.

**काकल**, न० (लं) कंठमणी, शंख.
**काकली**, स्त्री० (ली) अव्यक्त आणि मधुर असा जो शब्द तो.
**काका**, स्त्री० (का) कावळ्याचें नाक. २ वनौ० जीस काकजंघा, कावळी असें म्हणतात ती.
**काकांगी**, स्त्री० (गी) वनौ० जीस काकजंघा, कावळी असें म्हणतात ती.
**काकिणी**, स्त्री० (णी) पैशाचा चतुर्थांश, दमडी. २ तागडीचा दांडा. ३ गुंज. ४ एक कवडी. ५ तुलामानाचा एक चतुर्थांश.
**काकिनी**, स्त्री० (नी) काकिणी हा शब्द पहा.
**काकु**, स्त्री० (कुः) शोक, भय, इच्छाइत्यादिकेंकरून विरुद्धार्थ बोधक जो शब्द तो. (उ० मी समजत नाहीं कीं काय. येथें काय ह्या काकु स्वरानें समजतों, हा अर्थ भासतो. ) २ जीभ.
**काकुद**, न० (दं) तालू, टाळू.
**काकुत्स्थ**, पु० (स्थः) ककुत्स्थ राजा.
**काकेंदु**, पु० (दुः) वनौ० जीस कडू टेंभुरणी, काजरा, कुचला असें म्हणतात ती.
**काकोचिक**, पु० (कः) मत्स्यविशेष.
**काकोची**, स्त्री० (ची) मत्स्यविशेष.
**काकोदर**, पु० (रः) सर्प.
**काकोदुंबरिका**, स्त्री० (का) काव्हा उंबर, बोखाडा, खर्वत ह्या नांवांनीं प्रसिद्ध जो वृक्ष तो.
**काकोल**, पु० न० (लः लं) काकमेचक नांवाचें विष. २ पु० (लः) द्रोणकाक, डोमकावळा.
**काच**, पु० (चः) कांच, बांगडखार. २ शिंके. ३ नेत्ररोग विशेष, डोळ्यावर पडदा येतो तो. ४ मणी.
**कांचन**, न० (नं) सुवर्ण, सोनें. २ नागकेशर. ३ पु० (नः) सोनचाफा. ४ उंबराचें झाड. ५ धोतऱ्याचें झाड. ६ मसूर. (धान्य.)
**कांचनाव्हय**, पु० (यः) नागचाफा.
**कांचनी**, स्त्री० (नी) हरिद्रा, हळद.
**काचभाजन**, न० (नं) कांचेचें भांडें.
**काचमालिका**, स्त्री० (का) दारू.
**काचस्थाली**, स्त्री० (ली) वनौ० जीस पाडळी असें म्हणतात ती.
**कांचि**, स्त्री० (चिः) स्त्रियांचे कमरेचें भूषण ज्यास दाब, कमरपट्टा असें म्हणतात तो. २ नगर वि०.
**कांचिक**, न० (कं) कांजिक, कांजि.
**काचिघ**, पु० (घः) सुवर्ण. २ उंदीर.
**काचित**, वि० (तःता·तं) शिंक्यावर ठेवलेलें.
**काचिम**, पु० (मः) देवदारू.
**कांची**, स्त्री० (ची) स्त्रियांच्या कमरेचें भूषण ज्यास दाब, कमरपट्टा असें म्हणतात तें. २ देशविशेष. ३ चंदनादिकांची उटी आंगास लावितात ती. ४ तर्क.
**काचूक**, पु० (कः) कोंबडा. २ चक्रवाकपक्षि.
**कांजिक**, न० (कं) कांजी. २ पेज.
**काठ**, पु० (ठः) दगड.
**कांड**, न० पु० (डं·डः) दंड, दांडा. २ बाण. ३ कुत्सित, निकृष्ट, निंद्य. ४ परिच्छेद, वर्ग. ५ प्रस्ताव, अवसर, प्रसंग. ६ उदक, पाणी. ७ एकांत स्थान. ८ पु० (डः) काव्य पुराण नाटक भाग. ९ ज्या वृक्षांस लांब कांडें नाहीं

मुळासच फांद्या फुटलेल्या असतात तो वृक्ष, खुरटें झाड. १० मुळापासून फांद्यापर्यंत जो वृक्षाचा भाग तो.

**कांडगोचर**, पु० (रः) बाणविशेष.

**कांडपृष्ठ**, वि० (ष्ठःष्ठा-ष्ठं) शस्त्रानें लढणारा.

**कांडवत्**, वि० (वान्-वतीवत्) बाणांनीं लढणारा.

**कांडीर**, वि० (रःरा-रं) बाणांनीं लढणारा.

**कांडेक्षु**, स्त्री० (क्षुः) वनी० ज्यास कोलिस्ता, कोळसुंदा असें म्हणतात तो.

**काण**, पु० (णः) कावळा. २ ज्याला एक डोळा आहे तो.

**कांत**, वि० (तःता-तं) सुंदर. २ पु० (तः) पति, नवरा. ३ कृष्णागरु चंदन. ४ चंद्रकांत (पाषाण वि०) ५ सूर्यकांत (पा० वि०.)

**कातर**, वि० (रःरा-रं) क्षय, क्षुधा, तहान, यांनीं किंवा यांतून एकानें जो व्याकूळ तो, भयचकित, क्षुधातुर इत्यादि.

**कांतलक**, पु० (कः) नंदिवृक्ष ज्यास, नांदरुखी असें म्हणतात तो.

**कांता**, स्त्री० (ता) मनोहर जी बायको ती, प्रिया. २ नारी. ३ प्रियंगुवृक्ष ज्यास वाघांटी असें म्हणतात ती.

**कांताघ्रिदोहद**, पु० (दः) अशोकवृक्ष.

**कांतार**, न० पु० (रं-रः) दुर्गम मार्ग, (चोर, कांटे इत्यादिकांचे उपद्रवानीं युक्त जो मार्ग तो.) २ बीळ, छिद्र. ३ उसांतील एक भेद आहे. ४ मोठें अरण्य, मोठें रान.

**कांतारक**, पु० (कः) उसांतील एक भेद आहे.

**कांति**, स्त्री० (तिः) शोभा. २ इच्छा.

**कात्य**, पु० (त्यः) कात्यायन ऋषि.

**कात्यायन**, पु० (नः) मुनी विशेष. २ तेजःपुंज. ३ वस्त्र विशेष.

**कात्यायनी**, स्त्री० (नी) पार्वती. २ अर्धवृद्धा व विधवा असून तांबडें वस्त्र नेसणारी जी स्त्री ती.

**कादंब**, पु० (बः) हंस विशेष ज्यास बदक असें म्हणतात तो. २ बाण.

**कादंबक**, पु० (कः) बाण.

**कादंबर**, पु० (रः) दह्याची साय. २ मद्यविशेष.

**कादंबरी**, स्त्री० (री) मद्य. २ ग्रंथ विशेष. ३ कोकीळ. ४ सरस्वती. ५ सोंगटी.

**कांदविक**, वि० (कःका-कं) भक्ष्य पदार्थ करणारा, तैलघृतादि पक्व पदार्थ करणारा.

**कादंबिनी**, स्त्री० (नी) मेघ समुदाय, मेघमाला.

**कांदिशीक**, वि० (कःका-कं) भीतीनें जो पळाला तो.

**कांद्रवेय**, पु० (यः) शरीराचा अवयव. २ सर्प विशेष.

**कानन**, न० (नं) अरण्य. २ घर. ३ ब्रम्हदेवाचें तोंड.

**कानीन**, पु० (नः) अविवाहित कन्येचे ठायीं झालेला पुत्र. २ व्यास. ३ कर्ण.

**कान्यकुब्ज**, न० (ब्जं) कान्यकुब्जदेश.

**कापटिक**, पु० (कः) दुसऱ्याचें मर्म जाणणारा. २ शिष्य. ३ वि० (कःका-कं) वांकडे मनाचा.

**कापथ**, पु० (थः) दुर्मार्ग, वाईट रस्ता. २ न० (थं) काळ्या वाळ्याचें मूळ.

**कापिल**, पु० (लः) सांख्यशास्त्र जाणणारा, सांख्यशास्त्री.

**कांपिल्य**, पु० (ल्यः) शुंडारोचनी नामक वनौषधि.

**कांपिल्ल**, पु० (ल्लः) शुंडारोचनी नामक वनौषधि.

**कापिशायनं**, न० (नं) दारू.

**कापिशेय**, पु० (यः) पिशाच.

**कापोत**, पु० (तः) कपोतपक्ष्यांचा समूह. २ क्षारभेद ज्यास सज्जीखार असे म्हणतात तो.

**काप्यकार**, पु० (रः) पापयुक्त कथन.

**कांबल**, वि० (लः ला- लं) कांबळ्यानें वेष्टित (रथादि.)

**कांबविक**, पु० (कः) शंख, काकणें इत्यादि करणारा ज्यास कांसार असे म्हणतात तो.

**कांबोज**, पु० (जः) देशविशेषचा घोडा. २ अश्वविशेष. ३ कुंभाचें झाड. ४ उंडिणीचें झाड.

**कांबोजी**, स्त्री० (जी) माषपर्णी, रानउडीद. २ वनौ० पांढऱ्या खैराचें झाड.

**काम**, पु० (मः) मदन. २ इच्छा. ३ वि० (मः मा- मं) शक्तिवान. ४ पु० (मः) हत्ती. ५ न० (मं) रेत. ६ यथेच्छ.

**कामं**, अ० असूयापूर्वक स्वीकार. २ अनिच्छेनें जी अनुमति ती. उ० लंहनिष्यसि- चेत्कामं. ३ यथेष्ट, यथेच्छ. ४ प्रकाश. ५ अनुगमन.

**कामकूट**, पु० (टः) वेश्येचा हावभाव विशेष.

**कामकेलि**, पु० (लिः) पाहिजे तसें वोणणारा.

**कामगामिन्**, वि० (मी. मिनी. मि) यथेच्छ गमनशील, स्वेच्छेनें जाणारा.

**कामंगामिन्**, वि० (मी. मिनी. मि) यथेच्छ गमनशील, स्वेच्छेनें जाणारा.

**कामगुण**, पु० (णः) विषय. २ सर्व उपचारांही करून जी परिपूर्णता ती. ३ राग.

**कामचारिन्**, पु० (री) कामुक. २ स्वछंद. ३ चिमणी म्हणून जो लहान पक्षि तो.

**कामताल**, पु० (लः) कोकीळ.

**कामद**, वि० (दः दा दं) इच्छिलेलें देणारा.

**कामदा**, स्त्री० (दा) कामधेनु.

**कामन**, वि० (नः ना- नं) कामुक.

**कामपाल**, पु० (लः) बळराम.

**काममह**, पु० (हः) चैत्रीपूर्णिमा.

**कामयितृ**, वि० (ता. त्री. तृ) कामुक.

**कामरूप**, पु० (पः) देशविशेष.

**कामरूपिन्**, पु० (पी) देवाची एक जात आहे.

**कामल**, पु० (लः) कामाविष्ट. २ निर्जल देश. ३ वसंतऋतु.

**कामला**, स्त्री० (ला) रोगभेद ज्यास कवळ, कावीळ असें म्हणतात ती.

**कामांकुश**, पु० (शः) शिस्न.

**कामायु**, पु० (युः) गरुड.

**कामालिका**, स्त्री० (का) दारू.

**कामि**, पु० (मिः) कामी पुरुष. २ स्त्री० (मिः) रती.

**कामिनी**, स्त्री० (नी) कामातुर जी स्त्री ती. २ वृक्षाचे ठायीं जो विजाती अंकूर तो. ३ सामान्य स्त्री. ४ विलासिनी स्त्री.

**कामी**, पु० (मी) कामुक, कामाविष्ठ. २ चक्रवाक पक्षि. ३ पारवा पक्षि.

**कामुक,** त्रि० (कः-का-कं) कामाविष्ट. २ पु० (कः) अशोक वृक्ष. ३ एक फुलझाड आहे ज्यास कुसरी, कस्तुरी मोगरा असें म्हणतात तो.

**कामुका,** स्त्री० (का) धनादिकांची इच्छा जीस आहे ती स्त्री.

**कामुकी,** स्त्री० (की) जीस मैथुनाची फार इच्छा आहे ती स्त्री.

**काय,** पु० न० (यः-यं) देह. २ न० (यं) अनामिका आणि कनिष्ठिका ह्या अंगुलींचें मूळ. (ह्या अंगुळींचे मूळास प्रजापति तीर्थ असें म्हणतात.) ३ पु० (यः) देहस्वभाव. ४ समुदाय. ५ कपट.

**कायमान,** न० (नं) गवताची झोंपडी.

**कायचलन,** न० (नं) चिलखत.

**कायस्थ,** पु० (स्थः) जातिविशेष. २ परमात्मा.

**कायस्था,** स्त्री० (स्था) हिरड्याचें झाड.

**कार,** पु० (रः) वध. २ निश्चय. ३ बल. ४ यत्न. ५ यत्ता. ६ थंडीयुक्त पर्वत. ७ सेवक. ८ बंध.

**कारंडव,** पु० (वः) करडु या नांवाचा पक्षी. (हा काळा असून याचें तोंड कावळ्यासारखें आणि पाय लांब असतात.)

**कारंडव्यूह,** पु० (हः) बौद्धभेद.

**कारण,** न० (णं) कार्य साधन. २ हेतु. ३ वध, ठार मारणें.

**कारणा,** स्त्री० (णा) नरकपीडा.

**कारणिक,** वि० (कः-का-कं) प्रमाणानें अर्थ निश्चय करणारा, परीक्षा करणारा.

**कारंधमिन्,** पु० (मी) सोनार.

**कारंभा,** स्त्री० (भा) प्रियंगु वृक्ष ज्यास वाघांटी असें म्ह० तो.

**कारव,** पु० (वः) कावळा.

**कारवी,** स्त्री० (वी) वनौ० जीस मोरशेंडा, अजमोदा. असें म्हणतात ती. २ शोपेची भाजी. ३ हिंगु वृक्षाची पत्री. ४ काळेंजिरें, काळेंरें.

**कारवेल्ल,** पु० (ल्लः) कारली, कारेती.

**कारस्कर,** पु० (रः) वृक्ष, झाड.

**कारस्कराटिका,** स्त्री० (का) जंतुविशेष.

**कारा,** स्त्री० (रा) बंधनगृह, तुरुंग, बंदिखाना. २ पीडा. ३ दूती.

**कारावेश्मन्,** न० (श्म) बंदिशाळा.

**कारि,** पु० (रिः) क्रिया. २ वि० (रिः-रिः-रि) कारागीर.

**कारिक,** वि० (कः-का-कं) कर्ता, करणारा.

**कारिका,** स्त्री० (का) यातना, नरकपीडा. २ वृत्ति, विवरण श्लोक. ३ उंटीण. ४ कृति. ५ शिल्प. ६ नटाची स्त्री नटी.

**कारिष,** न० (षं) करिषांचा समूह. (करिष म्हणजे सुकलेलें शेण. गोवरी इत्यादि.

**कारु,** पु० (रुः) रंगारी, चितारी इत्यादि शिल्पी. २ विश्वकर्मा.

**कारुज,** पु० (जः) चित्र. २ वारूळ. ३ हत्तीचा बच्चा.

**कारुणिक,** वि० (कः-का-कं) दयाशील, दयाळू.

**कारुण्य,** न० (ण्यं) करुणारस, दया.

**कारुष,** पु० (षः) देशविशेष.

**कारोत्तर,** पु० (रः) मद्यावरची निवळी. २ विहीर.

**कार्तस्वर,** न० (रं) सुवर्ण, सोनें.

**कार्तांतिक,** पु० (कः) ज्योतिषी, जोशी.

**कार्तिक,** पु० (कः) कार्तिकमास.

**कार्तिकिक**, पु० (कः) कार्तिकमास.
**कार्तिकेय**, पु० (यः) कार्तिकस्वामी.
**कार्पट**, पु० (टः) जंतु.
**कार्पटिक**, पु० (कः) बुद्धिवान छात्र, बुद्धिवान शिष्य.
**कार्पण**, न० (णं) मंत्रतंत्रादिकांचे योजन. २ पु० (णः) कर्म करणारा.
**कार्पास**, वि० (सःसा-सं) कापसापासून उत्पन्न जें वस्त्र तें. २ (कापूस असेंही कोणी म्ह०) ३ पु० (सः) कापशी.
**कार्पासी**, स्त्री० (सी) कापशीण.
**कार्म**, वि० (र्मःर्मा-र्मं) सर्वदा कामकाजाविषयीं जो प्रवृत्त तो.
**कार्मण**, वि० (णःणा-णं) मूलभूतजें कर्म तें. (जसें औषध करण्यास प्रथम औषधींचें मूळ शोधणें हें कर्म.)
**कार्मुक**, न० (कं) धनुष्य. २ पु० (कः) वेळू. ३ वि० (कःका-कं) काम करण्याविषयीं जो समर्थ तो.
**कार्य**, न० (र्यं) हेतु. प्रयोजन.
**कार्यपुट**, पु० (टः) कृपण. २ उन्मत्त. ३ अनर्थ करणारा.
**कार्यपुटध्वनि**, पु० (निः) उन्मत्त. २ अनर्थ करणारा.
**कार्श्य**, पु० (र्श्यः) सायल्याचें झाड. २ न० (र्श्यं) कृशपणा.
**कार्षक**, वि० (कःका-कं) कृषिकर्मानें उपजीविका करणारा.
**कार्षापण**, पु० (णः) रुपया. २ सोळा पैसे म्हणजे एक कार्षापण असेंही आहे.
**कार्षिक**, पु० (कः) रुपया.
**कार्ष्य**, पु० (र्ष्यः) सायल्याचें झाड.
**कार्ष्टिर्न**, पु० (ष्टिर्नः) मदत.
**काल**, पु० (लः) प्रेतांचा राजा, यम. २ सर्व व्यवहारांस कारण जो प्रसिद्ध काल तो. ३ वि० (लःला-लं) नीलवर्ण, निळा. ४ महाकाल. ५ मृत्यु.
**कालक**, पु० (कः) शरीरावर जें काळें चिन्ह क्वचित् असतें ज्यास लासें असें म्हणतात तें.
**कालकंठ**, पु० (ठः) महादेव. २ पक्षिविशेष ज्यास दयार असें म्हणतात तो. ३ चिमणी म्हणून जो लहान पक्षि तो. ४ मयूर, मोर.
**कालकंठक**, पु० (कः) डाहद, अंध काक, जलकाक असें म्हणतात तो पक्षिविशेष.
**कालकर्णिका**, स्त्री० (का) दरिद्र.
**कालकूट**, न० (टं) पु० (टः) विषविशेष (हें विष दयुमाळी नामा दैत्य होता त्याचे रक्तापासून झालें असें म्ह०)
**कालकृत्**, पु० (त) सूर्य.
**कालखंड**, न० (डं) उजवे कुशींतील मांसपिंड विशेष.
**कालग्रंथि**, पु० (थिः) वर्ष.
**कालंजर**, पु० (रः) महादेव. २ योगी समागम. ३ पर्वत विशेष ज्यास कालंजर असें म्हणतात तो. ४ अष्ट भैरवांतील एक.
**कालंजरी**, स्त्री० (री) पार्वती.
**कालधर्म**, पु० (र्मः) मरण.
**कालनेमियवनारि**, पु० (रिः) विष्णु.
**कालपृष्ठ**, न० (ष्ठं) कर्ण नामा जो सूर्याचा पुत्र त्याचें धनुष्य. २ पु० (ष्ठः) कंकपक्षि.
**कालप्रभात**, न० (तं) शरदृतु.
**कालमेशिका**, स्त्री० (का) वनौ० जीस मंजिष्ठा असें म्हणतात ती.

**कालमेशी,** स्त्री० (शी) बावचीचें झाड.

**कालमेषिका,** स्त्री० (का) वनौ० जीस मंजिष्ठा असें म्हणतात ती. २ निगडी, तिधारें, काळा तेंडू असें म्हणतात ती.

**कालमेषी,** स्त्री० (षी) बावचीचें झाड.

**कालरात्रि.** स्त्री० (त्रिः) कालरात्र.

**कालवलन,** न० (नं) कवच, चिलखत.

**कालशाक,** पु० (कः) वृक्ष विशेष.

**कालशेय,** वि० (यः-या-यं) दंडमंथित, घुसळलेलें (दही)

**कालसर्प,** पु० (र्पः) कालसर्प.

**कालसूत्र,** न० (त्रं) नरकविशेष.

**कालस्कंध,** पु० (धः) वनौ० तेंडू, टेंभुरणी वृक्ष. २ तमाल वृक्ष. ३ असणाचें झाड.

**कालज्ञ,** पु० (ज्ञः) कोंबडा. २ ज्ञानी.

**काला,** स्त्री० (ला) पार्वती. २ वनौ० पाडळीची वेल. ३ नीली, नील. ४ काळा तेंडू. निगडी, तिधारें. ५ काळेंजिरें, काळेंरें.

**कालागुरु,** न० (रु) कृष्णागरु चंदन.

**कालानुसार्य,** न० (र्यं) शैलेय, ज्यास दगडफूल, शिलाजित असें म्हणतात तें. २सुवासिक द्रव्य विशेष, पीतचंदन. ३ वृक्ष विशेष.

**कालायस,** न० (सं) लोह, लोखंड.

**कालाक्षरिक,** पु० (कः) ज्याणें अध्ययन पढलें आहे तो.

**कालिका,** स्त्री० (का) मेघांचा समूह. २ देवता विशेष. ३ काळावर्ण. ४ वृक्ष विशेषाचें पान. ५ विंचवीण. ६ विकावयाच्या वस्तूचें मोल. ७ पडवळीची वेल. ८ रोमावळी, रोमपंक्ति. ९ जटामांशी. १० आंवळीचें झाड ११ कीटक विशेष.

**कालिंग,** पु० (गः) भुई कोहळा. २ हत्ती. ३ भुजंग. ४ कोहळा.

**कालिंगी,** स्त्री० (गी) कांकडी.

**कालिंदासेयी,** स्त्री० (यी) व्यासमाता.

**कालिंदी,** स्त्री० (दी) यमुना नदी.

**कालिंदीभिदन,** पु० (नः) बलराम.

**काली,** स्त्री० (ली) पार्वती. २ मेघांचा समूह. ३ देवता विशेष. ४ कीटक विशेष.

**कालीची,** स्त्री० (ची) यमाचें एकांत स्थळ.

**कालीय,** पु० (यः) कृष्णागरूचंदन.

**कालीयक,** पु० (कः) वनौ० दारूहळद. २ न० (कं) सुवासिक द्रव्यविशेष, पीतचंदन.

**कालेय,** पु० (यः) उजव्या कुशींतील मांसपिंड विशेष. २ दैत्य विशेष. ३ कृष्णागरूचंदन.

**कालेयक,** पु० (कः) वनौ० दारूहळद. २ न० (कं) सुवासिक द्रव्यविशेष, पीतचंदन.

**कालोल,** न० (लं) नरकविशेष. २ पु० (लः) कुंभार. ३ डोमकावळा. ४ पु० न० (लः-लं) विष विशेष.

**काल्पक,** पु० (कः) वनौषधिविशेष ज्यास कचर असें म्हणतात ती.

**काल्य,** न० (ल्यं) प्रातःकाळ.

**कावचिक,** न० (कं) जे कवचधारी त्यांचा समुदाय.

**कावार,** न० (रं) शेवाळ.

**कावारि,** स्त्री० (री) छत्री.

**कावेरी,** स्त्री० (री) नदी विशेष. २ हरिद्रा, हळद.

**काव्य,** पु० (व्यः) शुक्राचार्य. २ न०(व्यं) ग्रंथ.

**काव्यकर्तृ,** पु० (र्ता) पढलेलें ज्याचें अध्ययन आहे तो.

**काव्यचौर,** पु० (रः) काव्यचोर (चोरभेद.)

**काव्या,** स्त्री० (व्या) पूतना नामें राक्षसी. २ बुद्धि.

**काश,** पु० (शः) न० (शं) वनौ० मोळ, लव्हाळें, लवा. २ तृण विशेष.

**काशी,** स्त्री० (शी) वाराणशी. २ तृण विशेष.

**काश्मरी,** स्त्री० (री) शिवणीचें झाड.

**काश्मर्य,** पु० (र्यः) शिवणीचें झाड.

**काश्मीर,** न० (रं) पुष्कर नामक औषधीचें मूळ. २ पु० (रः) देश विशेष. ३ कुंकुम. ४ दगड फोडण्याचा लोखंडाचा घण ज्यास टांकी, पिकंदर असें म्हणतात तो.

**काश्मीरज,** न० (जं) कुंकू. २ कुष्ठ, कोड.

**काश्मीरजन्मन,** न० (न्म) कुंकुम, केशर.

**काश्मीरजा,** स्त्री० (जा) वनौ० विशेष जीस अतिविषा, अतिविख असें म्ह० ती.

**काश्यप,** पु० (पः) ऋषिविशेष. २ मृगवि०.

**काश्यपि,** पु० (पिः) अरुण नामा जो सूर्याचा सारथी तो.

**काश्यपी,** स्त्री० (पी) पृथ्वी.

**काष्ठ,** न० (ष्ठं) लांकूड.

**काष्ठकुद्दाल,** पु० (लः) नौकादिकांचा मळ घालविण्याकरितां केलेला काष्ठकुद्दाल, कुडती.

**काष्ठकूद्दाल,** पु० (लः) काष्ठकुद्दाल हा शब्द पहा.

**काष्ठतक्ष्,** पु० (ट्) सुतार.

**काष्ठमठी,** स्त्री० (ठी) चिता (प्रेत जाळण्यासाठीं क० ती.)

**काष्ठमल्ल,** पु० (ल्लः) तिरडी.

**काष्ठलेखक,** पु० (कः) लांकडास छिद्र पाडणारा किडा.

**काष्ठा,** स्त्री० (ष्ठा) दारुहळद. २ दिशा ३ अठरा निमिषात्मक काल. ४ उत्कर्ष ५ स्थिति, मर्यादा.

**काष्ठांबुवाहिनी,** स्त्री० (नी) द्रोणी, डोणी टांकी, पन्हळ इत्यादि.

**काष्ठीला,** स्त्री० (ला) कर्दली, केळ.

**कास,** न० पु० (सं-सः) मोळ, लव्हाळें लवा. २ रोगवि०, खोकला, ढांस.

**कासमर्द,** पु० (र्दः) गुल्म रोगाचा एक भेद आहे. २ शाकवि०. ३ नेत्ररोग.

**कासर,** पु० (रः) वनमहिष, गवा. २ रेडा

**कासार,** पु० (रः) तडाग, तळें.

**कासू,** स्त्री० (सूः) आयुधवि० ज्यास महाराष्ट्र भाषेंत सेति असें म्ह० तें. २ पु० (सूः) ज्याची विकल वाणी आहे तो.

**कांस्य,** न० (स्यं) वाद्यवि०. २ पाणी वगैरे पिण्याचें भांडें. ३ तैजस पदार्थ वि० ४ धातू, कांसें.

**कांस्यक,** न० (कं) कांसें.

**काहल,** पु० (लः) कोंबडा. २ शब्दमात्र. ३ वि० (लःला-लं) शुष्क. ४ दुष्ट. ५ अतिशय.

**काहला,** स्त्री० (ला) अप्सरावि०. २ वाद्यवि०.

**काहलापुष्प,** पु० (ष्पः) धोत्र्याचें झाड.

**काहली**, स्त्री० (ली) तरुण स्त्री,
**काक्ष**, पु० (क्षः) नेत्र कटाक्ष.
**कांक्षा**, स्त्री० (क्षा) इच्छा.
**काक्षी**, स्त्री० (क्षी) तुवरिका, तूर. २ सौराष्ट्र देशाची मृत्तिका.
**किं**, अ० विकल्प. २ प्रश्न. ३ निंदा ह्या अर्थी. उ० स्थाणुरयंकिंपुरुषः २ किमाद्रेयनरासिकाःकृतिमे. ३. सकिंराजायःप्रजांनरक्षति. ४ निषेध. ५ वितर्क. ६ प्रकार.
**किंकर**, वि० (रःरा-रं) दास, चाकर.
**किंकि**, पु० (किः) पक्षिवि० ज्यास चारगाचाप, तास असें म्ह० तो.
**किंकिणि**, स्त्री० (णिः) घागरी, घुंगूर.
**किंकिणी**, स्त्री० (णी) घागरी, घुंगूर.
**किंकिदिव**, पु० (वः) चापपक्षि.
**किंकिदिवि**, पु० (विः) चापपक्षि.
**किंकिदीवि**, पु० (विः) चापपक्षि.
**किंकिन्**, पु० (की) चापपक्षि.
**किंकीदिव**, पु० (वः) चापपक्षि.
**किंकीदिवि**, पु० (विः) चाप पक्षि.
**किंकीदिवी**, पु० (वी) चाप पक्षि.
**किखि**, पु० (खिः) वानर. २ स्त्री० (खिः) कोल्ही.
**किंच**, अ० आरंभ. २ साकल्य.
**किंचित**, अ० किंचित अल्प ह्या अर्थी. उ० किंचिद्दत्वा पृथक क्रिया.
**किंचिलिक**, पु० (कः) जलचर विशेष. ज्यास काडू, दानवार, गांडोळ असें म्हणतात ते.
**किंचुलुक**, पु० (कः) किंचिलिक हा शब्द पहा.
**किंजल्क**, पु० (ल्कः) केसर, पुष्परेणु, फुलांतील बारीक रज.
**किटि**, पु० (टिः) सूकर, डुकर.
**किट्ट**, पु० (ट्टः) कानांतील मळ.
**किट्टाल**, पु० (लः) तांब्याचा कलश. २ लोखंडाचें कीट.
**किण**, पु० (णः) व्रणजाचिन्ह, माव. २ मांसग्रंथि विशेष (खोरें कुदळ इत्यादिकांचे दांड्याचे अतिसंघर्षणानें हातास जो घट्टा पडतो तो. ३ ऊंस. ४ वेळूचा कोंब. ५ लांकडास छिद्र पाडणारा किडा.
**किणिही**, स्त्री० (ही) आघाड्याचें झाड.
**किण्व**, न० (ण्वं) तंडुलादि द्रव्य कृत जें सुरा बीज तें. २ मद्य प्राशनानें जो उन्मत्त व नग्न झाला त्यानें केलेलें आव्हान असेंही कोणी म्हणतात. ३ पाप. ४ पंढ, नपुंसक. ५ वि० (ण्वःण्वा-ण्वं) पराक्रम रहित पुरुष.
**किंतनु**, पु० (नुः) शरभ (प्राणी वि०.)
**कितव**, पु० (वः) वनौ० धोतरा. २ द्यूत खेळणारा, सोंगटीबाज, जुवेबाज, जुगारी इत्यादि. ३ उन्मत्त. ४ वंचक.
**किन्नर**, पु० (रः) देवयोनि विशेष. (ह्याचें तोंड मात्र घोड्यासारखें आणि आकृति मनुष्याची असते.
**किन्नरेश**, पु० (शः) कुबेर.
**किन्नु**, अ० प्रश्न. २ वितर्क ह्या अर्थी.
**किंपच**, वि० (चःचा-चं) कृपण.
**किंपचान**, वि० (नःना-नं) कृपण.
**किंपुरुष**, पु० (षः) देवयोनि विशेष (ह्याचें तोंड मात्र घोड्यासारिखें आणि आकृति मनुष्याची असते.) २ किंपुरुष लोक विशेष. ३ न० (षं) नवखंडांतील एक.
**किमु**, अ० विकल्पार्थी. उ० गृहंकिमुवनंगतः

२ संभावना. ३ पूर्वी जें अनुभविलें त्याचें विस्मरण न होणें.

किमुत, अ० विकल्पार्थी. उ० किमुतत्वं शिवोब्रम्हा. २ अतिशय ह्या अर्थी. उ० किमुतावर्धत क्षेत्रं.

किमुत्, अ० प्रश्न. २ वितर्क. ३ विकल्प. ४ अतिशय ह्या अर्थी.

कियद्देहिका, स्त्री० (का) प्रौढी.

किर, पु० (रः) डुकर.

किरण, पु० (णः) चंद्र, सूर्य इत्यादि तेजस्वी पदार्थांपासून प्रसृत जो प्रकाश तो, किरण.

किरणमाली, पु० (ली) सूर्य.

किरात, पु० (तः) अरण्यचर चांडाल विशेष, भिल्ल.२ म्लेंछभेद. ३ भुईंनिंब. ठेंगणा. ५ किल्ला.

किराततिक्त, पु० (क्तः) वनौषधि किराईत.

किराता, स्त्री० (ता) चवरी धरणारी स्त्री. २ कुंटण बायको.

किरि, पु० (रिः) सूकर, डुकर.

किरिक, पु० (कः) लेखक.

किरिट, न० पु० (टं-टः) मस्तकाचें भूषण, मुगूट.

किरीटिन्, पु० (टी) अर्जुन.

किर्मी, स्त्री० (र्मी) हिरवा रंग. २ फांदी.

किर्मीर, पु० (रः) नारिंगाचें झाड. २ राक्षस विशेष. ३ वि० (रः-रा-रं) चित्रवर्ण.

किल, अ० वार्ता. २ संभावना ह्या अर्थी. उ० जघानकंसंकिलवासुदेवः २ गुरुन्किलातिशेतेशिष्य ३ हेतु. ४ अरुचि. ५ दीर्घद्वेष.

किलकिंचित, न० (तं) हर्षानें गायनादि मिश्र बोलणें एतद्रूप जो हाव तो.

किलकिला, स्त्री० (ला) हर्षध्वनी.

किलाट, पु० (टः) खवा.

किलाटी, स्त्री० (टी) वेळू.

किलास, न० (सं) श्वेतकुष्ट, शिबें.

किलासिन्, वि० (सी- सिनी-सि) ज्याच्या आंगावर शिबें आहे तो.

किलिंजक, पु० (कः) वेणुविकार, करंडा, तटया इत्यादि.

किल्किन्, पु० (ल्की) घोडा.

किल्बिष, न० (षं) पाप. २ अपराध. ३ रोग.

किंशारु, पु० (रुः) बाण. २ कंकपक्षि.

किंशुक, पु० (कः) पळसाचें झाड.

किशोर, पु० (रः) अश्वबाल, शिंगरूं. २ लहान बालक. ३ रक्तचंदन. ४ तरुण. ५ सूर्य.

किष्कपर्वन, पु० (र्वा) ऊंस. २ वेळू. ३ देवनळ.

किष्कु, पु० (ष्कुः) हस्तप्रमाण, एक हात. २ वितस्थि, वीत. ३ प्रकोष्ट, कोंपराचा खालचा भाग, मनगट. ४ सायल्याचें झाड.

किसल, न० (लं) वृक्षपालवी.

किसलय, न० (यं) नूतन पल्लव, कोंवळी पालवी.

कीकट, पु० (टः) कृपण. २ दरिद्री. ३ देश विशेष. (मगध.)

कीकश, पु० (शः) पक्षि.

कीकस, न० ( सं ) अस्थि, हाड. २ पु० (सः) कीटकांची जाती.

कीचक, पु० (कः) वायूनें भरलेला वंश-

ब्द करणारा जो वेळू तो. २ दैत्य विशेष.

**कीट**, पु० (टः) किड्यांची जात. २ किडा.

**कीटक**, पु० (कः) किड्यांची जात. २ निष्ठूर. ३ किडा.

**कीनाश**, पु० (शः) यम, कृतांत, काळ. २ वि० (शःशा-शं) क्षुद्र. ३ कृपण. ४ कृषीवल, कृषिकर्म करणारा.

**कीर**, पु० (रः) रावा, राघू, पोपट. २ पु० ब० (राः) काश्मीर देश.

**कीर्ण**, वि० (र्णःर्णा-र्णं) दिलेलें. २ विखरलेलें. ३ मारलेलें.

**कीर्ति**, स्त्री० (र्तिः) यश. २ प्रसन्नता.

**कील**, पु० (लः) लोहादिमयशंकु, खिळा. २ कफणी, कोंपर. ३ स्तंभ, खांब. ४ महादेव. ५ ज्वाळा. ६ पु० न० (लःलं) लेश. ७ शस्त्र.

**कीलक**, पु० (कः) गाईस बांधण्याकरितां पुरलेलें खांब, मेढ.

**कीला**, स्त्री० (ला) ज्वाळा. २ कोंपर.

**कीलाल**, न० (लं) उदक. २ रक्त.

**कीलालपा**, पु० (पाः) यमदूत.

**कीलासिन्**, वि० (सी-सिनी-सि) ज्याचे आंगावर शिबें आहे तो.

**कीलित**, वि० (तःता-तं) बद्ध, दोरीनें बांधलेला.

**कीश**, पु० (शः) वानर. २ दिगंबर.

**कीशपर्णी**, स्त्री० (र्णी) आघाड्याचें झाड.

**कु**, स्त्री० (कुः) पृथ्वी. २ पु० (कुः) शब्द. ३ अ० पाप. ४ कुत्सा, निंदा. ५ किंचित ह्या अर्थी. उ० कुकर्म. ४ कापथः ५ कवोष्णं. ६ निवारण.

**कुक**, पु० (कः) चक्रवाकपक्षि.

**कुकर**, वि० (रः-री-रं) ज्याचे हात रोगादिकानें कुजले आहेत तो, हात कुजका. २ पु० (रः) कुत्रा.

**कुकील**, पु० (लः) पर्वत.

**कुकुद**, वि० (दः-दा-दं) जो आदरपूर्वक वरास अलंकृत कन्यादान करितो तो.

**कुंकुम**, न० (मं) कुंकू. २ पिंजर. ३ केशर. ४ रंग.

**कुकूल**, न० (लं) शंकूनी व्याप्त जो खळगा तो. २ पु० (लः) तुषाग्नि, कोंड्याचा विस्तव. ३ चिलखत.

**कुक्कुट**, पु० (टः) कोंबडा. २ कोळीपुत्र. ३ शूद्रपुत्र. ४ लावापक्षि.

**कुक्कुटी**, स्त्री० (टी) खोटी वर्तणूक.

**कुक्कुभ**, पु० (भः) वनकुक्कुट, रानकोंबडा.

**कुक्कुर**, पु० (रः) कुत्रा. २ पु० ब० (राः) देश विशेष. ३ वनौषधि विशेष जीस गेंठिवन भटोरा असें म्हणतात ती.

**कुच**, पु० (चः) स्तन, थान.

**कुचंदन**, न० (नं) रक्तचंदन. २ रक्तचंदनासारिखा वृक्ष ज्याला रक्तसार, पतंग असें म्हणतात तो.

**कुचर**, वि० (रः-रा-रं) दोषकथनशील, दुसऱ्याचे दोष सांगणें हा ज्याचा स्वभावच असतो तो.

**कुचाग्र**, न० (ग्रं) स्तनाचें अग्र, थानाची बोंडी.

**कुंचित**, वि० (तः-ता-तं) वक्र, वांकडा. २ आकुंचित.

**कुचेल**, वि० (लः-ला-लं) मळीण वस्त्राचा.

**कुचेला**, स्त्री० (ला) वनौ० जीस पहाडमूळ, पाडवळी असें म्ह० ती.

**कुज**, पु० (जः) मंगळ नांवाचा ग्रह. २ दैत्य विशेष भौमासूर.

**कुंज**, पु० न० (जः-जं) सभोंवताल्या वेली असून त्यांनीं आच्छादित अशी जी जागा ती, जाळी. २ हत्तीचा दांत. ३ हनवटी.

**कुजंभल**, पु० (लः) दिवसास चोरी करणारा.

**कुजंभिर**, पु० (रः) मनुष्यास मारून चोरी करणारा.

**कुंजर**, पु० (रः) हत्ती. २ हा कुंजर शब्द उत्तरपद असतां क्वचित श्रेष्ठार्थक होतो. उ० पुरुषकुंजरः ३ कल्पतरू.

**कुंजरा**, स्त्री० (रा) वनौ० जीस धायटी, धायफूल अ. म्ह. ती. २ पाडळीचीवेल.

**कुंजराशन**, पु० (नः) पिंपळाचें झाड. २ सिंह.

**कुंजल**, न० (लं) कांजिक, कांजी.

**कुंजा**, स्त्री० (जा) कात्यायनी देवी.

**कुज्झटि**, स्त्री० (टिः) धुकें.

**कुट**, पु० (टः) वृक्ष, झाड. २ कलश, तांब्या. ३ पु० न० (टः-टं) घर, गृह.

**कुटक**, न० (कं) फाळ (नांगराचा)

**कुटकुट्टीर**, पु० (रः) पर्वत.

**कुटंगक**, पु० (कः) वृक्ष, वेली ह्यांचें अरण्य.

**कुटज**, पु० (जः) कुड्याचें झाड. २ अगस्तिऋषि. ३ द्रोणाचार्य.

**कुटन्नट**, पु० (टः) दिंड्याचें झाड. २ केवडी, जलमुस्ता, लहान मोथा.

**कुटर**, पु० (रः) ज्या खांबास रवी म्हणजे मंथन दंड बांधतात तो खांब, ताकमेड.

**कुटल**, पु० (लः) समूह, समुदाय.

**कुटि**, पु० स्त्री० (टिःटिः) सभागृह. २ स्त्री० (टिः) पाणी भरणारी दासी. ३ वनौ० जीस मोरमांसी, तालीसपत्र असें म्हणतात ती.

**कुटिल**, वि० (लःला-लं) वक्र, वांकडा.

**कुटी**, स्त्री० (टी) सभागृह. २ गृहकोष्टक, अंतर्गृह, माजघर.

**कुटुंबव्यापृत**, वि० (तःता-तं) कुटुंब पोषणाचे व्यापाराचे ठायीं आसक्त.

**कुटुंबिनी**, स्त्री० ( नी ) जीस पति आणि पुत्रादि आपल्ये आहेत ती बायको.

**कुट्टनी**, स्त्री० (नी) परस्त्रीस परपुरुषयोजून देणारी स्त्री, कुंटण बायको.

**कुट्टमित**, न० ( तं ) सुख असतां दुःखोपचार करून दाखविणें. ( हा एक हाव आहे. )

**कुट्टार**, पु० ( रः ) पर्वत. २ न० ( रं ) मैथून. ३ संपूर्ण.

**कुट्टिनी**, स्त्री० (नी) कुंटण बायको.

**कुट्टिम**, पु० (मः) घरांतील फरसबंदीची भूमि, तळघर. २ मणिबंध भूमि. ३ भित्ति विशेष. ( भित्ति म्हणजे भिंत. ).

**कुंठ**, वि० ( ठःठा-ठं ) काम करण्यास जो आळशी व मूर्ख किंवा मंद तो.

**कुठर**, पु० (रः) ज्या खांबास रवी म्हणजे मंथनदंड बांधतात तो खांब, ताकमेड.

**कुठार**, पु० (रः) कुऱ्हाड.

**कुठारी**, स्त्री० (री) कुऱ्हाड.

**कुठारु**, पु० (रुः) वृक्ष. २ केंस.

**कुठिक**, पु० (कः) औषधि विशेष.

**कुठेरक**, पु० (कः) वनौ० जीस आजवल, बाबरी असें म्हणतात ती.

**कुठेरु**, पु० (रुः) चवरीचा वारा.

**कुंड**, पु० (डः) मुख्य नवरा जिवंत असतां

जार पुरुषापासून उत्पन्न जो पुत्र तो. २ स्थाली, तपेली. ३ न० (डं) अग्निकुंड. ४ देवांच्या दाराजवळचा जलाशय. ५ परिणाम विशेष.

**कुंडकीट,** पु० (टः) व्यभिचारी. २ नास्तिक वचनाचा अभिज्ञ पुरुष. ३ पतितापासून ब्राम्हणीचे ठायीं झालेला. ४ दासीचे ठिकाणीं कामुक.

**कुडंगक,** पु० (कः) वृक्ष, लता ह्यांचें अरण्य.

**कुडप,** पु० (पः) पावशेर.

**कुंडल,** न० (लं) पुरुषाचें कर्णभूषण, कुंडल. २ फांस, पाश. ३ प्रकोष्ठा भरण, पोंची, कांकण इत्यादि. ४ कांचनवृक्ष, कांचनाचें झाड.

**कुंडला,** स्त्री० (ला) गुळवेल.

**कुंडलि,** पु० (लिः) सर्प.

**कुंडलिन्,** पु० (ली) सर्प. २ वरुण. ३ मोर. ४ ज्याणें कुंडलें धारण केलीं आहेत तो.

**कुडव,** पु० (वः) पावशेर.

**कुंडी,** स्त्री० (डी) मुख्य नवरा जिवंत असतां जार पुरुषापासून झालेली कन्या २ जलपात्र वि० कमंडलू.

**कुड्मल,** न० पु० (लं-लः) किंचित फुललेली फुलाची कळी.

**कुडय,** न० (ड्यं) भिंत. २ विलेपन.

**कुणप,** पु० (पः) प्रेत. २ दुर्गंधियुक्त प्रेत.

**कुणपी,** स्त्री० (पी) पक्षि विशेष.

**कुणि,** पु० (णिः) नंदी वृक्ष ज्यास नांदरूख असें म्हणतात तो. २ रोगादिकानें ज्याचे हात कुजले आहेत तो.

**कुंत,** पु० (तः) शस्त्र विशेष ज्यास भाला असें म्हणतात तें. २ ऋषींचें भक्ष्य तृण धान्य विशेष. ज्यास कसईचें बीं, कसाड, कसा असें म्हणतात तें. ३ शस्त्र विशेष ज्यास सांग असें म्हणतात तें.

**कुतनु,** पु० (नुः) कुबेर.

**कुतप,** पु० न० (पः-पं) दिवसाचे मुहूर्त पंधरा त्यांतील आठवा मुहूर्त. २ पु० (पः) मृगांच्या लोकरीचें वस्त्र. ३ दर्भ. ४ नातु (कन्येचा पुत्र.) ५ वाद्य. ६ गलबत, मचवा इत्यादिकांतील मध्यस्तंभ. ७ सूर्य.

**कुंतल,** पु० (लः) मस्तकाचे केंस. २ देश विशेष. ३ मद्य प्राशन करण्याचें पात्र. ४ वेग.

**कुंतलहस्त,** पु० (स्तः) केशपाश.

**कुतलिका,** स्त्री० (का) दहीं घुसळण्याची रवी.

**कुंती,** स्त्री० (ती) पांडवांची माता.

**कुतुक,** न० (कं) कौतूक.

**कुतुप,** पु० (पः) तेल वगैरे ठेवण्याचें लहानसें चामड्याचें एक पात्र ज्यास दवडी, लहान बुधला असें म्हणतात तें.

**कुतू,** स्त्री० (तूः) तेल तूप वगैरे ठेवण्याचें पात्र ज्यास बुधला असें म्हणतात तें.

**कुतूहल,** न० (लं) कौतूक. २ प्रशस्त.

**कुत्र,** न० (त्रं) धान्य ठेवण्याचें घर, कोठार.

**कुत्रिण,** पु० (णः) जलकुंभी ह्याच नांवानें प्रसिद्ध आहे.

**कुत्स,** पु० (त्सः) हार. २ गुछ.

**कुत्सा,** स्त्री० (त्सा) निंदा.

**कुत्सित**, वि० (तः ता तं) अधम, निकृष्ट, निंद्य.

**कुथ**, पु० (थः) दर्भ. २ हत्तीच्या पाठीवरचें आस्तरण.

**कुथा**, स्त्री० (था) हत्तीच्या पाठीवरचें आस्तरण.

**कुंद**, न० पु० (दं-दः) कुंद नांवाचें फुलझाड. २ कुंदपुष्प. ३ वनौषधि जीस पालकी, पोईशाक, कांकारा, पालख असें म्हणतात ती. ४ पु० (दः) विष्णु. ५ नवनिधींतील एक. ६ चाक. ७ भ्रम.

**कुंदम**, पु० (मः) मांजर.

**कुंदर**, पु० (रः) वनौ० जीस पालकी, पोईशाक असें म्हणतात ती.

**कुंदरु**, पु० (रुः) वनौ० जीस पालकी, पोईशाक असें म्हणतात ती.

**कुंदरुकी**, स्त्री० (की) सालईचा वृक्ष.

**कुंदिनी**, स्त्री० (नी) कमळाच्या देंटीचा एक भेद.

**कुद्दाल**, पु० (लः) कुदळ. २ कांचनाचें झाड.

**कुद्रव**, पु० (वः) हरीक म्हणून जें कोकणांत धान्य आहे तें.

**कुनटी**, स्त्री० (टी) नेपाळ देशोत्पन्न मनःशिला, मनशीळ.

**कुनलिन्**, पु० (ली) अगस्त्याचें झाड.

**कुनाभि**, पु० (भिः) आकाश.

**कुनाशक**, पु० (कः) वनौ० ज्यास धमासा असें म्हणतात तो.

**कुपिंद**, पु० [दः] वस्त्र निर्माण करणारा शिल्पि, कोष्टी.

**कुपिनी**, पु० (नी) ढिवर (जातीवि०)

**कुपूय**, वि० (यः-या-यं) अधम, निंद्य.

**कुप्य**, न० (प्यं) सोनें, रुपें ह्याशिवाय ज्या ताम्रादि धातु त्या प्रत्येक.

**कुंबा**, स्त्री० (बा) यागभूमीचे ठायीं अंत्यजादिकांचें दर्शन न व्हावें म्हणून केलेलें कुंपण किंवा वेष्टन. २ यज्ञसंबंधी अंतर्गृह.

**कुबेर**, पु० (रः) देवांचा धनाध्यक्ष. २ वृक्षविशेष ज्यास नांदरुखी असें म्हणतात तो.

**कुबेरक**, पु० (कः) नंदीवृक्ष, नांदरुखीचें झाड.

**कुबेराचल**, पु० (लः) कैलास.

**कुबेराक्षी**, स्त्री० (क्षी) पाडळीची वेल.

**कुब्ज**, पु० (ब्जः) कुबडा. २ वृक्षविशेष. ३ रोगानें ज्याची पाठ किंवा तोंड वांकडें किंवा खालीं झालें आहे तो.

**कुब्जक**, पु० (कः) वृक्षविशेष.

**कुंभ**, पु० (भः) कुंभरास. २ हत्तीचें गंडस्थळ. ३ घट, तांब्या, घागर इत्यादि. ४ राक्षसविशेष ५ कंचनीचा नवरा. ६ धनुष्य. ७ पात्रविशेष, थाली. ८ कुंभ्याचें झाड. ९ कांहीं तांबडा आणि कांहीं पांढरा. १० न० (भं) गुग्गुलवृक्ष.

**कुंभस्कार**, पु० (रः) कुंभार.

**कुंभकारी**, पु० (री) कुंभार. २ स्त्री० (री) काळा सुरमा.

**कुंभयोनि**, पु० (निः) अगस्तिऋषि. २ वसिष्ठ. ३ द्रोणाचार्य.

**कुंभसंधि**, पु० (धिः) गंडस्थळ.

**कुंभसंभव**, पु० (वः) अगस्तिऋषि.

**कुंभिका**, स्त्री० (का) जलकुंभी ह्याच नानानें प्रसिद्ध आहे.

**कुंभिल**, पु० (लः) मत्स्यविशेष. २ चोर.

**कुंभी**, स्त्री० (भी) कायफळ. २ कुंभ्याचें झाड.

**कुंभीनस,** पु० (सः) सर्प.
**कुंभीनसा,** स्त्री० (सा) लवणासुराची माता.
**कुंभीर,** पु० (रः) जलचरविशेष ज्यास सुसर असें म्हणतात तो.
**कुंभीरमक्षिका,** स्त्री० (का) मक्षिकाविशेष.
**कुमार,** पु० (रः) कार्तिकस्वामी. २ लहान बालक. ३ नाटकांत युवराजास ही संज्ञा आहे. ४ पूर्वजिन (जैन). ५ शुक (व्यासपुत्र.) ६ खांदा. ७ स्वार. ८ सनकसनंदनादि ब्रम्हदेवाचे पुत्र. ९ अश्विनीकुमार, देवांचे वैद्य.
**कुमारक,** पु० (कः) वायवर्ण्याचें झाड.
**कुमारभृत्या,** स्त्री० (त्या) गर्भिणी अवस्था. २ गर्भिणीची सेवा.
**कुमारी,** स्त्री० (री) कन्या. २ कांटेशेवती, सेवंती गुलाब. ३ नदीविशेष. ४ पार्वती.
**कुमुद्,** न० (द्) शुभ्र कमळ. २ कृपण.
**कुमुद,** पु० (दः) नैऋत्य दिशेचा हत्ती. २ वानर. ३ न० (दं) शुभ्र जें कमळ तें, कापूस कमळ. ४ तांबडें कमळ.
**कुमुदबांधव,** पु० (वः) चंद्र.
**कुमुदा,** स्त्री० (दा) औषधि विशेष जिला जलकुंभी असें म्हणतात ती. २ शिवणीचें झाड.
**कुमुदिका,** स्त्री० (का) वनौ० जिला कायफळ, कुंभ्या असें म्हणतात ती.
**कुमुदिनी,** स्त्री० (नी) पांढरी कमळीण. २ ज्या जागेंत कुमुदें (कमळें) आहेत ती जागा.
**कुमुद्वत्,** वि० (द्वान्-द्वती-द्वत्) जेथें पुष्कळ कुमुदें (कमळें) आहेत ती जागा.
**कुमुद्वती,** स्त्री० (ती) पांढरी कमळीण. २ ज्या जागेंत कुमुदें (कमळें) आहेत ती जागा. ३ कुशपत्नी.
**कुमूरुह,** पु० (हः) दिंड्याचें झाड.
**कुरंकुर,** पु० (रः) सारसनामा पक्षि.
**कुरंग,** पु० (गः) हरीण.
**कुरट,** पु० (टः) चांभार.
**कुरंटक,** पु० (कः) पिंवळा कोरंटा.
**कुरंटी,** स्त्री० (टी) लांकडाची पुतळी.
**कुरंडवृद्ध,** पु० (द्धः) रोगविशेष.
**कुरबक,** पु० (कः) तांबडा कोरंटका. २ निंबाचें झाड. ३ रक्तवर्ण, तांबडा. ४ निळा कोरंटा.
**कुरर,** पु० (रः) पक्षिविशेष ज्यास कुररी असें म्हणतात तो.
**कुरस,** न० (सं) मद्यविशेष.
**कुरु,** पु० (रुः) राजविशेष. २ देशविशेष.
**कुरुंट,** पु० (टः) निळा कोरंटा. २ लांकडाची पुतळी.
**कुरुंटक,** पु० (कः) पिंवळा कोरंटा.
**कुरुबक,** पु० (कः) तांबडा कोरंटा.
**कुरुबिस्त,** पु० (स्तः) सोन्याचें शास्त्रसिद्ध म्हणजे ८० गुंजांचा एक तोळा असे चार तोळे.
**कुरुराट,** पु० (ट्.) दुर्योधन.
**कुरुविंद,** पु० (दः) वनौ० मुस्ता, मोथा. २ धान्यविशेष. ३ न० (दं) रत्नविशेष.
**कुरुविल्ल,** पु० (लः) पद्मरागमणि.
**कुरुक्षेत्र,** न० (त्रं) मध्यदेश. २ कुरुक्षेत्र.
**कुर्चिका,** स्त्री० (का) सूय.
**कुर्पास,** पु० (सः) स्त्रियांच्या स्तनांचें आच्छादक वस्त्रविशेष, चोळी.
**कुर्वाण,** वि० (णःणा-णं) चाकर. २ करणारा.

**कुल**, न० (लं) सजातीय जंतु समुदाय. २ घर. ३ वंश. ४ शरीर, देह. ५ देश.

**कुलक**, पु० (कः) वनी० जीस कडू टेंभुरणी, काजरा, कुचला असें म्हणतात ती. २ शिल्पिकुलप्रधान. ३ वारूळ. ४ कुलांमध्यें श्रेष्ठ. ५ न० (कं) पडवळीची वेल. ६ संबद्ध श्लोकांचा समुदाय. ७ जिभेचा मल.

**कुलटा**, स्त्री० (टा) व्यभिचारिणी स्त्री.

**कुलत्थ**, पु० (त्थः) कुळीथ (धान्य विशेष.)

**कुलत्थिका**, स्त्री० (का) काळासुरमा.

**कुलधारक**, पु० (कः) पुत्र.

**कुलनाश**, पु० (शः) उंठ.

**कुलपालिका**, स्त्री० (का) कुलीन बायको.

**कुलश्रेष्ठिन्**, पु० (ष्ठी) कुलप्रधान, कुलमुख्य.

**कुलसंभव**, वि० (वःवा-वं) कुलीन.

**कुलस्त्री**, स्त्री० (स्त्री) कुलीन बायको.

**कुलांकुर**, पु० (रः) ग्रामदेवता.

**कुलाय**, पु० (यः) पक्षिगृह, घरटा. २ स्थानमात्र.

**कुलायिका**, स्त्री० (का) पाखरें राहण्याचें घर.

**कुलाल**, पु० (लः) शिल्पिविशेष ज्यास कुंभार असें म्हणतात तो. २ रान कोंबडा.

**कुलाला**, स्त्री० (ला) अंजन विशेष.

**कुलाली**, स्त्री० (ली) निळ, सूरमा.

**कुलि**, पु० (लिः) हात.

**कुलिक**, पु० (कः) शिल्पि कुलांमध्यें मुख्य. २ सर्प. ३ कुलांत श्रेष्ठ. ४ वृक्ष विशेष.

**कुलिर**, पु० (रः) कुरलें, खेंकडा.

**कुलिश**, न० (शं) वज्र. २ पु० (शः) मत्स्य विशेष.

**कुलिशासन**, पु० (नः) शाक्यमुनी.

**कुली**, स्त्री० (ली) वनी० रिंगणीचें झाड.

**कुलीन**, पु० (नः) सज्जन. २ वि० (नःना-नं) कुलीन.

**कुलीर**, पु० (रः) कुरलें, खेंकडा.

**कुलुक**, न० (कं) जिभेचा मळ (लाळ वगैरे.)

**कुलूल**, न० (लं) शकुनीं व्यास जो खळगा तो. २ पु० (लः) तुषाग्नि, कोंड्याचा विस्तव.

**कुल्माष**, न० (षं) कांजिक, कांजी. २ पु० (षः) धान्य विशेष. ३ वाईट उडीद. ४ शूकशून्ययव, ज्यास कुसें नाहींत ते यव.

**कुल्माषाभिषुत**, न० (तं) कांजी.

**कुल्य**, न० (ल्यं) अस्थि, हाड. २ डोण, दोण (पाण्याची.) ३ सूप. ४ मांस. ५ पु० (ल्यः) मान्य. ६ कुलांमध्यें उत्पन्न झालेला. ७ वि० (ल्यःल्या-ल्यं) कुलालाहित.

**कुल्या**, स्त्री० (ल्या) नवीन झालेली आणि लहान अशी जी नदी ती. २ कुलस्त्री. ३ धान्यादिकांचें एक माप (म्ह० आठ द्रोण ६४ पायल्या.) ४ पाण्याचा नळ. ५ औषधि विशेष.

**कुल्लक**, पु० (कः) करताळ (वाद्यवि०.)

**कुव**, न० (वं) कमळ.

**कुवर**, पु० (रः) तुरट रस.

**कुवल**, न० ( लं ) बोरीचें फळ, बोर. २ कमळ. ३ मोतीं. ४ पु० (लः) कळा. ५ आरसा.

**कुवलय**, न० (यं) कमळ.

**कुवली**, स्त्री० (ली) नरक विशेष.

**कुवाद**, वि० (दःदा-दं) दोषकथनशील, दुसऱ्याचे दोष सांगण्याचा ज्याचा स्वभाव तो.

**कुविंद**, पु० ( दः ) वस्त्र निर्माण करणारा एक शिल्पि, कोष्टी.

**कुवेणी**, स्त्री० (णी) मत्स्यबंधन करंडिका, धरलेले मासे ठेवण्याची करंडी.

**कुश**, न० पु० ( शं-शः ) दर्भ. २ न० ( शं ) जल, पाणी. ३ सप्तद्वीपांतील एक. ४ पु० ( शः ) कुशनामा रामचंद्राचा पुत्र. ५ जूं बांधण्याची दोरी ज्यास जुंफणी असें म्हणतात ती. ६ जोतें. ७ वि० ( शःशा-शं ) पापिष्ठ. ८ उन्मत्त.

**कुशल**, न० ( लं ) कल्याण. २ सुकृत. ३ परिपूर्णता. ४ वि० (लःला-लं) निपुण, प्रवीण. ५ शिक्षित, शिकविलेला.

**कुशलप्रश्न**, पु० (श्नः) खुशालीचा प्रश्न.

**कुशस्थल**, न० (लं) कान्युकुब्जदेश.

**कुशस्थली**, पु० (ली) देशविशेष.

**कुशा**, स्त्री० (शा) रज्जु.

**कुशाकु**, पु० (कुः) वानर. २ अग्नि. ३ सूर्य. ४ वि० (कुः कुः कु) दुसऱ्यास ताप देणारा.

**कुशारणि**, पु० (णिः) दुर्वासऋषि.

**कुशिक**, पु० (कः) मुनिविशेष. २ सायल्याचें झाड.

**कुशी**, स्त्री० (शी) लोहविकार विशेष, नांगराचा लोखंडी फाळ.

**कुशीद**, न० (दं) लोकांस जें कर्ज दिलें त्याच्या व्याजानें चाललेली उपजीविका. २ व्याजी दिलेलें द्रव्य.

**कुशीलव**, पु० (वः) नटविशेष, नटव्यांतील एक भेद. २ वाल्मिकी. ३ याचक.

**कुशीवश**, पु० (शः) वाल्मिक ऋषि.

**कुशुंभ**, पु० (भः) कमंडलु.

**कुशेशय**, न० पु० (यं-यः) कमळ.

**कुषीद**, न० (दं) लोकांस जें कर्ज दिलें त्याच्या व्याजानें चाललेली उपजीविका. २ व्याजीं दिलेलें द्रव्य.

**कुष्ट**, न० (ष्टं) कडूकोष्ठ. २ पु० (ष्टः) रोग वि०, कोड.

**कुष्टतृत्**, पु० (त्) खैराचें झाड.

**कुष्ठ**, न० (ष्ठं) कडूकोष्ठ. २ गोडेंकोष्ठ. ३ पु० न० (ष्ठः-ष्ठं) त्वग्दोष, कुष्ठरोग.

**कुष्मांड**, पु० (डः) कोहळा.

**कुष्मांडक**, पु० (कः) कोहळा.

**कुसीद**, न० (दं) लोकांस जें कर्ज दिलें त्याच्या व्याजानें चाललेली उपजीविका. २ व्याजी दिलेलें द्रव्य.

**कुसीदिक**, वि० (कः का- कं) लोकांस दिलेल्या कर्जाच्या व्याजानें उपजीविका करणारा.

**कुसुंभ**, न० (भं) कुसुंब, कुसुंबा. २ सुवर्ण. ३ पु० (भः) कमंडलु.

**कुसुम**, न० (मं) पुष्प, फूल. २ स्त्री रज, न्हाण. ३ नेत्ररोग. ४ फळ.

**कुसुमांजन**, न० (नं) फार तापलेल्या पितळी पासून निघालेलें फूल ज्यास जस्ताचें फूल असें म्हणतात तें.

**कुसुमात्मक**, न० (कं) केशर.
**कुसुमाधिराट्**, पु० (ट्) चाफ्याचें झाड.
**कुसुमाल**, पु० (लः) दिवसास चोरी करणारा.
**कुसुमेषु**, पु० (षुः) मदन, काम.
**कुसूल**, पु० (लः) धान्यागार, धान्यगृह, धान्याचें कोठार.
**कुसुति**, स्त्री० (तिः) कपट, कृत्रिम.
**कुस्तुंबरी**, स्त्री० (री) कोथिंबीर, धना.
**कुस्तुंबरु**, न० (रु) कोथिंबीर.
**कुहकस्वर**, पु० (रः) रान कोंबडा.
**कुहन**, न० ( नं ) मातीचें पात्र विशेष. २ कांचेचें भांडें. ३ वि० (नःना-नं) ज्याला ईर्षा आहे तो.
**कुहना**, स्त्री० ( ना ) लोकांपासून धनादि मिळवावें म्हणून केलेला कपटवेष.
**कुहमुख**, पु० (खः) कोकिळ.
**कुहर**, न० ( रं ) छिद्र, बीळ. २ गुहा, दरी. ३ नाग विशेष.
**कुहरित**, न० (तं) ध्वनी. २ कोकिळेचा शब्द. ३ मैथुनाच्या वेळेचा स्त्री पुरुषांचा शब्द.
**कुहलि**, पु० (लिः) विवाह पुष्प.
**कुहु**, स्त्री० ( हुः ) चंद्राची कळा अगदीं दिसत नाहीं अशी जी अमावास्या ती. २ कोकिळेचा स्वर.
**कुहू**, स्त्री० (हूः) चंद्राची कळा अगदीं दिसत नाहीं अशी जी अमावास्या ती.
**कुहुमुख**, पु० (खः) कोकीळ.
**कुहेछ**, पु० (छः) कुबेर.
**कुहेलिका**, स्त्री० (का) धुकें.
**कू**, स्त्री० (कूः) पृथ्वी.
**कूकुद**, पु० (दः) वरास आदर सत्कारानें अलंकृत कन्या जो देतो तो.

**कूट**, न० पु० (टं-टः) पर्वताचें अग्र, शीखर, शेंडा. २ धान्यादिकांची रास. ३ निश्चल, अविकार (आकाशादिक.) ४ माया, अन्यथाकार दिसणें, अज्ञान. ५ यंत्र. ६ कपट. ७ असत्य. ८ अयोघन, लोखंडाचा घण. ९ नांगराचें शेवट. १० तुच्छ.
**कूटक**, न० (कं) नांगराच्या खालचें लांकूड, फाळ. २ पु० (कः) केसांचा बुचडा.
**कूटकृत्**, पु० (त) शूद्र जातिविशेष.
**कूटपर्व**, पु० (र्वः) हत्तीचा यजमान.
**कूटयंत्र**, न० (त्रं) पक्षिबंधनार्थ कपट यंत्र, सांपळा, पिंजरा, जाळें इ०. २ पु० (स्थः) आत्मा.
**कूटशाल्मलि**, पु० (लिः) काळ्या सांवरीचें झाड.
**कूटस्थ**, वि० (स्थःस्था-स्थं) एकाच स्वभावानें जो कालास व्यापक असतो तो (आकाशादिक.)
**कूटागार**, न० (रं) माडी.
**कूटायु**, पु० (युः) गुग्गुल वृक्ष.
**कूणि**, वि० (णिःणिःणि) ज्याचे हात रोगानें कुजले आहेत तो.
**कूप**, पु० (पः) विहीर.
**कूपक**, पु० (कः) खळगा. २ शुष्क नद्यादिकांचे ठायीं पाण्यासाठीं जो खळगा खणतात तो. ३ गलबतांतील मध्य स्तंभ, शिडाचा खांब. ४ तेलाचें भांडें. ५ पाठीचे कण्याचे खालचे बाजूस जे दोन खळगे असतात ते.
**कूबर**, पु० (रः) रथाच्या ज्या लांकडास घोडा बांधितात तें लांकूड, दांडी. २ कुबडा. ३ वि० (रःरा-रं) सुंदर.

**कूर्च**, पु० (र्चः) दोन भोंवईंचा मध्य. २ दाढी. ३ कपट. ४ बौद्धावतार. ५ कठीण. ६ केंस. ७ श्राद्धकालीं दर्भाचा करितात तो.

**कूर्चशीर्ष**, पु० (र्षः) जीवक नामक वनौषधिविशेष.

**कूर्चिका**, स्त्री० (का) दह्यानें किंवा ताकानें दुधास जी विकृती होते ती, विरजण. २ सूर्य. ३ सोनाराची शलाका जीस सळई असें म्हणतात ती. ४ फुलाची कळी.

**कूर्दन**, न० (नं) बाललीला.

**कूर्पर**, पु० (रः) कोंपर. २ ढोंपर.

**कूर्पास**, पु० (सः) स्त्रियांचे स्तनांचें आच्छादक वस्त्रविशेष, चोळी.

**कूर्पासक**, पु० (कः) स्त्रियांचे स्तनांचें आच्छादक वस्त्रविशेष, चोळी.

**कूर्म**, पु० (र्मः) कांसव.

**कूल**, न० (लं) नदीचे वगैरे तीर. २ वडा, घारगा इत्यादि भक्ष्य पदार्थ. ३ सैन्याचा पृष्ठ भाग. ४ तलाव.

**कूलक**, पु० न० (कः-कं) वडा, घारगा इत्यादि भक्ष्य पदार्थ.

**कूलंकष**, पु० (षः) समुद्र.

**कूलंकषा**, स्त्री० (षा) नदी.

**कूलहंडक**, पु० (कः) जलभोंवरा.

**कूष्मांड**, पु० (डः) कोहळा.

**कूष्मांडक**, पु० (कः) कोहळा.

**कूष्मांडी**, स्त्री० (डी) पार्वती. २ पु० (डी) समुदायविशेष.

**कृकण**, पु० (णः) पक्षिविशेष ज्यास करकरटु असें म्ह० तो. २ कीटक.

**कृकलाश**, पु० (शः) सरडा.

**कृकलास**, पु० (सः) सरडा.

**कृकवाकु**, पु० (कुः) कोंबडें. २ मयूर, मोर. ३ सरडा.

**कृकवाकुध्वज**, पु० (जः) कार्तिकस्वामी.

**कृकाटिका**, स्त्री० (का) मान आणि मस्तक ह्यांच्या पाठीमागचा संधी ज्यास घांटी असें म्हणतात ती.

**कृकुलास**, पु० (सः) सरडा.

**कृच्छ्र**, न० (च्छ्रं) शरीरास जें दुःख तें, कष्ट. २ सांतपनादिक जीं धर्मशास्त्रोक्त प्रायश्चित्तें तीं प्रत्येक. ३ पाप.

**कृणु**, पु० (णुः) चित्रें काढणारा. २ जामीन.

**कृत**, न० (तं) कृतयुग. २ वि० (तः-ता-तं) पर्याप्त, पुरे झालेला. ३ केलेला. ४ न० (तं) सत्ययुग.

**कृतकोटि**, पु० (टिः) काश्यप ऋषि.

**कृतपुंख**, वि० (खः-खा-खं) बाण सोडण्याविषयीं जो कुशल तो.

**कृतमाल**, पु० (लः) बाहव्याचें झाड.

**कृतमुख**, वि० (खः-खा-खं) प्रवीण, निपूण.

**कृतलक्षण**, वि० (णः-णा-णं) शौर्यादिकें करून जो प्रख्यात तो.

**कृतसापत्नका**, स्त्री० (का) अनेक ज्या विवाहित स्त्रिया त्यांतील पहिली स्त्री.

**कृतसापत्निका**, स्त्री० (का) अनेक ज्या विवाहित स्त्रिया त्यांतील पहिली स्त्री.

**कृतहस्त**, वि० (स्तः-स्ता-स्तं) बाण सोडण्याविषयीं जो कुशल तो

**कृतज्ञ**, पु० (ज्ञः) कुत्रा. २ वि० (ज्ञः-ज्ञा-ज्ञं) मर्यादा बाळगणारा. ३ उपकार जाणणारा.

**कृतांत**, पु० (तः) प्रेतांचा राजा जो यम तो. २ सिद्धांत. ३ दैव, प्राक्तन कर्म. ४ अकुशल कर्म, पापकर्म.

**कृतालय**, पु० (यः) बेडूक.

**कृति**, स्त्री० (तिः) कारण. २ हिंसा.

**कृतिन्**, वि० (ती.तिनी.ति) पंडित, विद्वान. २ प्रवीण, निपूण.

**कृती**, स्त्री० (ती) पंडित. २ योग्य.

**कृत्त**, वि० (त्तःत्ता-त्तं) खंडित, तोडलेला, छेदलेला. २ न० (त्तं) वेष्टित.

**कृत्ति**, स्त्री० (त्तिः) मृगादिकांचें चामडें.

**कृत्तिवासस्**, पु० (साः) महादेव.

**कृत्य**, वि० (त्यःत्या-त्यं) धन, स्त्री, भूमि इत्यादिक देऊन फितुर केलेला. (परराज्यांतील राज पुरुष वगैरे.) २ न० (त्यं) कार्य, काम.

**कृत्या**, स्त्री० (त्या) क्रिया, कर्म. २ तामस देवता वि०.

**कृत्रिम**, न० (मं) कपट. २ लवणवि०. ३ ऊद. ४ वि० (मःमा-मं) रचित, रचलेला. (ग्रंथ वगैरे.)

**कृत्रिमधूपक**, पु० (कः) अनेक पदार्थांचा केलेला धूपवि०.

**कृत्स्न**, वि० (त्स्नःत्स्ना-त्स्नं) सर्व, समग्र. २ न० (त्स्नं) उदक, पाणी. ३ जठर.

**कृप**, पु० (पः) कृपाचार्य.

**कृपण**, वि० (णःणा-णं) जो धर्म न करितां व आपण न भोगितां आणि कुटुंबाचें पोषण यथास्थितपणें न करितां लोभानें द्रव्य संचय करितो तो. २ मंद. ३ कुत्सित. ४ पु० (णः) कीटकै वि०.

**कृपा**, स्त्री० (पा) करुणरस, दया.

**कृपाण**, पु० (णः) खड्ग, तरवार.

**कृपाणक**, पु० (कः) तरवार.

**कृपाणा**, स्त्री० (णा) सुरी, कात्री.

**कृपाणी**, स्त्री० (णी) कात्री, कातर.

**कृपाद्वैत**, पु० (तः) बौभद्धेद.

**कृपालु**, वि० (लुःलुःलु) दयाशील, कृपाळू.

**कृपी**, स्त्री० (पी) द्रोणाचार्याची स्त्री.

**कृपीट**, न० (टं) उदर, पोट. २ जल.

**कृपीटपाल**, पु० (लः) नौकेचें सुकाणु. २ समुद्र.

**कृपीपाटल**, पु० (लः) समुद्र.

**कृपीटयोनि** पु० (निः) अग्नि.

**कृपीसुत**, पु० (तः) अश्वत्थामा.

**कृमि**, पु० (मिः) किडा. २ कुसुरडा, घुलें.

**कृमिकंटक**, न० (कं) वनौ० ज्यास वावडिंग असें म्हणतात तो. २ उंबर.

**कृमिकोशोत्थ**, न० (त्थं) रेशीम.

**कृमिघ्न**, पु० (घ्नः) वावडिंगाचें झाड.

**कृमिज**, न० (जं) कृष्णागरु चंदन.

**कृश**, वि० (शःशा-शं) सक्ष्म, बारीक.

**कृशरा**, स्त्री० (रा) तिळांनीं युक्त ओदन, भात.

**कृशानु**, पु० (नुः) अग्नि, चित्रक.

**कृशानुरेतस्**, पु० (ताः) महादेव.

**कृशाश्विन**, पु० (श्वी) नट, नटवा, स्त्रीवेशानें नर्तनादिक करून उपजीविका करणारा.

**कृषक**, पु० (कः) नांगराचें खालचें लांकूड, फाळ. २ किरसान, शेतकरी.

**कृषि**, स्त्री० (षिः) कृषिकर्म (ही वैश्यांची वृत्ति.)

**कृषिक**, वि० (कः-का-कं) कृषिकर्मानें उपजीविका करणारा.

**कृषीवल**, वि० (लः-ला-लं) कृषिकर्मानें उपजीविका करणारा.

**कृष्ककर**, पु० (रः) महादेव.

**कृष्ट**, वि० (ष्टः-ष्टा-ष्टं) नांगरलेलें (शेत वगैरे.)

**कृष्टि**, पु० (ष्टिः) पंडित, विद्वान. २ स्त्री० (ष्टिः) आकर्षण.

**कृष्ण**, पु० (ष्णः) कृष्णनामा देव. २ विष्णु. ३ अर्जुननामा पांडुराजाचा पुत्र. ४ व्यास. ५ कावळा. ६ वि० (ष्णः-ष्णा-ष्णं) काळा. ७ न० (ष्णं) मिरीं. ८ लोखंड.

**कृष्णकंद**, न० (दं) कुमुद पुष्प.

**कृष्णकर्मन्**, वि० (र्मा- र्मणी- र्म) पापकर्मी.

**कृष्णकोहल**, पु० (लः) जुगार खेळणारा.

**कृष्णद्वैपायन**, पु० (नः) व्यासऋषि.

**कृष्णपाकफल**, पु० (लः) करवंदाचें झाड.

**कृष्णपिंगला**, स्त्री० (ला) पार्वती.

**कृष्णफला**, स्त्री० (ला) वनौ० बावंचीचें झाड.

**कृष्णभेदी**, स्त्री० (दी) कुटकी, केदार.

**कृष्णला**, स्त्री० (ला) गुंज.

**कृष्णवर्त्मन्**, पु० (र्त्मा) अग्नि, विस्तव. २ दुराचार. ३ चंद्र.

**कृष्णवृंता**, स्त्री० (ता) वनौ० पाडळीची वेल. २ वनौ० जीस रान उडीद असें म्हणतात ती.

**कृष्णशार**, पु० (रः) कृष्णमृग.

**कृष्णसार**, पु० (रः) कृष्णमृग.

**कृष्णसारा**, स्त्री० (रा) शिसवीचें झाड. २ स्तुति. ३ वनौषधि जीस शेर, निवडुंग असें म्हणतात ती.

**कृष्णा**, स्त्री० (ष्णा) पिंपळी. २ द्राक्षाची वेल. ३ द्रौपदी.

**कृष्णायस**, न० (सं) लोखंड.

**कृष्णिका**, स्त्री० (का) कृष्णसर्षप, काळी मोहरी, राई.

**कृसर**, पु० (रः) तिलमिश्रित जें अन्न तें.

**कृप्तकीला**, स्त्री० (ला) व्यवस्थापत्र.

**केकर**, वि० (रः-रा-रं) काणा, कैरा.

**केका**, स्त्री० (का) मयूरशब्द, मोराची वाणी.

**केकिन्**, पु० (की) मयूर, मोर,

**केचुक**, न० (कं) शुंठी, सुंठ.

**केडभा**, स्त्री० (भा) पार्वती.

**केतक**, पु० (कः) केतक.

**केतकी**, स्त्री० (की) केतकीचें झाड, केवड्याचें झाड.

**केतन**, न० (नं) ध्वज, पताका, निशाण. २ कृत्य, कार्य. ३ आमंत्रण. ४ निवास, राहण्याची जागा.

**केतु**, पु० (तुः) नऊ ग्रहांतील एक केतुनामा ग्रह. २ ध्वज. पताका. ३ रोग. ४ शत्रु. ५ ग्रहोत्पात. ६ चिन्ह.

**केतुमाल**, न० (लं) नऊ खंडांतील एक.

**केदर**, पु० (रः) व्यवहार पदार्थ.

**केदार**, पु० (रः) क्षेत्र, शेत. २ पर्वत. ३ शिव. ४ झाडादिकांस अळीं करितात ती. ५ भूमि विशेष.

**केनती**, स्त्री० (ती) मदनाची स्त्री, रती.

**केनार**, पु० (रः) नरक. २ शीर. ३ गाल. ४ संधि.

**केनिपात**, पु० (तः) नौकेचें सुकाणू.

**केनिपातक**, पु० (कः) नौकेचें सुकाणू.

**केयूर**, न० (रं) प्रगंडभूषण, बाहुवटे, बाजुबंद इत्यादि.

**केलक**, पु० (कः) नटविशेष.

**केलि**, पु० स्त्री० (लिःलिः) क्रीडा, लीला, खेळ.

**केलिकलावती**, स्त्री० (ती) मदनाची स्त्री, रती.

**केलिकुंचिका**, स्त्री० (का) मेव्हणी.

**केलिमुख**, पु० (खः) थट्टा.

**केवल**, वि० (लःला-लं) एकटा, असहाय. उ० केवलोयंव्रजति. २ सकल, संपूर्ण. उ० केवलाभिक्षवः ३ कपटवेष धारण करणारा. ४ पु० (लः) ज्ञानभेद. ५ लोकांपासून धनादि मिळवावें म्हणून केलेला कपटवेष. ६ निर्णय केलेला.

**केवलं**, अ० निर्णीत, निश्चित ह्या अर्थी. उ० केवलं मूर्खः

**केश**, पु० (शः) मस्तकाचे केस. २ वनौ० ज्यास वाळा असें म्हणतात तो. ३ वरुण.

**केशगर्भक**, पु० (कः) केसांचा बुचडा.

**केशघ्न**, पु० (घ्नः) मस्तककेशरोग ज्यास चाई असें म्हणतात तो.

**केशट**, पु० (टः) विष्णु.

**केशपक्ष**, पु० (क्षः) केसांचा समूह.

**केशपाश**, पु० (शः) केसांचा समूह.

**केशपाशी**, स्त्री० (शी) शेंडी.

**केशर**, पु० न० (रःरं) केसर, पुष्परेणु. २ पु० (रः) उंडिणीचें झाड. ३ न० (रं) चवरी.

**केशराज**, पु० (जः) वृक्षविशेष.

**केशव**, पु० (वः) विष्णु. २ उंडिणीचें झाड. ३ वि० (वःवा-वं) ज्याचे केस चांगले आहेत तो.

**केशवेश**, पु० (शः) केशबंध रचना.

**केशिक**, वि० (कःका-कं) ज्याचे प्रशस्त केस आहेत तो.

**केशिन्**, पु० (शी) प्रशस्त केसांचा. २ दैत्यविशेष. ३ विष्णु.

**केशिनी**, स्त्री० (नी) वनौ० जीस चोरवल्ली, शंखाहुली, सालवेल असें म्हणतात ती.

**केसर**, पु० न० (रःरं) पुष्पाचा पराग, पुष्परेणु. २ पु० (रः) उंडिणीचें झाड. ३ बकूळ. ४ नागचाफा. ५ नागकेशर ६ हिंग. ७ सिंहाची आयाळ.

**केसरि**, पु० (रिः) सिंह. २ घोडा. ३ उंडिणीचें झाड. ४ नागकेशर.

**केसरिन्**, पु० (री) सिंह.

**कैटभजित्**, पु० (त्) विष्णु.

**कैटभी**, स्त्री० (भी) पार्वती.

**कैटर्य**, पु० (र्यः) कुम्याचें झाड.

**कैडर्य**, पु० (र्यः) कुम्याचें झाड.

**कैतव**, न० (वं) कपट. २ द्यूत, फांशांचा वगैरे खेळ.

**कैदार**, न० (रं)
**कैदारक**, न० (कं)
**कैदारिक**, न० (कं)
**कैदार्य**, न० (र्यं)
} शेतांचा समूह.

**कैरव**, न० (वं) शुभ्र कमलविशेष. २ कुमुदपुष्प.

**कैरवी**, स्त्री० (वी) चांदणें.

**कैरात**, पु० (तः) बलवान पुरुष.

**कैलास**, पु० (सः) कुबेराचें स्थान. (ह्यास कैलास पर्वत असें म्हणतात.)

**कैवर्त**, पु० (र्तः) मासे मारणारा जातीविशेष ज्यास कोळी असें म्ह० तो, नावाडी.

**कैवर्तमुस्तक**, न० (कं) वनौ० ज्यास जलमुस्ता, क्षुद्रमोथा असें म्ह० तो.

**कैवर्तिमुस्तक**, न० (कं) वनौ० ज्यास जलमुस्ता, नागरमोथा असें म्ह० तो.

**कैवर्तीमुस्तक**, न० (कं) वनौ० ज्यास जलमुस्ता, नागरमोथा असें म्ह० तो.

**कैवल्य**, न० (ल्यं) मुक्ति, मोक्ष.

**कैशिक**, न० (कं) } केशांचा समूह.
**कैश्य**, न० (श्यं) }

**कोक**, पु० (कः) मृग जातीवि०, लांडगा. २ चक्रवाक पक्षि. ३ विष्णु. ४ खजुराचें झाड. ५ बेडूक.

**कोकनद**, पु० न० (दःदं) तांबडें कमळ.

**कोकिल**, पु (लः) कोकीळ. २ निखारा.

**कोकिलाक्ष**, पु० (क्षः) वनौ० ज्यास कोळसुंदा, तालिमखान्याचें बीं, कोलिस्ता असें म्ह० तो.

**कोजागर**, पु० (रः) अश्विनी पूर्णिमा, कोजागर.

**कोट**, पु० (टः) सुपारी.

**कोटर**, न० पु०(रं-रः) वृक्षांस जी ढोल पडलेली असते ती.

**कोटवी**, स्त्री० (वी) नग्न स्त्री.

**कोटि**, स्त्री० (टिः) धनुष्याचें शेवट. २ तरवारीचें वगैरे अग्र, टोंक. ३ उत्कर्ष, प्रकर्ष. ४ संख्यावि०.

**कोटिजित्**, पु० (त्) कालिदास कवी.

**कोटिर**, पु० (रः) मुंगूस. २ इंद्र. ३ काजवा.

**कोटिवर्षा**, स्त्री० (र्षा) वनौ० जीस स्पृक्का, पिंडिका असें म्ह० ती.

**कोटिश**, पु० (शः) डिखळें फोडण्याचा मुद्गर ज्यास कुळव, डिफळा असें म्ह० तो.

**कोटी**, स्त्री० (टी) धनुष्याचें अग्र. २ तरवारीचें वगैरे टोंक. संख्यावि०.

**कोटीर**, पु० (रः) केशजटा.

**कोटीवर्ष**, न० (र्षं) शोणितपूर.

**कोटीश**, पु० (शः) डिखळें फोडण्याचा मुद्गल.

**कोट्ट**, पु० (ट्टः) ज्या शहरासभोंवतें तट, खंदक वगैरे असतात त्यामुळें शत्रूचा प्रवेश होण्यास अवघड असें जें शहर तें.

**कोट्टवी**, स्त्री० (वी) नग्न स्त्री. २ पार्वती.

**कोठार**, पु० (रः) शहरांतील विहीर. २ पुष्करणीचा पाट. ३ पाण्याचा पाट.

**कोठ**, पु० (ठः) कुष्ठरोग, कोड. २ कुष्ठवि० ज्यास गजकर्ण असें म्ह० तें असेंही कोणाचें मत आहे.

**कोण**, पु० (णः) कोपरा. २ तरवारीचें वगैरे अग्र, टोंक. ३ सारंगी वगैरे वाजविण्याचें काष्ठ, कमटी. ४ दांडा.

**कोणप**, पु० (पः) राक्षस.

**कोथ**, पु० (थः) नेत्ररोगवि०.

**कोदंड**, न० (डं) धनुष्य. २ पु० (डः) देशवि०.

**कोद्रव**, पु० (वः) धान्य वि० ज्यास हरीक असें म्ह० तें.

**कोप**, पु० (पः) क्रोध राग.

**कोपक्रम**, न० (मं) ब्रम्हदेवाचा उपक्रम म्ह० ब्रम्हदेवानें उत्पन्न केलेला (लोक.) उ० कोपक्रमलोकः

**कोपन**, वि० (नःना-नं) कोपशील, रागीट.

**कोपन्न**, न० वि० (न्नं) ब्रम्हदेवानें प्रथम उत्पन्न केलेली (प्रजा) उ० कोपन्नंप्रजा.

**कोपिन्**, वि० (पी.पिनी.पि) कोपशील, रागीट.

**कोमल**, वि० (लः.ला.लं) कोंवळा. २ मृदु. ३ न० (लं) उदक.

**कोमासिका**, स्त्री० (का) जाळें.

**कोयष्टि**, पु० (ष्टिः) पक्षिविशेष ज्यास कोढापक्षि असें म्हणतात तो.

**कोयष्टिक**, पु० (कः) पक्षिविशेष ज्यास कोढापक्षि असें म्हणतात तो.

**कोरक**, पु० (कः) कळी, कळा. २ भिशें, भिसें. ३ न० (कं) कंकोल, गवला.

**कोरंगी**, स्त्री० (गी) सूक्ष्मएला, लहान इलायची.

**कोरदूष**, पु० (षः) धान्यविशेष ज्यास हर्राक असें म्हणतात तें.

**कोल**, पु० (लः) लहान नौका, होडी, पडाव इत्यादि. २ मांडी. ३ वनौषधि ज्यास चवक. असें म्हणतात ती. ४ ओटा. ५ शनीग्रह. ६ चित्र. ७ न० (लं) बदरीफल, बोर. ८ डुकर.

**कोलक**, न० (कं) कंकोल, गवला. २ मरीच, मिरीं.

**कोलदल**, न० (लं) सुवासिक द्रव्यविशेष ज्यास नखला असें म्हणतात तें,

**कोलपुच्छ**, पु० (छः) कंकपक्षि.

**कोलंबक**, पु० (कः) तारारहीत वीणा.

**कोलवल्ली**, स्त्री० (ल्ली) वनौषधि जीस गजपिंपळी असें म्हणतात ती.

**कोला**, स्त्री० (ला) बोरीचें झाड. २ पिंपळी.

**कोलाहल**, पु० (लः) बहुतांनीं केलेला अस्पष्ट शब्द, कोल्हाळ.

**कोलि**, स्त्री० (लिः) बोरीचें झाड.

**कोली**, स्त्री० (ली) बोरीचें झाड.

**कोविद**, वि० (दः दा. दं) पंडित, विद्वान, ज्ञाता.

**कोविदार**, पु० (रः) कांचनाचें झाड.

**कोश**, पु० न० (शः शं) धनसमूह किंवा जामदारखाना. २ कुड्मल, कळा. ३ तरवारीचें मेण. ४ शपथविशेष. ५ पक्ष्यादिकांचें अंडें, कंवट. ६ जायफळ. ७ सोनें. ८ रुपें. ९ शब्दसंग्रह. १० पात्र, भांडें.

**कोशफल**, न० (लं) कंकोल, गवला.

**कोशातकी**, स्त्री० (की) वनौ० पडवळीची वेल. २ घोसाळी. ३ दोडकी.

**कोशी**, स्त्री० (शी) चरमी जोडा.

**कोष**, न० पु० (षं-षः) पक्ष्यादिकांचें अंडें, कंवट. २ दिव्य, शपथविशेष. ३ शब्दसंग्रह. ४ पात्र, भांडें. ५ धनसमूह किंवा जामदारखाना. ६ कुड्मल, कळा. ७ तरवारीचें मेण. ८ जायफळ.

**कोषज्ञ**, पु० (ज्ञः) अमुक ठिकाणीं ठेव आहे असें सांगणारा.

**कोष्ठ**, पु० (ष्ठः) गृहाभ्यंतर, माजघर. २ अंतर्जठर, कोठा. ३ धान्यागार, कोठी. ४ स्वकीय. ५ चांगला ध्वनी.

**कोष्ण**, वि० (ष्णः.ष्णा ष्णं) किंचित उष्ण.

**कोहल**, पु० (लः) वाद्यवि०. २ नाट्य शास्त्रवक्ता.

**कौकृत्य**, न० (त्यं) अनुताप, पश्चात्तप, पश्चात्ताप. २ करावयास योग्य नाहीं तें कर्म, कुत्सित कर्म.

**कौक्कुटिक**, वि० (कः.का.कं) दूरवर नजर देणारा. २ मायावी, गारुडी, कपटी.

**कौक्कुटिककंदल**, पु० (लः) भुजंग.

**कौंच**, पु० (चः) माल्यवान पर्वत.

**कौंचदारण**, पु० (णः) कार्तिकस्वामी.
**कौटतक्ष**, पु० (क्षः) कोणाचा अंकीत नव्हे असा जो सुतार तो.
**कौटिक**, पु० (कः) खाटीक मांस विक्रय करून उपजीविका करणारा जाति विशेष.
**कौडविक**, वि० (कःका-कं) कुडव परिमित धान्याचें (शेत.)
**कौणप**, पु० (पः) राक्षस.
**कौणपदंत**, पु० (तः) भीष्म.
**कौंतिक**, पु० (कः) भाल्यानें लढणारा, भालेवाला.
**कौंती**, स्त्री० (ती) सुगंधि द्रव्यविशेष ज्याला रेणुबीज असें म्हणतात तें.
**कौतुक**, न० (कं) आश्चिर्य. २ मंगलकार्य. ३ इच्छा. ४ भोग्य. ५ अभिलाष. ६ उत्सव. ७ क्रीडा. ८ हर्ष. ९ परंपरागत शुभकृत्य. १० पु० न० (कःकं) लग्नांतील गाणें. ११ लग्नसूत्र.
**कौतूहल**, न० (लं) आश्चिर्य. २ प्रशस्त.
**कौद्रवीण**, वि० (णःणा-णं) हरीक नामें करून जें धान्य तें उत्पन्न होण्याचें शेत.
**कौपीन**, न० (नं) वस्त्रविशेष, लंगोटी. २ उपस्थ, गुह्य. ३ वि० (नःना-नं) अकार्य, करण्यास अयोग्य.
**कौपोदकी**, स्त्री० (की) विष्णूची गदा.
**कौमुद**, पु० (दः) कार्तिकमास.
**कौमुदी**, स्त्री० (दी) चंद्रिका, चांदणें. २ अश्विनी पूर्णिमा. ३ कार्तिकोत्सव. ४ ग्रंथविशेष.
**कौमुदीवृक्ष**, पु० (क्षः) दीपवृक्ष.
**कौमोदकी**, स्त्री० (की) विष्णूची गदा.
**कौलटिनेय**, पु० (यः) पतिव्रता असून भिक्षा मागणारी जी स्त्री तिचा पुत्र.
**कौलटेय**, पु० (यः) पतिव्रता असून भिक्षा मागणारी जी स्त्री तिचा पुत्र. २ व्यभिचारिणीचा पुत्र.
**कौलटेर**, पु० (रः) व्यभिचारिणी जी स्त्री तिचा पुत्र.
**कौलिक**, पु० (कः) नास्तिक.
**कौलीन**, न० (नं) कुलीनता. २ लोकापवाद. ३ पशु, सर्प, पक्षी ह्यांचें युद्ध. ४ गुह्य. ५ कुकर्म.
**कौलेयक**, पु० (कः) कुत्रा. २ कूलीन.
**कौशलिका**. स्त्री० (का) नजराणा.
**कौशली**, स्त्री० (ली) खुशालीचा प्रश्न. २ आज्ञा.
**कौशल्या** स्त्री० (ल्या) दशरथ राजाची ज्येष्ठ पत्नी, स्त्री.
**कौशल्याजानि**, पु० (निः) रामचंद्र.
**कौशांबी**, स्त्री० (बी) नगर विशेष.
**कौशिक**, पु० (कः) गुग्गुल वृक्ष. २ शृंगार रस. ३ इंद्र. ४ घुबड, घूक, पेंचापक्षि. ५ विश्वामित्र. ६ गारुडी. ७ मुंगूस. ८ अमुक ठिकाणीं ठेव आहे असें सांगणारा.
**कौशिकी**, स्त्री० (की) गौरि. पार्वती. २ चंडिका देवी. ३ नदी विशेष.
**कौशेय**, वि० (यः-या-यं) किड्याचे अपानद्वारापासून निघालेला जो कुड्मलाकार कोश त्यापासून झालेलें वस्त्र, रेशमी वस्त्र.
**कौषीतकी**, स्त्री० (की) अगस्त्यपत्नी.
**कौस्तुभ**, पु० (भः) विष्णूचा मणी.
**कौस्तुभवक्ष**, पु० (क्षः) विष्णु.
**कौक्षेयक**, पु० (कः) तरवार.
**क्रकच**, पु० न० (चःचं) लांकूड वगैरे

चिरण्याचें एक शस्त्र ज्यास करवत असें म्हणतात तें.
**क्रकचच्छद**, पु० (दः) केतक. २ केवडा.
**क्रकचपाद्**, पु० (त्) सरडा.
**क्रकचपृष्ठी**, पु० (ष्ठी) मत्स्यविशेष.
**क्रकर**. पु० (रः) कारवीचें झाड. २ पक्षी विशेष ज्यास करेटु, करक असें म्हणतात तो. ३ दीन. ४ करवत.
**क्रतु**, पु० (तुः) यज्ञ. २ मुनी.
**क्रतुद्विष्**, पु० (ट्) राक्षस.
**क्रतुध्वंसिन्**, पु० (सी) महादेव.
**क्रतुपशु**, पु० (शुः) घोडा.
**क्रतुपुरुष**, पु० (षः) विष्णु.
**क्रतुभुज्**, पु० (क्) देव.
**क्रतूत्तम**, पु० (मः) यज्ञविशेष.
**क्रथन**, न० (नं) वध, ठार मारणें.
**क्रंदन**, न० (नं) युद्धांत योध्यांचा आक्रोशपूर्वक जो शब्द तो. २ रोदन, रडणें.
**क्रंदित**, न० (तं) रोदन, रडणें. २ बोलावणें.
**क्रम**, पु० (मः) अनुक्रम. २ विधि, नियोगशास्त्र. ३ शक्ति. ४ कंप. ५ आक्रमण.
**क्रमुक**, पु० (कः) तांबडा लोध्र वृक्ष. २ पारसा पिंपळ. ३ सुपारीचें झाड, पोफळ. ४ नागरमोया. ५ कापसाच्या झाडाचें फळ, कापसाचें बोंड.
**क्रमेलक**, पु० (कः) उंट.
**क्रयविक्रयिक**, पु० (कः) क्रयविक्रयेंकरून उपजीविका करणारा, उदमी.
**क्रयारोह**, पु० (हः) बाजार.
**क्रयिक**, पु० स्त्री० (कः-की) विकत घेणारा.
**क्रय्य**, वि० (य्यः-य्या-य्यं) विकावयाची वस्तु.
**क्रव्य**, न० (व्यं) मांस.
**क्रव्याद्**, पु० (द्) राक्षस. २ मांस खाणारा.
**क्रव्याद**, पु० (दः) राक्षस.
**क्रायिक**, वि० (कः-का-कं) विकत घेणारा.
**क्रिमि**, पु० (मिः) क्षुद्र कीटविशेष ज्यास घुले, कमुरडा असें म्हणतात तो. २ किडा. ३ लाला, लाख. ४ तीक्ष्ण. ५ जंतुविशेष ज्यास जंत असें म्ह० ते.
**क्रिमिशैल**, पु० (लः) किड्याचें वगैरे वारूळ.
**क्रिया**, स्त्री० (या) चिकित्सा, रोगाची परीक्षा. २ कर्म, क्रिया. ३ आरंभ. ४ निष्कृति. ५ प्रायश्चित. ६ शिक्षा. ७ पूजन. ८ संप्रधारण. ९ विचार. १० उपाय. ११ चेष्टा.
**क्रियाकार**, पु० (रः) नवीन अध्ययन करणारा.
**क्रियावत्**, वि० (वान्-वती-वत्-) कर्माविषयीं जो उद्युक्त तो.
**क्रीडा**, स्त्री० (डा) ज्यांत पुण्यादिक पुरुषार्थ कांहीं नाहीं, केवळ तात्कालिक चित्त रमण्याजोगा जो द्यूतादिकादि व्यापार तो. २ बालकाची लीला.
**क्रीडारत्न**, न० (त्नं) मैथून.
**क्रुञ्च्**, पु० (ङ्) पक्षिविशेष ज्यास ठेंक, कुरकुंचा असें म्हणतात तो.
**क्रुध**, स्त्री० (धू) क्रोध, राग.
**क्रुष्ट**, न० (ष्टं) रडणें. २ शब्द.
**क्रूर**, वि० (रः-रा-रं) दुसऱ्याशीं द्रोह करण्याचा ज्याचा स्वभाव असतो तो. २ कठीण. ३ निर्दय. ४ भयंकर. ५ घातुक. ६ शिजलेला भात.

**क्रूरदृश्**, वि० (क्) दुर्जन. २ पु० (क्) शनैश्चर.

**क्रूरलोचन**, पु० (नः) शनीनामा ग्रह

**क्रेतव्य**, वि० (व्यः-व्या-व्यं) विकत घेण्याची वस्तु.

**क्रेय**, वि० (यः-या-यं) विकत घेण्याची वस्तु.

**क्रोड**, न० स्त्री० (डं-डा) वक्षस्थळ, उर. २ चिन्ह. ३ पु० (डः) डुकर. ४ शनीग्रह. ५ राक्षस.

**क्रोडांघ्रि**, पु० (घ्रिः) कांसव.

**क्रोध**, पु० (धः) राग, क्रोध.

**क्रोधन**, वि० (नः-ना-नं) कोपशील, रागीट.

**क्रोधना** स्त्री० (ना) कोपिष्ट स्त्री.

**क्रोश**, पु० (शः) कोस, दोन हजार दंड.

**क्रोशताल**, पु० (लः) वाद्यविशेष. ज्यास पटह असें म्ह० तें.

**क्रोशध्वनि**, पु० (निः) वाद्यविशेष ज्यास पटह असें म्हणतात तें.

**क्रोष्टृ**, पु० (ष्टाः) कोल्हा.

**क्रोष्टुविन्ना**, स्त्री० (न्ना) वनौषधि जीस डवला, पिटवण असें म्ह० ती.

**क्रोष्ट्री**, स्त्री० (ष्ट्री) पांढरा भुईकोहळा. २ कोल्ही. ३ पिंपळी. ४ वनौषधि जीस जल पिंपळी असें म्ह० ती.

**क्रौंच**, पु० (चः) पक्षिविशेष ज्यास ठेक, कुरकुंचा असें म्हणतात तो. २ माल्यवान पर्वत. ३ न० ( चं ) सप्तद्वीपांतील एक.

**क्रौंचदारण**, पु० (णः) कार्तिकस्वामी.

**क्रौंचादन**, न० (नं) भिसें.

**क्लम**, पु० (मः) ग्लानी.

**क्लमथ**, पु० (थः) ग्लानी.

**क्लिन्न**, वि० (न्नः-न्ना-न्नं) आर्द्र, ओलसर.

**क्लिन्नाक्ष**, वि० ( क्षः-क्षा-क्षं ) ज्याचे डोळे क्लेदयुक्त तो, चिपडा.

**क्लिशित**, वि० (तः-ता-तं) क्लेश पावलेला.

**क्लिष्ट**, वि० (ष्टः-ष्टा-ष्टं) क्लेश पावलेला. २ पूर्वापर विरुद्ध जें बोलणें तें.

**क्लीतक**, न० ( कं ) वनौ० गोडें कोष्ट. २ ज्येष्ठिमध.

**क्लीतकिका**, स्त्री० ( का ) वनौषधि जीस नीली, नीळ असें म्हणतात ती.

**क्लीब**, न० पु० (बं-बः) नपुंसक. २ वि० (बः-बा-बं) पौरुषहीन, पराक्रमहीन.

**क्लेदु**, पु० (दुः) चंद्र.

**क्लेश**, पु० (शः) दुःख विशेष. २ कोप, राग. ३ व्यवसाय.

**क्लोम**, न० ( मं ) मांसपिंडविशेष ज्यास फुफुस असें म्हणतात तो.

**क्वण**, पु० (णः) वीणादिक वाद्यांचा ध्वनि. २ शब्द करणें.

**क्वणन**, न० (नं) वीणादिक वाद्यांचा ध्वनि. २ शब्द करणें.

**क्वथित**, वि० (तः-ता-तं) सकल पक्व, अगदीं कढलेला (काढा वगैरे.)

**क्वाण**, पु० (णः) वीणादिक वाद्यांचा ध्वनी.

**क्वाथ**, पु० (थः) अति दुःख. २ काढा.

## ख.

**ख**, न० (खं) इंद्रिय. २ आकाश. ३ देवलोक. ४ हर्ष. ५ अनुभव. ६ शहर. ७ क्षेत्र. ८ शून्य, बिंदु. ९ कर्म. १० पु० (खः) सामान्य.

**खकुंतल**, पु० (लः) महादेव.

**खक्खट**, वि० (ट:टा-टं) कठीण.
**खग**, पु० (ग:) बाण. २ पक्षि. ३ सूर्य. ४ ग्रह. ५ देव.
**खगेश्वर**, पु० (र:) गरुड.
**खचमस**, पु० (स:) चंद्र.
**खचित**, न० (तं) लिप्त. २ युक्त.
**खज**, वि० (ज:जा-जं) व्याकुळ.
**खंज**, वि० (ज:जा-जं) गतिविकळ, लंगडा.
**खंजक**, पु० (क:) लंगडा.
**खंजखेल**, पु० (ल:) पक्षिविशेष ज्यास ताजवा, दय्यर असें म्हणतात तो.
**खंजन**, पु० (न:) पक्षिविशेष ज्यास ताजवा, दय्यर असें म्ह० तो.
**खंजनरत**, न० (तं) संन्याशाचें मैथुन.
**खंजना**, स्त्री० (ना) मोहरी. २ गति.
**खंजरीट**, पु० (ट:) पक्षिविशेष ज्यास ताजवा, दय्यर असें म्हणतात तो.
**खंजलेख**, पु० (ख:) पक्षि विशेष ज्यास ताजवा, दय्यर असें म्हणतात तो.
**खजा**, स्त्री० (जा) मंथन करण्याचा दंड.
**खंजा**, स्त्री० (जा) छंदभेद.
**खजाका**, स्त्री० (का) पळी.
**खजित**, पु० (त:) बौद्धावतार.
**खट**, पु० (ट:) फार खोल विहीर. २ तृण. ३ कफ. ४ टंक. ५ प्रहार विशेष. ६ दगड फोडण्याचें यंत्र ज्यास टांकी असें म्हणतात ती.
**खट्टाश**, पु० (श:) गेंडा.
**खट्टाशी**, स्त्री० (शी) गेंडी.
**खट्टि**, स्त्री० (ट्टि:) प्रेत नेण्याचा गाडा. २ खडी, पांढरी माती खडयासारखी असते ती.
**खट्टिका**, स्त्री० (का) खाट, बाज.

**खट्वांग**, पु० (ग:) दिलिपराजा.
**खट्वा**, स्त्री० (ट्वा) पलंग. २ बाज.
**खट्वारूढ**, वि० (ढ:ढा-ढं) अविनीत, दांडगा. २ बाजेवर बसलेला.
**खंड**, पु० न० (ड:डं) तुकडा, भाग. २ गूळ. ३ साखर. ४ मण्यादिकांवर जी रेघ असते ती.
**खडक्किका**, स्त्री० (का) घराचें मागील दार.
**खंडपरशु**, पु० (शु:) महादेव.
**खंडपर्शु**, पु० (र्शु:) महादेव. २ परशुराम. ३ सुवासिक उटणें आंगाला लावणारा. ४ राहु नामा ग्रह. ५ औषधिविशेष.
**खंडविकार**, पु० (र:) साखर.
**खंडाभ्र**, न० (भ्रं) अभ्रलेश, किंचित अभ्र. २ दंतक्षतविशेष.
**खड्ग**, पु० (ड्ग:) तरवार. २ गंडशृंग, गेंडा. ३ बुद्धिभेद.
**खड्गट**, पु० (ट:) तृणविशेष.
**खड्गधारा**, स्त्री० (रा) नटी.
**खड्गधेनु** स्त्री० (नु:) मत्स्यविशेष ज्यास गर असें म्हणतात त्याची स्त्री. २ सुरी.
**खड्गपिधान**, न० (नं) तरवारीचें म्यान.
**खड्गारीट**, पु० (ट:) ढाल.
**खड्गिक**, पु० (क:) म्हशीच्या दुधाचा फेस.
**खड्गिन्**, पु० (ड्गी) पूर्वजिन (जैन्न)
**खड्गी**, स्त्री० (ड्गी:) तरवार. २ हलका ध्वनि. ३ पु० (ड्गी) तरवार धरणारा.
**खतमाल**, पु० (ल:) धूर. २ मेघ.
**खदिका**, स्त्री० (का) लाह्या.
**खदिर**, पु० (र:) खैराचें झाड. २ इंद्र. ३ कात.
**खदिरी**, स्त्री० (री) वनौ० जीस लाजाळू असें म्हणतात ती. २ शाकविशेष. ३ पु० (री) खैराचें झाड. २ चंद्र.

**खदूरवासिनी**, स्त्री० (नी) लक्ष्मी.
**खद्योत**, पु० (तः) काजवा. २ सूर्य.
**खनक**, पु० (कः) उंदीर. २ चोर. ३ डुकर. ४ लहान मूल.
**खनि**, स्त्री० (निः) रत्नादिकांची खाण.
**खनित्र**, न० (त्रं) कुद्दाल, कुदळ.
**खनिशाजल**, न० (लं) बर्फ.
**खपुर**, पु० (रः) सुपारीचें झाड, पोफळ. २ न० (रं) उर्ध्वगपूर नगरविशेष.
**खबाष्प**, न० (ष्पं) दंव.
**खभ्रांति**, पु० (तिः) घार.
**खमणि**, पु० (णिः) सूर्य.
**खमूलिका**, स्त्री० (का) जलकुंभी ह्याच नांवानें प्रसिद्ध आहे.
**खर**, पु० (रः) राक्षस. २ तीक्ष्ण. ३ गर्दभ, गाढव. ४ वि० (रःरा-रं) फार उष्ण.
**खरकुटि**, स्त्री० (टिः) न्हाव्याचें घर.
**खरगृह**, न० (हं) गृहविशेष.
**खरग्रह**, पु० (हः) क्रूर ग्रह.
**खरणस्**, वि० (णाःणाःणः) सरळ नाकाचा.
**खरपात्र**, न० (त्रं) लोखंडी पात्र.
**खरपुष्पा**, स्त्री० (ष्पा) शाकविशेष जीस तिळवण, कानफोडी असें म्ह० ती.
**खरमंजरी**, स्त्री० (री) वनौ० आघाड्याचें झाड.
**खरसोद**, पु० (दः) लोखंडी पात्र.
**खरा**, स्त्री० (रा) वृक्षविशेष ज्यास देवताड असें म्हणतात तो.
**खरालिक**, पु० (कः) नापित, न्हावी. २ ब्राम्हण. ३ उशी.
**खरांशु**, पु० (शुः) सूर्य.
**खरांश्वा**, स्त्री० (श्वा) वनौ० जीस मोरशेंडा, अजमोदा असें म्हणतात ती.
**खरु**, पु० (रुः) दांत. २ घोडा. ३ महादेव. ४ दर्प. ५ वि० (रुःरुःरु) पांढरा.
**खर्जु**, स्त्री० (र्जुः) कीटकविशेष. २ खजुराचें झाड. ३ सुरी खरूज, कंडू.
**खर्जुर**, न० (रं) रुपें.
**खर्जू**, स्त्री० (र्जूः) सुरी खरूज.
**खर्जूर**, पु० (रः) खजुराचें झाड. २ खल. ३ विंचू. ४ खजूर. ५ न० (रं) रुपें.
**खर्जूरी**, स्त्री० (री) तृणद्रुमविशेष, खर्जूर वृक्षाचा एक भेद.
**खर्पर**, पु० (रः) चोर. २ धूर्त. ३ भिक्षापात्र. ४ कपाळ.
**खर्पुर**, पु० (रः) नागरमोथा.
**खर्ब**, पु० (र्बः) संख्याविशेष. २ वि० (र्बःर्बा-र्बं) वामनमूर्ति, ठेंगणा. ३ नीच.
**खर्व**, पु० (र्वः) संख्याविशेष. २ वि० (र्वःर्वा-र्वं) वामनमूर्ति, ठेंगणा. ३ नीच.
**खर्वट**, पु० (टः) चतुःशतग्रामसंग्रहस्थान, चारशें गांवांचें संस्थान.
**खल**, वि० (लः ला-लं) दुर्जन, परस्परांत द्वैध आणणारा, दुष्ट. २ नीच. ३ क्रूर. ४ अधम. ५ न० (लं) खळ, आंगण. ६ स्थान. ७ पाप.
**खलति**, पु० (तिः) ज्याचे मस्तकास खल्वाट पडलेलें आहे तो.
**खलपू**, पु० (पूः) संमार्जनादिक करणारा, झाडसारवण करणारा.
**खला**, स्त्री० (ला) पृथ्वी.
**खलिति**, पु० (तिः) ज्याचे मस्तकास टक्कल पडलें आहे तो.
**खलिन**, पु० (नः) कडियाळी, लगाम.
**खलिनी**, स्त्री० (नी) खलांचा समुदाय.

२ वनौ० जीस मुरा, तालिसपत्र असें म्हणतात ती.

खलीन, पु० न० (नः-नं) लगाम.

खलु, अ० निषेध. २ वाक्यालंकार. ३ जिज्ञासा, ४ अनुनय, सांत्वन ह्या अर्थी. उ० खलुरुदित्वा. २ एतत्खल्वाहुः ३ खलुजानासि. ४ देहीखलु वाचकं. ५ पदाचें किंवा वाक्याचें पूरण. ६ वीप्सा. ७ निश्चय.

खलुग्वृत्र, पु० (त्रः) अंधकार.

खलेदारु, न० (रु) पशूंस बांधण्याकरितां पुरलेलें काष्ट ज्यास मेढ असें म्हणतात ती.

खलेशय, पु० (यः) मत्स्यविशेष.

खल्या, स्त्री० (ल्या) खलांचा समुदाय.

खल्ल, पु० (ल्लः) वस्त्रभेद. २ खळगा. ३ कातडें. ४ चातक पक्षि.

खल्लिट, पु० (टः) ज्याचे मस्तकास टक्कल पडलें आहे तो.

खल्ली, स्त्री० (ल्ली) रोगविशेष.

खशायस्थस्क, पु० ब० (स्काः) देशविशेष.

खश्वासा, स्त्री० (सा) वायु.

खष्प, पु० (ष्पः) क्रोध. २ बलात्कार.

खसभ, पु० (भः) बौद्धावतार.

खसर्पण, पु० (णः) बौद्धभेद.

खस्तनी, स्त्री० (नी) पृथ्वी.

खाजिक, पु० (कः) लाह्या.

खाटि, स्त्री० (टिः) खोरें, कुदळ इत्यादिकांचे दांड्याचे अतिसंघर्षणानें हातास जो घट्टा पडतो तो. २ तिरडी.

खात, न० (तं) पुष्करिणी, लहानसरोवर.

खातभू, पु० (भूः) खंदक.

खादित, वि० (तःता-तं) भक्षित, खाल्लेला.

खादुक, पु० (कः) हिंसा करणारा कुत्रा.

खानि, स्त्री० (निः) रत्नादिकांची खाण.

खानोदक, पु० (कः) नारळ.

खार, पु० स्त्री० (रः-री-रि) परिमाणविशेष ज्यास दीडमणी असें म्हणतात ती.

खारीक, वि० (कःका-कं) खारी परिमित धान्याचें (शेत वगैरे.)

खिंखिरा, स्त्री० (रा) भालुविशेष. २ बाजेचा अवयव. ३ कावड.

खिल, वि० (लःला-लं) नांगरलेलें नव्हे असें (शेत वगैरे.) २ न० (लं) संक्षिप्त. ३ ब्रम्हदेव.

खुर, पु० (रः) सुगंधि द्रव्यविशेष ज्यास नखला असें म्हणतात तें. २ अश्वखूर, घोड्याचा खूर.

खुरणम्, वि० (णाः-णाः-णं) भयंकर नाकाचा..

खुरणस, वि० (सःसा-सं) भयंकर नाकाचा.

खुरत्र, पु० (त्रः) बाणविशेष.

खुरलिन्, पु० (ली) शास्त्रविद्या.

खुरली, स्त्री० (ली) शास्त्राभ्यास.

खुलक, वि० (कःका-कं) नीच, पामर, हलका.

खुल्लम, पु० (मः) मार्ग.

खेखीरक, पु० (कः) शब्द होणारी काठी.

खेचर, पु० (रः) देव जाति विशेष.

खेट, पु० (टः) लोखंडाचा मळ, कीट. २ ग्रामभेद. ३ कफ. ४ चर्म, चामडें, ५ वि० (टःटा-टं) अधम, नीच, निंद्य.

खेटक, पु० (कः) खेडेगांव. २ ढाल. ३ व्याजावर उपजीविका करणारा.

**खेय**, न० (यं) खंदक, चर.

**खेला**, स्त्री० (ला) क्रीडा, बाललीला.

**खोड**, वि० ( डःडा-डं ) गतिविकल, लंगडा.

**खोर**, पु० (रः) लंगडा.

**खोलक**, पु० ( कः ) खोल, खोळ. २ वारूळ, भोम. ३ सुपारीचा कळा. ४ वैश्य (जाति वि०.)

**खोल्मुक**, पु० (कः) मंगळ नांवाचा ग्रह.

**ख्यात**, वि० (तःता-तं) प्रख्यात, प्रसिद्ध.

**ख्यातगर्हण**, वि० ( णःणा-णं ) निंदित, निंदिलेला.

**ख्याति**, स्त्री० (तिः) प्रख्याति, प्रसिद्धपणा.

## ग.

**ग**, पु० ( गः ) प्रतिमार्ग. २ गणपति. ३ गंधर्व. ४ न० (गं) गाणें.

**गगन**, न० (नं) आकाश.

**गगनध्वज**, पु० (जः) मेघ.

**गगनोल्मुख**, पु० (खः) मंगळ नांवाचा ग्रह.

**गंगा**, स्त्री० (गा) भागीरथी नदी.

**गंगाचिल्ली**, स्त्री० (ल्ली) पक्षिविशेष.

**गंगाधर**, पु० (रः) महादेव. २ समुद्र.

**गंगोल**, पु० (लः) रत्नविशेष.

**गच्छ**, पु० (छः) वृक्ष. अ० जा,गमन कर ह्या अर्थी.

**गज**, पु० (जः) हत्ती. २ मान. ३ स्थान विशेष. ४ कवठांतील किडा.

**गंज**, पु० (जः) अवगणना. २ पु० न० (जःजं) शिलेखाना. ३ गोठा.

**गजढक्का**, स्त्री० (क्का) वाद्यविशेष, हत्तीवरची नौबत.

**गजता**, स्त्री० (ता) गजांचा समूह.

**गजबंधनी**, स्त्री० (नी) हत्ती बांधण्याचा खांब.

**गजभक्षा**, स्त्री० (क्षा) वनौ० जीस सालई असें म्हणतात ती.

**गजभक्ष्या**, स्त्री० (क्ष्या) वनौ० जीस सालई असें म्हणतात ती.

**गजमंडन**, न० (नं) हत्तीचा शृंगार.

**गजमाचल**, पु० (लः) सिंह.

**गंजा**, स्त्री० (जा) क्षारसमुद्र. २ मद्यस्थान, दारूचें दुकान. ३ खाण.

**गजानन**, पु० (नः) गणपति.

**गजारि**, पु० (रिः) महादेव.

**गजाव्हह**, न० (व्हं) हस्तनापूर.

**गजाव्हा**, स्त्री० (व्हा) वनौषधिविशेष.

**गड**, पु० (डः) मत्स्यविशेष. २ विघ्न.

**गंड**, पु० (डः) गेंडा. २ ग्रह योगभेद. ३ फोड, पुळी. ४ मार्गाचें अंग. ५ चिन्ह. ६ वीर, योद्धा. ७ गाल. ८ घोड्याचा अलंकार. ९ बुडबुडा (पाण्याचा वगैरे) १० नेत्र आणि गाल ह्यांचा मध्यभाग.

**गंडक**, पु० (कः) मत्स्यविशेष ज्यास गर असें म्हणतात तो. २ संख्याविशेष. ३ तरवार. ४ विघ्न. ५ विद्याविशेष.

**गंडकारी**, स्त्री० (री) वनौ० जीस लजाळू असें म्हणतात ती.

**गंडकाली**, स्त्री० (ली) वनौ० जीस लजाळू असें म्हणतात ती.

**गंडकी**, स्त्री० (की) नदीविशेष.

**गंडकुसुम**, पु० (मः) मस्त हत्ती.

**गंडकूप** पु० (पः) पर्वताचें शिखर.

**गंडशैल**, पु० (लः) ललाट. २ पर्वतापासून घसरलेला मोठा दगड.

**गंडीर**, पु० (रः) कडवा सुरण.

**गडु**, पु० (डुः) गलगंड, गळ्याचा हरडा. २ पृष्ठगुड, पाठीचा मणका. ३ जलचरविशेष. ४ वि० (डुःडुःडु) कुबडा.

**गडुल**, वि० (लःला-लं) कुबडा.

**गंडूपद**, पु० (दः) जलचरविशेष ज्यास, काडू, दानवार, गांडोळ असें म्ह० तें.

**गंडूपदी**, स्त्री० (दी) लहान काडूं.

**गंडूष**, पु० (षः) गजहस्तांगुलीविशेष. २ प्रसृतिपरिमित.

**गंडूषा**, स्त्री० (षा) उन्नतनाभि, वर आलेली नाभी. २ जलादिकानें केलेलें खपुरण, चूळ.

**गंडोल**, न० (लं) गूळ.

**गण**, पु० (णः) चोर ओंवा, किरमाणी ओंवा. २ समूह. ३ तीन गुल्मरू जें सैन्य तें. ४ महादेवाचा सेवक जो प्रमनामा गण तो. ५ संख्या.

**गणक**, पु० (कः) ज्योतिषी. २ जोशी.

**गणचक्रक**, न० (कं) धार्मिकांचें सहभोजन.

**गणनायिका**, स्त्री० (का) पार्वती.

**गणनीय**, वि० (यःया-यं) गणना करण्यास योग्य.

**गणपर्वत**, पु० (तः) कैलास.

**गणरात्र** न० (त्रं) रात्रींचा समुदाय.

**गणरूप**, पु० (पः) वनौ० रुईचें झाड.

**गणहासक**, पु० (कः) चोर ओंवा, किरमाणी ओंवा.

**गणाग्रणी**, पु० (णी) गणपति.

**गणाधिप**, पु० (पः) गणपति.

**गणाधिपति** पु० (तिः) महादेव. २ गणपति.

**गणिका**, स्त्री० (का) पुष्प जातिविशेष, जुई. २ वेश्या, कळवंतीण. ३ हत्तीण.

**गणिकारिका**, स्त्री० (का) नरवेलाचें झाड.

**गणित**, वि० (तः-ता-तं) गणना केलेला.

**गणेरू**, पु० (रुः) पांगाऱ्याचें झाड. २ स्त्री० (रुः) हत्तीण. ३ वेश्या.

**गणेरुका**, स्त्री० (का) कुंटण.

**गणेय**, वि० (यःया-यं) गणना करण्यास योग्य.

**गणेश**, पु० (शः) महादेव. २ गणपति.

**गणोत्साह**, पु० (हः) मत्स्यविशेष.

**गत**, न० (तं) गेलेलें. २ मारलेलें.

**गति**, स्त्री० (तिः) मार्ग. २ ज्ञान. ३ उपाय. ४ गमन, जाणें.

**गंतु**, पु० (तुः) पांथस्थ.

**गंत्री**, स्त्री० (त्री) बैलाची गाडी.

**गंत्रीरथ**, पु० (थः) गाडा, खांचर.

**गद**, पु० (दः) रोग. २ विष्णुचा गद नामा बंधु.

**गदयित्नु**, पु० (त्नुः) मदन. २ बहुत अवाच्य भाषण करणारा. ३ कामुक.

**गदा**, स्त्री० (दा) आयुध, गदा.

**गदागद**, पु० द्वि. (दौ) देवांचे वैद्य.

**गदाग्रज**, पु० (जः) विष्णु.

**गदांबर**, पु० (रः) मेघ.

**गदाह्वय**, न० (यं) कडुकोष्ठ.

**गदी**, पु० (दी) विष्णु. २ रोगी.

**गद्गदध्वनि**, पु० (निः) गहिंवरयुक्त भाषण.

**गद्य**, न० (द्यं) शास्त्रोक्त छंद नसोन केवळ पदसमूहात्मक जें काव्य तें.

**गंध**, पु० (धः) सुगंध. २ हर्ष. ३ लेश. ४ संबंध. ५ गर्व. ६ बल.

**गंधक**, पु० (कः) खारविशेष, गंधक.

**गंधकाष्ठ**, न० (ष्ठं) अगरु लांकूड.

**गंधकुटी**, स्त्री० (टी) वनौ० जीस मुरा, तालीसपत्र, मोरमांशी असें म्ह० ती.

**गंधचेलिका**, स्त्री० (का) कस्तुरी.

**गंधन**, न० (नं) उत्साह. २ हिंसाकर्म. ३ सूचन, सुचविणें. ४ उघड करणें.

**गंधनकुल**, पु० (लः) चिचुंद्री.

**गंधनाकुली**, स्त्री० (ली) वनौ० जीस मुंगशी, मुंगुसवेल असें म्ह० ती.

**गंधनाली**, स्त्री० (ली) नाक.

**गंधपलाशिका**, स्त्री० (का) वनौषधि वि०.

**गंधपिशाचिका**, स्त्री० (का) धूप.

**गंधफली**, स्त्री० (ली) वनौ जीस प्रियंगु वृक्ष, वाघांटी असें म्ह० ती. २ सोनचाफ्याची कळी.

**गंधमादन**, पु० (नः) पर्वतवि० २ भ्रमर. ३ गंधक. ४ वानर वि०.

**गंधमादना**, स्त्री० (ना) दारू, मद्य.

**गंधमादनी**, स्त्री० (नी) दारू, मद्य.

**गंधमुकी**, स्त्री० (खी) चिचुंद्री.

**गंधमूली**, स्त्री० (ली) वनौ० जीस कापूर कचरी, आंबेहळद असें म्ह० ती.

**गंधमूषिक**, पु० (कः) चिचुंद्री.

**गंधमैथुन**, पु० (नः) बैल.

**गंधरस**, पु० (सः) बोळ, रक्तयाबोळ.

**गंधर्ब**, पु० (र्बः) **गंधर्व** शब्द पहा.

**गंधर्व**, पु० (र्वः) कस्तुरीमृग. २ तुंबुरु प्रभृति जे देवांचे गवई ते. ३ घोडा. ४ जन्ममरणामध्यें असलेला प्राणी. ५ कोकिलांतील पुरुष जातीचा. ६ सामान्य गवई.

**गंधर्वहस्त**, पु० (स्तः) एरंडाचें झाड.

**गंधर्वहस्तक**, पु० (कः) एरंडाचें झाड.

**गंधवती**, स्त्री० (ती) पृथ्वी. २ नगरीवि०. ३ व्यासमाता. ४ दारू, मद्य.

**गंधवह**, पु० (हः) वायु, वारा.

**गंधवहा**, स्त्री० (हा) नासिका, नाक.

**गंधवाह**, पु० (हः) वायु, वारा.

**गंधवाहा**, स्त्री० (हा) नासिका, नाक.

**गंधशेखर**, पु० (रः) कस्तुरी.

**गंधसार**, पु० (रः) मलयागरु, मैलागिरी चंदन.

**गंधसोम**, न० (मं) कुमुदपुष्प. २ पांढरें कमळ.

**गंधाखु**, पु० (खुः) चिचुंद्री.

**गंधाश्मन्**, पु० (श्मा) गंधक.

**गंधिक**, पु० (कः) गंधक.

**गंधिनी**, स्त्री० (नी) वनौ० जीस मुरा, तालीसपत्र, मोरमांशी असें म्ह० ती.

**गंधोत्तमा**, स्त्री० (मा) मद्य.

**गंधोली**, स्त्री० (ली) गांधीण माशी. २ छाटी.

**गभस्ति**, पु० (स्तिः) किरण. २ सूर्य. ३ स्त्री० (स्तिः) अग्नीची स्त्री.

**गभस्तिहस्त**, पु० (स्तः) सूर्य.

**गंभारी**, स्त्री० (री) शिवणीचें झाड.

**गंभिरवेदि**, पु० (दिः) अंकुश मारणारा, महात.

**गंभीर** वि० (रःरा-रं) गंभीर, खोल.

**गभीर**, वि० (रःरा-रं) खोल, गंभीर.

**गभोलिक**, पु० (कः) मोठी मसूर.

**गम**, पु० (मः) प्रयाण, जाणें. २ गती.

**गमकरित्व**, न० (त्वं) वेग.

**गमन**, न० (नं) प्रयाण, जाणें.

**गम्य**, वि० (म्यःम्या-म्यं) प्राप्त व्हावयास योग्य.

**गय**, पु० (यः) पशुविशेष. २ गय. नामा राजा.

**गया**, स्त्री० (या) गया क्षेत्र.

**गर**, पु० (रः) करणविशेष (बव, बालवादिकांतील)

**गरल**, न० (लं) विष, गरळ. २ परिमाण. ३ गवताची पेंढी.

**गरहन्**, पु० (हा) वृक्षविशेष.

**गरागरी**, स्त्री० (री) वनौ० जीस देवताली, देवडंगरी असें म्हणतात ती.

**गरिष्ठ**, वि० (ष्ठः ष्ठा-ष्ठं) अतिशय गुरु, फार मोठा.

**गरी**, स्त्री० (री) वनौ० जीस देवताली, देवडंगरी असें म्हणतात ती. २ वनौ० जीस अतिविषा, अतिविख असें म्हणतात ती.

**गरुड**, पु० (डः) विष्णूचें वाहान जो गरुड नामा पक्षि तो.

**गरुडध्वज**, पु० [जः] विष्णु.

**गरुडाग्रज**, पु० (जः) अरुण नावाचा जो सूर्याचा सारथी तो.

**गरुत्**, पु० (त्) पक्ष, पंख, पीस.

**गरुत्मत्**, (पु० त्मान्) गरुडपक्षि. २सामान्य पक्षि.

**गरुयोधी**, स्त्री० (धी) पक्षिविशेष.

**गर्गर**, पु० (रः) मत्स्य विशेष.

**गर्गरी**, स्त्री० (री) ज्या भांड्यांत रवीनें दही घुसळतात तें भांडें. २ कळशी.

**गर्गाट**, पु० (टः) मत्स्यविशेष.

**गर्जन**, न० (नं) शब्द. २ कोप, राग.

**गर्जित**, न० (तं) मेघांची गर्जना. २ पु० (तः) मदोन्मत्त हत्ती.

**गर्त**, पु० (र्तः) छिद्र, खळगा. २ त्रिगर्तनामक राजे.

**गर्दभ**, पु० (भः) गाढव. २ गंधविशेष. ३ न० (भं) पांढरें कमळ.

**गर्दभांड**, पु० (डः) वृक्षविशेष ज्यास लाखी पिंपरी, गजहंड असें म्हणतात तो.

**गर्दभी**, स्त्री० (भी) गाढवीण. २ क्षुद्रजंतु विशेष. ३ रोगविशेष.

**गर्द्धन**, त्रि० (नः ना- नं) आकांक्षाशील.

**गर्ब**, पु० (र्बः) अहंकार.

**गर्भ**, पु० (र्भः) कुक्षिस्थप्राणी. २ अर्भक, बालक. ३ कुक्षि जठर. ४ संधि. ५ फणसाचा कांटा.

**गर्भक**, पु० (कः) केशामध्यें धारण केलेली माळ.

**गर्भंड**, पु० (डः) नाभिरोग.

**गर्भागार**, न० (रं) गृहमध्यभाग, माजघर.

**गर्भाशय**, पु० (यः) ज्या चर्मानें जठरामध्यें गर्भ वेष्टित असतो तें चर्म.

**गर्भाष्टम**, पु० (मः) गर्भाचा आठवा मास, महिना.

**गर्भिणी**, स्त्री० (णी) गरोदर स्त्री.

**गर्भिण्यवेक्षण**, न० (णं) गर्भिणी अवस्था.

**गर्मुत्**, पु० (त्) तृणधान्यविशेष.

**गर्म्युत्**, पु० (त्) तृणधान्यविशेष. २सुवर्ण. ३ लता, वेल.

**गर्व**, पु० (र्वः) अहंकार.

**गर्वाट**, पु० (टः) द्वारपाळ.

**गर्हण**, न० (णं) निंदा.

**गर्ह्य**, त्रि० (र्ह्यः र्ह्या- र्ह्यं) निकृष्ट, निंद्य.

**गर्ह्यवादिन्**, वि० (दी-दिनी-दि) कुत्सित भाषण करणारा.

**गल**, पु० (लः) ग्रीवाग्रभाग ज्यास गोकनळी, गोकटी, नरडी असें म्हणतात ती. २ मोठा लवा, मोठा मोळ. ३ राळ. ४ धूप.

**गलकंबल**, पु० (लः) गोजातीयांचे कंठाचे ठायीं लोंबणारें चर्म ज्यास साकळी, कांबल असें म्हणतात तें.

**गलंतिका**, स्त्री० (का) गळती, रोवळी.

**गलमेखला**, स्त्री० (ला) गळसरी.

**गलव्रत**, पु० (तः) तित्तिरपक्षि.

**गलित**, वि० (तः ता- तं) च्युत, गळलेला.

**गलेगंड**, पु० (डः) गलेगंड पक्षि वि०.

**गल्या**, स्त्री० (ल्या) मोठे मोळांचा समूह.

**गल्वर्क**, पु० (र्कः) इंद्रनील मणी.

**गवय**, पु० (यः) गवा ह्या नावानें प्रसिद्ध जो मृग विशेष तो, गवापशू.

**गवल**, न० (लं) माहिषशृंग, गव्याचें शिंग.

**गवादनी**, स्त्री० (नी) मोठ्या कंवडळीचें झाड. २ गायींस पुष्कळ चरण्याजोगें रान.

**गवालुक**, पु० (कः) गवापशु.

**गवाक्ष**, पु० (क्षः) झरोका. २ वानर.

**गवाक्षी**, स्त्री० (क्षी) वनौ० जीस कंवडळ असें म्हणतात ती.

**गवी**, स्त्री० (वी) दूध काढण्याचें भांडें, चरवी.

**गवीन**, वि० (नः ना- नं) पूर्वीं जेथें गाई असत तें स्थान.

**गवीश्वर**, पु० (रः) गाईचा धनी.

**गवेडु**, स्त्री० (डुः) ऋषींचें भक्ष्य तृण धान्यविशेष ज्यास कसईचें बीं, कसाड, कसा असें म्हणतात तें.

**गवेडुका**, स्त्री० (का) ऋषींचें भक्ष्य तृण धान्यविशेष ज्यास कसईचें बीं, कसाड, कसा असें म्हणतात तें.

**गवेधु**, स्त्री० (धुः) ऋषींचें भक्ष्य तृण धान्यविशेष ज्यास कसईचें बीं, कसाड, कसा असें म्हणतात तें.

**गवेधुका**, स्त्री० (का) ऋषींचें भक्ष्य तृण धान्यविशेष ज्यास कसईचें बीं, कसाड, कसा असें म्हणतात तें.

**गवेरुक**, न० (कं) धातुविशेष.

**गवेशण**, न० (णं) शोध करणें, शोधणें.

**गवेशणा**, स्त्री० (णा) धर्मादिकांचा शोध करणें.

**गवेषित**, वि० (तः ता- तं) शोधलेला.

**गव्य**, वि० (व्यः व्या- व्यं) गाईचें शेण मूत, दूध इत्यादि. २ गाईला हितकारक (पदार्थ.)

**गव्या**, स्त्री० (व्या) गाईंचा समूह.

**गव्युति**, स्त्री० (तिः) दोन कोस.

**गव्यूत**, न० (तं) दोन कोस.

**गव्यूति**, स्त्री० (तिः) दोन कोस.

**गहन**, वि० (नःना-नं) दुरधिगम, दुःप्रवेश. २ न० (नं) अरण्य. ३ दुःख. ४ नवीन केलेली नव्हे अशी जी पर्वताचे ठायीं गुहा असते ती.

**गव्हर**, न० (रं) नवीन केलेली नव्हे अशी जी पर्वताच्येठायीं गुहा असते ती. २ दंभ. ३ निकुंज. ४ अरण्य.

**गा**, स्त्री० (गा) श्लोक. २ इतिहास, गाथा. ३ पृथ्वी.

**गांग**, पु० (गः) भीष्म. २ कार्तिकस्वामी. ३ वि० (गःगा-गं) गंगेपासून उत्पन्न झालेला (पदार्थ वगैरे).

**गांगायनि**, पु० (निः) भीष्म.
**गांगेय**, पु० (यः) भीष्म. २ कार्तिकस्वामी. ३ न० (यं) सुवर्ण, सोनें. ४ पाठीचा कणा.
**गांगेरुकी**, स्त्री० (की) वनौ० जीस लहान चिकणा असें म्हणतात ती.
**गाडव**, पु० (वः) मेघ.
**गांडिव**, न० पु० (वं-वः) अर्जुनाचें धनुष्य.
**गांडीव**, न० पु० (वं-वः) अर्जुनाचें धनुष्य.
**गांडीविन्**, पु० (वी) अर्जुन.
**गाढ**, अ० अत्यंत, अतिशय ह्या अर्थी उ० गाढं निद्रितः
**गाढमुष्टि**, पु० (ष्टिः) तरवार. २ वि० (ष्टिः ष्टिः ष्टि) कृपण.
**गाणिक्य**, न० (क्यं) वेश्यांचा समुदाय.
**गातु**, पु० (तुः) कोकीळ. २ भ्रमर. ३ गंधर्व. ४ क्रोध.
**गात्र**, न० (त्रं) देह, शरीर. २ हत्तीचा पुढचा जंघादि प्रदेश. ३ शरीराचा अवयव. ४ प्रतिमार्ग.
**गात्रानुलेपनी**, स्त्री० ( नी ) शरीरास लेप काढण्यास योग्य जें दळलेलें किंवा उगाळलेलें सुगंधि द्रव्य ज्यास उटणें असें म्हणतात तें.
**गांत्री**, स्त्री० (त्री) गाडी.
**गाथक**, पु० (कः) गाणारा.
**गाथा**, स्त्री० ( था ) श्लोक. २ पूर्वी झालेल्या कथा, गोष्टी.
**गादिनीसूत**, पु० (तः) भीष्म.
**गांध**, पु० (धः) स्नान. २ इच्छा.
**गांधार**, पु० (रः) गायनाच्या सात सुरांतील एक सूर. २ देवविशेष. ३ शेंदूर. ४ रणभूमि. ५ न० (रं) रक्तयाबोळ.
**गांधारेय**, पु० (यः) दुर्योधन.
**गांधिक**, पु० ( कः ) लेखक. २ सुगंधि पदार्थ.
**गाधिज**, पु० (जः) विश्वामित्र.
**गांधिनी**, स्त्री० (नी) गंगानदी.
**गांधिनीसुत**, पु० (तः) भीष्म.
**गाधेय**, पु० (यः) विश्वामित्र ऋषी.
**गान**, न० (नं) गायन. २ गाणें.
**गायत्री**, स्त्री० (त्री) देवमंत्रविशेष, महामंत्र. २ छंदविशेष. ३ खदिर वृक्ष, खैराचें झाड.
**गायन**, पु० (नः) गाणारा, गवई.
**गारुड**, न० ( डं ) विषमंत्र. २ रत्नविशेष ज्याला पाच असें म्हणतात तें.
**गारुत्मत**, न० (तं) रत्नविशेष ज्यास पाच असें म्हणतात तें.
**गार्गक**, न० (कं) गर्गाचे अपत्यांचा समुदाय.
**गार्भिण्य**, न० (ण्यं) गार्भिणींचा समुदाय.
**गार्हपत्य**, पु० (त्यः) अग्निविशेष.
**गालव**, पु० (वः) लोध्रवृक्ष. २ गालवनामा ऋषि.
**गिर**, स्त्री० ( गीः ) भाषा. २ सरस्वती, वाणी.
**गिरा**, स्त्री० (रा) सरस्वती, वाणी. २ पूर्वपक्ष.
**गिरि**, पु० (रिः) पर्वत. २ निगरण, गिळणें. ३ वि० (रिः रिः रि) पूजा करावयास योग्य.
**गिरिकंटक**, पु० (कः) वज्र.
**गिरिकर्णिका**, स्त्री० (का) पृथ्वी.
**गिरिकर्णी**, स्त्री० (र्णी) वनौ० जीस विष्णुक्रांता असें म्हणतात ती.
**गिरिका**, स्त्री० (का) लहान एक उंदिराची जात आहे.
**गिरिज**, न० (जं) अभ्रक. २ शिलाजित.

३ पर्वतापासून झालेला (पदार्थ वगैरे.) ४ लोखंड.

**गिरिजा**, स्त्री० (जा) गौरी, पार्वती. २ महाळुंगीचें झाड.

**गिरिजामल**, न० (लं) अभ्रक.

**गिरिमल्लिका**, स्त्री० (का) कुडयाचें झाड.

**गिरिमृत्**, स्त्री० (त्) धातुविशेष.

**गिरिश**, पु० (शः) महादेव.

**गिरिसार**, पु० (रः) लोखंड. २ मलयपर्वत. ३ कथील.

**गिरीश**, पु० (शः) महादेव. २ देवांचा गुरु जो बृहस्पति तो. ३ पर्वतामधील श्रेष्ठ पर्वत.

**गिलित**, वि० (तःता तं) खादित, खाल्लेलें, भक्षण केलेलें.

**गीत**, न० (तं) गायन. २ वि० (तःता-तं) गायलेलें.

**गीति**, स्त्री० (तिः) छंदविशेष. २ गाणें. ३ गवळयांच्या मुलांचें गाणें.

**गीर्ण**, वि० (र्णःर्णा-र्णं) स्तवलेला.

**गीर्णि**, स्त्री० (र्णिः) निगरण, गिळणें.

**गीर्बाण**, पु० (णः) देव.

**गीर्वाण**, पु० [णः] देव.

**गीष्पति**, पु० (तिः) बृहस्पतिनामा जो देवांचा गुरु तो.

**गुग्गुल**, पु० (लः) गुग्गुल वृक्ष.

**गुच्छ**, पु० (छः) बत्तीस सरांचा मुक्ताहार. २ स्तबक, झुबका; ३ ज्या वृक्षास लांब कांडे नाहीं मुळासच फांद्या फुटलेल्या असतात तो वृक्ष, खुरटें झाड. ४ अलंकार. ५ वनौ० जीस गंठिवन, भटोरा असें म्हणतात ती. ६ फुलांचा घोंस.

**गुच्छक**, पु० (कः) कुड्मलयुक्त पल्लव, घोंस, झुबका.

**गुच्छार्ध**, पु० (र्धः) चोवीस सरांचा मुक्तहार.

**गुंजा**, स्त्री० (जा) गुंज. २ विचार. ३ वाद्यविशेष. ४ हलका ध्वनि. ५ चिंचेचा एक भेद. ६ मधुरध्वनि. ७ गांजा.

**गुंठित**, वि० (तःता-तं) धूलिलिप्त, धूळ लागलेला. २ गुंडाळलेला.

**गुड**, पु० (डः) नवरा मेला असतां जार पुरुषापासून उत्पन्न जो पुत्र तो. २ इक्षुविकार, गूळ. ३ हत्तीचा शब्द.

**गुंडक**, पु० (कः) मलीन. २ धूळ.

**गुडदारु**, पु० (रुः) ऊंस.

**गुडपुष्प**, पु० (ष्पः) मोहावृक्ष, मोहाचें झाड.

**गुडफल**, पु० (लः) अक्रोडाचें झाड.

**गुडशर्करा**, स्त्री० (रा) गुळीसाखर.

**गुडा**, स्त्री० (डा) वनौ० शेर, निवडुंग. २ गुळवेल.

**गुडाकेश**, पु० (शः) महादेव. २ अर्जुन.

**गुडी**, स्त्री० (डी) वनौ० शेर, निवडुंग. २ गुळवेल.

**गुडुची**, स्त्री० (ची) गुळवेल.

**गुडूची**, स्त्री० (ची) गुळवेल.

**गुण**, पु० (णः) सैपाकी, आचारी. २ धनुष्याची दोरी. ३ रूप, रस, गंधादि *चोवीस गुण. ४ सत्व, रज, तम हे प्रत्येक. ५ शौर्य चातुर्यादिक. ६ संधि

* रूप. २ रस. ३ गंध. ४ स्पर्श. ५ संख्या. ६ परिमाण. ७ पृथक्त्व. ८ संयोग. ९ विभाग. १० परत्व. ११ अपरत्व. १२ गुरुत्व. १३ द्रवत्व. १४ स्नेह. १५ शब्द. १६ बुद्धि. १७ सुख. १८ दुःख. १९ इच्छा. २० द्वेष. २१ प्रयत्न. २२ धर्म. २३ अधर्म. २४ संस्कार.

विग्रहादिक ‡ सहा गुण. ७ अप्रधान, विशेषण. ८ इंद्रिय. ९ त्याग, दान. १० आवृत्ति. ११ रज्जु, दोरी, सूत. १२ शुक्लनीलादिक.

**गुणकार**, पु० (रः) भीमसेन.

**गुणनिका**, स्त्री० (का) नृत्य. २ शून्य. ३ गुंडिका (अध्याय वगैरे तोंड पाठ करण्याकरितां करितात ती.)

**गुणनीय** पु० (यः) अभ्यास.

**गुणवृक्षक**, पु० (कः) गलबत, मचवा इत्यादिकांतील मध्यस्तंभ, डोलकाठी.

**गुणसागर**, पु० (रः) बौद्धभेद.

**गुणित**, वि० (तःता-तं) गुणलेला. २ न० (तं) योग्य.

**गुणिन्**, पु० (णी) धनुष्य.

**गुणिनी**, स्त्री० (नी) पाठ (अध्ययन संबंधी.)

**गुत्सक**, न० (कं) चवरी.

**गुद**, न० (दं) विष्ठानिर्गमद्वार, अपानद्वार.

**गुंद्र**, पु० (द्रः) तृणविशेष. २ नागरमोया. ३ प्रियंगुवृक्ष ज्यास वाघांटी असें म्हणतात ती.

**गुंद्रा**, स्त्री० (द्रा) प्रियंगुवृक्ष ज्यास वाघांटी असें म्हणतात ती. २ नागरमोया.

**गुप्त**, वि० (प्तःप्ता-प्तं) गोपनयुक्त, गूढ. २ रक्षित, रक्षण केलेला.

**गुप्तचर**, पु० (रः) बलराम.

**गुप्ति**, स्त्री० (प्तिः) रक्षण, राखणें. २ भूमिविवर, भुयार. ३ कारागृह, बंदिखाना.

**गुंफ**, पु० (फः) गुंफन, गुंफणें. २ बाहुभूषण.

‡ संधि. २ विग्रह. ३ यान. ४ आसन. ५ द्वैध, ६ आश्रय. हे सहा गुण.

**गुफित**, वि० (तःता-तं) गुंफलेला.

**गुंफित**, वि० (तःता-तं) गुंफलेला.

**गुरण**, न० (णं) उद्योग करणें.

**गुरु**, पु० (रुः) बृहस्पति. २ पुंसवनादि कर्म कर्ता जो पित्रादि तो. ३ बाण. ४ वेदशास्त्र पढविणारा. ५ महादेव. ६ द्रोण. ७ वि० (रुःरुःरु) महान. ८ अलघु.

**गुरुगुंडित**, न० (तं) लिप्त. २ युक्त.

**गुरुंडक**, पु० (कः) तिलमयूर.

**गुरुपत्रिका**, स्त्री० (का) शिशपा वृक्षविशेष.

**गुर्विणी**, स्त्री० (णी) गर्भिणी स्त्री.

**गुल**, पु० (लः) गूळ.

**गुला**, स्त्री० (ला) वनौ० जीस शेर, निवडुंग असें म्हणतात ती.

**गुली**, स्त्री० (ली) रोगविशेष.

**गुलुंच**, पु० (चः) घोस, झुबका.

**गुलुछ**, पु० (छः) फुलांचा घोस.

**गुल्फ**, पु० (ल्फः) पादपार्श्वस्थ ग्रंथिविशेष ज्यास पायाचा घोंटा असें म्हणतात तो.

**गुल्म**, पु० (ल्मः) ज्या वृक्षाचें कांडें लांब नाहीं मुळासच फांद्या फुटलेल्या असतात तो वृक्ष, खुरटें झाड. २ वामकुक्षिस्थ मांस पिंडविशेष. ३ तीन सेना मुखें. ४ रोगविशेष. ५ दर्भादिकांचें बेट. ६ सैन्य. ७ सैन्याचें रक्षण.

**गुल्मा**, स्त्री० (ल्मा) आंवळीचें झाड.

**गुल्मिनी**, स्त्री० (नी) विस्तृत लता, पसरलेली वेल.

**गुवाक**, पु० (कः) सुपारीचें झाड, पोफळ.

**गुह**, पु० (हः) कार्तिकस्वामी. २ कोळी, नावाडी.

**गुहा**, स्त्री० (हा) अकृत्रिम जें पर्वतादिकांचे ठायीं विवर असतें ती. २ वनौषधि जीस डवला, पिठवण असें म्हणतात ती. ३ दरी, खळगा.

**गुहिन**, न० (नं) अरण्य.

**गुह्य**, न० (ह्यं) रहस्य, गोप्य. २ उपस्थ, शिश्न व योनी. ३ गुदद्वार. ४ ग्रंथभेद. ५ मूळ राजधानी एक असोन दुसरें जें राजाचें शहर तें. ६ पु० (ह्यः) महादेव. ७ कांसव. ८ कपट. ९ घराचे ठिकाणीं आसक्त जो मृगादि तो.

**गुह्यक**, पु० (कः) यक्ष, जमीनींत ठेवलेला विषय रक्षण करणारा जातिविशेष.

**गुह्यकेश्वर**, पु० (रः) कुबेर.

**गूढ**. वि० (ढः ढा- ढं) गुप्त. २ न० (ढं) एकांत. ३वेष्टित.

**गूढपात्**, पु० (त्) सर्प.

**गूढपुरुष**, पु० (षः) चार पुरुष, बातमीदार.

**गूढमैथुन**, पु० (नः) कावळा.

**गूढवर्चस्**, पु० (र्चाः) बेडूक.

**गूथ**, न० पु० (थं- थः) विष्ठा.

**गून**, न० (नं) अपानद्वारानें टाकलेला मळ.

**गूरण**, न० (णं) उद्योग करणें.

**गूवाक**, पु० (कः) सुपारीचें झाड, पोफळ.

**गृंजन**, पु० (नः) लसूण. २ न० (नं) विषयुक्त बाणानें मारलेल्या पशूचें मांस.

**गृध्नु**, वि० (ध्नुः ध्नुः ध्नु) आकांक्षाशील.

**गृध्नुता**, स्त्री० (ता) शंका घेणारा.

**गृध्र**, पु० (ध्रः) पक्षिविशेष ज्यास गीध, गिधाडा असें म्हणतात तो. २ कावळा. ३ लोभी.

**गृध्रनखी**, स्त्री० (खी) बोरीचें झाड.

**गृध्रसी**, स्त्री० (सी) वातरोगविशेष (हा ऊरूंच्या संधीचे ठायीं होतो.)

**गृष्टि**, स्त्री० (ष्टिः) एकदां व्यायलेली गाय. २ वनौषधि जीस वाराहीकंद, डुकरकंद असें म्हणतात ती. ३ बोरीचें फळ, बोर. ४ पु० (ष्टिः) डुकर.

**गृह**, न० (हं) घर. २ पु० नित्य ब० (हाः) स्त्री, बायको.

**गृहकच्छप**, पु० (पः) जातें.

**गृहकपोतक**, पु० (कः) पारवापक्षि.

**गृहगोधा**, स्त्री० (धा) पाल.

**गृहगोधिका**, स्त्री० (का) पाल.

**गृहगोलिका**, स्त्री० (का) पाल.

**गृहतटी**, स्त्री० (टी) मार्ग.

**गृहनीड**, पु० (डः) चिमणी म्हणून जो लहान पक्षि तो.

**गृहपति**, पु० (तिः) घराचा यजमान, घरधनी. २ गृहस्थ. ३ मंत्री.

**गृहपोतक**, पु० (कः) घराची जागा. २ पारवा. ३ खबुत्र.

**गृहमणि**, पु० (णिः) दीप, दिवा.

**गृहमेधिन्**, पु० (धी) गृहस्थाश्रमी.

**गृहयालु**, वि० (लुःलुःलु) गृहणशील, घेणारा.

**गृहवाटिका**, स्त्री० (का) घराजवळ केलेला बागबगीचा.

**गृहवित्त**, पु० (त्तः) घरधनी.

**गृहस्थूण**, न० (णं) गृहस्तंभ, घराचा खांब, धारण.

**गृहाम्ल**, न० (म्लं) पेज, कांजी.

**गृहाराम**, पु० (मः) घराजवळ केलेला बागबगीचा.

**गृहालिका,** स्त्री० (का) पाल.

**गृहावग्रहणी;** स्त्री० (णी) घराच्या दाराचा खालचा भाग ज्यास उंबरा, उंबरटा असें म्ह० तो.

**गृहाश्मा,** स्त्री० (श्मा) जाति.

**गृहाक्ष,** पु० (क्षः) खिडकी.

**गृहिणी,** स्त्री० (णी) पेज.

**गृहिन्,** पु० (ही) गृहस्थाश्रमी.

**गृह्यक,** पु० (कः) जो मृगवि० किंवा पक्षि घरामध्यें पिंजऱ्यांत चमत्कारार्थ घालून ठेवितात तो मृग किंवा पक्षि. २ वि० (कः-का-कं) स्वाधीन.

**गेंडुक,** पु० (कः) खेळण्याचा चेंडू. २ गिरदी, गाल उशी.

**गेंडूक,** पु० (कः) खेळण्याचा चेंडू. २ गिरदी, गाल उशी.

**गेंदुक,** पु० (कः) खेळण्याचा चेंडू. २ गिरदी, गाल उशी.

**गेय,** न० (यं) गायन. २ वि० (यः-या-यं) गायन करावयास योग्य.

**गेह,** न० (हं) गृह, घर.

**गेष्णु,** पु० (ष्णुः) गायन. २ नट.

**गैरिक,** न० (कं) सुवर्ण, सोनें. २ गेरू ह्या नांवानें प्रसिद्ध जी धातु ती.

**गैरेय,** न० (यं) शिलाजित.

**गोकंटक,** पु० (कः) वनौ० ज्यास सरांटा असें म्ह० तो. २ गाईचा खूर.

**गोकर्ण,** पु० (र्णः) सर्प. २ मृगवि० ज्यास गोंव असें म्ह० तो. ३ अनामिका युक्त अंगुष्ठविस्तार, अनामिका व अंगठा हीं संयुक्त असोन जो बाकी अंगुल्यांचा प्रसार तो. ४ खेचर.

**गोकर्णी,** स्त्री० (र्णी) वनौ० जीस मूर, मूरवेल असें म्ह० ती.

**गोकिराटिका,** स्त्री० (का) पक्षिवि०.

**गोकील,** पु० (लः) नांगर. २ मुसळ.

**गोकुल,** न० (लं) गाईचा समूह.

**गोकुलिक,** पु० (कः) नेत्रवियुक्त ज्यास काणा, तिरवा असें म्ह० तो.

**गोग्रंथि,** पु० (थिः) वाळलेलें शेण, गोंवरी. २ वनौ० जीस दवली, पायरी असें म्ह० ती. ३ गोठा.

**गोघृत,** न० (तं) मेघधार.

**गोचर,** पु० (रः) इंद्रियग्राह्य, विषय.

**गोजिह्वा,** स्त्री० (ह्वा) वनौ० जीस दवली, पायरी असें म्हणतात ती.

**गोंड,** पु० (डः) नाभि, बेंबी. २ पामर लोकांतील एक जातिविशेष. ३ वृद्ध पुरुषाची नाभि बेंबी.

**गोडुंब,** पु० (बः) देंट, डेंख.

**गोडुंबा,** स्त्री० (बा) वनौ० जीस कंवडळ असें म्हणतात ती. २ वनौषधिविशेष.

**गोतमी,** स्त्री० (मी) वासिष्ठी नदी.

**गोत्र,** न० (त्रं) वंश, कुल. २ अभिधान, नांव. ३ बोध, ज्ञान. ४ अरण्य. ५ क्षेत्र, शेत. ६ शरीर. ७ मार्ग. ८ शरीराचा अवयव. ९ पु० (त्रः) पर्वत.

**गोत्रभिद्,** पु (द्) इंद्र.

**गोत्रा,** स्त्री० (त्रा) पृथ्वी. २ गाईचा समूह.

**गोद,** पु० (दः) मस्तकांतील मेंदु.

**गोदंत,** पु० (तः हरताळ.

**गोदारण,** न० (णं) हल, नांगर.

**गोदावरी,** स्त्री० (री) गोदावरी नदी.

**गोधुग्धा,** स्त्री० (ग्धा) वनौ० जीस कंवडळ असें म्हणतात ती. चिभूड.

**गोदुह**, पु० (धुक्) गवळी.

**गोधन**, न० (नं) गाईचा समूह.

**गोधा**, स्त्री० (धा) धनुष्य काखेस लावलें असतां त्याच्या दोरीचें घर्षण बाहूस न व्हावें म्हणून केलेला जो चांमड्याचा वगैरे बाहुबंध तो. २ जलचरविशेष ज्यास पाण्यांतील घोरपड असें म्हणतात ती.

**गोधापदी**, स्त्री० (दी) वनौ० जीस हंसपादिका, तांबडी लाजाळू असें म्हणतात ती.

**गोधि**, पु० (धिः) भाल, ललाट, कपाळ.

**गोधिका**, स्त्री० (का) जलचरविशेष जीस पाण्यांतील घोरपड असें म्हणतात ती.

**गोधिकात्मज**, पु० (जः) स्थल गोधिकेचें अपत्य ज्यास गार असें म्हणतात तो.

**गोधूम**, पु० (मः) गहूं. २ नारिंगाचें झाड. ३ औषधिविशेष.

**गोनंदी**, स्त्री० (दी) सारस पक्ष्याची स्त्री.

**गोनर्द**, न० (र्दं) वनौ० ज्यास केवडी, जलमुस्ता, क्षुद्रमोथा असें म्हणतात तो. २ कमळ.

**गोनस**, पु० (सः) घोणस.

**गोनस्**, पु० (नाः) भुजंगविशेष.

**गोनास**, पु० (सः) भुजंगविशेष.

**गोप**, पु० (पः) बहुत गांवचा अधिकारी (महालकरी वगैरे.) २ थट्टीचे कामाकडील अधिरी. ३ गवळी. ४ रक्त्याबोळ. ५ गाई राखणारा. ६ राजा. ७ शारीवाख्यवनौषधि.

**गोपति**, पु० )तिः) स्वेछेनें फिरणारा बैल, पोळ. २ महादेव, ३ षंढ, नपुंसक. ४ राजा. ५ सूर्य. ६ कृष्ण. ७ विष्णु.

**गोपदल**, पु० (लः) वानर.

**गोपरस**, पु० (सः) रक्त्या बोळ.

**गोपा**, स्त्री० (पा) वनौ० जीस उपलसरी, उपरसाळ असें म्हणतात ती.

**गोपानसी**, स्त्री० (सी) घराचे शाकारास आधारभूत जें ओंमण, कडणी, वांसा, सज्जा इत्यादि असतें तें.

**गोपायित**, वि० (तः ता- तं) रक्षित, रक्षण केलेला.

**गोपाल**, पु० (लः) गवळी. २ राजा.

**गोपालक**, पु० (कः) महादेव.

**गोपी**, स्त्री० (पी) वनौ० जीस उपरसाळ, उपलसरी असें म्ह० ती. २ गवळण.

**गोपुटिक**, न० (कं) नंदीचें घर. २ बैल.

**गोपुर**, न० (रं) पुरद्वार, शहरचा दरवाजा. २ द्वार, दार. ३ वनौ० ज्यास केवडी, जलमुस्ता असें म्ह० तो.

**गोपेश**, पु० (शः) शाक्यमुनि. २ कृष्ण.

**गोप्य**, पु० (प्यः) दासीसुत. २ वि० (प्यः- प्या-प्यं) रक्षण करावयास योग्य.

**गोप्यक**, पु० (कः) दास. २ भक्त.

**गोभंडीर**, पु० (रः) पक्षिवि० ज्याला कोढा असें म्ह० तो.

**गोम**, न० (मं) धान्य ठेवण्याचें घर ,कोठार.

**गोमत**, न० (तं) दोन कोस.

**गोमत्**, वि० (मान्. मती. मत्) गवीश्वर, गाईचा स्वामी.

**गोमय**, न० पु० (यं-यः) गाईचें शेण.

**गोमयछत्र**, न० (त्रं) गोमयछत्र.

**गोमयछत्रिका**, स्त्री० (का) गोमय छात्रिका.

**गोमर्द**, पु० (र्दः) सारस पक्षि.

**गोमायु**, पु० (युः) कोल्हा.
**गोमिन्**, पु० (मी) गाईचा मालक. २ कोल्हा. ३ उपासक. ४ बौद्धाभिक्षुशिष्य.
**गोमुख**, न० (खं) उपलेप. २ वांकडें घर. ३ लेपन. ४ पु० (खः) मातली नामा जो इंद्राचा सारथी त्याचा पुत्र. ५ महादेवाचा गणवि०.
**गोमेदक**, न० (कं) रत्नवि०. २ काममेचक नांवाचें विष.
**गोरंकु**, पु० (कुः) पक्षिवि०. २ बाण. ३ सूर्य. ४ मेषादि राशी. ५ जामीन. ६ अटकाव.
**गोरथ**, पु० (थः) गुरुग्रह, बृहस्पति.
**गोरस**, पु० (सः) ताक, दहीं, दूध. इत्यादि.
**गोरक्ष**, पु० (क्षः) नारिंगाचें झाड. २ गाईचें संरक्षण करणारा, गवळी, गुराखी. ३ मच्छंद्र नाथाचा शिष्य.
**गोराटी**, स्त्री (टी) पक्षिवि०.
**गोरिल**, पु० (लः) लोहचूर्ण. २ पांढरी मोहरी.
**गोरुत**, न० (तं) दोन कोस.
**गोल**, पु० (लः) वाटोळा पिंड. २ न० (लं) वर्तुळाकार. ३ रांझण.
**गोलक**, पु० (कः) नवरा मेला असतां जार पुरुषापासून उत्पन्न जो पुत्र तो. २ मणी. ३ गूळ.
**गोला**, स्त्री० (ला) नेपाळ देशोत्पन्न जी मनःशिला ती. २ गोदावरी नदी. ३ सखी. ४ किल्ला. ५ लहान मुलाचें खेळणें.
**गोलांगुल**, पु० (लः) पूगवृक्ष, सुपारीचें झाड, पोफळ.
**गोलास**, पु० (सः) गोमयछत्रिका.
**गोलासिनी**, स्त्री० (नी) पक्षिवि०.
**गोलीढ**, पु० (ढः) बनी० ज्यास मोरवा असें म्ह० तो.
**गोलोमी**, स्त्री० (मी) वेखंड. २ अक्कलकाढा. ३ शुक्लदुर्वा, पांढरी दुर्वा. ४ जटामांसीलता.
**गोवंदिनी**, स्त्री० (नी) प्रियंगु वृक्ष ज्यास वांघाटी असें म्ह० तो.
**गोविंद**, पु० (दः) विष्णु. २ कृष्ण. ३ गवळी. ४ राखणारा. ५ बृहस्पति.
**गोविष्**, स्त्री० (ट्) गाईचें शेण.
**गोशीर्ष**, न० (र्षं) कमलासारखा सुगंधि चंदन वि०.
**गोष्ठ**, न० (ष्ठं) गोस्थान, गोठा. २ पु० (ष्ठः) स्वस्थानस्थित.
**गोष्ठागार**, पु० (रः) गोठा.
**गोष्ठी**, स्त्री० (ष्ठी) सभा. २ परस्पर बोलणें, गोष्टी.
**गोष्पद**, वि० (दः दा- दं) गोसेवित देश, गाईनीं सेविलेला. २ न० (दं) खुरप्रमाण, गाईचें पाऊल. ३ गाईच्या पावला इतका खोल खळगा.
**गोस**, पु० (सः) प्रातःकाळ. २ पक्षिविशेष. ३ ऊंस. ४ गंधरस, रक्तपाबोळ.
**गोसंख्य**, पु० (ख्यः) गवळी.
**गोसर्ग**, पु० (र्गः) प्रातःकाळ.
**गोसर्गा**, स्त्री० (र्गा) प्रातःकाळ.
**गोस्तन**, पु० (नः) चार सरांचा मुक्ताहार. २ गाईचें आंचळ.
**गोस्तना**, स्त्री० (ना) द्राक्षाची वेल.
**गोस्तनी**, स्त्री० (नी) द्राक्षाची वेल.
**गोस्थानक**, न० (कं) गोस्थान, गोठा.

गोहल्ल, न० (ल्लं) गाईचें शेण.

गोक्षुरक, पु० (कः) वनौ० ज्यास सराटा असें म्हणतात तो.

गौ, पु० (गौः) बलीवर्द, बैल. २ स्वर्ग, परलोक. ३ किरण. ४ वज्र. ५ चंद्र. ६ सूर्य. ७ यज्ञ विशेष. ८ पु० स्त्री० (गौः गौः) लोम. ९ जल, पाणी. १० नेत्र. ११ बाण. १२ स्त्री० (गौः) गाय. १३ वाचा, वाणी. १४ दिशा. १५ भूमि. १६ रोहिणी नक्षत्र.

गौंजिक, पु० (कः) सोनार.

गौड, पु० (डः) गौडदेश. २ पंचगौडांतील प्रत्येक.

गौडी, स्त्री० (डी) गुळाची दारू.

गौतम, पु० (मः) बुद्ध विशेष. २ गौतम ऋषि.

गौतमी, स्त्री० (मी) दुर्गा, पार्वती. २ नदी विशेष.

गौधार, पु० (रः) स्थलगोधिकेचें अपत्य ज्यास गार असें म्हणतात तो.

गौधेय, पु० (यः) स्थलगोधिकेचें अपत्य ज्यास गार असें म्हणतात तो.

गौधेर, पु० (रः) स्थलगोधिकेचें अपत्य ज्यास गार असें म्ह० तो.

गौर, वि० (रः-रा-रं) शुक्लवर्ण, पांढरा. २ पीतवर्ण, पिंवळा. ३ अरूण, तांबडा. ४ विशुद्ध, शुद्ध. ५ पु० (रः) पांढरी मोहोरी. ६ चंद्र. ७ न० (रं) कमलांतील केसर, पराग.

गौरव, न० (वं) उत्थानपूर्वक सत्कार. २ बाहुल्य.

गौरक्ष, पु० (क्षः) गाड्याचा बैल.

गौरी, स्त्री० (री) जीस रजोदर्शन झालें नाहीं अशा स्त्री. २ (आठ वर्षांची कन्या असेंही मत आहे.) ३ पार्वती.

गौष्ठीन, वि० (नः ना- नं) प्रथम जेथें गाई असत तें स्थान.

ग्रंथ, पु० (थः) निबंध. २ शास्त्र. ३ द्रव्य. ४ बत्तीस अक्षरी श्लोक.

ग्रंथकूट, पु० (टः) लेख्य स्थान.

ग्रंथि, पु० (थिः) वेळू, माणगा इत्यादिकांचें पेर, गांठ, २ वनौषधि जीस गंठीवन, भटोरा असें म्हणतात ती. ३ रोगविशेष. ४ बंध.

ग्रंथिक, पु० (कः) जोशी. २ सहदेव नामा पांडव. ४ न० (कं) पिंपळीचें मूळ. ५ गुग्गुल वृक्ष. ६ वनौ० जीस गंठीवन, भटोरा असें म्हणतात ती. ७ कारवीचें झाड.

ग्रथित, वि० (तः ता- तं) गुंफित, गुंफलेला.

ग्रंथित, वि० (तः ता- तं) गुंफित, गुंफलेला. २ व्यापलेला. ३ मारलेलें.

ग्रंथिपर्ण, न० (र्णं) वनौ० जीस गंठीवन, भटोरा असें म्हणतात ती.

ग्रंथिल, पु० (लः) वनौ० वेहकळी वृक्ष ज्यास कर्नाटकांत हलुमाणिका असें म्हणतात तो. २ कारवीचें झाड. ३ वि० (लः ला- लं) ग्रंथियुक्त, ज्याला गांठी आहेत तो.

ग्रंथिहर, पु० (रः) प्रधान.

ग्रस्त, वि० (स्तः स्ता- स्तं) ज्या वाक्यांत वर्णाचा किंवा पदाचा संपूर्ण उच्चार होत नाहीं तें. २ भक्षित, खाल्लेलें.

ग्रह, पु० (हः) चंद्र ग्रहण आणि सूर्य ग्रहण हीं प्रत्येक. २ ग्रहण, स्वीकारणें. ३ सूर्य, चंद्र, बुध, गुरु, शुक्र, शनी,

राहु, केतु, हे नवग्रह. ४ निर्बंध, आग्रहविशेष. ५ निग्रह, विरोध. ६ रणोद्यम, युद्धाविषयीं उद्योग. ७ पूतनादिक पिशाचें. ८ अनुग्रह.

**ग्रहकल्लोल**, पु० (लः) राहुनामा ग्रह.

**ग्रहण**, न० (णं) स्वीकार. २ आदर. ३ हस्त. ४ ग्रहण. ५ प्राप्ति. ६ बंदी, अटकाव.

**ग्रहणीरुज्**, स्त्री० (क्) संग्रहणीनामक रोग.

**ग्रहनाशन**, पु० (नः) सातवणाचा वृक्ष.

**ग्रहपति**, पु० (तिः) सूर्य.

**ग्रहराज**, पु० (जः) सूर्य. २ चंद्र.

**ग्रहाधार**, पु० (रः) ध्रुव.

**ग्रहीतृ**, वि० (ता-त्री तृ) घेणारा.

**ग्राम**, पु० (मः) गांव. २ गायनांतील स्वरविशेष. ३ शब्दादिकापुढें हा ग्राम शब्द असला तर क्वचित समूहार्थक होतो. उ० शब्दग्रामः

**ग्रामकूट**, पु० (टः) फार मोटा. २ कुळकर्णी.

**ग्रामणी**, पु० (णीः) नापित, न्हावी. २ वि० (णीःणीःणि) श्रेठ, मुख्य. ३ ग्रामाधिपति, गांवकर.

**ग्रामतक्ष**, पु० (क्षः) ग्रामाधीन, सुतार, गांवचा सुतार.

**ग्रामता**, स्त्री० (ता) ग्रामसमूह.

**ग्राममद्गुरिका**, स्त्री० (का) मद्गुरनामा जो मत्स्यविशेष त्याची स्त्री. २ ग्रामयुद्ध. ३ वनौषधि जीस अतिविषा, अतिविख असें म्हणतात ती.

**ग्राममुख**, न० (खं) बाजार.

**ग्राममृग**, पु० (गः) कुत्रा.

**ग्रामाधीन**, वि० (नः-ना-नं) गांवचे स्वाधीन.

**ग्रामांत**, पु० (तः) गांवचे समीप जो देश तो.

**ग्रामीण**, वि० (णःणा-णं) गांवापासून झालेला (पदार्थ वगैरे.)

**ग्रामीणा**, स्त्री० (णा) वनौ० जीस नीली, नीळ असें म्हणतात ती.

**ग्रामीन**, पु० (नः) कुत्रा. २ कावळा.

**ग्रामेयक**, पु० (कः) पळपळीत बोलणारा.

**ग्राम्य**, वि० (म्यःम्या-म्यं) शिथिल, पळपळीत (बोलणें वगैरे.) २ गांवांतील. ३ प्राकृत. ४ पु० (म्यः) पळपळीत बोलणारा.

**ग्राम्यकर्कटी**, स्त्री० (टी) कोहळा.

**ग्राम्यकुंकुम**, न० (मं) कुसुंबा.

**ग्राम्यधर्म**, पु० (र्मः) मैथून.

**ग्राम्यमद्गुरिका**, स्त्री० (का) मद्गुर नामा जो मत्स्यविशेष त्याची स्त्री, बायको.

**ग्राम्याश्व**, पु० (श्वः) गाढव.

**ग्रावन्**, पु० (वा) पर्वत. २ पाषाण. ३ मेघ.

**ग्रास**, पु० (सः) ग्रास, घांस.

**ग्राह**, पु० (हः) जलचर विशेष ज्यास नावाडे सावज, सुसर असें म्हणतात ती. २ ग्रहण, घेणें. ३ बंदी, अटकाव.

**ग्राहक**, पु० (कः) धान्य घेणारा. २ पक्षिविशेष.

**ग्राहिन्**, पु० (ही) कवठीचें झाड.

**ग्रीवा**, स्त्री० (वा) मान.

**ग्रीवाघंटा**, स्त्री० (टा) अश्वाच्या गळ्यांतील घंटा.

**ग्रीवाशिरा**, स्त्री० (रा) मानेची शीर.
**ग्रीष्म**, पु० (ष्मः) ग्रीष्मऋतु.
**ग्रैव**, वि० (वः वा- वं) ग्रीवासंबंधी.
**ग्रैवेय**, वि० (यः या -यं) ग्रीवासंबंधी.
**ग्रैवेयक**, न० (कं) ग्रीवाभूषण.
**ग्रैष्मी**, स्त्री० (ष्मी) नेवाळी. २ मोगरी.
**ग्लस्त**, वि० (स्तः स्ता- स्तं) भक्षित, खाल्लेलें.
**ग्लह**, पु० (हः) पण, पैज, प्रतिज्ञा.
**ग्लान**, वि० (नः ना- नं) रोगादिकें करून हर्षरहित, म्लान.
**ग्लास्नु**, वि० (स्नुः स्नुः स्नु) रोगादिकें करून हर्षरहीत.
**ग्लौ**, पु० (ग्लौः) चंद्र.

## घ.

**घ**, पु० (घः) घंटा. २ घर्घरयुक्त शब्द. ३ मेघ. ४ मारणें. ५ घर्म, घाम.
**घट**, पु० (टः) कलश, तांब्या, घागर इत्यादि. २ समाधिविशेष. ३ हत्तीचें गंडस्थळ.
**घटदासी**, स्त्री० (सी) कुंटण.
**घटना**, स्त्री० (ना) चलन. २ आवृत्ति. ३ रचना, जुळविणें.
**घटराज**, पु० (जः) कुंभ, माठ.
**घटा**, स्त्री० (टा) युद्धाचे ठायीं हत्तीचें संघट्टन. २ सभा.
**घंटापथ**, पु० (थः) राजमार्ग.
**घंटापाटलि**, पु० (लिः) मोरव्याचें झाड.
**घंटारवा**, स्त्री० (वा) सण, ताग. २ लहान ताग, घागरी.
**घटिकार्थक**, पु० (कः) घड्याळ वाजविणारा.
**घटी**, स्त्री० (टी) कळशी, घागर इत्यादि. २ दंडढक्का (वाद्यविशेष.)
**घटीयंत्र**, न० (त्रं) विहिरींतून पाणी वर काढण्याचें यंत्र, राहाट, खिराडी इत्यादि.
**घटोत्कचांतक**, पु० (कः) कर्ण.
**घट्ट**, पु० (ट्टः) गंगातीरावर वगैरे दगडानीं बांधलेला घाट.
**घन**, वि० (नः ना- नं) सांद्र, निबीड. २ कठीण. ३ पु० (नः) मेघ. ४ न० (नं) टाळ, घांट, झल्लरी इत्यादि जें वाद्य तें. ५ मध्यम नृत्य. ६ पु० (नः) लोह मुद्गल. ७ मोथा. ८ विस्तार. ९ दार्ढ्य. १० ओघ.
**घनकक**, पु० (कः) मेघधार.
**घनजंबाल**, न० (लं) चिखल.
**घनतोल**, पु० (लः) चातक पक्षि.
**घनरस**, पु० न० (सः सं) उदक, पाणी. २ डीक. ३ निबीड. ४ उंसाचें मूळ. ५ कापूर. ६ वनौषधि जीस मुखेल असें म्हणतात ती.
**घनवल्लिका**, स्त्री० (का) वीज.
**घनवास**, पु० (सः) कोहळा.
**घनसार**, पु० (रः) कापूर. २ पारा.
**घनाघन**, पु० (नः) इंद्र. घातुक असोन मदोन्मत्त हत्ती असतो तो. ३ वर्षाकालाचा मेघ, वृष्टीकरणारा मेघ. ४ चक्र.
**घनामय**, पु० (यः) खजूर.
**घनामल**, पु० (लः) वनौषधि जीस घेटुळी असें म्हणतात ती.
**घनोपल**, पु० (लः) कठिणोदक, गार.

**घर्घर**, पु० (रः) घुबड. २ पाण्याचा पाट. ३ दार. ४ नदविशेष.

**घर्घरा**, स्त्री० (रा) अश्वाच्या गळ्यांतील घांट. २ घुंगूर. ३ वीणाविशेष. ४ स्वरविशेष.

**घर्घरिका**, स्त्री० (का) लहान घंटा. २ वाद्याचा दांडा.

**घर्म**, पु० (र्मः) स्वेदांबु, घाम. २ वि० (र्मः र्मा- र्मं) उष्ण. ३ पु० (र्मः) ग्रीष्म ऋतु. ४ सूर्याचा प्रकाश.

**घर्षणी**, स्त्री० (णी) हळद.

**घर्षनाल**, पु० (लः) शिलापुत्र.

**घस्मर**, वि० (रःरा-रं) भक्षक, खादाड.

**घस्र**, पु० (स्रः) दिवस. २ घातुक. ३ भयंकर. ४ महादेव. ५ भयानकरस. (नाट्य प्रकरण.) ६ न० (स्रं) कुंकु. ७ रंग. ८ पिंजर.

**घा**, स्त्री० (घा) स्त्रियांचे कमरेचें भूषण ज्यास कमरपटा असें म्ह० तो. २ घात. ३ घंटा.

**घाटा**, स्त्री० (टा) मान आणि मस्तक यांचा मागले कडचा संधि. २ (मानेवरील उंच भाग ज्यास टांटी असें म्ह० ती. असेंही कोणाचें मत आहे.

**घांटिक**, पु० (कः) स्तुतिपाठक वि०, २ धोत्र्याचें झाड.

**घात**, पु० (तः) वध, ठार मारणें. २ दांडा.

**घातुक**, वि० (कःका-कं) हिंसाशील, ज्याचा हिंसा करावयाचा स्वभाव तो. २ क्रूर, परद्रोहशील.

**घास**, पु० (सः) गाई, म्हशी इत्यादिकांचें खावयाचें तृण.

**घासि**, पु० (सिः) अग्नि.

**घु**, पु० (घुः) नाक.

**घुटिका**, स्त्री० (का) पायांचे मागची गांठ जीस पायांचा घोटा असें म्हणतात तो.

**घुण**, पु० (णः) काष्ठकृमि, लांकडास छिद्र पाडणारा किडा.

**घुर्घुर**, पु० (रः) पक्षिवि०.

**घुघुरी**, स्त्री० (री) जलचरवि०.

**घुसृण**, न० (णं) केशर. २ कुंकु.

**घू**, पु० (घूः) शब्द, ध्वनी.

**घूक**, पु० (कः) घुबड.

**घूर्णित**, वि० (तःता-तं) जो निजेचे गुंगित आहे तो, निद्रेनें गुंगलेला.

**घृणा**, स्त्री० (णा) करुणरस. २ दया. ३ निंदा.

**घृणावास**, पु०(सः) कोहळा.

**घृणि**, पु० (णिः) किरण.

**घृत**, न० (तं) आज्य, तूप. २ जल, पाणी. ३ वि० (तःता-तं) प्रदीप्त.

**घृतपूर्णक**, पु० (कः) करंजाचें झाड.

**घृष्टि**, स्त्री० (ष्टिः) वनौषधि जीस वाराहीकंद, डुकर कंद असें म्ह० ती. २ पु० (ष्टिः) डुकर. ३ स्पर्धा. ४ विष्णुक्रांत नांवाची वनौषधि वि०. ५ घर्षण.

**घेंडा**, पु० (डाः) घोडे विकणारा. २ कोकीळ पक्षि.

**घोट**, पु० (टः) घोडा.

**घोटक**, पु० (कः) घोडा.

**घोंटा**, स्त्री० (टा) बदरीफळ, बोर. २ पूगवृक्ष, सुपारीचें झाड, पोफळ. ३ बदरीसदृश वृक्ष विशेष.

**घोणा**, स्त्री० (णा) नासिका, नाक.

**घोणिन्**, पु० (णी) डुकर.
**घोर**, पु० (रः) भयानकरस (नाटय प्रकरण.) २ वि० (रःरा-रं) भयंकर.
**घोररासन**, पु० (नः) कोल्हा.
**घोरा**, स्त्री० (रा) रात्र.
**घोष**, पु० (षः) गवळ्यांचें घर किंवा त्यांचा गांव २ पक्षिविशेष. ३ गवळ्यांचा शब्द. ४ घोंसाळी. ५ दोडकी. ६ कांसें. ७ मेघगर्जना.
**घोषक**, पु० (कः) घोंसाळी. २ दोडकी.
**घोषणा**, स्त्री० (णा) उच्च स्वरानें जो घोष तो.
**घोषयित्नु**, पु० (त्नुः) कोकीळ.
**घोषा**, स्त्री० (षा) बडीशेप.
**घ्राण**, न० (णं) नासिका, नाक. २ वि० (णःणा-णं) नाकानें ज्याचा वास घेतला तें, हुंगलेलें (फुल वगैरे.)
**घ्राणतर्पण**, वि० (णःणा-णं) सुगंधि. २ पु० (णः) सुगंध.
**घ्रात**, वि० (तःता तं) नाकानें ज्याचा वास घेतला तें, हुंगलेलें (फुल वगैरे.)

## ङ.

**ङ**, पु० (ङः) विषय. २ विषयाची इच्छा. ३ भैरव.

## च.

**च**, पु० (चः) कांसव. २ चंद्र. ३ चोर. ४ पक्षांतर. ५ हेतु. ६ निश्चय. ७ अ० पादपूरण. ८ समुच्चय. ९ अन्यतरानुषंगिकत्व. १० समाहार. ११ इतरेतरयोग ह्या अर्थीं. उ० अवितंगोपायितंचगुलंच. २ ईश्वरंगुरुंचभज. ३ भिक्षामटगांचानय. ४ संज्ञाचपरिभाषाचसंज्ञापरिभाषं. ५ धवश्चखदिरश्चधवखदिरौ.
**चंकर**, पु० (रः) वृक्ष. २ स्यंदन.
**चकित**, पु० (तः) भय पावणारा.
**चंकुर**, न० (रं) साधारण वाहान.
**चकोर**, पु० (रः) चकोर पक्षि. (ह्यास चांदणें मोठें प्रिय आहे.)
**चकोरक**, पु० (कः) चकोर पक्षि.
**चक्र**, न० (क्रं) शस्त्र. २ वर्तुळाकृति. ३ चक्राकार भ्रमण होऊन जें जल खालीं जातें तें, भोंवरा. ४ राज्य. ५ सैन्य. ६ रथादिकाचें चाक. ७ पु० (क्रः) चक्रवाकपक्षि. ८ प्रहरण. ९ समूह. १० कुंभाराचें चाक. ११ दंभ, कपट.
**चक्रकारक**, न० (कं) सुवासिक द्रव्यवि० ज्यास वाघनख असें म्ह० तें.
**चक्रधर**, पु० (रः) विष्णु. २ सर्प. ३ कुंभार.
**चक्रपाणि**, पु० (णिः) विष्णु.
**चक्रफल**, न० (लं) आयुधवि०.
**चक्रभेदिनी**, स्त्री० (नी) रात्र.
**चक्रमर्दक**, पु० (कः) वनौ० ज्यास टाकळा असें म्ह० तो.
**चक्रमुख**, पु० (खः) डुकर.
**चक्रला**, स्त्री० (ला) वनौ० जीस उच्चटामूल, फुरडी असें म्ह० ती.
**चक्रवज्र**, पु० (ज्रः) डुकर.

**चक्रवर्तिन्**, पु० (र्ती) समुद्र वलयांकित पृथ्वीचा स्वामी जो राजा तो.

**चक्रवर्तिनी**, स्त्री० (नी) शाकवि० ज्यास चाकवत असें म्ह० ती.

**चक्रवाक**, पु० (कः) चक्रवाक पक्षि.

**चक्रवाड**, पु० (डः) सप्तद्वीपवती जी पृथ्वी तीस प्राकारभूत जो पर्वत वि० तो. २ न० (डं) मंडल, वाटोळा घेरा.

**चक्रवाल**, पु० (लः) सप्तद्वीपवती जी पृथ्वी तीस प्राकारभूत जो पर्वतवि० तो. २ न० (लं) मंडल, वाटोळा घेरा.

**चक्रसंवर**, पु० (रः) वजटीक देव.

**चक्रांग**, पु० (गः) हंसपक्षि. २ छत्री.

**चक्रांगी**, स्त्री० (गी) वनौ० जीस केदार, कुटकी असें म्ह० ती.

**चक्राट**, पु० (टः) विषवैद्य. २ धूर्त. ३ बत्तीस गुंजा प्रमाणाचें एक नाणें आहे.

**चक्राधिवासिन**, पु० (सी) नारिंगाचें झाड.

**चक्रिन्**, पु० (क्री) सर्प. २ विष्णु. ३ कुंभार. ४ याज्ञिक. ५ जाळ्यानें मृगादिकांस धरणारा. ६ चक्रवाकपक्षि. ७ अज, बोकड. ८ सुचविणारा.

**चक्री**, पु० (क्री) सर्प. २ विष्णु. ३ कुंभार.

**चक्रीवत्**, पु० (वान्) गर्दभ.

**चंग**, पु० (गः) सुंदर. २ पक्षि. ३ मोरचंग, वाद्यवि०.

**चंगल**, पु० (लः) वाणी जातीचा.

**चंचरीक**, पु० (कः) भ्रमर.

**चंचल**, वि० (लःला-लं) कंपित, चंचळ. २ पु० (लः) कामुक. ३ अग्नि.

**चंचला**, स्त्री० (ला) लक्ष्मी. २ विद्युल्लता, वीज.

**चंचा**, स्त्री० (चा) गवताची पेटी.

**चंचिसुचि**, पु० (चिः) पक्षिवि० ज्यास कारंडव असें म्ह० तो.

**चंचु**, पु० (चुः) एरंडाचें झाड. २ पक्ष्याचें तोंड, चोंच.

**चंचुमत्**, पु० (मान्) पक्षि.

**चटक**, पु० (कः) पक्षिवि० ज्यास चिमणी असें म्ह० ती. २ बहिरीससाणा.

**चटका**, स्त्री० (का) पिप्पलीमूल, पिंपळमूळ. २चिमणी म्हणून जो लहान पक्षि तो.

**चटकाशिरस्**, न० (रः) पिप्पलीमूल, पिंपळमूल.

**चटिकाशिरस्**, न० (रः) पिप्पलीमूल, पिंपळमूळ.

**चटु**, पु० न० (टुःटु) प्रीतियुक्त जें मिथ्या भाषण तें. २ न० (टु) प्रिय भाषण. ३ पु० (टुः) जठर, उदर. ४ व्रतीचें आसन.

**चंड**, पु० (डः) यमदूत. २ दैत्य. ३ चिंचेचें झाड. ४ वि० (डःडा-डं) कोपशील, फार रागीट.

**चंडा**, स्त्री० (डा) वनौ० जीस मूषिकपर्णी, उंदीर कानी असें म्हणतात ती. २ चोरओवा, किरमाणी ओवा.

**चंडात**, पु० (तः) पुष्प वृक्षविशेष, कण्हेरीचें झाड.

**चंडातक**, न० (कं) स्त्रियांचें अर्धोरूचें आच्छादक नेसण्याचें वस्त्रविशेष ज्यास परकर, लहंगा असें म्हणतात तो.

**चंडाल**, पु० (लः) ब्राम्हणी स्त्रीचे ठायीं शूद्रापासून झालेला पुत्र, म्हार वगैरे (यानें मृताचे अंगावरचीं वस्त्र घेऊन

निंद्य मांस भक्षून स्मशानांत राहून उपजीविका करावि.)

**चंडालवल्लकी**, स्त्री० (की) अंत्यजाची किनरी, वीणा.

**चंडालिका**, स्त्री० (का) पार्वती. २ फळ पिकलें म्हणजे जी निर्जिव होते ती. उ० भात पिकलें म्हणजे काडी निर्जीव होते. ३ अंत्यजाची किनरी, वीणा.

**चंडांशु**, पु० (शुः) सूर्य.

**चंडिका**, स्त्री० (का) पार्वती. २ जवस (धान्यविशेष.)

**चंडी**, स्त्री० (डी) कोपिष्ठ स्त्री. २ तीव्र. ३ कात्यायनी देवी.

**चणक**, पु० (कः) हरभरा.

**चतुर**, वि० (रःरा·रं) दक्ष, चातुर्ययुक्त.

**चतुरंगल** पु० (लः) बाहाव्याचें झाड.

**चतुरानन**, पु० (नः) ब्रम्हदेव.

**चतुर्दंत**, पु० (तः) इंद्राचा हत्ती.

**चतुर्भद्र**, न० (द्रं) प्रबळ जे धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष ते.

**चतुर्भुज**, पु० (जः) विष्णु.

**चतुर्वर्ग** पु० (र्गः) धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष हा समुदाय.

**चतुःशाल**, न० (लं) चौसोपि, चौक.

**चतुष्की**, स्त्री० (ष्की) लहान सरोवर.

**चतुष्पथ**, न० (थं) चार मार्ग जेथें मिळालें तें स्थान, चवाठा. २ पु० (थः) ब्राम्हण.

**चतुष्पदी**, पु० (दी) पद्य. २ पशु. ३ करण विशेष.

**चत्वर**, न० (रं) आंगण. २ यज्ञासाठीं संस्कारयुक्त केलेला जो भूभागविशेष तो.

**चत्वाल**, पु० (लः) होमकुंड. २ दर्भ.

**चंदन**, पु० (नः) चंदन, मलयागरु, लागिरी.

**चंदनद्रुम**, पु० (मः) रक्तचंदनाचें झाड.

**चंदना**, स्त्री० (ना) भद्रकाली देवी.

**चंदनाद्रि**, पु० (द्रिः) मलयपर्वत.

**चंदिर**, पु० (रः) चंद्र. २ हत्ती.

**चंदीर**, पु० (रः) चंद्र.

**चंद्र**, पु० (द्रः) चंद्रमा. २ वनी० जीस शुंडारोचनी असें म्हणतात ती. ३ कापुर. ४ सुवर्ण. ५ जल, पाणी.

**चंद्रक**, पु० (कः) मोराचे पिसांवर नेत्राकार जें चिन्ह असतें तें.

**चंद्रकांत**, पु० (तः) मणिविशेष. २ कपट.

**चंद्रकिन्**, पु० (की) मोर.

**चंद्रगोलस्थ**, पु० (स्थः) स्वर्गस्थ पितर.

**चंद्रभस्मन्**, न० (स्म) कापूर.

**चंद्रभागा**, स्त्री० (गा) नदीविशेष.

**चंद्रभागी**, स्त्री० (गी) चंद्रभागा नदी.

**चंद्रमस्**, पु० (माः) चंद्र,

**चंद्रमौलि**, पु० (लिः) महादेव.

**चंद्ररेणु**, पु० (णुः) काव्यचोर (चोरभेद.)

**चंद्रवाला**, स्त्री० (ला) इलायची.

**चंद्रविहंगम**, पु० (मः) बकपक्षी.

**चंद्रशाला**, स्त्री० (ला) उपरमाडी, सज्जा. २ चंद्राचा प्रकाश, चांदणें.

**चंद्रशेखर**, पु० (रः) महादेव.

**चंद्रहास**, पु० (सः)खड्ग,तरवार. २रावणाचें शस्त्र. ३ चांदणें.

**चंद्रापीड**, पु० (डः) महादेव.

**चंद्रिका**, स्त्री० (का) चांदणें.

**चंद्रिल**, पु० (लः) न्हावी. २ वनी० ज्यास बथुवा, चंदनबटुवा असें म्हणतात तो. ३ महादेव.

**चन,** अ० असाकल्य ह्या अर्थी. उ० कंचन.

**चंपक,** पु० (कः) कुडचांफा. २ सोनचांफा.

**चंपकोल्ब,** पु० (ल्बः) फणसाचें झाड.

**चपल,** पु० (लः) मासा. २ चोर. ३ पाषाण विशेष. ४ न० (लं) शीघ्र. ५ वि० (लः ला-लं) त्वरित. ६ विचारावांचून झडकर कार्य करणारा. ७ पारद, पारा असें म्हणतात तो रस विशेष.

**चपला,** स्त्री० (ला) लक्ष्मी. २ व्यभिचारिणी स्त्री. ३ विद्युल्लता, वीज. ४ पिप्पली, पिंपळी. ५ चंचला.

**चपलांग,** पु० (गः) जलचर विशेष ज्यास शिशुमार असें म्हणतात तो.

**चंपा,** स्त्री० (पा) कर्णपूर नगर.

**चंपू,** पु० (पूः) काव्यविशेष. ज्यांत गद्यें मिश्रित पद्य रचना आहे तो.

**चपेट,** पु० (टः) पसरलेला हात.

**चमत्कृति,** पु० (तिः) चमत्कार.

**चमर,** न० (रं) मंजरीविशेष. २ चवरी. ३ पु० (रः) ज्याचें पुच्छ चवरीच्या उपयोगी पडतें असा जो मृग विशेष तो.

**चमरिक,** पु० (कः) कांचनाचें झाड.

**चमरी,** स्त्री० (री) पुष्पमंजिरी.

**चमस,** पु० न० (सः सं) यज्ञपात्र विशेष. २ पिठाचा केलेला भक्ष्य पदार्थ. (वडा, घारगा इत्यादि.) ३ पु० (सः) कवि आदिनवयोगींद्रांपैकीं आठवा.

**चमसी,** स्त्री० (सी) यज्ञपात्र विशेष. २ पिठाचा केलेला भक्ष्य पदार्थ (वडा, घारगा इत्यादि.)

**चमू,** स्त्री० (मूः) सेना, सैन्य. २ तीनष्टतना. (पृतना म्ह० सेना.)

**चमरू,** पु० (रुः) हरिण विशेष.

**चय,** पु (यः) संग्रह. २ समूह. ३ खंदकांतील माती काढून तटबंदीचें बाहेरून मजबुतीसाठीं घातली असते ती.

**चर** पु० (रः) दूतभेद. २ मंगळ नामा ग्रह. ३ चंचळ. ४ चार संज्ञक पुरुष, बातमीदार. ५ वि० (रः रा-रं) जंगम, चर.

**चरक,** पु० न० (कः कं) वैद्याचें शास्त्रविशेष.

**चरण,** पु० (णः) पाद, पाय. २ वेदांश, वेदाचा अंश. ३ बव्हृचादि. ४ मूळ. ५ गोत्र. ६ कवितेचा चवथा भाग.

**चरणायुध,** पु० (धः) कोंबडें.

**चरम,** वि० (मः मा-मं) अंत्य, शेवटचा.

**चरमाचल,** पु० (लः) अस्ताचल.

**चरवायु,** पु० (युः) घर्मवायु.

**चराचर,** वि० (रः रा-रं) जंगम, चर. २ न० (रं) जग.

**चरिष्णु,** वि० (ष्णुः ष्णुः ष्णु) जंगम, चर.

**चरु,** पु० (रुः) हव्यान्न, हवन करावयाचें जें अन्न तें.

**चरुव्रण,** पु० (णः) अपूप. (तांदुळाच्या पिठाचा भक्ष्य विशेष, वडा, घारगा, इत्यादि)

**चर्च,** पु० (र्चः) नवनिधींतील एक.

**चर्चरी,** स्त्री० (री) हाताचा शब्द (टाळ्यापिटण्यापासून निघतो तो.) २ हर्ष. क्रिडा. ३ गायनभेद. ४ फणी.

**चर्चरीक,** पु० (कः) महाकाल. २ शाकविशेष.

**चर्चा,** स्त्री० (र्चा) बुद्धि. २ चिंता. ३ प्रमाणाहीं करून कोणतेही अर्थाची परीक्षा करणें ती. ४ चंदनादिकांची उटी.

**चर्चिका**, स्त्री० (का) चामुंडा देवी.
**चर्पट**, पु० (टः) पसरलेला हात.
**चर्पटी**, स्त्री० (टी) पोळी.
**चर्मकषा**, स्त्री० (षा) वनौषधि, शिकेकाई.
**चर्मकार**, पु० (रः) चांभार. २ औषधिविशेष.
**चर्मणवती**, स्त्री० (ती) नदी विशेष. २ केळीचें झाड.
**चर्मण्वती**, स्त्री० (ती) नदी विशेष. २ केळीचें झाड.
**चर्मन्**, न० (र्म) मृगादिकांचें कातडें. २ ढाल.
**चर्मप्रभेदिका**, स्त्री० (का) चामडें शिवण्याचें शस्त्रविशेष ज्यास आरी असें म्हणतात ती.
**चर्मप्रसेवक**, पु० (कः) विस्तव • पेटविण्याकरितां चामड्याचा भाता करितात तो.
**चर्मप्रसेविका**, स्त्री० (का) विस्तव पेटविण्याकरितां चामड्याचा भाता करितात तो.
**चर्मरु**, पु० (रुः) चांभार.
**चर्मसंभवा**, स्त्री० (वा) इलायचीचें झाड.
**चर्मिन्**, पु० (र्मी) म्हाका, माका. २ भूर्ज वृक्ष. ३ वि० (र्मी- र्मिणी- र्मि) चर्मधारी, ढाल धारण करणार. ढालाईत.
**चर्या**, स्त्री० (र्या) ईर्या पथ, योग मार्गाचे ठायीं जी स्थिति ती.
**चर्वा**, स्त्री० (र्वा) थापट मारणें.
**चर्वीत**, वि० (तः ता- तं) भक्षित, खाल्लेलें. २ चावलेलें.
**चल**, वि० (लः- ला- लं) चंचळ. २ कांपणें. ३ पु० (लः) कंप.
**चलदल**, पु० (लः) पिंपळाचें झाड.
**चलन**, वि० (नः- ना- नं) कंपशील, कांपरा. २ कांपणें. ३ न० (नं) भ्रमण.
**चलनी**, स्त्री० (नी) हत्ती बांधण्याची जागा.
**चला**, स्त्री० (ला) लक्ष्मी.
**चलाचल**, वि० (लः- ला- लं) चंचळ.
**चलाबुकी**, स्त्री० (की) वीणा.
**चलित**, वि० (तः- ता- तं) किंचित कंपित. २ प्रस्थित जें सैन्य तें.
**चविक**, पु० (कः) वनौ० ज्यास चाकवत असें म्हणतात ती.
**चविका**, स्त्री० (का) वनौ० ज्यास चाकवत असें म्हणतात ती.
**चवि**, स्त्री० (वि) वनौषधी ज्यास चाकवत असें म्हणतात ती.
**चव्य**, न० (व्यं) वनौषधी ज्यास चाकवत असें म्हणतात ती.
**चव्या**, स्त्री० (व्या) वनौषधी ज्यास चाकवत असें म्हणतात ती. २ वेखंड.
**चषक**, पु० न० (कः-कं) मद्य प्राशन करण्याचें पात्र. २ मधु विशेष. मद्यविशेष.
**चषाल**, पु० (लः) यज्ञस्तंभाच्या मस्तकाचे ठायीं वाटोळा जो काष्ठ विकार केलेला असतो तो.
**चहुख**, पु० (खः) कोल्हा.
**चक्षन्**, पु० (क्षाः) गुरुनामा ग्रह.
**चक्षुश्रवस्**, पु० (वाः) सर्प.
**चक्षुष्य**, पु० (ष्यः) पुंडरीक नामक वृक्ष विशेष. २ केतक. ३ वि० (ष्यः- ष्या- ष्यं) डोळ्यास हितकारक (पदार्थ.) ४ मनोरम.
**चक्षुष्या**, स्त्री० (ष्या) अंजन विशेष ज्यास निळा सुरमा असें म्हणतात तो.

**चक्षुस्**, न० (क्षुः) डोळा नेत्र.

**चाक्रिक**, पु० (कः) घंटा नादें करून राजास नियमित काळीं जागृत करणारा बंदीजन.

**चांगेरी**, स्त्री० (री) वनौषधि जीस अम्ललोणिका, चुका असें म्हणतात ती.

**चाटकैर**, पु० (रः) चिमणी म्हणून जी लहान पाक्षि जाती त्यांतील पुरुष जाती, चिमणा.

**चाटलोल**, वि० (लः- ला- लं) चंचळ.

**चाटु**, न० (टु) प्रिय भाषण. २ पु० न० (टुः- टु) प्रीतियुक्त जें मिथ्या भाषण तें.

**चाटुपटु**, पु० (टुः) भांड (सोंगाड्ये)

**चाटुबटु**, पु० (टुः) नटविशेष.

**चाटुक्ति**, स्त्री० (क्तिः) सेवा.

**चांडाल**, पु० (लः) ब्राम्हणींचे ठायीं शूद्रापासून उत्पन्न जो पुत्र तो, चांडाल जाती. (याणें स्मशानांत राहून मेलेले मनुष्यांचे आंगावरचीं वस्त्रें व निंद्य मांस यांहीं करून उपजीविका करावी असें सांगितलें आहे.)

**चांडालिका**, स्त्री० (का) अंत्यजाची किनरी, वीणा.

**चातक**, पु० (कः) चातक पाक्षि.

**चातुर**, पु० (रः) उशी. २ सारथी. ३ दृष्टिगोचर. ४ चातुर्य.

**चातुरक**, वि० (कःका-कं) प्रीतियुक्त मिथ्या भाषण करणारा. २ डोळ्यासमोरील पदार्थ. ३ सारथी.

**चातुर्वर्ण्य**, न० (र्ण्यं) ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे चार वर्ण.

**चांद्रभागा**, स्त्री० (गा) चंद्रभागा नदी.

**चांद्रभागी**, स्त्री० (गी) चंद्रभागा नदी.

**चांद्रायण**, न० (णं) प्रायश्चित.

**चाप**, पु० न० (पःपं) धनुष्य.

**चांपिला**, स्त्री० (ला) नदी.

**चांपेय**, न० (यं) सुवर्ण. २ पु० (यः) केसर. ३ नागकेसर. ४ सोनचाफा. ५ नागचाफा.

**चामर**, न० (रं) चवरी. २ पु० (रः) दंड.

**चामरपुष्प**, न० (ष्पं) पूगवृक्ष, सुपारीचें झाड.

**चामरा**, स्त्री० (रा-री) आश्विनी पूर्णिमा.

**चामरिन्**, पु० (री) घोडा.

**चामरी**, स्त्री० (री) चवरी. २ दंड.

**चामुंडा**, स्त्री० (डा) चामुंडा नामे देवी.

**चार**, पु० (रः) गती. २ वृक्षविशेष ज्यास प्रियाळ असें म्हणतात तो. ३ चार संज्ञक पुरुष, बातमीदार. ४ बंधन, अटकाव होण्याचें साधन व तो व्यापार.

**चारक**, पु० (कः) अश्वादि पाळणारा. २ बंध.

**चारटी**, स्त्री० (टी) स्थलकमलिनी.

**चारण**, पु० (णः) कथकनट, कथा करणारा, कीर्तन करणारा.

**चारु**, वि० (रुःरुःरु) सुंदर. २ न० (रु) माणिक वगैरे. ३ पु० (रुः) बृहस्पति.

**चारुधारा**, स्त्री० (रा) इंद्राची स्त्री.

**चारुबंधुर**, पु० (रः) मनोरम.

**चारुलोचन**, पु० (नः) हरीण.

**चारुव्रता**, स्त्री० (ता) एक महिना उपोषण करणारी स्त्री.

**चार्चिक्य**, न० (क्यं) शरीरास चंदनादिकांची उटी काढितात ती.

**चार्म**, न० (र्मं) चर्मसमूह.
**चार्मण**, न० (णं) चर्मसमूह.
**चार्मिण**, न० (णं) चांभारांचा समुदाय.
**चार्वाक**, पु० (कः) देहात्म वादी जो बौद्ध तो.
**चार्वी**, स्त्री० (र्वी) सुंदर स्त्री. २ बुद्धि. ३ चंद्राचा प्रकाश, चांदणें. ४ कुबेराची स्त्री.
**चालक**, पु० (कः) महात, अंकुश मारणारा.
**चालन**, न० (नं) चाळण.
**चालनी**, स्त्री० (नी) चाळण.
**चाष**, पु० (षः) पक्षिविशेष ज्यास चारगा, चास, तास असें म्हणतात तो.
**चास**, पु० (सः) पक्षिविशेष ज्यास चारगा, चास, तास असें म्हणतात तो.
**चिक**, पु० (कः) चिचुंद्री.
**चिकित्सक**, पु० (कः) वैद्य.
**चिकीर्षा**, स्त्री० (र्षा) करण्याची इच्छा.
**चिकुर**, पु० (रः) मस्तकाचे केंस. २ पर्वत. ३ वृक्षविशेष. ४ पक्षि. ५ सर्प. ६ वि० (रःरा-रं) विचारावांचून झटकर (वधादि) कार्य करणारा.
**चिक्कण**, वि० (णःणा-णं) स्निग्ध, ओलें, चिकूचिकीत.
**चिक्कस**, न० (सं) यवादिकांचें पीठ. २ पु० (सः) यज्ञपात्र विशेष.
**चिंगट**, पु० (टः) मत्स्यविशेष.
**चिंचा**, स्त्री० (चा) चिंचेचें झाड.
**चित्**, स्त्री० (त्) बुद्धि, ज्ञान. २ अ० आसाकल्य ह्या अर्थी. उ० कश्चित्.
**चित**, वि० (तःता-तं) व्याप्त.
**चितया**, स्त्री० (या) काळजी.
**चिता**, स्त्री० (ता) समूह. २ प्रेतदाहाधार चुल्ली जीस सरण असें म्हणतात ती.
**चिंता**, स्त्री० (ता) स्मरण. २ विचार. ३ काळजी.
**चिंताकर्मन्**, न० (र्म) चिंताप्रकार.
**चिंतामणि**, पु० (णिः) बौद्धभेद.
**चिंतावेश्मन्**, न० (श्म) मसलतीचें घर.
**चिति**, स्त्री० (तिः) समूह. २ प्रेतदाहाधार चुल्ली जीस सरण असें म्हणतात ती.
**चितिका**, स्त्री० (का) करदोटा.
**चित्त**, न० (त्तं) मन.
**चित्तविभ्रम**, पु० (मः) चित्तवृत्तीचें अनवस्थान.
**चित्तसमुन्नति**, स्त्री० (तिः) गर्व. २ हर्ष.
**चित्तहारी**, स्त्री० (री) शेवग्याचें झाड.
**चित्ताचूडक**, न० (कं) चिता, प्रेतदाहाधार चुल्ली जीस सरण असें म्हणतात ती.
**चित्ताभोग**, पु० (गः) मनास जी सुखादिकांविषयीं तत्परता ती.
**चित्तोक्ति**, स्त्री० (क्तिः) आकाशवाणी.
**चित्तोद्रेक**, पु० (कः) गर्व. २ हर्ष. ३ इच्छा.
**चित्य**, न० (त्यं) स्मशान.
**चित्या**, स्त्री० (त्या) चिता, प्रेतदाहाधार चुल्ली जीस सरण असें म्हणतात ती.
**चित्र**, न० (त्रं) कपाळावरील तिलक. २ अद्भुतरस. ३ आश्चर्य. ४ भिंतीवर वगैरे जें चित्र काढितात तें. ५ वि० (त्रः त्रा-त्रं) चित्रवर्ण.

**चित्रक,** पु० (कः) व्याघ्रविशेष ज्यास चित्ता असें म्हणतात तो. २ एरंडाचें झाड. ३ वनौषधि ज्यास चिता असें म्हणतात ती. ४ न० (कं) कपाळावर कस्तुर्यादिकांचा जो टिळक लावितात तो.

**चित्रकर,** पु० (रः) चितारी, चित्रें काढणारा, रंगारी.

**चित्रकाय,** पु० (यः) सिंह.

**चित्रकृत्,** पु० (त्) तिवसाचें झाड.

**चित्रकोल,** पु० (लः) पाल.

**चित्रगुप्त,** पु० (प्तः) यम. २ यमाचा चित्रगुप्त नामें लेखक.

**चित्रतंडुला,** स्त्री० (ला) वनौषधि जीस विडंग, वावडिंग असें म्हणतात ती.

**चित्रनेत्रा,** स्त्री० (त्रा) पक्षिविशेष ज्यास साळुंखी असें म्हणतात तो.

**चित्रपर्णी,** स्त्री० (र्णी) वनौषधि जीस डवला, पिठवण असें म्हणतात ती.

**चित्रपक्ष,** पु० (क्षः) तित्तिरपक्षि.

**चित्रपादा,** स्त्री० (दा) पक्षिविशेष ज्यास साळुंखी असें म्हणतात तो.

**चित्रपुंख,** पु० (खः) बाण.

**चित्रपृष्ठ,** पु० (ष्ठः) पक्षिविशेष ज्यास साळुंखी असें म्हणतात तो.

**चित्रफली,** स्त्री० (ली) मत्स्यविशेष.

**चित्रभानु,** पु० (नुः) अग्नि. २ सूर्य.

**चित्रमेखल,** पु० (लः) मोर.

**चित्ररथ,** पु० (थः) सूर्य. २ गंधर्वविशेष. ३ सूर्यविशेष.

**चित्रशिखंडिज,** पु० (जः) बृहस्पति.

**चित्रशिखंडिन्,** पु० (डी) मरीचि, अत्रि, अंगिरा, पुलस्त्य, पुलह, क्रतु आणि वसिष्ठ हे सात ऋषि प्रत्येक.

**चित्रा,** स्त्री० (त्रा) वनौषधि जीस दंती असें म्हणतात ती. २ इंद्रजाल, गारुड. ३ चित्रानक्षत्र. ४ नदीविशेष.

**चित्राटीर,** पु० (रः) ब्रम्हदेव. २ दैव.

**चित्रापूप** पु० (पः) अपूप, (तांदुळांच्या पिठाचा भक्ष्यविशेष, वडा, घारगा इत्यादि.)

**चित्राक्षी,** स्त्री० (क्षी) साळुंखी पक्षि.

**चित्रोक्ति,** स्त्री० (क्तिः) लहान गाडा. २ विलक्षण बोलणें.

**चिन,** न० (नं) पताका, निशाण.

**चिन्ह,** न० (न्हं) कोणेक गोष्टीचा अनुमापक असाधारण हेतु. २ पताका. ३ चिन्ह ४ निशाणी.

**चिपिट,** पु० (टः) पृथुक, पोहे.

**चिपिटक,** पु० (कः) पृथुक, पोहे.

**चिबुक,** न० (कं) अधरोष्ठाच्या खालचा भाग, हनवटी.

**चिरं,** अ० दीर्घकाल ह्या अर्थी.

**चिरकाल,** न० (लं) बहुतकाल.

**चिरक्रिय,** वि० (यःया-यं) थोड्या वेळांत होण्याचें काम फार वेळानें करणारा.

**चिरजीविन्,** पु० (वी) ब्रम्हदेव.

**चिरंजीविन्,** पु० (वी) काकपक्षि, कावळा.

**चिरंटी,** स्त्री० (टी) किंचित तारुण्य दशेस आलेली विवाहित स्त्री.

**चिरंतन,** वि० (नःना-नं) प्राचीन, पुरातन.

**चिरप्रसूता,** स्त्री० (ता) बहुत वर्षांनीं प्रसवलेली (गाय वगैरे.)

**चिरबिल्व,** पु० (ल्वः) करंजाचें झाड.

**चिरंभण,** पु० (णः) घार.

**चिरमेहिन्,** पु० (ही) गर्दभ.

**चिररात्राय,** अ० दीर्घकाल ह्या अर्थी.

**चिरस्थ**, पु० (स्थः) नायक.
**चिरस्य**, अ० दीर्घकाल ह्या अर्थी.
**चिरात्**, अ० दीर्घकाल ह्या अर्थी.
**चिरात**, पु० (तः) गरूड.
**चिराय**, अ० दीर्घकाल ह्या अर्थी.
**चिरायुष**, पु० (षः) देव.
**चिरि**, पु० (रिः) पोपट.
**चिरिंटी**, स्त्री० (टी) किंचित तारुण्य दशेस आलेली विवाहित स्त्री.
**चिरिबिल्व**, पु० (ल्वः) करंजाचें झाड.
**चिरेण**, अ० दीर्घकाल ह्या अर्थी.
**चिलिचिम**, पु० (मः) मत्स्यवि० ज्यास वेगसा असें म्ह० तो.
**चिलिचिमि**, पु० (मिः) मत्स्यविशेष ज्यास वेगसा असें म्ह० तो.
**चिलिमीलिका**, स्त्री० (का) कंठालंकार, गळ्यांतील आलंकार. २ काजवा. ३ विद्युल्लता, वीज.
**चिल्ल**, पु० (ल्लः) पक्षिवि० ज्यास घार असें म्ह० ती. २ वि० (ल्लःल्ला-ल्लं) आपणास जो मारावयास आला तो. ३ ज्याचे डोळे क्लेदयुक्त तो, चिपडा.
**चिल्लाभ**, पु० (भः) बळजोरीनें चोरी करणारा.
**चिल्ली**, स्त्री० (ल्ली) वनौषधि जीस बथुवा, चंदनबटुवा असें म्ह० ती.
**चीन**, पु० (नः) हरिणांतील एक जाती. २ देशवि०. ३ तंतु. ४ व्रीहिवि०. ५ वस्त्रवि०.
**चीर**, न० (रं) वल्कल. २ मुक्ताहारवि०. ३ रेखाभेद. ४ लेख्यवि०.
**चीरी**, स्त्री० (री) चार सरांचा मुक्ताहार. २ वस्त्रवि०. ३ लेखनवि०. ४ रंध. ५ मुरकूट, चिलट असें म्ह० तो कीटवि०.
**चीर्ण**, न० (र्णं) स्वीकारित.
**चीर्णपर्ण**, पु० (र्णः) खजुराचें झाड. २ निंबाचें झाड.
**चीवर**, न० (रं) मुनिवस्त्र, ऋषीचें वस्त्र. २ पु० (रः) शाकवि०. ३ (शाक्यमुनीचें प्रावर्ण वस्त्र असें सुभूतीचें मत आहे.)
**चीवरिन्**, पु० (री) बौद्ध भिक्षुक.
**चुक्कार**, पु० (रः) सिंहशब्द.
**चुक्र**, पु० (क्रः) वनौषधि जीस अम्लवेतस असें म्ह० ती. २ आम्लभेद, आमसोल.
**चुक्रिका**, स्त्री० (का) वनौ० जीस अम्ललोणिका, चुका असें म्ह० ती.
**चुचु**, पु० (चुः) वृक्षवि०.
**चुंचु**, स्त्री० (चुः) चिचुंद्री.
**चुंचुरी**, स्त्री० (री) जुगार.
**चुंचुलि**, स्त्री० (लिः) फांशांनीं चौरस खेळणें.
**चुंटा**, स्त्री० (टा) विहीर.
**चुंटी**, स्त्री० (टी) विहीर.
**चुटुलोल**, वि० (लःला-लं) चंचळ.
**चुंबक**, पु० (कः) मुके घेणारा. २ धूर्त. ३ लोहचुंबक, ४ चतुरस्त्र. ५ तागडीवरची धरावयाची दोरी. ६ चुंबक.
**चुलक**, पु० (कः) कुब्जीकृत हस्त. २ पात्रविशेष.
**चुलुंपा**, स्त्री० (पा) शेळी.
**चुलूक**, पु० (कः) चिखल.
**चुल्ल**, वि० (ल्लःल्ला-ल्लं) क्लेदयुक्त डोळ्यांचा, चिपडा.
**चुल्लकी**, स्त्री० (की) जलचरविशेष. २ कुलविशेष.

**चुल्लि**, स्त्री० (ल्लिः) चूल.
**चुल्ली**, स्त्री० (ल्ली) चूल. २ चिता, प्रेतदहनार्थ करितात ती.
**चुचूक**, पु० न० (कः कं) कुचाचें अग्र.
**चूडक**, पु० ( कः ) विहीर.
**चूडा**, स्त्री० ( डा ) विहीर. २ बाहुभूषण. ३ मोराची शिखा, मोराचा तुरा. ४ शेंडी.
**चूडामणि**, पु० ( णिः ) शिरोमणि, मस्तकभूषण. २ गुंज.
**चूडाल**, वि० ( लः ला- लं ) ज्याला शेंडी आहे तो.
**चूडाला**, स्त्री० ( ला ) वनौषधि उच्चटा मूल जीस कोकणांत फुरडी असें म्हणतात ती.
**चूत**, पु० ( तः ) आंब्याचें झाड.
**चूतक**, पु० ( कः ) आंब्याचें झाड. २ गलबतांतील मध्यस्तंभ.
**चूर्ण**, न० ( र्णं ) वासयोग, सुवासिक करण्याचें उपायभूत जें चूर्ण तें. २ पिष्टरज, धूळ. ३ क्षारविशेष, चुना.
**चूर्णक**, पु० ( कः ) सातूचें पीठ.
**चूर्णकुंतल**, पु० ( लः ) मस्तकाचे कुटिल केस.
**चूर्णखंड**, पु० ( डः ) चूर्णखंड.
**चूर्णि**, स्त्री० ( र्णिः ) चूर्णिका, गद्य.
**चूर्णिका**, स्त्री० ( का ) गद्य.
**चूर्णिकृत्**, पु० ( त् ) पतंजली ऋषि.
**चूर्णी**, स्त्री० ( र्णी ) गद्य.
**चूलिका**, स्त्री० ( का ) हत्तीच्या कानाचें मूळ. २ नाटकांग.
**चूष्या**, स्त्री० ( ष्या ) हत्तीच्या मध्यभागीं बांधण्यास उपयोगी जो चर्मरज्जु तो.
**चेट**, वि० ( टः टी- टं ) दास, चाकर.
**चेटक**, वि० ( कः की-कं ) दास, चाकर.
**चेडक**, वि० ( कः की- कं ) दास, चाकर.
**चेत्**, अ० पक्षांतरार्थी. उ० सत्यंचेत्तपसा- चकिं.
**चेतकी**, स्त्री० ( की ) हिरड्याचें झाड.
**चेतन**, पु० (नः) प्राणी. २ वि० (नः-नानं) प्राणेंकरून युक्त.
**चेतना**, स्त्री० ( ना ) बुद्धि. २ कामवांछा. ३ सजीवत्व.
**चेतस्**, न० ( तः ) मन, चित्त.
**चेदि**, पु० ब० ( दयः) चेदी देशविशेष.
**चेदिराट्**, पु० ( ट् ) शिशुपाल.
**चेल**, न० (लः) वस्त्र. २ वि० (लः लालं) अधम, निकृष्ट.
**चेली**, स्त्री० (ली) अधमा स्त्री, नीच जातीची बायको.
**चेलुक**, पु० (कः) बौद्ध भिक्षु शिष्य.
**चेलोंडुक**, पु० (कः) मस्तक संबंधी वस्त्र.
**चेष्टित**, न० (तं) गती. २ चेष्टा.
**चैत्य**, न० (त्यं) यज्ञस्थानविशेष. २ चिता, प्रेतदहनार्थ करितात ती. ३ पु० (त्यः) कल्पतरु वृक्ष. ४ पिंपळाचें झाड.
**चैत्यमुख**, पु० (खः) संन्याशाचें पात्र, कमंडलू.
**चैत्र**, पु० (त्रः) चैत्रमास. २ पर्वतविशेष. ३ बौद्ध भिक्षुक. ४ राजविशेष. ५ न० (त्रं) मेलेलें. ६ देवांचें कूळ.
**चैत्ररथ**, पु० (थः) कुबेराचा बाग बगीच्या. २ न० (थं) देवांची बाग.
**चैत्रावती**, स्त्री० (ती) चैत्रीपूर्णिमा.

**चैद्य**, पु० (द्यः) चेदी देशविशेष. २ शिशुपाल.
**चैल**, न० (लं) वस्त्र. २ वि० (लः ला-लं) अधम, नीच.
**चैली**, स्त्री० (ली) अधमास्त्री, नीच जातीची बायको.
**चोच**, न० (चं) वनौषधि जीस तेज, दालचिनी असें म्हणतात ती. २ फळ खाऊन जें अवशिष्ट राहिलें तें. ३ ताल फल. ४ केळीचें फळ, केळें. ५ लवंग.
**चोड**, पु० (डः) प्रावर्ण. २ देशविशेष.
**चोदनागुड**, पु० (डः) चेंडु. २ उशी.
**चोदनी**, स्त्री० (नी) वनौषधि जीस धमासा असें म्हणतात ती.
**चोद्य**, वि० (द्यःद्या-द्यं) प्रेरणा करावयास योग्य. २ न० (द्यं) अद्भुत प्रश्न, आश्चिर्यकारक प्रश्न.
**चोर**, पु० (रः) चोरी करणारा, चोर.
**चोरपुष्पी**, स्त्री० (ष्पी) वनौषधि जीस चोर, शंखाहुळी, सालवेल असें म्हणतात ती.
**चोरिका**, स्त्री० (का) चौर्य, चोरी.
**चोल**, पु० (लः) कंचुकी, चोळी. २ न० (लं) वस्त्र.
**चोलकिन्**, पु० (की) नारिंगाचें झाड. २ कारवीचें झाड.
**चोली**, स्त्री० (ली) कंचुकी, चोळी.
**चोस्क**, पु० (स्कः) सिंधु देशांतील घोडा.
**चोक्ष**, पु० (क्षः) गीत. २ शुद्ध, पवित्र. ३ चतुर. ४ निरंतर. ५ मनोज्ञ.
**चौर**, पु० (रः) चोर. २ वनौ० जीस चोर, शंखाहुळी, सालवेल असें म्हणतात ती.
**चौरिका**, स्त्री० (का) चौर्य, चोरी.
**चौर्य**, न० (र्यं) चोरी.
**च्युत**, वि० (तःता-तं) गलित, गळलेला, भ्रष्ट झालेला.

## छ.

**छ**, वि० (छःछा-छं) निर्मळ, स्वच्छ.
**छगण**, पु० (णः) थापटा. २ भाटशेण.
**छगल**, न० (लं) गाईचें शेण. २ नील वस्त्र. ३ पु० (लः) अज, बोकड.
**छगलक**, पु० (कः) अज, बोकड.
**छगला**, स्त्री० (ला) वनौषधि जीस वरधारा, जीर्णफंजी असें म्हणतात ती.
**छगलांघ्री**, स्त्री० (घ्री) वनौषधि जीस वरधारा, जीर्णफंजी असें म्हणतात ती.
**छगलांडी**, स्त्री० (डी) वनौषधि जीस वरधारा, जीर्णफंजी असें म्हणतात ती.
**छगलांत्री**, स्त्री० (त्री) वनौषधि जीस वरधारा, जीर्णफंजी असें म्हणतात ती.
**छटाफल**, पु० (लः) पूगवृक्ष, सुपारीचें झाड.
**छत्र**, न० (त्रं) छत्री, छत्र.
**छत्रक**, पु० (कः) कोर्यिबीर. २ बडीशोप. ३ वेखंडाचा भेद.
**छत्रभंग**, पु० (गः) वैधव्य. २ राजाचा नाश. ३ आपल्या स्वातंत्र्याचा नाश.

छत्रा, स्त्री० (त्रा) शोपेची भाजी. २ वनौषधि, मधुरिका, बडिशेप. ३ वेखंडाकृति जलतृण विशेष. ४ कोथिंबीर.

छत्राकी, स्त्री० (की) वनौषधि जीस मुंगसी, मुंगुसवेल असें म्हणतात ती.

छद, पु० (दः) पर्ण, पान. २ पक्ष, पीस. ३ तमालवृक्ष. ४ वनौ० जीस गंठीवन, भटोरा असें म्हणतात ती.

छंद, पु० (दः) वेद. २ वंश. ३ अभिप्राय, आशय. ४ वि० (दःदा-दं) वश, अधीन.

छदन, न० (नं) पर्ण, पान. २ झांकण.

छंदस्, न० (दः) पद्य. २ स्वैछाचार. ३ गायत्री, उष्णिक् इत्यादि छंद. ४ इच्छा. ५ वेद.

छदिस्, स्त्री० (दिः) शाकार.

छद्मतापस, पु० (सः) कपटी तपस्वी.

छद्मन्, न० (द्म) अपदंश. २ कपट.

छन्न, न० (न्नं) एकांत स्थळ. २ वि० (न्नः न्ना न्नं) आच्छादित, आच्छादलेला.

छर्दन, पु० (नः) निंबवृक्ष. २ भोंपळा. ३ न० (नं) वमन, ओकणें.

छल, न० (लं) कपट. २ युद्धमर्यादेपासून चलन, युद्धमर्यादास्खलन.

छल्ली, स्त्री० (ल्ली) वेल वाढणें. २ वल्कल. ३ पुष्पविशेष.

छवि, स्त्री० (विः) शोभा. २ कांति.

छाग, पु० (गः) अज, बोकड.

छागण, पु० (णः) करीषाग्नि, शेणीचा विस्तव.

छागवाहन, पु० (नः) अग्नि.

छागी, स्त्री० (गी) शेळी.

छात, वि० (तःता-तं) अशक्त. २ खंडित, तोडलेला.

छात्र, पु० (त्रः) शिष्य.

छात्रगंड, पु० (डः) पदें वगैरे जाणणारा.

छांदस, पु० (सः) वेदाध्यायी, वेद पढणारा.

छादित, वि० (तःता-तं) आच्छादित, आच्छादलेला.

छाया, स्त्री० (या) शनीची माता. २ सूर्याची स्त्री. ३ कांति, तेज. ४ प्रतिबिंब. ५ अनातप. ६ पंक्ति. ७ उत्कोच, लाच. ८ पालन. ९ शोभा. १० अंधकार.

छायातरु, पु० (रुः) निबिडवृक्ष.

छायात्मज, पु० (जः) शनी नांवाचा ग्रह.

छायापथ, पु० (थः) देवमार्ग.

छायामृगधर, पु० (रः) चंद्र.

छायासुत, पु० (तः) शनी नामें ग्रह.

छित, वि० (तःता-तं) खंडित, तोडलेला.

छिदिर, पु० (रः) अग्नि. २ रज्जु. ३ अस्त्रविशेष. ४ कुऱ्हाड.

छिदुर, पु० (रः) छेदन द्रव्य. २ धूर्त. ३ वैरी. ४ पाहिजे तसें बोलणारा.

छिद्र, न० (द्रं) दूषण. २ रंध्र, भोंक.

छिद्रित, वि० (तःता-तं) छिद्र पाडलेला, वेध पाडलेला.

छिन्न, वि० (न्नःन्ना-न्नं) खंडित, तोडलेला.

छिन्नरुहा, स्त्री० (हा) वनौषधि जीस गुळवेल असें म्हणतात ती.

छिन्ना, स्त्री० (न्ना) गुळवेल.

छुछुंदरी, स्त्री० (री) चिचुंद्री.

छुप, पु० (पः) ज्याच्या फांद्या व मूळ लहान आहे असा जो वृक्ष तो. २ स्पर्श करणें.

छुरा, स्त्री० (रा) आंगाला लावण्याचें सुवासिक उटणें.

**छुरिका**, स्त्री० (का) सुरी.
**छेक**, पु० (कः) गृहाचे ठिकाणीं आसक्त जो पक्षि किंवा मृग तो. २ भ्रमर. ३ जो मृग जाती किंवा पाक्षि घरांत पिंजऱ्यामध्यें वगैरे चमत्कारार्थ घालून ठेवितात तो. ४ वि० (कःका-कं) शहरांतील. ५ वांकडा.
**छेद**, पु० (दः) भाग, अंश. २ कापणें, तोडणें.
**छेदन**, न० (नं) कर्तन, कातरणें. ५ छेदणें.
**छेदोक्ति**, स्त्री० (क्तिः) कुटिल भाषण.
**छोटी**, पु० (टी) ढिवर.
**छोरण**, न० (णं) परित्याग.



## ज.

**ज**, पु० (जः) महादेव. २ बाप. ३ विष्णु. ४ उत्पत्ति.
**जकुट**, न० (टं) डोरली वायंगीचें फूल. २ पु० (टः) मलय पर्वत. ३ कुत्रा.
**जगच्चक्षु**, पु० (क्षुः) सूर्य.
**जगत्**, पु० (त्) वायू. २ न० (त्) भुवन, लोक. ३ वि० (त्- ती- त्) जंगम, चर.
**जगती**, स्त्री० (ती) भूमि. २ भुवन, लोक. ३ जगतीनामक छंदोविशेष. ४ जंगमा.
**जगत्प्राण**, पु० (णः) वायु.
**जगद्बल**, पु० (लः) वायु.
**जगद्योनि**, पु० (निः) महादेव, ब्रम्हदेव.
**जगद्वहा**, स्त्री० (हा) पृथ्वी.
**जगनु**, पु० (नुः) जंतु. २ अग्नि.
**जगन्नाथ**, पु० (थः) विष्णु.
**जंगम**, वि० (मः मा- मं) चर, जंगम.
**जंगमकुटी**, स्त्री० (टी) छत्री.
**जंगमेतर**, वि० (रः रा- रं) स्थावर, अचर.
**जगर**, पु० (रः) चिलखत.
**जगल**, वि० (लः ला- लं) धूर्त. २ पु० (लः) धोत्र्याचें झाड. ३ सुराकल्क, मद्याचा कल्क. ४ पिठापासून झालेलें मद्य असेंही कोणी म्हणतात.
**जंगल**, वि० (लः ला- लं) निर्जन स्थान.
**जंगला**, स्त्री० (ला) मांस.
**जग्ध**, वि० (ग्धः ग्धा- ग्धं) खादित, भक्षित, खाल्लेलें.
**जग्धि**, स्त्री० (ग्धिः) भोजन. २ सहभोजन, पंक्तिबरोबर जेवणें.
**जघन**, न० (नं) स्त्रियांच्या कमरेचा पुढचा भाग ज्यास बांदन ओंटी असें म्हणतात ती.
**जंघन**, न० (नं) स्त्रियांच्या कमरेचा पुढचा भाग ज्यास बांदन ओंटी असें म्हणतात ती. २ कमर.
**जघनेफला**, स्त्री० (ला) वनौषधि. ज्यास काळा उंबर, बोखाडा, खर्वत असें म्हणतात तो वृक्ष.
**जघन्य**, पु० (न्यः) शूद्र. २ वि० (न्यः- न्या- न्यं) अंत्य, शेवटचा, चरम. ३ अधम. ४ न० (न्यं) शिश्न.
**जघन्यज**, पु० (जः) शूद्र. २ धाकटा बंधु.
**जंघा**, स्त्री० (घा) पोटरी, नांध.
**जंघाकारिक**, पु०(कः) गतिबलें करून उपजीविका करणारा, जासूद.

**जंघात्राण**, न० (णं) जांघेचें रक्षण करणारें वस्त्र.

**जंघाल**, पु० (लः) जंघील, अतिवेगवान, फार लौकर जाणारा.

**जंघिल**, पु० (लः) अतिवेगवान, फार लौकर जाणारा.

**जटा**, स्त्री० (टा) पिंपरीचें झाड. २ तपश्चर्या करणारांची शेंडी. ३ संश्लिष्टकेश, जटा. ४ वृक्षाचें मूळ. ५ जटामांशी नामक लताविशेष. ६ वेदविकृति, जटा.

**जटाचीर**, पु० (रः) महादेव.

**जटाजूट**, पु० (टः) संश्लिष्ट केशांचा बुचडा.

**जटाज्वाल**, पु० (लः) दिवा.

**जटाटंक**, पु० (कः) महादेव.

**जटाधर**, पु० (रः) बौद्धभेद. २ महादेव.

**जटामांसी**, स्त्री० (सी) लताविशेष.

**जटायु**, पु० (युः) अरुणाचा पुत्र, संपातीचा कनिष्ट बंधु. २ गुग्गुळ.

**जटि**, पु० (टिः) पिंपरीचें झाड.

**जटिन्**, पु० (टी) पिंपरीचें झाड.

**जटिल**, वि० (लःला-लं) ज्याला जटा आहेत तो.

**जटिला**, स्त्री० (ला) लताविशेष. २ पिंपळी.

**जटुल**, पु० (लः) शरीरावर काळें चिन्ह क्वचित असतें ज्यास लासें असें म्हणतात तें.

**जठर**, पु० (रः) वृद्ध. २ खेंकडा. ३ पु० न० (रःरं) कुक्षि, पोट. ४ वि० (रःरा-रं) कठीण.

**जड**, वि० (डःडा-डं) मूर्ख. २ मुका. ३ शीतल, थंड.

**जडा**, स्त्री० (डा) वनौ० जीस कुवली, कुहिरी असें म्हणतात ती.

**जडुल**, पु० (लः) शरीरावर काळें चिन्ह क्वचित असतें ज्यास लासें म्हणतात तें.

**जतु**, पु० (तुः) लाक्षा, लाख.

**जंतु**, पु० (तुः) प्राणी.

**जतुक**, न० (कं) लाक्षा, लाख. २ हिंगुवृक्षाचा डीक.

**जतुका**, स्त्री० (का) चक्रवर्तिनी नामक शाकविशेष, चाकवत. २ पक्षिविशेष ज्यास बटुरा, चामचिराई असें म्हणतात तो.

**जतुपुत्रक**, पु० (कः) नीति.

**जंतुफल**, पु० (लः) उंबर, उंबराचें झाड.

**जतूका**, स्त्री० (का) चक्रवर्तिनीनामक शाकविशेष चाकवत. २ पक्षिविशेष, ज्यास बटुरी, चामाचिराई असें म्हणतात तो.

**जत्रु**, न० (त्रु) बाहु आणि मस्तक ह्यांचा संधि.

**जन**, पु० (नः) लोक. २ महर्लोकाच्या पलीकडील लोक. ३ नीच, अधम.

**जनक**, पु० (कः) राजविशेष. २ बाप.

**जनंगम**, पु० (मः) चांडाळ.

**जनता**, स्त्री० (ता) जनांचा समूह.

**जनन**, न० (नं) जन्म. २ वंश, कुल.

**जननी**, स्त्री० (नी) आई. २ दया.

**जनपद**, पु० (दः) देश. २ जन.

**जनयितृ**, पु० (ता) बाप.

**जनयित्री**, स्त्री० (त्री) माता, आई.

**जनश्रुति**, स्त्री० (तिः) लोकप्रवाद, लोकवार्ता.

**जनांतिक**, न० (कं) भेट.

**जनार्दन**, पु० (नः) विष्णु.

**जनाश्रय**, पु० (यः) मंडप, मांडव.

**जनि**, स्त्री० (निः) जन्म. २ चक्रवर्तिनी नामक शाक विशेष जीस चाकवत असें म्हणतात ती. ३ पुत्राची भार्या, सून.

**जनित्री**, स्त्री० (त्री) माता, आई.
**जनी**, स्त्री० (नी) उत्पत्ति. २ स्त्री, बायको ३ चक्रवर्तिनी नामक शाक जीस चाकवत असे म्हणतात ती. ४ पुत्राची भार्या, सून.
**जनुस्**, न० (नुः) जन्म.
**जन्मकील**, पु० (लः) विष्णु.
**जन्मन्**, न० (न्म) उत्पत्ति.
**जन्मवर्त्मन्**, न० (र्त्म) योनी.
**जन्मिन्**, पु०(न्मी) प्राणी.
**जन्य**, न० (न्यं) बाजार. २ डोहो. ३ पु० (न्यः) बाप. ४ सेवक. ५ जावयाचा स्नेही. ६ न० (न्यं) युद्ध. ७ जनवाद, लोकापवाद.
**जन्या**, स्त्री० (न्या) माता. २ मातेची सखी, स्नेहीण. ३ नूतन लग्न झालेली स्त्री. ४ ज्ञाति.
**जन्यु**,पु० (न्युः) अग्नि. २ब्रम्हदेव. ३ प्राणी.
(**जन्हु**) पु० (न्हुः) विष्णु. २ राजर्षिविशेष. ३ मधुसूदन.
**जन्हुतनया**, स्त्री० (या) भागीरथी नदी.
**जप**, पु० (पः) वेदाभ्यास. २ मंत्राचें वारंवार उच्चारणे करून संख्या करणें.
**जंपति**, स्त्री० (ती) बायको आणि नवरा (ही दोघांची सहोक्ति आहे.)
**जपा**, स्त्री० (पा) जास्वंदीचें झाड.
**जपापुष्प**, न० (ष्पं) जास्वंदीचें फूल.
**जंबाल**, न० (लं) शेवाळ. २ चिखल.
**जंबालिनी**, स्त्री० (नी) नदी.
**जंबीर**, पु० (रः) इडाचें झाड. २ वनौ० ज्यास जंबीर, पांढरा मरवा असें म्हणतात तो. ३ वनौषधिविशेष ज्यास श्वेत मरवा असें म्हणतात तो.

**जंबु**, न० (बु) जांबाचें झाड. २ सप्तद्वीपांतील एक. ३ नदीविशेष.
**जंबुक**, पु० (कः) कोल्हा. २ नीच. ३ पश्चिम दिशेचा पति.
**जंबूल**, पु० (लः) जांबाचें झाड. २ केवडा.
**जंभ**, पु० (भः) दांत. २ दैत्यविशेष. ३ व्यवहार. ४ भक्षण. ५ लहान जें इडनिंबु त्याचें झाड. ६ वनौषधिविशेष ज्यास श्वेत मरवा असें म्हणतात तो.
**जंभभेदिन्**, पु० (दी) इंद्र..
**जंभल**, पु० (लः) पूर्वीचा यक्ष. २ बुद्धदेवविशेष. ३ लहान जें इडनिंबु त्याचें झाड. ४ वनौषधिविशेष ज्यास श्वेत मरवा असें म्हणतात तो.
**जंभारि**, पु० (रिः) वज्र. २ इंद्राचा हत्ती.
**जंभीर**, पु० (रः) लहान जें इडनिंबु त्याचें झाड. २ वनौषधिविशेष ज्यास श्वेत मरवा असें म्हणतात तो.
**जय**, पु० (यः) नरवेलीचें झाड. २ इंद्राचा पुत्र. ३ विजय. ४ धर्मराज. ५ शत्रूस परांग्मुख केल्यानें प्राप्त जो उत्कर्षविशेष तो.
**जयंत**, पु० (तः) महादेव. २ भयानक नामरस (नाट्य प्रकरणांत.) ३ चंद्र. ४ इंद्राचा पुत्र जो जयंतनामा तो.
**जयंती**, स्त्री० (ती) गौरी, पार्वती. २ पताका. ३ इंद्राची कन्या. ४ वनौषधिविशेष जीस टाहाकळ, येरएरण असें म्हणतात ती.
**जयन**, न० (नं) घोड्याचें जीन. २ जय, विजय.
**जया**, स्त्री० (या) पार्वतीची सखी. २ लक्ष्मी. ३ तिथिविशेष. ४ हिरड्याचें झाड. ५

पार्वती. ६ वनौषधिविशेष जीस टाहाकळ, थोरएरण असें म्हणतात ती.

**जय्य**, वि० (य्यः य्या य्यं) जिंकण्यास शक्य.

**जरठ**, वि० (ठः ठा ठं) कर्कश. २ पांढरा. ३ कठीण.

**जरण**, न० (णं) हिंग. २ खारविशेष ज्यास संचळ खार असें म्हणतात तो. ३ जिरें.

**जरत्**, पु० (न्) वृद्ध, म्हातारा.

**जरंत**, पु० (तः) म्हातारा.

**जरद्गव**, पु० (वः) म्हातारा बैल.

**जरा**, स्त्री० (रा) ज्या अवस्थेनें शरीर जीर्ण होतें ती, म्हातारपणा.

**जराभीरु**, पु० (रुः) मदन.

**जरायु**, पु० (युः) पक्षिराज. २ गर्भाशय, ज्या चर्मानें जठरामध्यें गर्भ वेष्टित असतो तें चर्म, वार.

**जरायुज**, वि० (जः जा जं) मनुष्यपश्वादिक.

**जरूथ**, पु० (थः) मांस.

**जर्जर**, न० (रं) शेवाळ. २ इंद्राचा ध्वज. ३ वि० (रः रा रं) जर्रे करून आतुर झालेला.

**जर्जरीक**, पु० (कः) वार्धक्यानें जो क्षीण झाला तो. २ ज्याला बहुत छिद्रें पडलीं आहेत तो पदार्थ. (वस्त्रादि.)

**जर्णु**, पु० (र्णुः) चंद्र. २ वृक्ष.

**जर्तिल**, पु० (लः) निष्फळ तीळ, वांझा तीळ, रान तीळ.

**जल**, न० (लं) उदक, पाणी. २ वनौषधि ज्यास वाळा असें म्हणतात तो. ३ वि० (लः ला लं) थंड.

**जलकंटक**, पु० (कः) सुसर.

**जलकपि**, पु० (पिः) जलचरवि० ज्यास शिशुमार असें म्ह० तो.

**जलकरंक**, पु० (कः) शंख. २ नारळ.

**जलकरंडक**, पु० (कः) नारळ. २ कमळ. ३ शंख. ४ मेघ. ५ पाण्यांतील वेळ.

**जलकल्क**, पु० (ल्कः) चिखल.

**जलकांक्ष**, पु० (क्षः) हत्ती.

**जलकांक्षी**, (क्षी) हत्ती.

**जलकिराट**, पु० (टः) जलचरवि० ज्यास नाडेसावज, सुसर असें म्ह० ती.

**जलकुक्कुटी**, स्त्री० (टी) पक्षि वि०.

**जलकुकुभ**, पु० (भः) पक्षिवि० ज्यास कोंढा असें म्ह० तो.

**जलकूपी**, स्त्री० (पी) लहान सरोवर. २ कूपगर्त (गर्त म्हणजे खळगा.)

**जलकूर्म**, पु० (र्मः) जलचरवि० ज्यास शिशुमार असे म्ह० तो.

**जलकेश**, न० (शं) शेवाळ.

**जलक्रीडा**, स्त्री० (डा) जलक्रीडा.

**जलंगम**, पु० (मः) चांडाळ.

**जलगुल्म**, पु० (ल्मः) पाण्याचा भोंवरा. २ कांसव.

**जलज**, न० (जं) कमळ. २ पु० (जः) शंख.

**जलजंतु**, पु० (तुः) जलचर प्राणी.

**जलजिव्हा**, स्त्री० (व्हा) सुसर.

**जलडिंब**, पु० (बः) पाण्यांतील लहान शिंप.

**जलताल**, पु० (लः) मत्स्य विशेष.

**जलत्रा**, स्त्री० (त्रा) छत्री.

**जलद**, पु० (दः) मेघ. २ नागरमोथा.

**जलधर**, पु० (रः) मेघ.

**जलधिजा**, स्त्री० (जा) लक्ष्मी.

**जलनिधि**, पु० (धिः) समुद्र.

**जलनिर्गम**, पु० (मः) चक्राकार जें जल फिरतें तें, भोंवरा.

**जलनीली**, स्त्री० (ली) शेवाळ.
**जलप्राय**, वि० (यःया-यं) जलमय, पांथळ.
**जलबिल्व**, पु० (ल्वः) वेखंड.
**जलब्रम्ही**, स्त्री० (म्ही) चाकवताची भाजी.
**जलब्राम्ही**, स्त्री० (म्ही) चाकवताची भाजी.
**जलमद्गु**, पु० (द्गुः) पक्षि विशेष.
**जलमसि**, पु० (सिः) मेघ.
**जलमक्षिका**, स्त्री० (का) जलचर विशेष.
**जलमार्जार**, पु० (रः) जलचर विशेष ज्यास पाण्यांतील मांजर, पाणमांजर असें म्हणतात तें.
**जलमुच्**, पु० (क्) मेघ.
**जलरस**, न० (सं) खारें मीठ.
**जलरुंड**, पु० (डः) पाण्याचा भोंवरा. २ पाण्याचा तुषारा. ३ सर्प.
**जलरूप**, पु० (पः) सुसर.
**जललता**, स्त्री० (ता) लहरी, लाट.
**जलवरंट**, पु० (टः) रोगविशेष.
**जलवल्कल**, न० (लं) जलकुंभी ह्याच नांवानें प्रसिद्ध आहे.
**जलवृश्चिक**, पु० (कः) जलचर विशेष ज्यास जलविंचु असें म्ह० तो.
**जलव्यथ**, पु० (थः) मत्स्यविशेष.
**जलव्यध**, पु० (धः) मत्स्यविशेष.
**जलव्याल**, पु० (लः) पाणसर्प, विरोळें.
**जलशायिन्**, पु० (यी) विष्णु.
**जलशुक्ति**, स्त्री० (क्तिः) लहान शिंपी.
**जलशूकर**, पु० (रः) जलचरविशेष.
**जलसूचि**, स्त्री० (चिः) जळू. २ मत्स्य, मासा. ३ जलचरविशेष.
**जलह**, न० (हं) लहान जलयंत्र.
**जलहास**, पु० (सः) समुद्रफेणी.
**जलाखु**, पु० (खुः) चलचरविशेष.
**जलांचल**, न० (लं) शेवाळ. २ पाझर.
**जलांटक**, पु० (कः) जलचरविशेष ज्यास नाडे सावज, सुसर असें म्हणतात ती.
**जलाटन**, पु० (नः) ज्याचीं पिसें बाणास उपयोगी पडतात तो पक्षिविशेष.
**जलाटनी**, स्त्री० (नी) जळू.
**जलांडक**, पु० (कः) लहान मत्स्यांच्या पिलांचा समूह.
**जलांतक**, पु० (कः) सप्त समुद्रांतील एक.
**जलाधार**, पु० (रः) तळें वगैरे जें पाण्याचें आधारभूत स्थळ तें. २ बांधारा-बांध.
**जलांबिका**, स्त्री० (का) विहीर.
**जलार्णव**, पु० (वः) वर्षाऋतु.
**जलार्द्र**, न० (र्द्रं) ओलें वस्त्र.
**जलाशय**, पु० (यः) जलाधार, हौद. २ न० (यं) काळे वाळ्याचें मूळ.
**जलाष्ठीली**, स्त्री० (ली) लहान सरोवर.
**जलूका**, स्त्री० (का) जळू.
**जलेंद्र**, पु० (द्रः) वरुण. २ पूर्वींचा यक्ष. ३ वनौषधि ज्यास श्वेत मरवा असें म्हणतात तो. ४ महोदधि नामें समुद्र.
**जलोका**, स्त्री० (का) जळू.
**जलोछ्वास**, पु० (सः) तळ्यांत वगैरे पुष्कळ भरलेलें पाणी ज्या मार्गानें बाहेर वाहातें तो मार्ग.
**जलौकस्**, स्त्री० ब० (सः) जळू. (जलौकसः जलौकाभिः असा बहुवचनांत अमरकोशांत आहे, परंतु संसारावर्तवेतारपाल ह्या कोशावरून बहुत्व अप्रयोजक दिसतें.

**जलौका**, स्त्री० (का) जळू.

**जल्पाक**, वि० (कः की- कं) बहुत अवाच्य भाषणें करणारा.

**जल्पित**, वि० (तः ता- तं) उक्त, बोललेला.

**जव**, पु० (वः) वेग. २ वि० (वः वा- वं) वेगवान्.

**जवन**, वि० (नः ना- नं) अति वेगवान्. (अश्व वगैरे) २ न० (नं) वेग. ३ पु० (नः) देशविशेष.

**जवनिका**, स्त्री० (का) पडदा, कनात इत्यादि.

**जवा**, स्त्री० (वा) जास्वंदीचें झाड.

**जहक**, पु० (कः) दिनरात्री इत्यादि काल.

**जागर**, पु० (रः) कवच, चिलखत. २ जागरण.

**जागरण**, न० (णं) जागरण.

**जागरा**, स्त्री० (रा) जागरण.

**जागरितृ**, वि० (ता- त्री- तृ) जागरूपक, जागरणशील.

**जागरूक**, वि० (कः का- कं) जागरणशील.

**जागर्ति**, स्त्री० (र्तिः) जागरण.

**जागर्या**, स्त्री० (र्या) जागरण.

**जांगलविष**, न० (षं) गरळ.

**जांगली**, स्त्री० (ली) विषविद्या, गारुड विद्या. २ वनौषधि जीस कुवली, कुहिरी असें म्हणतात ती.

**जागुड**, न० (डं) कुंकु, रंग, पिंजर.

**जांगुलिक**, पु० (कः) विषवैद्य, गारुडी.

**जाग्रिया**, स्त्री० (या) जागरण.

**जांघिक**, पु० (कः) गतिबलें करून उपजीविका करणारा, जासूद.

**जाघनी**, स्त्री० (नी) बेंबी.

**जात**, न० (तं) ओघ. २ ब्राम्हणत्वादि जाति. ३ वि० (तः ता- तं) उत्पन्न.

**जातरूप**, न० (पं) सुवर्ण, सोनें.

**जातवेदस्**, पु० (दाः) अग्नि.

**जातापत्या**, स्त्री० (त्या) प्रसूत झालेली स्त्री.

**जाति**, स्त्री० (तिः) जन्म, उत्पत्ति. २ पुष्पलताविशेष जीस जाई असें म्हणतात ती. ३ आंवळीचें झाड. ४ ब्राम्हणत्वादि जाति. ५ जायफळ. ६ चूल. ७ छंद विशेष. ८ वंश, कुल.

**जातिकोश**, पु० (शः) जायफळ.

**जातिफल**, न० (लं) जायफळ.

**जाती**, स्त्री० (ती) पुष्पलताविशेष जीस जाई असें म्हणतात ती. २ जायफळ.

**जातीकोश**, पु० (शः) जायफळ,

**जातीकोष**, पु० (षः) जायफळ.

**जातीफल**. न० (लं) जायफळ.

**जातु**, अ० कदाचित् ह्या अर्थी उ० नजातुकामाद्धर्मंत्यजेत्.

**जातुधान**, पु० (नः) राक्षस.

**जातुष** वि० (षःषा-षं) लाक्षाविकृति, लाखेचें (पात्र.)

**जातोक्ष**, पु० (क्षः) बलीवर्द भावातें पावलेला बैल, प्रौढ दशेस आलेला बैल.

**जानकी**, स्त्री० (की) रामचंद्राची स्त्री.

**जानपद**, पु० (दः) नगरवासी. २ देश. ३ जन.

**जानु**, न० (नु) ढोंपर, गुढगा.

**जांबव**, न० (वं) जांवूळ.

**जाबाल**, पु० (लः) अजपाल, मेंढपाल, धनगर.

**जाबाला**, स्त्री (ला) धनगरीण.

**जांबुनद**, न० (दं) सुवर्ण, सोनें.

**जामातृ**, पु० (ता) आपले कन्येचा नवरा, जावई. २ नवरा.

**जामि**, स्त्री० (मिः) भगिनी, बहीण. २ कुलस्त्री, कुलवधू.

**जायक** न० (कं) सुवासिक द्रव्यविशेष ज्यास पीत चंदन असें म्हणतात तें.

**जाया**, स्त्री० (या) विवाहित स्त्री, भार्या.

**जायाजीव**, पु० (वः) स्त्रीवेषानें नर्तनादिक व्यापार करून उपजीविका करणारा, नट.

**जायापती**, पु० (ती) बायको आणि नवरा (ह्या दोघांचीही सहोक्ति.)

**जायानुजीविन्**, पु० (वी) नट. २ बक पक्षि.

**जायापती**, पु० (ती) बायको आणि नवरा (ह्या दोघांचीही सहोक्ति.)

**जायु**, पु० (युः) औषध.

**जार**, पु० (रः) जारपुरुष, मुख्य नवऱ्यावांचून जो दुसरा पति तो, सोयरा.

**जारी**, स्त्री० (री) औषधि विशेष. २ पु० (री) जार पुरुष.

**जाल**, पु० (लः) कळंबाचें झाड. २ न० (लं) जाळें. ३ समूह. ४ गवाक्ष, खिडकी. ५ अस्फुट कलिका, प्रफुल्लित होण्यास योग्य न झालेली कळी. ६ दंभ, कपट.

**जालक**, न० (कं) दंभ, कपट. २ पक्षिगृह, ज्यास घरटा असें म्हणतात तो. ३ जाळें. ४ शेवग्याची शेंग. ५ वस्त्रविशेष. ६ नूतन कलिका, अस्फुटकळी.

**जालका**, स्त्री० (का) जळू. २ विधवा स्त्री.

**जालकिनी**, स्त्री० (नी) मेंढी.

**जालगोणिका**, स्त्री० (का) कंठाळ.

**जालपाद्**, पु० (त्) हंसपक्षि.

**जालिक**, पु० (कः) जाळ्यानें मृगादिकांस धरणारा. २ मत्स्य मारणारा, ढिवर.

**जालिका**, स्त्री० (का) विधवा स्त्री. २ जाळीदार कवच. ३ जाळें.

**जाली**, स्त्री० (ली) पडवळीची वेल.

**जाल्म**, पु० (ल्मः) क्रूर. २ नीच, पामर. ३ गुणदोष विचार न करितां कार्य करणारा.

**जाहक**, पु० (कः) मांजर.

**जिंगी**, स्त्री० (गी) वनौषधि मंजिष्ठा.

**जिघत्सु**, वि० (त्सुः त्सुः त्सु) बुभुक्षित, भूकेलेला.

**जित्वर**, वि० (रः री रं) जयशील, यशस्वी.

**जित्वरी**, स्त्री० (री) काशीक्षेत्र.

**जिन**, पु० (नः) बुद्ध, नास्तिक. २ जय करणारा. ३ बौद्धावतार.

**जिम्ह**, पु० (म्हः) कुटिल. २ न० (म्हं) तगरीचें झाड. ३ वि० (म्हः म्हा म्हं) वक्र, वांकडा. ४ अलस, आळशी.

**जिम्हग**, पु० (गः) मंद गमन करणारा. २ सर्प.

**जिवाजिव**, पु० (वः) ज्याचीं पिसें मोराच्या पिसासारिखीं आहेत असा एक पक्षि.

**जिष्णु**, पु० (ष्णुः) अर्जून. २ इंद्र. ३ वि० (ष्णुः ष्णुः ष्णु) जयशील.

**जिव्ह**, पु० ( व्हः ) बेडूक.
**जिव्हा**, स्त्री० ( व्हा ) जीभ.
**जिव्हादुर**, पु० (रः) पक्षि.
**जिव्हाप**, पु० (पः) मांजर. २ कुत्रा.
**जिव्हामल**, न० ( लं ) जिभेचा मळ.
**जीन**, पु० ( नः ) वृद्ध, म्हातारा.
**जीमूत**, पु० (तः) पर्वत. २ मेघ. ३ वृक्ष विशेष ज्यास देवताली, देवडंगरी असें म्हणतात तो. ४ धैर्ययुक्त. ५ कौरवाचे जवळचा मल्ल.
**जीर**, पु० (रः) जिरें. २ खड्ग.
**जीरक**, पु० ( कः ) जिरें.
**जीर्ण**, न० (र्णं ) परिपक्क. २ प्राचीन. ३ वृद्ध.
**जीर्णपर्ण**, न० (र्णं) शिरस. २ कळंब.
**जीर्णवस्त्र**, न० ( स्त्रं ) जुनें वस्त्र.
**जीर्णि**, स्त्री० ( र्णिः ) जीर्णता, जीर्णपणा.
**जीव**, पु० (वः) जीव. २ वृक्षविशेष. ३ गुरुनामा ग्रह. ४ प्राण धारण. ५ प्राण धारण करणारा. ६ पु० न० ( वः·वं ) जीवित.
**जीवक**, पु० ( कः ) कृपण. २ असणाचें झाड. ३ वनौषधि विशेष.
**जीवजीव**, पु० ( वः ) ज्याचीं पिसें मोराच्या पिसासारिखीं आहेत असा एक पक्षि.
**जीवंजीव**, पु० (वः) चकोरपक्षि. २ वृक्ष विशेष. ३ ज्याचीं पिसें मोराच्या पिसासारिखीं आहेत असा एक पक्षि.
**जीवंतिक**, पु० ( कः ) पक्षिहंता, पक्ष्यांचा पारधी.
**जीवंतिका**, स्त्री० ( का ) वनौषधि जीस हरणवेल, हरणदोडी असें म्हणतात ती. २ वृक्षावर उत्पन्न झालेली लताविशेष ज्यास बांदे असें म्हणतात ती. ३ गुळवेल.
**जीवंती**, स्त्री० (ती) शमी. २ गुळवेल. ३ वृक्षावर झालेली लताविशेष जीस बांदें वेटांगुळी असें म्हणतात ती. ४ वनौषधि जीस हरणवेल, हरणदोडी असें म्हणतात ती.
**जीवद**, पु० (दः) वैद्य. २ शत्रु.
**जीवधन**, न० (नं) गोधन, गाईचा समूह.
**जीवन**, न० (नं) प्राणधारण. २ उदक, पाणी. ३ उपजीविका.
**जीवना**, स्त्री० (ना) वनौषधि जीस हरणवेल, हरणदोडी असें म्हणतात ती.
**जीवनी**, स्त्री० (नी) वनौषधि जीस हरणवेल, हरणदोडी असें म्हणतात ती.
**जीवनीया**, स्त्री० (या) वनौ० जीस हरणवेल, हरणदोडी असें म्हणतात ती.
**जीवनौषध**, न० (धं) जीव रक्षण करण्याचा उपाय.
**जीवा**, स्त्री० (वा) वेखंड. २ पृथ्वी. ३ वनौषधि जीस हरणवेल, हरणदोडी असें म्हणतात ती. ४ धनुष्याची दोरी.
**जीवांतक**, पु० (कः) पक्ष्यांचा पारधी.
**जीवातु**, पु० (तुः) वांचणें. २ अन्न. ३ जीव रक्षण करण्याचा उपाय, जी वनौषध.
**जीवास्या**, स्त्री० (स्या) धनुष्याची दोरी.
**जीविक**, वि० (कःकाकं) सेवन करणारा. २ पु० (कः) गारुडी.
**जीविका**, स्त्री०(का) उपजीविका.
**जीवितकाल**, पु० (लः) आयुष्य.
**जीवितेश**, पु० (शः)यम. २ नाथ, मालक.

**जुंग**, पु० स्त्री० (गः गा) वनौषधि जीस वृद्धदारक, वरधारा असें म्हणतात ती.

**जुगुप्सा**, स्त्री० (प्सा) निंदा.

**जुष्ट**, न० (ष्टं) खरकटें. २ वि० (ष्टः ष्टा-ष्टं) सेवन केलेलें.

**जुहुवाण**, पु० (णः) यजुर्वेदी ऋत्विज. २ अग्नि.

**जुहु**, स्त्री० (हुः) स्रुक् म्हणून जें होमपात्र तें.

**जू**. स्त्री० (जूः) लौकर जाणें. २ जाणें. ३ आकाशवाणी. ४ पिशाच. ५ अतिवेगवान.

**जूति**, स्त्री० (तिः) वेग.

**जूर्ति**, स्त्री० (र्तिः) ज्वर.

**जृंभ**, पु० (भः) जांभई.

**जृंभण**, न० (णं) जांभई.

**जृंभा**, स्त्री० (भा) विकासणें, उमलणें. २ जांभई.

**जृंभित**, न० (तं) स्त्रियांचें नृत्य. २ चेष्टा.

**जेंगट**, पु० (टः) डोहळा.

**जेतृ**, वि० (ता.त्री.तृ) जेता, जिंकणारा. २ जयशील.

**जेमन**, न० (नं) जेवण, भोजन.

**जेय**, वि० (यः या-यं) जेतव्य, जिंकण्यास योग्य.

**जैत्र**, वि० (त्रः त्री-त्रं) जयशील.

**जैमिनीय**, पु० (यः) मीमांसाशास्त्र जाणणारा.

**जैमिन्याद्या**, पु० (द्याः) कांदर्षयः

**जैवातृक**, पु० (कः) चंद्र. २ कुश, दर्भ. ३ आयुष्मान.

**जोंग**, पु० (गः) कृष्णागरुचंदन.

**जोंगक**, पु० (कः) कृष्णागरुचंदन. २ अगरु, लांकूड.

**जोटिंग**, पु० (गः) महादेव.

**जोटिंट**, पु० (टः) नवीन मुंज झालेला.

**जोतीरथ**, पु० (थः) ध्रुव.

**जोषं**, अ० तूष्णीं, उगे रहाणें. २ सुख या अर्थी.उ०'जोषंतिष्ठ. २जोषमासीत वर्षासु. ३ स्तुति. ४ अतिक्रमण.

**जोषा**, स्त्री० (षा) स्त्री, बायको.

**जोषित्**, स्त्री० (ता) स्त्री, बायको.

**जोषिता**, स्त्री० (ता) स्त्री, बायको.

**ज्या**, स्त्री० (ज्या) माता. २ धनुष्याची दोरी. ३ पृथ्वी.

**ज्यानि**, स्त्री० (निः) जीर्णता, जीर्णपणा. २ हानी. ३ नदी.

**ज्यायस्**, वि० (यान्- यसी- यः) अतिवृद्ध. २ अति स्तुत्य.

**ज्येष्ठ** पु० (ष्ठः) ज्येष्ठमास. २ श्रेष्ठ. ३ वृद्ध. ४ अत्यंत प्रशस्त. ५ ज्येष्ठ बंधु.

**ज्येष्ठा**, स्त्री० (ष्ठा) पाल. २ ज्येष्ठानक्षत्र. ३ आकाबाई लक्ष्मीची वडील बहीण.

**ज्येष्ठांबु**, न० (बु) पातळ पदार्थावरची निवळी.

**ज्येष्ठामूलीय**, पु० (यः) ज्येष्ठमास.

**ज्येष्ठाश्रमिन्**, पु० (मी) गृहस्थाश्रमी.

**ज्योति**, पु० (तिः) काजवा. २ अग्नि. ३ सूर्य.

**ज्योतिरिंगण**, पु० (णः) काजवा.

**ज्योतिर्बीज**, पु० (जः) काजवा.

**ज्योतिषिक**, पु० (कः) ज्योतिषी, जोशी.

**ज्योतिष्मती**, स्त्री० (ती) वनौषधि जीस मालकांगोणी असें म्ह० ती.

**ज्योतिस्**, न० (तिः) नक्षत्र. २ प्रकाश. ३ दृष्टी, डोळा.

**ज्योतीरथ**, पु० (थः) ध्रु.

**ज्योत्स्ना**, स्त्री० (त्स्ना) चांदणी रात्र. २ चंद्राचा प्रकाश, चांदणें. ३ शाकवि० जीस पडवळी असें म्ह० ती.

**ज्योत्स्नावृक्ष**, पु० (क्षः) मोठा दिवा.

**ज्योत्स्नी**, स्त्री० (त्स्नी) चांदणी रात्र. २ शाकवि० जीस पडवळीची वेल असें म्ह० ती.

**ज्वर**, न० (रं) आंतडें. २ ज्वर, ताप.

**ज्वराग्नि**, पु० (ग्निः) ज्वराग्नि.

**ज्वलन**, पु० (नः) अग्नि.

**ज्वलित**, न० (तं) दग्ध. २ चकचकीत.

**ज्वाल**, पु० (लः) ज्वाळा.

**ज्वाला**, स्त्री० (ला) ज्वाळा.

---

## झ.

**झ**, पु० (झः) सुरगुरु जो बृहस्पति तो. २ दैत्यराज. ३ शब्द.

**झंझा**, स्त्री० (झा) नष्ट. २ शब्द वि०. ३ पाण्याचा वेग. ४ वृष्टियुक्त जो वायु त्याचा शब्द.

**झंझानिल**, पु० (लः) वायुवि०.

**झंझावात**, पु० (तः) वृष्टियुक्त जो वारा तो.

**झटा**, स्त्री० (टा) भुई आवळीचें झाड.

**झटित**, अ० शीघ्रार्थी.

**झंपाशी**, स्त्री० (शी) पक्षिवि०.

**झर**, पु० (रः) झरा.

**झर्झर**, पु० (रः) कलियुग. २ नदविशेष. ३ वाद्यवि० ज्यास झांगड असें म्ह० तें. ४ झरा.

**झर्झरक**, पु० (कः) कलियुग.

**झर्झरा**, स्त्री० (रा) वेश्या.

**झलझ्झला**, स्त्री० (ला) हत्तीच्या कानाचें फडफडणें. २ हत्तीच्या कानाचावि० भाग.

**झलरी**, स्त्री० (री) वाद्यवि० ज्यास हुडुक असें म्ह० तें.

**झल्लरी**, स्त्री० (री) वाद्यवि० ज्यास झांझ असें म्ह० ती. २ बालकाचे केस.

**झष**, पु० (षः) अरण्य. २ मत्स्य, मासा.

**झषा**, स्त्री० (षा) वनौषधि जीस न्हस्वचिकणा असें म्ह० ती.

**झषाशन**, पु० (नः) जलचरवि०.

**झाट**, पु० (टः) सभोंवताल्या वेली असून त्यांनीं आच्छादिलेली जागा, जाळी. २ कठीण मार्ग. ३ क्षत धुणें.

**झाटल**, पु० (लः) वृक्षवि० ज्यास मोरवा असें म्ह० तो.

**झाउक**, पु० (कः) तिळव्याचे झाडांतील एक भेद.

**झिंझिम**, पु० (मः) वणवा.

**झिंटी**, स्त्री० (टी) निळा कोरांटा. २ कोरांटी.

**झिल्लि**, स्त्री० (ल्लिः) कीटवि० ज्यास मुरकूट, जळार, घुंगुरटें असें म्ह० तें.

**झिल्लिकंट**, पु० (टः) पारवापक्षि. २ खबुत्र.

**झिल्लिका**, स्त्री० (का) कीटवि० ज्यास मुरकूट, जळार, घुंगुरटें असें म्ह० तें.

**झिल्ली**, स्त्री० (ल्ली) कीटकवि० ज्यास मुरकूट, जळार, घुंगुरटें असें म्ह० तें. २ प्रभा. ३ शरीरास लावण्याचें सुगंधि द्रव्यवि० ज्यास उटणें असें म्ह० तें. ४ पडदणी.

**झीरुका**, स्त्री० (का) कीटकवि० ज्यास मुरकूट, जळार, घुंगुरटें असें म्ह० तें.

**घूणि**, पु० (णि:) पूगवृक्ष, सुपारीचें झाड, पोफळ. २ कठीण.

## ञ.

**ञ**, पु० (ञ:) बैल. २ शुक्र.

## ट.

**ट**, पु० (ट:) वामन. २ पाद. ३ स्वप्न.

**टंक**, पु० (क:) महादेव. २ पु० न० (क:कं) कुदळ. ३ पु० (क:) दगड फोडण्याचा लोखंडाचा घण ज्यास टांकी, चिकंदर असें म्ह० तो. ४ दर्प, गर्व. ५ कपित्थ, कवठ. ६ तरवारीचें म्यान. ७ क्रोध. ८ परिणामवि०. ९ जंघा. १० टाकणखार.

**टंका**, स्त्री० (का) कुदळ.

**टंकार**, पु० (र:) शब्द, नाद. २ विस्मय. ३ प्रसिद्ध. ४ धनुष्याच्या दोरीचा शब्द.

**टंग**, पु० (ग:) कुदळ. २ खड्गविशेष. ३ जंघा. ४ टाकणें. ५ दान. ६ वर्ज करणें.

**टगर**, पु० (र:) टाकणखार. २ काणा, तिर्वा.

**टट्टनी**, स्त्री० (नी) पाल.

**टट्टरी**, स्त्री० (री) वाद्यविशेष. २ खोटें बोलणें.

**टार**, पु० (र:) घोडा. २ नृत्य.

**टिट्टिभ**, पु० (भ:) पक्षिविशेष ज्यास टिटवी असें म्हणतात तो.

**टिट्टिभक**, पु० (क:) पक्षिविशेष ज्यास टिटवी असें म्हणतात तो.

**टीकि**, पु० (क:) महादेव.

**टीका**, स्त्री० (का) विषम पदाची व्याख्या.

**टुंटुक**, पु० (क:) टेंड्याचें झाड. २ अल्प.

**टुंटुम**, पु० (म:) मोठा मुंगूस.

**टुमोरंध्र**, पु० (ध्र:) उंदीर.

## ठ.

**ठ**, पु० (ठ:) मंडल. २ चंद्रबिंब. ३ शून्य.

## ड.

**ड**, पु० (ड:) वडवाग्नि.

**डंडु**, पु० (डु:) निर्विष सर्प.

**डमर**, पु० (र:) उपद्रवविशेष. २ प्रलय. ३ न० (रं) भिऊन पळणें.

**डमरु**, पु० (रु:) वाद्यविशेष. २ चमत्कार.

**डमरुक**, पु० (क:) वाद्यविशेष ज्यास डमरू असें म्हणतात तें.

**डयन**, न० (नं) बुरख्याची गाडी.

**डहु**, पु० (हु:) ओटींचें झाड.

**डा**, स्त्री० (डा) डांकिनी देवताविशेष.

**डालिम**, पु० (म:) डाळिंबीचें झाड.

**डाहल**, पु० ब० (ला:) चेदी देशविशेष.

**डिंगर**, पु० (र:) क्षेप.

**डिंडिम**, पु० (म:) वाद्यविशेष ज्यास दवंडी असें म्हणतात ती.

**डिंडिर**, पु० (र:) समुद्राचा फेण.

**डिंब**, पु० (ब:) उपद्रवविशेष. २ भय. ३

शरीरांतील फुफूस. ४ शुक्र शोणिताचें मिश्रीभवन. ५ भयध्वनि. ६ आंडें. ७ न० (बं) भिजून पळणें.

**डिंभ**, पु० (भः) शिशु, बालक. २ स्तनंधय, तान्हें बालक. ३ मूर्ख.

**डुंडुभ**, पु० (भः) निर्विष व दुतोंडा सर्पविशेष ज्यास दुतोंडें असें म्हणतात तो.

---

## ढ.

**ढ**, पु० (ढः) वाद्यविशेष ज्यास पटह असें म्हणतात तें. २ कुत्रा. ३ कुत्र्याचें शेंपूट.

**ढक्का**, स्त्री० (क्का) वाद्यविशेष ज्यास पटह असें म्हणतात तें.

---

## ण.

**ण**, पु० (णः) भूषण. २ जलगृह. ३ गुणवर्जित.

---

## त.

**त**, पु० (तः चोर. २ अमृत. ३ पुच्छ. ४ डुकर. ५ म्लेंछ जातिविशेष. ६ न० (तं) पुण्य.

**तंक**, पु० (कः) दगड फोडण्याचा लोखंडाचा घण ज्यास टांकी, पिकंदर असें म्हणतात तो. २ दर्प, गर्व. ३ कवित्थ, कवठ. ४ तरवारीचें म्यान. ५ क्रोध. ६ परिमाणविशेष. ७ जंघा, पोटरी.

**तक्र**, न० (क्रं) ताक.

**तक्राट**, पु० (टः) माथ्या. ताक करण्याचें रवीचें बोंड. २ रवीचा दांडा.

**तट**, न० (टं) क्षेत्र. २ पु० न० (टः- टं) तीर, नदीचा काठ.

**तटाक**, पु० न० (कः- कं) तळें.

**तटिनी**, स्त्री० (नी) नदी.

**तटी**, स्त्री० (टी) तीर, नदी कांठ.

**तंडक**, पु० (कः) फेण. २ पक्षिविशेष ज्यास ताजवा, दय्यर असें म्हणतात तो. ३ उपतापविशेष. ४ खंजन पक्षि. ५ समासप्राय जी वाणी ती. ६ घराचें लांकूड. ७ मुळापासून शाखा मर्याद जो वृक्षाचा भाग तो, कांडें. ८ मायाबहुल, मायावी.

**तडाग**, पु० न० (गः- गं) तळें.

**तडित्**, स्त्री० (त्) विद्युल्लता, वीज.

**तडित्वत्**, पु० (त्वान्) मेघ.

**तंडुल**, पु० (लः) वावंडिगाचें झाड. २ तांदूळ.

**तंडुलीय**, पु० (यः) वावंडिग. २ शाकविशेष ज्यास तांदुळजा असें म्हणतात तो.

**तंडुवीण**, पु० (णः) किडा. २ वनौषधि ज्यास भारंग असें म्हणतात तो. ३ तांदुळांचें पाणी, धोण.

**तंडूल**, पु० (लः) धान्याचा समुदाय.

**तत्**, अ० कारण ह्या अर्थी उ० तदिदंपरिरक्ष शोभनें.

**तत**, वि० (तःता-तं) व्याप्त. २ विस्तृत. ३ पु० (तः) वायु. ४ न० (तं) वीणादिक वाद्य.

**ततः**, अ० कारण. २ अनंतर ह्या अर्थी. उ० ततोनिष्कल्मषोनरः.

**तंतु**, पु० (तुः) सूत. २ सुतासारिखे जे भिश्याचे वगैरे अवयव ते प्रत्येक.

**तंतुनाग**, पु० (गः) मगर.

**तंतुभ**, पु० (भः) मोहोरी. २ धान्यविशेष ज्यास सांसव, शिरस असें म्हणतात तें.

**तंतुल**, न० (लं) भिसें.

**तंतुवाय**, पु० (यः) वस्त्र निर्माण करणारा कोष्टी.

**तंतुविग्रहा**, स्त्री० (हा) केळीचें झाड.

**तंतुसार**, पु० (रः) सुपारी.

**तत्काल**, पु० (लः) वर्तमानकाल.

**तत्पर**, पु० (रः) आसक्त, लंपट.

**तंत्र**, न० (त्रं) सिद्धांत. २ प्रधान, मुख्य. ३ तंतुवाय, कोष्टी. ४ परिच्छद. ५ कुटुंब कृत्य. ६ औषधोत्तम. ७ शास्त्रविशेष. ८ वेदशाखाविशेष- ९ हेतु. १० उभयार्थ प्रयोजन. ११ इति कर्तव्यता.

**तंत्रक**, न० (कं) नूतन वस्त्र, कोरें वस्त्र.

**तंत्रवाप**, पु० (पः) वस्त्र निर्माण करणारा, कोष्टी.

**तंत्रवाय**, पु० (यः) वस्त्र निर्माण करणारा, कोष्टी.

**तंत्रिका**, स्त्री० (का) गुळवेल.

**तंत्री**, स्त्री, (त्री) दोरी. २ वीणा.

**तत्व**, न० (त्वं) परमात्मा. २ वस्तु. ३ धर्म. ४ विलंबित जें नृत्यादिक तें, सावकास नाचणें. ५ वास्तविक अर्थ.

**तथा**, अ० समुच्चय. २ अभ्युपगम, स्वीकार. ३ प्रत्युत्तर. ४ निश्चय. ५ साम्य. ६ सत्य ह्या अर्थी. उ० ६ यथाबुभुक्षितस्यान्नं तथैवार्तस्यचौषधं.

**तथ्य**, न० (थ्यं) वास्तविक.

**तथ्यानुज**, पु० (जः) गुरुनामाग्रह.

**तदा**, अ० त्या कालाचे ठायीं ह्या अर्थी. उ० तदाचक्षुष्मतां प्रीतिः.

**तदात्व**, न० (त्वं) वर्तमानकाळ.

**तदानीं**, अ० त्या कालाचे ठायीं ह्या अर्थी उ० यदास्याप्रियया संगस्तदानीमेवमेसुखं.

**तद्दीनं**, अ० दिनमध्य. २ प्रतिवासर ह्या अर्थी. ३ पु० (नः) दररोज.

**तंद्रवाय**, पु० (यः) वस्त्र निर्माण करणारा, कोष्टी.

**तंद्रा**, स्त्री० (द्रा) निद्रेपासून जो आळस तो. २ अत्यंत श्रम झाल्यानें जें हस्तपादादिकांस असामर्थ्य येतें तें.

**तंद्रि**, स्त्री० (द्रिः) निद्रेपासून जो आळस तो. २ अत्यंत श्रम झाल्यानें जें हस्तपादादिकांस असामर्थ्य येतें तें.

**तंद्री**, स्त्री० (द्री) नीज, निद्रा. २ निद्रेपासून जो आळस तो. ३ अत्यंत श्रम झाल्यानें जें हस्तपादादिकास असामर्थ्य येतें तें.

**तनय**, पु० (यः) पुत्र.

**तनया**, स्त्री० (या) कन्या.

**तनु**, स्त्री० (नुः) देह. २ वि० (नुः नुः, न्वी. नु) सूक्ष्म, बारिक, कृश. ३ अल्प. ४ विरल, विरकळ. ५ स्त्री० (नुः) त्वक्, त्वचा.

**तनुत्र**, न० (त्रं) कवच, चिलखत.

**तनुरस**, पु० (सः) घाम.

**तनू**, स्त्री० (नूः) देह, शरीर.

**तनूकृत**, वि० (तः ता- तं) तासलेलें, लहान केलेलें.

**तनूनपात्**, पु० (त्) अग्नि, विस्तव.

**तनूरुह**, न० (हं) पीस. २ आंगावरचा केस.

**तप**, पु० (पः) ग्रीष्मऋतु. २ तपश्चर्या.

**तपती**, स्त्री० (ती) शनीनामा जो ग्रह त्याची माता.

**तपन**, पु० (नः) बिब्ब्याचें झाड. २ सूर्य. ३ नरक विशेष.

**तपनीय**, न० (यं) सुवर्ण, सोनें.

**तपस्**, न० (पः) शरदृतु. २ सांतपन, चांद्रायणादिक, कृच्छ्र. ३ लोकविशेष, तपोलोक. ४ धर्म.

**तपस**, पु० (सः) चंद्र.

**तपस्तक्ष**, पु० (क्षः) इंद्र.

**तपस्थली**, स्त्री० (ली) काशीक्षेत्र.

**तपस्य**, पु० (स्यः) फाल्गुन महिना.

**तपस्या**, स्त्री० (स्या) व्रत करणें, तप.

**तपस्विन्**, पु० (स्वी) व्रती, ज्याणें व्रत धारण केलें आहे तो. २ शोक करावयास योग्य. ३ दया करावयास योग्य. ४ तपस्वी, तपश्चर्या करणारा.

**तपस्विनी**, स्त्री० (नी) जटामांशीलता. २ वनौषधि जीस केदार कुटकी असें म्हणतात ती.

**तपोधन**, पु० (नः) तपस्वी.

**तपोवट**, पु० (टः) ब्रम्हवर्त देश.

**तम**, पु० (मः) राहुनामा ग्रह.

**तमस्**, पु० न० (माःमः) राहुनामा ग्रह. २ न० (मः) तमोगुण. ३ अंधकार. ४ पाप. ५ शोक.

**तमस्विनी**, स्त्री० (नी) रात्र.

**तमा**, स्त्री० (मा) रात्र.

**तमाल**, पु० (लः) वायवण्याचें झाड. २ तरवार. ३ तमालवृक्ष. ४ कस्तुरिकादिकांचा कपाळावर जो टिळक लावितात तो.

**तमालपत्र**, न० (त्रं) कपाळावर कस्तुरीचा वगैरे जो टिळक लावितात तो. २ तमालवृक्षाचें पान.

**तमालिका**, स्त्री० (का) तामलिप्त देश.

**तमि**, स्त्री० (मिः) रात्र.

**तमिस्र**, न० (स्रं) कोप. २ अंधकार.

**तमिस्रा**, स्त्री० (स्रा) रात्र.

**तमी**, स्त्री० (मी) रात्र.

**तमोघ्न**, पु० (घ्नः) सूर्य. २ अग्नि. ३ अवगत, जाणलेला. ४ विष्णु. ५ महादेव.

**तमोनुद**, पु० (दः) चंद्र. २ अग्नि. ३ सूर्य.

**तमोपह**, पु० (हः) सूर्य. २ अग्नि. ३ चंद्र. ४ जिन, नास्तिक.

**तमोमणि**, पु० (णिः) काजवा.

**तमोव्रण**, पु० (णः) रोगविशेष.

**तर**, पु० (रः) तरणें.

**तरंग**, पु० (गः) लहरी, लाट. २ बुडबुडा.

**तरंगिणी**, स्त्री० (णी) नदी.

**तरंड**, पु० (डः) नौका. २ लहान होडी, पडाव.

**तरंडा**, स्त्री० (डा) नौका.

**तरण**, पु० (णः) नौका.

**तरणि**, पु० (णिः) सूर्य. २ स्त्री० (णिः) नौका. ३ कांटेशेवती, गुलाबशेवती.

**तरंतोदारद**, पु० (दः) समुद्र.

**तरदा**, स्त्री० (दा) नौका. २ विहंगम, पक्षि.

**तरपण्य**, न० (ण्यं) नद्यादिकांच्या उताराबद्दल मोल, उताराचा पैसा.

**तरल**, पु० (लः) सूर्य. २ मोत्याचे हारांतील मध्यमणी. ३ वि० (लःला-लं) चंचल.

**तरला**, स्त्री० ( ला ) द्रवणारें ओदन, आटवल, पातळ भात, कणेरी.

**तरलित**, वि० (तःता-तं) चंचळ.

**तरस्**, न० (रः) बळ. २ रोग. ३ वेग. ४ पराक्रम.

**तरस**, न० (सं) मांस.

**तरस्विन्**, वि० ( स्वी-स्विनी-स्वि ) वेगवान. २ शूर. ३ बली, बलिष्ठ.

**तरक्षु**, पु० (क्षुः) तरस.

**तरांधु**, स्त्री० (धुः) होडी.

**तरालु**, पु० (लुः) नावेंतील पाणी काढणारा.

**तरि**, स्त्री० (रिः) नौका, नाव.

**तरिक**, पु० (कः) नौका, नाव.

**तरिरथ**, पु० (थः) नौकेचें सुकाणु.

**तरी**, स्त्री० (री) वस्त्रें अलंकार इत्यादि ठेवण्याची पेटी. २ नौका. ३ पु० (री) धूर.

**तरु**, पु० (रुः) वृक्ष, झाड.

**तरुण**, वि० (णःणी-णं) तारुण्ययुक्त, मध्यमवयस्क. २ पु० (णः) पुष्पविशेष. ३ एरंडाचें झाड.

**तरुणी**, स्त्री० (णी) तरुण स्त्री.

**तरतूलिका**, स्त्री० (का) पक्षिविशेष.

**तरुराग**, पु० (गः) नूतन पल्लव.

**तरुवारी**, स्त्री० (री) तरवार.

**तरुशायी**, पु० (यी) पक्षि.

**तरुसार**, पु० (रः) कापूर.

**तर्क**, पु० (र्कः) आश्चिर्य. २ कांक्षा. ३ शास्त्रविशेष. ४ विचार. ५ अपूर्वोत्प्रेक्षा. ६ कल्पना.

**तर्कारी**, स्त्री० (री) वनौषधि जीस टांहाकळ, थोर एरण असें म्हणतात ती.

**तर्कुट**, न० (टं) छेदन. २ सूत काढणें.

**तर्जनी**, स्त्री० (नी) आंगठ्याजवळची आंगळी, आंगठी.

**तर्णक**, पु० (कः) गोवत्स, गोह्रा.

**तर्तरीक**, पु० (कः) वल्हें २ वि० (कः काकं) तरून जो पलीकडे गेला तो.

**तर्दू**, पु० (र्दूः) दर्वि विशेष, डवली.

**तर्पण**, न० (णं) तृप्ति. २ देव, पितर ह्यांच्या उद्देशानें जें जलदान तें.

**तर्पणा**, स्त्री० (णा) तृप्ति.

**तर्मन्**, न० (र्म) यूपाग्र, यज्ञस्तंभाचें अग्र.

**तर्ष**, पु० (र्षः) इच्छा, २ तृषा, ताहान.

**तर्षित**, वि० (तःता-तं) तृषा लागलेला.

**तल**, न० (लं) झाडास वगैरे जी तळी करितात ती. २ अरण्य. ३ खड्गमुष्टि, तरवारीची मूठ. ४ पसरलेला हात, तळाथ. ५ धनुष्याचे दोरीचें घर्षण बाहूंस न व्हावें म्हणून चामड्याचा वगैरे केलेला बाहुबंधविशेष. ६ अधोभाग उ० रसातलं. ७ पु० न० (लः- लं) स्वरूप. उ० वक्षस्तलं. ८ कार्यबीज. ९ तालवृक्ष. १० डाव्या हातानें वाजविलेल्या वीणेचा ध्वनी.

**तलक**, न० (कं) लहान सरोवर.

**तलप्रहार**, न० (रं) थापट मारणें.

**तलवारि**, स्त्री० (रिः) तलवार.

**तलिन**, पु० (नः) तुच्छ. २ बिछाना. ३ वि० [नः ना- नं] विरळ, सांतर. ४ स्तोक, अल्प. ५ स्वछ, निर्मळ.

**तलिम**, न० (मं) तळघर. २ शय्या. ३ तरवार. ४ ऊन नलागण्यासाठीं वरती बांधलेलें वस्त्र ज्यास चांदवा असें म्हणतात तें.

**तलुन**, पु० (नः) पवन, वारा. २ तरुण.

**तलुनी**, स्त्री० (नी) तरुणी.

**तल्क**, न० (ल्कं) अरण्य.

**तल्प**, पु० न० (ल्पः ल्पं) शय्या. २ अट्ट, उपरिगृह, माडी. ३ स्त्री, बायको उ. गुरुतल्पगः

**तल्ल**, न० ( ल्लं ) झाडास वगैरे तळी करितात ती. २ पु० ( ल्लः ) जलाधार, तळें.

**तल्लज**, पु० ( जः ) प्रशस्त.

**तल्ली**, स्त्री० ( ल्ली ) तरुणी.

**तविषी**, स्त्री० ( षी ) इंद्राची कन्या. २ पु० ( षी ) स्वर्ग. ३ महोदधि समुद्र.

**तष्ट**, वि० ( ष्टः ष्टा-ष्टं ) तासून लहान केलेला, तासलेला.

**तसर**, पु० ( रः ) कोष्टयानें एक तऱ्हेनें गुंडाळलेलें सूत ज्यास तसरी असें म्हणतात तें.

**तस्कर**, पु० ( रः ) चोर.

**तक्षक**, पु० ( कः ) नागविशेष. २ भारंगीची वेल.

**तक्षन्**, पु० ( क्षा ) वर्द्धकी, सुतार.

**ताटंक**, पु०( कः ) कर्णभूषण.

**ताड**, पु० ( डः ) ताडण. २ शब्द. ३ मुष्टिमेय तृणादि.

**ताडंक**, पु० ( कः ) कर्णभूषण.

**तांडव**, न० ( वं ) नृत्य, नाचणें. २ नृत्यविशेषार्थी असेंही कोणी म्ह०

**ताडपत्र**, न० ( त्रं ) तानवड, ताटंक.

**तांडवतालिक**, पु० ( कः ) शिवद्वारपाळ.

**ताडी**, स्त्री० ( डी ) वृक्षविशेष.

**तात**, पु० ( तः ) बाप. २ दया करावयास योग्य. ३ दया करणारा.

**तातन**, पु० ( नः ) पक्षिविशेष ज्यास ताजवा, दय्यर असें म्हणतात तो.

**तातल**, पु० ( लः ) रोग. २ पाक. ३ लोहकूट. ४ बापासारखा.

**तांत्रिक**, पु० ( कः ) शास्त्रवेत्ता.

**तानूर**, पु० ( रः ] जलभोंवरा.

**ताप**, पु० ( पः ) संताप. २ त्रास. ३ अग्नि, सूर्य यांपासून झालेली उष्णता.

**तापन**, पु० ( नः ) सूर्य.

**तापस**, पु० (सः) तपस्वी.

**तापसतरु**, पु० (रुः) हिंगणबेटाचें झाड.

**तापिछ**, पु० (छः) तमालवृक्ष.

**तापिंज**, पु० (जः) तमालवृक्ष.

**तापी**, स्त्री० (पी) नदीविशेष.

**तापीगुणाकर**, पु० (रः) बौद्धावतार.

**तांबूल**, न० (लं) सुपारीचें झाड. २ वावडिंगाचें झाड. ३ विडा.

**तांबूलद**, पु० (दः) विडा देणारा सेवक.

**तांबूलराग**, पु० (गः) विडा रंगणें.

**तांबूलवल्ली**, स्त्री० (ल्ली) पानवेल.

**तांबूली**, स्त्री० (ली) पानवेल.

**तामरस**, न० (सं) तांबें. २ सोनें. ३ पु० न० (सः-सं) कमळ.

**तामलकी**, स्त्री० (की) भुई आंवळी.

**तामलिप्त**, न० (प्तं) तामलिप्त देश.

**तामलिप्ती**, स्त्री० (प्ती) तामलिप्त देश.

**तामस**, पु० (सः) सर्प. २ दुष्ट, खल. ३ रागीट.

**तामसी**, स्त्री० (सी) पार्वती. २ दुर्गादेवी. ३ आंधारी रात्र.

**ताम्र**, न० (म्रं) तांबें. २ कपिलावर्ण. ३ किंचित तांबडा.

**ताम्रक**, न० (कं) तांबें.

**ताम्रकर्णी**, स्त्री० ( र्णी ) अंजननामा जो पश्चिम दिशेचा हत्ती त्याची स्त्री.

**ताम्रकुट्टक**, पु० (कः) शिल्पिविशेष ज्यास तांबट असें म्हणतात तो.

**ताम्रक्रिमि**, पु० (मिः) मृगाच्या वेळेस जे लाल किडे पडतात ते, बिरबाहुटी.

**ताम्रचूड**, पु० (डः) कोंबडा.

**ताम्रवृन्त**, पु० (न्तः) कुळीथ ( धान्यविशेष. )

**ताम्रार्ध**, न० (र्धं) कांसें.

**ताम्राक्ष**, पु० (क्षः) कोकीळपक्षि.

**ताम्री**, स्त्री० (म्री) वाद्यविशेष.

**तार**, पु० (रः) वानरविशेष. २ मोती. ३ शुद्धि. ४ नक्षत्र. ५ डोळ्यांतील कनीनिका, बाहुली. ६ अति उच्चस्वरानें जो शब्द तो. ७ मौक्तिकाची निर्मलता. ८ तरणें. ९ शुद्ध मौक्तिक. १० न० (रं) रुपें.

**तारक**, पु० (कः) तारकासूरनामा दैत्य. २ नावाडी. ३ वि० (कःका-कं ) संरक्षण करणारा.

**तारकजित्**, पु० (त्) कार्तिकस्वामी.

**तारका**, स्त्री० (का) नक्षत्र. २ डोळ्यांतील कनीनिका, बाहुली. ३ दृष्टि.

**तारणस्तंभ**, पु० (भः) मंगलस्तंभ.

**तारणी**, स्त्री० (णी) नौका.

**तारा**, स्त्री० ( रा ) लक्ष्मी. २ बुद्धदेवताविशेष. ३ वालीनामा जो वानर त्याची स्त्री. ४ सुरगुरु जो बृहस्पति त्याची स्त्री. ५ नक्षत्र.

**तारापथ**, पु० (थः) आकाश.

**तारापीड**, पु० (डः) चंद्र.

**तारिणी**, स्त्री० (णी) लक्ष्मी.

**तारुण्य**, न० (ण्यं) तरुणपणा.

**तार्क्ष्य**, पु० (र्क्ष्यः) गरुडपक्षि. २ अश्व, घोडा. ३ रथ. ४ सूर्याचा सारथी जो अरुणनामा तो. ५ सायल्याचें झाड. ६ न० (र्क्ष्यं) दारु हळदीचें काढ्यांत सम भाग शेळीचें दूध घालून केलेलें अंजन विशेष. ७ सोनें.

**तार्क्ष्यशैल**, न० (लं) दार्विकेच्या काढ्यापासून केलेलें अंजन विशेष.

**ताल**, पु० (लः) ताळी. २ वाजविण्याचा टाळ. ३ काल आणि गायनादि रूपक्रिया ह्यांचा नियम. ४ ताडमाड. ५ मध्यमांगुली व आंगठा हे संयुक्त असून बाकी पसरलेल्या अंगुली किंवा त्यांचा प्रसार. ६ न० (लं ) हरिताळ, हरताळ.

**तालती**, स्त्री० (ती) ताडाची दारू.

**तालपत्र**, न० (त्रं) ताटंक, तानवड. २ ताडवृक्षाचें पान.

**तालपत्री**, स्त्री० (त्री) वनौषधि जीस उंदीरकानी असें म्हणतात ती.

**तालपर्णी**, स्त्री० (र्णी) वनौषधि जीस मुरा, तालीसपत्र, मोरमांशी असें म्हणतात ती.

**तालमर्दल**, पु० (लः) वाद्यविशेष ज्यास करताळ असें म्हणतात तें.

**तालमूलिका**, स्त्री० (का) वनौषधि जीस कंद, मुसलकंद असें म्हणतात ती.

**तालवृंतक**, न० (कं) ताडमाडाच्या पानांनीं केलेला विंझणा. २ साधारण विंझणा असेंही कोणी म्ह०.

**तालांक**, पु० (कः) बलराम.

**तालावचर**, पु० (रः) नट. २ सहाय्यावांचून नाचणारा.

**ताली**, स्त्री० (ली) भुई आंवळीचें झाड. २

तालवृक्षभेद. ३ वनौषधि जीस जटामांशी असें म्हणतात ती.

'**तालीशपत्र**, न० (त्रं) भुई आंवळीचें झाड. २ तालवृक्षभेद.

**तालु**, न० (लु) तालु, टाळू.

**तावत्**, अ० साकल्य. २ अवधि. ३ परिमाण. ४ निश्चय ह्यां अर्थी. उ० १ यावत्तावद्भुंक्ते. २ मूलाच्छाखां यावत् प्रकांडः ३ यावत्सुवर्णं तावद्रजतं. ४ श्रोत्रियं तावदामंत्रय. ५ अवधारण. ६ हर्षानें जी त्वरा ती. ७ परिच्छेद. ८ संपूर्ण. ९ अधिकार ह्यां अर्थी.

**तावीषी**, स्त्री० (षी) चंद्राची कन्या. २ पु०(षी) स्वर्ग. ३ समुद्र. ४ सुवर्ण.

**तिक्त**, पु० (क्तः) सुवासिक. २ तिखट. ३ (क्तः क्ता क्तं) कडू.

**तिक्तक**, पु० (कः) पडवळीची वेल.

**तिक्तगुंजा**, स्त्री० (जा) करंज वृक्ष.

**तिक्तपर्वा**, स्त्री० (र्वा) गुळवेल. २ वनौ० चाकवताची भाजी. ३ गोडें कोट.

**तिक्तशाक**, पु० (कः) खैराचें झाड. २ वायवण्याचें झाड.

**तिक्ता**, स्त्री० (क्ता) वनौषधि जीस केदार, कुटकी असें म्हणतात ती.

**तिग्म**, वि० (ग्मः ग्मा ग्मं) अत्युष्ण, फार उष्ण.

**तितउ**, पु० (उः चालनी, चाळण.

'**तिंतिडिक**, न० (कं) आम्ल विशेष ज्यास आमसोल असें म्हणतात तें.

**तिंतिडि**, स्त्री० (डी) जुगार.

**तिंतिलीका**, स्त्री० (का) फांशांनीं चौरस खेळणें.

**तितिक्षा**, स्त्री० (क्षा) सहन करणें.

**तितिक्षु**, वि० (क्षुः क्षुः क्षु) सहिष्णु, सहनशील.

**तिन्तिडी**, स्त्री० (डी) चिंचेचें झाड. २ पु०(डी) उपद्रव विशेष.

**तिंत्तिडी**, स्त्री० (डी) चिंचेचें झाड.

**तित्तिर**, पु० (रः) तित्तिरनामा पक्षि.

**तित्तिरि**, पु० (रिः) तित्तिरनामा पक्षि.

**तिन्तिली**, स्त्री० (ली) चिंचेचें झाड.

**तिथ**, पु० (थः) दीन रात्री इत्यादि काल.

**तिथि**, स्त्री० (थिः) प्रतिपदादिक तिथि.

**तिथिप्रणी**, पु० (णी) चंद्र.

**तिंदुक**, पु० स्त्री० (कः की) वृक्ष विशेष ज्यास तेंडू, टेंभुरणी असें म्हणतात तो.

**तिनिश**, पु० (शः) तिवसाचें झाड.

**तिमि**, पु० (मिः) समुद्र. मत्स्य विशेष.

**तिमिकोष**, पु० (षः) समुद्र.

**तिमिंगिल**, पु० (लः) मत्स्यविशेष.

**तिमिर**, न० (रं) नेत्ररोग. २ तांबें. ३ अंधःकार.

**तिमिष**, पु० (षः) कोहळा, भोंपळा.

**तिरः**, अ० अंतर्धान. २ तिर्यक्, वांकडा ह्या अर्थी. उ० तिरोभूय आस्ते. २ तिरोवर्तते चंद्रः

**तिरस्करिणी**, स्त्री० (णी) पडदा, कनात.

**तिरस्कारिणी**, स्त्री० (णी) कनात, पडदा.

**तिरस्क्रिया**, स्त्री० (या) अनादर.

**तिरीट**, पु० (टः) लोध्र वृक्ष. २ वेष्टण, शिरोभूषण असें कोणी म्ह०

**तिरोधान**, न० (नं) आच्छादन करणें.

**तिरोहित**, वि० (तः ता तं) आच्छादित.

**तिर्यक**, अ० वाकडा ह्या अर्थी.

**तिर्यग्यान**, पु० (नः) खेकडा.

**तिर्यञ्च्**, पु० (क्) विहंगम, पक्षि.

**तिलक**, पु० (कः) रोगभेद. २ अश्वविशेष. ३ शरीरावर क्वचित स्वभावतः तील असतो तो. ४ पु० न० (कः·कं) कपाळावर कस्तुरिकादिकांचा लावलेला टिळा. ५ न० (कं) काळा संचळ खार. ६ तिळव्याचें झाड. ७ शरीरांतील मांसपिंड विशेष ज्यास फुप्पूस असें म्हणतात तो.

**तिलकालक**, पु० (कः) शरीरावर स्वभावतः जो काळा तील असतो. तो.

**तिलपर्णी**, स्त्री० (र्णी) रक्तचंदन.

**तिलपिंज**, पु० (जः) निष्फळ तीळ, वांझे तीळ, रानतील.

**तिलपेज**, पु० (जः) वांझेतीळ, रानतीळ.

**तिलमयूर**, पु० (रः) तिलमयूर, पक्षि.

**तिलित्स**, पु० (त्सः) सर्पवि० ज्यास घोणस असें म्ह० तो.

**तिल्य**, वि० (ल्यः·ल्या·ल्यं) तीळ उत्पन्न होण्यास योग्य जें शेत तें.

**तिल्व**, पु० (ल्वः) लोध्रवृक्ष.

**तिष्य**, पु० (ष्यः) पुष्यनक्षत्र. २ चतुर्थयुग, कलियुग.

**तिष्यफला**, स्त्री० (ला) आंवळीचें झाड.

**तिष्या**, स्त्री० (ष्या) धात्री, आंवळी.

**तीर**, न० (रं) नद्यादिकांच्या दोहों बाजूच्या ज्या मर्यादा भूमि त्या प्रत्येक. २ बाणवि० ज्यास सायक असें म्ह० तो. ३ पु० (रः) कथील.

**तीरभुक्ति**, पु० (क्तिः) विदेहनगर.

**तीर्थ**, न० (र्थं) योग. २ विहिरीचे जवळ जो जलाशय तो. ३ बौद्धशास्त्रान्यच्छास्त्र. ४ऋषींनीं सेविलेलें जल. ५ गुरु, उपाध्याय. ६ यज्ञ. ७ क्षेत्र. ८ उपाय. ९ स्त्रीरज. १० अवतार. ११ पात्र. १२ मंत्री.

**तीर्थराज्ञी**, स्त्री० (ज्ञी) काशीक्षेत्र.

**तीवर**, पु० (रः) समुद्र. २ व्याध, पारधी.

**तीव्र**, वि० (व्रः·व्रा·व्रं) अतिशयीत. २ उष्ण.

**तीव्रवेदना**, स्त्री० (ना) अतिशयीत वेदना. २ नरक पीडा.

**तीव्रा**, स्त्री० (व्रा) वनौषधि जीस केदार, कुटकी असें म्ह० ती. २ काळी मोहोरी. ३ दुर्वा.

**तीक्ष्ण**, पु० (क्ष्णः) प्रखर. २ जवखार. ३ न० (क्ष्णं) लोखंड. ४ विष. ५ युद्ध. ६ सामुद्रलवण. ७ मोरचा नामक वृक्ष. ८ वि० (क्ष्णः·क्ष्णा·क्ष्णं) अत्युष्ण, खर. ९ आत्मत्यागी, आत्मत्याग करणारा.

**तीक्ष्णकर्मन्**, पु० (र्मा)

**तीक्ष्णगंध**, पु० (धः) शेवग्याचें झाड.

**तीक्ष्णगंधक**, पु० (कः) शेवग्याचें झाड.

**तीक्ष्णगंधा**, स्त्री० (धा) वेखंड. २ मोहोरी.

**तु**, अ० भेद. २ अवधारण, निश्चय ह्या अर्थीं. उ० क्षीरान्मांसंतुपुष्टिकृत्. ३ शिष्टैर्मतंतुतद्युक्तं. ३ पादपूरण. ४ पक्षांतर. नियोग. ६ प्रशंसा. ७ निग्रह ह्या अर्थीं.

**तुंग**, पु० (गः) पर्वत. २ उंडिणीचें झाड. ३ वि० (गः·गा·गं) उंच.

**तुंगभद्र**. पु० (द्रः) नदवि०. २ वि० (द्रः·द्रा·द्रं) मत्त, माजलेला.

**तुंगभद्रा**, स्त्री० (द्रा) नदीवि०.

**तुंगी**, स्त्री० (गी) शाकवि. जीस बर्बरी, तिळवण, कानफोडी असें म्ह० ती. २ रात्र. ३ पु० (गीः)

**तुंगीश**, पु० (शः) चंद्र.

**तुछ**, पु० (छः) तुछ. २ वि० (छःछा-छं) रिक्त, रिकामें.

**तुंड**, न० (डं) मुख, तोंड.

**तुंडिकेरी**, स्त्री० (री) कार्पासी, कापशीण. २ तोंडलीची वेल.

**तुंडिकेशी**, स्त्री० (शी) तोंडलीची वेल.

**तुंडिन्**, पु० (डी) महादेवाचा नंदी.

**तुंडिभ**, पु० (भः) बृहदुदर, दोंदिल. २ वातादिकेंकरून ज्याची नाभी उंच झाली आहे तो.

**तुंडिल**, पु० (लः) बृहदुदर, दोंदिल. २ वातादिकेंकरून ज्याची नाभी उंच झाली आहे तो.

**तुणि**, पु० (णिः) वनौषधि ज्यास नंदीवृक्ष, नांदरुख असें म्ह० तो.

**तुत्थ**, न० (त्थं) अंजनवि० ज्यास मोरचुद असें म्ह० तें. पु० (त्थः) अग्नि, विस्तव.

**तुत्था**, स्त्री० (त्था) लहान इलायची. २ मक्षिका, माशी. ३ वनौषधि जीस नीली, नीळ असें म्ह० ती.

**तुथांजन**, न० (नं) मोरचुद.

**तुंद**, पु० (दः) बेंबी. २ न० (दं) जठर.

**तुंदकूपी**, स्त्री० (पी) बेंबी.

**तुंदपरिमार्ज**, पु० (र्जः) आळशी.

**तुंदपरिमृज**, पु० (जः) आळशी.

**तुंदिक**, पु० (कः) बृहदुदर, दोंदील.

**तुंदिकर**. पु० (रः) बेंबी.

**तुंदिन्**, पु० (दी) बृहदुदर, दोंदिल. २ पुष्ट.

**तुंदिभ**, पु० (भः) बृहदुदर, दोंदिल. २ वातादिकेंकरून ज्याची नाभी उंच झाली आहे तो.

**तुंदिल**, पु० (लः) बृहदुदर, दोंदिल. २ वातादिकें करून ज्याची नाभि उंच झाली आहे तो.

**तुन्न**, पु० (न्नः) वनौ० ज्यास नंदी वृक्ष, नांदरुख असें म्हणतात तो.

**तुन्नवाय**, पु० (यः) शिल्पविशेष, ज्यास शिंपी, दर्जी असें म्हणतात तो.

**तुंबरी**, स्त्री० (री) कोथिंबीर. २ कुत्री.

**तुंबा**, स्त्री० (बा) दूध काढण्याचें भांडें, चरवी. २ वाटोळा जो काळा भोंपळा तो.

**तुंबि**, पु० (बिः) काळा भोंपळा.

**तुंबी**, स्त्री० (बी) काळा भोंपळा.

**तुंबीपुष्प**, न० (ष्पं) भोंपळीचें फूल.

**तुभ**, पु० (भः) अज, बोकड.

**तुमुल**, पु० (लः) धाटिंग वृक्ष. २ न० (लं) रणसंबाध, युद्धाची दाटी. (यास विशेषणत्व विवक्षा असतां तुमुल शब्द विशिष्टार्थ बोधक होतो.)

**तुरग**, पु० (गः) अश्व, घोडा. २ चित्त, मन.

**तुरंग**, पु० (गः) अश्व, घोडा.

**तुरगब्रम्हचर्य**, न० (र्यं) स्त्री न मिळाल्यानें ब्रम्हचर्य व्रत.

**तुरगब्रम्हचर्यक**, न० (कं) स्त्री परित्याग.

**तुरंगम**, पु० (मः) अश्व घोडा.

**तुरंगवदन**, पु० (नः) किन्नर.

**तुरगी**, स्त्री० (गी) अश्वगंधा. २ घोडी.

**तुरायण**, न०(णं) यज्ञविशेष.

**तुरासाह्**, पु० (षाट्. षाड्.) इंद्र.

**तुरुष्क**, पु० (ष्कः) सुवासिक द्रव्य विशेष ज्यास सिल्ह, ऊद, लोबान असें म्हणतात तो. २ देश विशेष. ३ म्लेंछ जातीविशेष.

**तुल,** न० (लं) पारसापिंपळ. २ आकाश. ३ कापूस.

**तुला,** स्त्री० (ला) सारखेपणा. २ तूळरास. ३ सोन्यादिकांचें वजन करण्याचें एक मान आहे. (१०० पलें+४०० शास्त्रसिद्ध तोळे.) ४ तराजू, तागडी.

**तुलाकोटि,** स्त्री० (टिः) पायांतील भूषण. (नूपुर, तोरड्या, पैंजण इत्यादि.) २ तराजूचें पारडें. बांधण्याची जागा, दांडीचें शेवट.

**तुलाकोटी,** स्त्री० (टी) पायांतील भूषण. (नूपुर, तोरड्या, पैंजण इत्यादि.) वरचा शब्द पहा.

**तुलाधर,** पु० (रः) तूळरास. २ वि० (रः-रा-रं) वाणी. सोनार. ३ माळी.

**तुलाबीज,** न० (जं) गुंजेचें झाड.

**तुल्य,** वि० (ल्यः-ल्या-ल्यं) सदृश, सारखा. २ वजन करण्यास योग्य जें तें.

**तुल्यपान,** न० (नं) सहपान, सह प्राशन, बरोबर पिणें.

**तुवर,** वि० (रः-रा-रं) तुरट.

**तुवरिका,** स्त्री० (का) धान्यविशेष ज्यास तूर असें म्हणतात ती.

**तुवरी,** स्त्री० (री) धान्यविशेष ज्यास तूर असें म्हणतात ती.

**तुष,** पु० (षः) धाटिंग वृक्ष, बेहेडा. २ धान्यत्वचा, सालपट, कोंडा.

**तुषग्रह,** पु० (हः) अग्नि.

**तुषानल,** पु० (लः) तृणाग्नि, वणवा.

**तुषार,** पु० (रः) जलाचा बिंदु, तुषार. २ हींव, थंडी. ३ बर्फ. ४ दव. ५ वि० (रः-री-रं) शीतळ दहिवर.

**तुषित,** पु० (तः) देवांचा गणविशेष.

**तुषोदक,** न० (कं) पेज, कांजी.

**तुहिन,** न० (नं) थंडीनें युक्त दुर्दिन. २ हिम, थंडी, बर्फ.

**तूण,** पु० (णः) इषुधि, बाण ठेवण्याचा भाता.

**तूणी,** स्त्री० (णी) वनौषधि जीस नीली, नील असें म्हणतात ती. २ इषुधि बाण ठेवण्याचा भाता.

**तूणीर,** पु० (रः) इषुधि, बाण ठेवण्याचा भाता.

**तूद,** पु० (दः) पारसा पिंपळ.

**तूबर,** पु० (रः) शिंगे येण्याच्या दशेस आला असतां शिंगें येत नाहींत तो बैल, प्रौढ असून शृंगरहीत बैल. २ स्मश्रू येण्याच्या काळींही ज्यास स्मश्रू येत नाहीं तो, प्रौढ असून स्मश्रूरहीत पुरुष. ३ पुरुष चिन्हरहीत. ४ कषायरस.

**तूर,** न० (रं) वाद्यविशेष ज्यास डंका असें म्हणतात तें.

**तूर्ण,** न० (र्णं) शीघ्र, लौकर.

**तूर्य,** न० (र्यं) वाद्यविशेष ज्या डंका असें म्हणतात तें.

**तूर्यगंड,** पु० (डः) सूपविशेष.

**तूल,** पु० (लः) कार्पास, कापूस. २ पारशा पिंपळाचें झाड.

**तूलकार्मुक,** न० (कं) कापूस पिंजण्याचें यंत्र.

**तूलिका,** स्त्री० ( का ) सोनाराची शलाका जीस सळई असें म्हणतात ती. २ चित्रें काढणारी स्त्री. ३ गादी.

**तूवर,** वि० (रः-रा-रं) तुरट. २ प्रौढ असून शृंगरहीत बैल. ३ प्रौढ असून स्मश्रूरही

त पुरुष. ४ पुरुष चिन्हरहीत. ५ कषायरस.
**तूवारकी,** स्त्री० (की) धान्यविशेष ज्यास तूर असें म्हणतात ती.
**तूष्णीं,** अ० मौन ह्या अर्थी. उ० तूष्णींस्थित्वाक्षणंभूयः
**तूष्णीकं,** अ० मौन ह्या अर्थी. उ० तूष्णीकंजलमध्यगः
**तूष्णीक,** वि० ( कःका-कं ) तूष्णींभावयुक्त, उगी राहणारा.
**तूष्णींशील,** वि० (लःलाःलं ) तूष्णींभावयुक्त, उगी राहणारा.
**तूस्त,** न० ( स्तं ) जटा. २ धूळ.
**तृका,** स्त्री० (का) कमळांतील कोश.
**तृण,** न० (णं) गवत.
**तृणकाष्ठधृक्,** पु० (क्) वडवाग्नि.
**तृणकुटी,** स्त्री० (टी) गवताची झोंपडी.
**तृणकेतु,** पु० (तुः) वेळू.
**तृणगोधा,** स्त्री० (धा) सरडा. २ पाल.
**तृणता,** स्त्री० (ता) धनुष्य. २ तृणत्व.
**तृणद्रुम,** पु० (मः) ताडमाड. २ नारळीचें झाड, माड. ३ पोफळीचें झाड. ४ तालवृक्षविशेष. ५ खर्जूरवृक्ष. ६ केगदी ( केतकी ) चें झाड. ७ तालीवृक्षविशेष. ८ खर्जूरवृक्षविशेष. हे आठ तृण द्रुम मानलेले आहेत.
**तृणधान्य,** न० (न्यं) नीवार, नेर, सांवा वगैरे जीं धान्यें तीं.
**तृणध्वज,** पु० (जः) वेणु, वेळू.
**तृणपूली,** स्त्री० (ली) गवताची पेंटी.
**तृणमत्,** पु० (त् ) जामीन.
**तृणराज,** पु० (जः) ताडमाड.
**तृणशून्य,** न० (न्यं) मोगरीचें झाड. २ केतकीचें फळ.
**तृणषट्पद,** पु० (दः) भ्रमरविशेष.
**तृणसारा,** स्त्री० (रा) केळीचें झाड.
**तृणहर्म्य,** न० (र्म्यं) गवताचें घर.
**तृणाग्नि,** पु० (ग्निः) तृणाग्नि.
**तृणांजन,** पु० (नः) सरडा.
**तृण्या,** स्त्री० (ण्या) तृणसमूह.
**तृतीयप्रकृति,** पु० (तिः) षंढ, नपुंसक.
**तृतीयाकृत,** वि० (तःता-तं) तीन वेळ नांगरलेलें (शेत.)
**तृतीयाकृति,** पु० (तिः) षंढ, नपुंसक.
**तृप्त,** वि० ( प्तःप्ता प्तं ) हर्षयुक्त. २ तृप्ति पावलेला.
**तृप्ति,** स्त्री० (प्तिः) इच्छा. २ शांति.
**तृफला,** स्त्री० (ला) हरडा, बेहेडा, आणि आंवळकठी ह्यांचें कूट.
**तृष्,** स्त्री० (ट्) इच्छा. २ तृषा, तहान. ३ मदनाची कन्या.
**तृषा,** स्त्री० (षा) इच्छा. २ तहान.
**तृषित,** वि० (तःता-तं) तृषा लागलेला.
**तृष्णज्,** वि० (क्) तृष्णाशील. इच्छाशील.
**तृष्णा,** स्त्री० (ष्णा) इच्छा. २ पिपासा, तहान.
**तेजन,** पु० (नः) वेळू.
**तेजनक,** पु० (कः) तृणवि० ज्यास शर असें म्ह० तो.
**तेजनी,** स्त्री० (नी) मुखेल. गवताची पेंढी.
**तेजस्,** न० (जः) पराक्रम. २ रेत. ३ प्रभाव. ४ दीप्ति, कांती. ५ बल. ६ लोणी. ७ अग्नि.

**तेजित**, वि० (तः-ता-तं) तीक्ष्णीकृत (शस्त्रादि.)
**तेम**, पु० (मः) आर्द्रीभाव, आर्द्रपणा.
**तेमन**, न० (नं) व्यंजनदधि. कढी. २ ओलें करणें.
**तेवन**, न० (नं) क्रीडा. २ क्रीडारण्य, क्रीडा करावयाचें अरण्य.
**तैजसावर्तिनी**, स्त्री० (नी) सुवर्णादि पाकार्थ पात्रवि० ज्यास मूस असें म्ह० ती.
**तैतिल**, पु० (लः) गेंडा. २ न० (लं) करणवि०.
**तैत्तिर**, न० (रं) तितर पक्ष्यांचा समुदाय.
**तैलपर्णिक**, न० (कं) पांढरा व शीतळ असा चंदनवि०.
**तैलपर्णी**, स्त्री० (र्णी) रक्तचंदन. २ धूप. ३ पण्यवि० ज्यास ऊद, लोबाण असें म्ह० तो.
**तैलपायिका**, स्त्री० (का) पक्षयुक्त कीटक वि० ज्यास वाघूळ असें म्ह० तें.
**तैलाख्य**, पु० (ख्यः) सुगंधि द्रव्यवि०.
**तैलीन**, वि० (नः-ना-नं) तीळ उत्पन्न होण्याचें (शेत.)
**तैष**, पु० (षः) पौषमास.
**तोक**, न० (कं) अपत्य.
**तोकक**, पु० (कः) चातक पक्षि.
**तोक्म**, पु० (क्मः) कर्णमळ. २ हिरवा रंग. ३ घोडा. ४ गायनांतील स्वरवि०. ५ हिरवा निःशूक जव.
**तोटक**, न० (कं) वृत्तवि०.
**तोत्र**, न० (त्रं) तोदनदंड, ताडण करण्याची काठी. २ आंसूड, चाबुक.
**तोदन**, न० (नं) आंसूड, चाबूक.
**तोमर**, पु० न० (रः-रं) शस्त्रविशेष ज्यास गुरगूज, असें म्ह० तें. (हें घुसळण्याच्या रवीसारखें असतें.)
**तोय**, न० (यं) उदक, पाणी.
**तोयडिंब**, पु० (बः) कठिणोदक, गार.
**तोयद**, पु० (दः) नागरमोथा. २ मेघ. ३ न० (दं) आज्य, तूप.
**तोयधर**, पु० (रः) नागरमोथा. २ मेघ. ३ शाकवि० कुरडूची भाजी.
**तोयपिप्पली**, स्त्री० (ली) वनौषधि जीस जळपिंपळी असें म्ह० ती.
**तोरण**, पु० न० (णः-णं) बाहेरचें दार. २ (दाराचे बाहेरचा भाग असेंही कोणाचें मत आहे. ३ मंगलकार्य सूचक द्वारावर बांधतात तें.
**तौर्यत्रिक** न० (कं) नृत्य, गायन आणि वाद्य.
**त्यक्त**, वि० (क्तः-क्ता-क्तं) उत्सृष्ट, टाकलेला.
**त्याग**, पु० (गः) दान. २टाकणें.
**त्यागी**, पु० (गी) शूर. २ दाता. ३ साधू.
**त्र्युषण**. न० (णं) सुंठ, पिंपळी आणि मिरीं ह्या तीहींचें कूट.
**त्रपा**, स्त्री० (पा) लज्जा, लाज. २ व्यभिचारिणी स्त्री.
**त्रपु**, पु० (पुः) कथील. २ शिसें. ३ रक्तिमा.
**त्रयी**, स्त्री० (यी) वेद. २ ऋग्वेद, सामवेद, आणि यजुर्वेद हे तीन.
**त्रयीतनु**, पु० (नुः) सूर्य. २ दत्तात्रेय.
**त्रयीधर्म**, पु० (र्मः) वेदोक्त विधि (यागादिक.)
**त्रस**, न० (सं) अरण्य. २ पु० (सः) जंगम, चर.
**त्रसर**, पु० (रः) कोष्ठ्यानें एक तऱ्हेनें गुंडाळलेलें सूत ज्यास तसरी असें म्ह० ती.

**त्रसरेणु**, स्त्री० (णु:) यमाची माता. २ किंचित काळाचें मान.

**त्रस्त**, वि० (स्तःस्ता-स्तं) भयशील, भित्रा. २ भ्यालेला. ३ कंटाळलेला.

**त्रस्नु**, वि० (स्नुः स्नुः स्नु) भयशील, भित्रा.

**त्राण**, न० ( णं ) रक्षण, राखणें. २ वि० ( णः णा- णं ) रक्षित, रक्षण केलेला.

**त्रात**, वि० ( तः ता- तं ) रक्षित, रक्षण केलेला.

**त्रापुष**, वि० ( षः- षा- षं ) कथिलाचें (भांडें वगैरे.)

**त्रायंती**, स्त्री० ( ती ) त्रायमाणानाम्नी वनौषधि.

**त्रायमाण**, वि० ( णः णा- णं ) रक्षण करणारा.

**त्रायमाणा**, स्त्री० ( णा ) त्रायमाणानाम्नी वनौषधि.

**त्रास**, पु० ( सः ) भय. २ मण्यादिकांतील दोष.

**त्रिक**, न० ( कं ) पाठीचे दांड्याचे खालीं एक ठिकाणीं मिळालेलीं तीन हाडें ज्यास माकडहाड असें म्हणतात तें.

**त्रिककुत्**, पु० ( त् ) त्रिकुटाचल, त्रिकुट पर्वत.

**त्रिकटु**, न० ( टु ) सुंठ, पिंपळी आणि मिरीं ह्या तिहींचें कूट.

**त्रिकंठ**, पु० ( ठः ) जलचरविशेष. २ दत्तात्रेय. ३ राक्षसविशेष.

**त्रिका**, स्त्री० ( का ) हात राहाट.

**त्रिकूट**, पु० ( टः ) त्रिकूटनामा पर्वत. २ मीठ.

**त्रिगर्त**, पु० ( र्तः ) देशविशेष. २ गणित विशेष.

**त्रिगर्तक**, पु० ब० ( काः ) देशविशेष.

**त्रिगर्ता**, स्त्री० ( र्ता ) कामुक स्त्री.

**त्रिगुणाकृत**, वि० ( तः ता- तं ) तीन वेळां नांगरलेलें (शेत.)

**त्रिदश**, पु० ( शः ) देव.

**त्रिदशायुध**, न० ( धं ) वज्र.

**त्रिदशालय**, पु० ( यः ) स्वर्ग.

**त्रिदिव**, न० ( वं ) स्वर्ग.

**त्रिदिवेश**, पु० ( शः ) देव.

**त्रिदोषज**, पु० ( जः ) हत्तीचा यजमान.

**त्रिधातु**, पु० ( तुः ) गणपति.

**त्रिनेत्रचूडामणि**, पु० (णिः) चंद्र.

**त्रिपताक**, न० ( कं ) ज्या कपाळावर तीन रेघा असतात तें.

**त्रिपथगा**, स्त्री० ( गा ) भागीरथीनदी.

**त्रिपात्**, पु० ( त् ) विष्णु.

**त्रिपुट**, पु० (टः) तीर.

**त्रिपुटा**, स्त्री० ( टा ) मोगरी. २ वनौषधि जीस तेंडू, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती. ३ लहान इलायचीची वेल.

**त्रिपुटी**, स्त्री० ( टी ) वनौषधि जीस तेंडू, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती. २ लहान इलायचीची वेल.

**त्रिपुटीफल**, पु० (लः) एरंडाचें झाड.

**त्रिपुंड्र**, पु० (ड्रः) भस्मलावण्याचा प्रकार.

**त्रिपुरदहन**, पु० (नः) महादेव.

**त्रिपुरमल्लिका**, स्त्री० (का) मोगरिचा भेद.

**त्रिपुरांतक**. पु० (कः) महादेव.

**त्रिफला**, स्त्री० (ला) हरडा, बेहडा आणि आंवळकठी ह्यांचें कूट.

**त्रिभंडी**, स्त्री० ( डी ) वनौषधि जीस तेंडू, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती.

**त्रिभद्र**, न० ( द्रं ) मैथून.
**त्रिमुखा**, स्त्री० ( खा ) ईश्वरी माया.
**त्रिमूर्ति**, पु० ( र्तिः ) बौद्धावतार, दत्तात्रय.
**त्रियामा**, स्त्री० ( मा ) रात्र.
**त्रिलोचन**, पु० (नः) महादेव.
**त्रिलोचना**, स्त्री० ( ना ) लक्ष्मी.
**त्रिवर्ग**, पु० ( र्गः ) धर्म ( वेदांत सांगितल्याप्रमाणें वर्तणें ), अर्थ ( द्रव्य ) आणि काम ( यथाशास्त्रस्त्रियादि विषयोपभोग ) हे तीन. २ क्षय (म्हणजे कृषिकर्म; रहदारी; व्यापार; किल्ले; पूल; हत्ती; रत्नादिकांची खाण; सैन्य; सरकार सारा ह्या अष्ट वर्गांचा जो नाश तो.) स्थिति (म्हणजे नाश व वाहाढ नसोन आहे त्याचप्रमाणें असणें ती), आणि वृद्धि (म्हणजे वाहाढ ) हे तीन. ३ सत्व, रज आणि तम हे तीन.
**त्रिवर्णक**, न० ( कं ) वनौषधि ज्यास सराटा असें म्हणतात तें. २ हरडा, बेहेडा आणि आंवळकठी ह्यांचें कूट.
**त्रिविक्रम**, पु० (मः) विष्णु. २ वामन.
**त्रिविष्टप**, न० (पं) स्वर्ग.
**त्रिवृत्**, स्त्री० (त) वनौषधि जीस तेंडू, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती.
**त्रिवृत्ता**, स्त्री० (त्ता) वनौषधि जीस, तेंडू, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती.
**त्रिशंकु**, पु० (कुः) चातकपाक्षि. २ राजविशेष. ३ माजर. ४ कीटकविशेष. ५ दीपपतंग.
**त्रिशरण**, पु० (णः) बौद्धावतार.
**त्रिशिख**, न० (खं) त्रिशूळ. २ मंडलांतर. ३ पु० (खः) राक्षस.
**त्रिशिरस्**, पु० (रा) कुबेर.
**त्रिसीत्य**, वि० (त्यःत्या-त्यं) तीन वेळां नांगरलेलें (शेत.)
**त्रिस्रोतःस्**, स्त्री० (ताः) भागीरथी नदी.
**त्रिहल्य**, वि० (ल्यःल्या-ल्यं) तीन वेळां नांगरलेलें (शेत.)
**त्रिहायणी**, स्त्री० (णी) तीन वर्षांची (गाय वगैरे.)
**त्रीफला**, स्त्री० हरडा, बेहेडा, आणि आंवळकठी ह्यांचें कूट.
**त्रुटि**, स्त्री० (टिः) सूक्ष्म येला, लहान इलायचीची वेल. २ वि० (टिःटिःटि) सूक्ष्म, बारीक. ३ स्त्री० (टिः) ह्रस्वाक्षराच्या चतुर्थांशाचा उच्चार करण्यास जो काल लागतो तो. ४ अल्प, लेश. ५ संशय.
**त्रुटी**, स्त्री० (टी) सूक्ष्म येला, लहान इलायचीची वेल. २ सूक्ष्म, बारीक. ३ ह्रस्वाक्षराच्या चतुर्थांशाचा उच्चार करण्यास जो काल लागतो तो. ४ अल्प, लेश. ५ संशय.
**त्रेता**, स्त्री० (ता) दाक्षिण, गार्हपत्य आणि आहवनीय हे तीन अग्नि. २ त्रेतायुग.
**त्रोटि**, स्त्री० (टिः) पक्ष्यांचें तोंड ज्यास टोंच, चोंच असें म्हणतात ती.
**त्रोटी**, स्त्री० (टी) कुंभ्याचें झाड. २ पक्षि. ३ मत्स्यविशेष.
**त्र्यंकट**, न० (टं) शिंकें.
**त्र्यंबक**, पु० (कः) महादेव.
**त्र्यंबकसख**, पु० (खः) देवांचा धनाध्यक्ष जो कुबेर नामा तो.
**त्र्यब्दा**, स्त्री० (ब्दा) तीन वर्षांची (गायवगैरे.)
**त्र्यक्ष**, पु० (क्षः) महादेव.

**त्र्यूषण**, न० (णं) सुंठ, पिंपळी आणि मिरीं ह्या तिहींचें कूट.

**त्व**, वि० (त्वः त्वा- त्वं) भिन्न, निराळा.

**त्वक्**, स्त्री० (क्) त्वचा, साल, वल्कल. २ चर्म. ३ वस्त्रविशेषाचे उत्पत्तीस कारणभूत जी त्वचा ती, अतसी, शाण.

**त्वक्कंडुर**, पु० (रः) व्रण.

**त्वक्पत्र**, न (त्रं) तज, दालचिनी.

**त्वक्पत्रा**, स्त्री० (त्रा) वनौषधि जीस मोरशेंडा, अजमोदा असें म्हणतात ती.

**त्वक्पत्री**, स्त्री० (त्री) हिंगु वृक्षाची पत्री.

**त्वक्पुष्प**, न० (ष्पं) रोमांच.

**त्वक्पुष्पिका**, स्त्री० (का) शिंब (आंगावरचें.)

**त्वक्सार**, पु० (रः) वेळू.

**त्वक्सुगंधक**, पु० (कः) नारिंगवृक्ष.

**त्वक्सुगंधा**, स्त्री० (धा) इलायचीचें झाड.

**त्वक्क्षीरी**, स्त्री० (री) वेणुजन्य औषधविशेष ज्यास वंशलोचन असें म्हणतात तें.

**त्वगंकुर**, पु० (रः) रोमांच.

**त्वच**, न० (चं) तज, दालचिनी.

**त्वचिसार**, पु० (रः) वेळू.

**त्वरा**, स्त्री० (रा) वेग.

**त्वरित**, न० (तं) लौकर, जलदी. २ वि० (तः ता- तं) वेगी, वेगवान.

**त्वष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) तासलेला.

**त्वष्टृ**, पु० (ष्टा) शिल्पिविशेष ज्यास सुतार असें म्हणतात तो. २ देवाचा सुतार. ३ ब्रम्हदेव.

**त्वाष्ट्र**, पु० ष्ट्रः) वृत्रासुर.

**त्वाष्ट्री**, स्त्री० (ष्ट्री) यमाची माता. २ लहान रथ.

**त्विष्**, स्त्री० (ट्) कांति. २ शोभा. ३ वाणी, वाचा. ४ रुचि. ५ अति आसक्ति.

**त्विषांपति**, पु० (तिः) सूर्य.

**त्सरु**, पु० (रुः) तरवार, कटार, खंजीर, सुरी इत्यादिकांची मूठ, थरू.

---

## थ.

**थ**, न० (थं) मंगल. २ रक्षण. ३ भय. ४ पु० (थः) पर्वत. ५ भयापासून रक्षण करणारा.

---

## द.

**द**, पु० (दः) अचल. २ दत्त, दिलें. ३ दाता.

**दक्रट**, पु० (टः) कारवीचें झाड. २ वेळूचा कोंब.

**दग्ध**, वि० (ग्धःग्धा-ग्धं) जळालेला.

**दग्धा**, स्त्री० (ग्धा) ज्या दिशेस सूर्य स्थित असतो ती दिशा.

**दग्धिका**, स्त्री० (का) दग्धान्न, करप.

**दंड**, पु० (डः) सूर्याचा दंड नामा एक चाकर. २ सेनेचा व्युहवि०. ३ दंडणें, दंड. ४ लांकूड. ५ मानवि०. ६ यम. ७ सैन्य. ८ वृक्षाचें कांड. ९ घोडा. १० कोंपरा. ११ मंथन करण्याचा दंड. १२ अभिमान. १३ ग्रह. १४ काल. १५ चार हातांचें प्रमाण, संन्याशाचे हातांतील कांठी.

**दंडढक्का**, स्त्री० (का) वाद्यविशेष ज्यास हत्तीवरची नौबत असें म्ह० ती.

**दंडधर**, पु० (रः) राजा. २ यम.

**दंडनीति**, स्त्री० (तिः) अर्थशास्त्र.

**दंडपाल**, पु० (लः) जलचरवि०.

**दंडभृत्**, पु० (त्) कुंभार.

**दंडयात्रा**, स्त्री० (त्रा) दिशेचा जय. २ दूरची यात्रा करणें.

**दंडवासिनि**, पु० (निः) द्वारपाल.

**दंडविष्कंभ**, पु० (भः) मंथन दंड ज्या खांबास बांधितात तो खांब, घुसळखांब, ताकमेड,

**दंडायाम**, पु० (मः) यम. २ दिवस. ३ अगस्त्यऋषि.

**दंडार**, पु० (रः) मस्त हत्ती. २ बाणाचें यंत्र. ३ कुंभाराचें चाक. ४ वाहन.

**दंडाहत**, वि० (तःता-तं) दंडानें घुसळलेलें (ताक वगैरे.)

**दंडिन्**, पु० (डी) पूर्वजिन. २ संन्याशी.

**दंत**, पु० (तः) दांत. २ पर्वताचा मध्य भाग. ३ पर्वताचें शिखर. ४ सभोंवताल्या वेली असून त्यांनीं वेष्टित जी जागा ती, जाळी. ५ टेंकडी.

**दंतक**, पु० (कः) डोंगरावरील शूलाकार पाषाणवि०

**दंतधावन**, पु० (नः) खदिर वृक्ष, खैराचें झाड. २ न० (नं) तोंड धुणें,

**दंतभाग**, पु० (गः) हत्तीचा अग्रभाग.

**दंतम**, पु० (मः) दांतांचा मळ.

**दंतवासस्**, न० (सः) ओंठ.

**दंतशठ**, पु० (ठः) कपित्थ वृक्ष, कवठीचें झाड. २ लहान इडनिंबीण. ३ नारिंगाचें झाड.

**दंतशठा**, स्त्री० (ठा) वनौषधि जीस आ[illegible] लोणिका, चुका असें म्ह० ती.

**दंतशाण**, न० (णं) दांतवण, राखुंडी.

**दंतहर्षण**, पु० (णः) इडाचें झाड.

**दंता** स्त्री० (ता) औषधिवि०.

**दंतायुध**, पु० (धः) डुकर.

**दंतावल**, पु० (लः) हत्ती.

**दंतिका**, स्त्री० (का) वनौषधि जीस दां[illegible] असें म्ह० ती.

**दंतिन्**, पु० (ती) हत्ती. २ प[illegible]

**दंतुर**, पु० (रः) मोठे [illegible] २ वि० (रःरा-रं) जो [illegible]वतः उंच असून उपाधि[illegible]करून किंचित नम्र होतो तो.

**दंतेय**, [illegible]० (यः) इंद्र.

**दत्त**, न० (तं) दिलें. २ पूजित, पुजलेलें.

**दंदशूक**, पु० (कः) सर्प. २ राक्षस.

**दद्रुघ्न**, पु० (घ्नः) वनौषधि ज्यास टायकळा असें म्ह० तो.

**दद्रुण**, वि० (णःणा-णं) दद्रु म्हणजे एक प्रकारची खरूज आहे ती ज्यास झाली आहे तो.

**दद्रुरोगिन्**, वि० (गी.गिनी.गि) दद्रु म्हणजे एक प्रकारची खरूज आहे ती ज्यास झाली आहे तो.

**दद्रूण**, वि० (णःणा-णं) दद्रु म्हणजे एक प्रकारची खरूज आहे ती ज्यास झाली आहे तो.

**दधि**, पु० (धिः) सप्त समुद्रांतील एक. २ न० (धि) दहीं. ३ सापत्याचें झाड. ४ धूप.

**दधिचार**, पु० (रः) रवीचा दांडा. २ माथ्या

**दधित्थ**, पु० (त्थः) कपित्थ वृक्ष, कवठीचें झाड.

**दधिफल**, पु० (लः) कपित्थ वृक्ष, कवठीचें झाड.

**दधिशोण**, पु० (णः) वानर.

**दधिस्नेह**, पु० (हः) लोणी.

**दधिस्वास्थि**, न० (स्थि) हिरा.

**दधृग्**, पु० (क्) दांडगा.

**दनु**, स्त्री० (नुः) राक्षसमाता.

**दनुज**, पु० (जः) दैत्य.

**दंपती**, पु० (ती) बायको आणि नवरा (हा शब्द [illegible] द्विवचनी चालतो.)

**दंभ**, पु० (भः) [illegible] २ कपट.

**दंभोलि**, पु० (लिः) [illegible] वज्र.

**दभ्र**, वि० (भ्रःभ्रा-भ्रं) सूक्ष्म, [illegible]िक, लहान.

**दम**, पु० (मः) इंद्रियनिग्रह, इंद्रियांचें [illegible]न. २ दंड, दंडणें, मारणें. ३ चिर[illegible]

**दमघोषसुत**, पु० (तः) शिशुपाळ.

**दमथ**, पु० (थः) इंद्रियनिग्रह, इंद्रियांचें दमन. २ दंड. ३ गुरें बांधण्याचा रज्जुविशेष ज्यास दावें असें म्हणतात तें.

**दमन**, पु० (नः) दमन पुष्प विशेष. २ धीर.

**दमित**, वि० (तःता-तं) ज्याचा निग्रह केला तो (इंद्रियादि.)

**दमुनस्**, पु० (नाः) अग्नि, विस्तव.

**दमूनस्**, पु० (नाः) अग्नि, विस्तव.

**दम्य**, पु० (म्यः) कांहीं तारुण्य दशेस आलेला गोवत्स.

**दया**, स्त्री० (या) करुणरस. २ कृपा.

**दयालु**, वि० (लुःलुःलु) दयाशील, कृपाळु.

**दयित**, वि० (तःता-तं) अभिष्ट, इष्ट. २ प्रिय, नवरा.

**दर**, पु० न० (रःरं) भय. २ गर्त, खळगा.

**दरं**, अ० थोड्या अर्थी.

**दरत्**, स्त्री० (त्) म्लेंछ जाति.

**दरदा**, स्त्री० (दा) पर्वताचा तुटलेला कडा. २ भय. ३ पर्वत.

**दरा**, अ० किंचित ह्या अर्थी.

**दरिद्र**, वि० (द्रः द्रा- द्रं) निर्धन, गरीब.

**दरी**, स्त्री० (री) पर्वतावरची गुहा.

**दर्दर**, पु० (रः) पर्वत.

**दर्दुर**, पु० (रः) बेडूक. २ मेघ. ३ पर्वतविशेष. ४ भग्न झालेला. ५ न० (रं) ग्रामजाल.

**दर्दुरा**, स्त्री० (रा) चंडिका, पार्वती.

**दर्प**, पु० (र्पः) अहंकार, गर्व. २ कस्तुरी.

**दर्पक**, पु० (कः) मदन, काम.

**दर्पण**, पु० (णः) आरसा.

**दर्बी**, स्त्री० (र्बी) पळी. २ सर्पाची फडा, फणा.

**दर्भ**, पु० (र्भः) तृणविशेष दर्भ.

**दर्भट**, न० (टं) गृहविशेष.

**दर्वि**, स्त्री० (र्वी) सैपाकाचें वगैरे कामाची पळी.

**दर्वी**, स्त्री० (र्वी) सैपाकाचे वगैरे कामाची पळी.

**दर्वीकर**, पु० (रः) सर्प.

**दर्श** पु० (र्शः) अमावास्या तिथि. २ अमावास्येचे ठायीं विहित जो पितृश्राद्धादिक याग तो. ३ अवलोकन, पाहणें.

**दर्शक**, पु० (कः) द्वारपाळ. २ प्रवीण. ३ दाखविणारा.

**दर्शन**, न० (नं) निरीक्षण, पाहाणें. २ डोळा. ३ स्वप्न. ४ बुद्धि. ५ धर्म. ६ उपलब्धि. ७ शास्त्र. ८ आरसा. ९ वर्ण.

**दर्शविपत्**, पु० (त्) चंद्र.

**दर्शिन्**, पु० (र्शी) बौद्धभेद.
**दल**, न० (लं) पर्ण, पान. २ अर्ध. ३ वृक्षादिकांची उंची.
**दलाढक**, पु० (कः) वनौषधि विशेष. २ किरण. ३ ज्याचें शरीर फार लहान म्हणजे जो अमानुषप्राय तो. ४ गेरू. ५ नागकेसर. ६ फार मोठा. ७ लहान सरोवर. ८ फेंस.
**दलामल**, न० (लं) वनौषधि गळ्याचें झाड. २ दमन.
**दलेगंधि**, पु० (धिः) सांतवणाचें झाड.
**दव**, पु० (वः) अरण्य.
**दविष्ठ**, वि० (ष्ठः ष्ठा-ष्ठं) फार दूरचा.
**दवीयस्**, वि० (याः यसी-यः) फार दूरचा.
**दंश**, पु० (शः) मोठी डांस, रानमाशी. २ कीटकवि०. ३ कवच, चिलखत. ४ दंश करणें. ५ मारणें. ६ सर्पानें केलेलें क्षत.
**दशक**, पु० (कः) शासन करणारा.
**दंशक**, पु० (कः) रानमाशी.
**दशकंठजित्**, पु० (त्) रामचंद्र.
**दशन**, पु (नः) दांत. २ शिखर. ३ न० (नं) कवच, चिलखत.
**दंशन**, न० (नं) दंश. २ चिलखत, कवच.
**दशनवासस्**, पु० (साः) ओंठ.
**दशनोछिष्ट**, पु० (ष्टः) अधरोष्ट चुंबन. २ दांतांनें तोडलेला. ३ श्वास.
**दशपुर**, न० (रं) वनौषधि ज्यास कैवर्ती, केवडी, क्षुद्रमोथा असें म्ह० ती.
**दशबल**, पु० (लः) बुद्ध, नास्तिकवि०.
**दंशभी**, पु० (भीः) रेडा.
**दशभूमिश**, पु० (शः) बौद्धावतार.
**दशमिन्**, वि० (मी. मिनी. मि) अतिवृद्ध, फार म्हातारा.
**दशमीस्थ**, वि० (स्थः स्था-स्थं) अतिवृद्ध, फार म्हातारा. २ निर्बळ.
**दशमुख**, पु० (खः) रावण.
**दशा**, स्त्री० (शा) वस्त्राचे दोहींकडचे पुढचे भाग, दशा. २ बाल्य, तारुण्यादिक ज्या अनेकविध अवस्था त्या प्रत्येक. ३ दिव्याची वात.
**दशाकर्षी**, पु० (र्षी) दिवा.
**दशान**, न० (नं) प्रकाश. २ पु० (नः) सूर्य.
**दशार्ह**, पु० (र्हः) बौद्धावतार. २ पु० ब० (र्हाः) देशवि०.
**दशावतार**, पु० (रः) विष्णु.
**दंशित**, वि० (तः ता-तं) कवच धारण केलेला. २ ज्याला दंश झाला आहे तो.
**दंशी**, स्त्री० (शी) रानमाश्यांतील एक लहान जाती.
**दशेंधन**, पु० (नः) दिवा.
**दशेर**, पु० (रः) निजणाराचा घात.
**दंष्ट्रिन्**, पु० (ष्ट्री) डुकर.
**दंष्ट्री**, पु० (ष्ट्री) सर्प.
**दस्म**, पु० (स्मः) यजमान. २ चोर. ३ अग्नि.
**दस्यु**, पु० (स्युः) चोर. २ शत्रु.
**दस्र**, पु० (स्रः) अश्विनीकुमार, स्वर्गींचा वैद्य. २ गर्दभ.
**दहन**, पु० (नः) अग्नि. २ वनौषधि ज्यास चिता असें म्ह० ती. ३ वनौषधि ज्यास बिबवा, भिलावा असें म्ह० तो वृक्ष. ४ दुष्टाचरण.

३ दधियुक्त भ्रष्टयवचूर्ण, दहींपीठ. ४ ऊद.

**दाहसर,** पु० (रः) स्मशान, मसनवटी.

**दाक्षक,** न० (कं) दक्षाच्या अपत्यांचा समूह.

**दाक्षाप्य,** पु० (प्यः) पक्षिविशेष ज्यास गीध असें म्हणतात तो.

**दाक्षायणी,** स्त्री० (णी) अश्विन्यादिक सत्तावीस नक्षत्रें. २ पार्वती, गौरी.

**दाक्षायणीपति,** पु० (तिः) चंद्र. २ शंकर, महादेव.

**दाक्षाय्य,** पु० (य्यः) पक्षिविशेष ज्यास गीध असें म्हणतात तो.

**दाक्षिणात्य,** पु० (त्यः) नारळीचें झाड, माड. २ वि० (त्यःत्या-त्यं) दक्षिण दिशेस झालेला.

**दाक्षिण्य,** पु० (ण्यः) दक्षणा घेण्यास योग्य. २ सरळपणा.

**दाक्षीपुत्र,** पु० (त्रः) पाणिनीऋषि.

**दिक्,** स्त्री० (क्) दिशा.

**दिकरी,** स्त्री० (री) तरुण स्त्री.

**दिगंबर,** वि० (रःरा-रं) नग्न, नागवा. २ पु० (रः) महादेव. ३ अंधकार.

**दिगंबरक,** पु० (कः) दिगंबर योगी.

**दिग्ध,** वि० (ग्धःग्धा-ग्धं) लिप्त. २ पु० (ग्धः) विषानें जो लित बाण तो.

**दित,** वि० (तःता-तं) खंडित, तोडलेला.

**दिति,** स्त्री० (तिः) दैत्यमाता.

**दितिसुत,** पु० (तः) दैत्य.

**दिदिवि,** पु० (विः) गुरुग्रह.

**दिधिषु,** स्त्री० (षुः) प्रथम एका पुरुषाशीं विवाह करून नंतर दुसऱ्याशीं विवाह करणारी जी स्त्री ती. २ पु० (षुः) ह्या स्त्रीचा दुसरा नवरा, (मनुस्मृतींत ज्येष्ट कन्या अविवाहित असतां ज्या कनिष्ट कन्येचा विवाह केला ती कनिष्ट कन्या असें सांगितलें आहे.)

**दिधिषू,** स्त्री० (षूः) प्रथम एका पुरुषाशीं विवाह करून नंतर दुसऱ्याशीं विवाह करणारी जी स्त्री ती. २ ज्येष्ठ कन्या अविवाहित असतां ज्या कनिष्ठ कन्येचा विवाह केला ती कनिष्ठ कन्या असें मनुस्मृतींत सांगितलें आहे. ३ पु० (पुः) प्रथम एकाशीं विवाह करून नंतर दुसऱ्याशीं विवाह करणारी जी स्त्री तिचा दुसरा नवरा.

**दिन,** न० (नं) दिवस.

**दिनप्रणी,** पु० (णीः) सूर्य.

**दिनमणि,** पु० (णिः) सूर्य.

**दिनमूर्धन्,** पु० (र्धा) उदयाचल.

**दिनांत,** पु० (तः) संध्याकाळ.

**दिनांतक,** पु० (कः) संध्याकाळ.

**दिलीर,** पु० (रः) गोमयछत्रिका.

**दिव,** न० (वं) स्वर्गलोक. २ आकाश. ३ पु० (वः) पक्षिविशेष ज्यास चारगा, चाष, तास असें म्हणतात तो.

**दिवस,** पु० न० (सःसं) सूर्योदयापासून सूर्यास्तपर्यंत जो काळ तो.

**दिवस्पति,** पु० (तिः) इंद्रनामा जो देवांचा राजा तो.

**दिवा,** अ० दिवसाचे ठायीं ह्याअर्थी.

**दिवाकर,** पु० (रः) सूर्य.

**दिवाकीर्ति,** पु० (र्तिः) चांडाळ. २ न्हावी.

**दिवांध,** पु० (धः) पक्षिविशेष ज्यास पेंचा पक्षि असें म्हणतात तो. २ पक्षिविशेष ज्यास घूक, घूबड असें म्हणतात तो.

**दिवाधिका**, स्त्री० (का) चिचुंदरी.

**दिवाभीत**, पु० (तः) पक्षिशेष ज्यास घुबड असें म्हणतात तो. २ चंद्रविकासी कमळांचा समुदाय.

**दिविषद्**, पु० (द्) देव.

**दिवोकस्**, पु० (काः) देव. २ चातक पक्षि.

**दिवौकस्**, पु० देव. २ चातक पक्षि.

**दिव्य**, न० (व्यं) लवंग. २ वि० (व्यः व्या-व्यं) सुंदर. ३ स्वर्गाचेठायीं झालेला. ४ शफत.

**दिव्यचक्षुस**, पु० (क्षुः) सुगंधविशेष. २ आंधळा. ३ ज्याचे डोळे चांगले आहेत तो.

**दिव्या**, स्त्री० (व्या) आंवळीचें झाड.

**दिश्य**, वि० (श्यःश्या श्यं) दिशांचे ठायीं झालेला.

**दिष्ट**, पु० (ष्टः) काल. २ सांगणें. ३ न० (ष्टं) दैव. ४ प्राक्तनकर्म.

**दिष्टांत**, पु० (तः) मरण.

**दिष्टि**, स्त्री० (ष्टिः) परिमाण. २ हर्ष.

**दिष्टया**, अ० आनंद. २ मंगल ह्या अर्थी

**दिदिवि**, पु० (विः) अन्न, भात. २ गुरु नामा ग्रह.

**दीदिविर**, पु० (रः) गुरु नामा ग्रह.

**दीधिति**, पु० स्त्री० (तिःतिः) किरण.

**दीन**, वि० (नःना-नं) निर्धन, दरिद्री. २ भ्यालेला.

**दीना**, स्त्री० (ना) उंदरीण.

**दीनार**, पु० (रः) बत्तीस गुंजा प्रमाणाचें एक नाणें आहे. (सुवर्णाचा सत्तरावा भाग तो एक रूपक आणि अठ्ठावीस रूपकांचा एक दीनार म्हटला. आहे.)

**दीप**, पु० (पः) दिवा. २ उत्तरीय, पांघरण्याचें-वस्त्र. ३ मस्तक. ४ लता.

**दीपक**, पु० (कः) अजमोदा, ओंवा. २ मोराची शेंडी. ३ प्रकाशक. ४ न० (कं) वाणीचा अलंकार.

**दीपन**, न० (नं) कुंकूं, रंग, पिंजर. २ प्रीति, भक्षणाची इच्छा.

**दीपवृक्ष**, पु० (क्षः) वृक्षविशेष. २ मोठा दिवा.

**दीपशृंखला**, स्त्री० (ला) दिव्यांची पंक्ति, ओळ.

**दीपाली**, स्त्री० (ली) कार्तीक शुद्ध प्रतिपदा. २ दिव्यांची ओळ.

**दीप्त**, न० (प्तं) दग्ध. २ पेटविलेलें.

**दीप्तजिव्हा**, स्त्री० (व्हा) कोल्ही.

**दीप्ताग्नि**, पु० (ग्निः) अगस्त्य ऋषि.

**दीप्ताक्ष**, पु० (क्षः) माजर.

**दीप्ति**, स्त्री० (प्तिः) कांति.

**दीप्य**, पु० (प्यः) वनौषधि ज्यास मयूरशिखा, मोर शेंडा असें म्हणतात तो. २ (ओंवा असेंही कोणाचें मत आहे.)

**दीप्यक**, पु० (कः) अजमोदा, ओंवा. २ मोराची शेंडी. ३ प्रकाशक. ४ जिरें.

**दीर्घ**, स्त्री० (र्घः र्घा र्घं) लांब.

**दीर्घकोशिका**, स्त्री० (का) जळूसारखा एक जलचरविशेष.

**दीर्घकोषी**, स्त्री० (षी) जळूसारखा एक जलचरविशेष.

**दीर्घजंघ**, पु० (घः) पक्षिविशेष ज्यास बक असें म्हणतात तो.

**दीर्घतुंडी**, स्त्री० (डी) चिचुंदरी.

**दीर्घदर्शिन्**, पु० (र्शी) पंडित, विद्वान.

**दीर्घपाद**, पु० (दः) कंकपक्षि.

**दीर्घपृष्ठ**, पु० (ष्ठः) सर्प.

**दीर्घमारुत**, पु० (तः) हत्ती.

**दीर्घरद**, पु० (दः) डुकर.
**दीर्घरात्र**, न० (त्रं) बहुतकाळ.
**दीर्घवृंत**, पु० (तः) दिंडयाचें झाड.
**दीर्घसुरत**, पु० (तः) कुत्रा.
**दीर्घसूत्र**, वि० (त्रः त्रा- त्रं) थोडया कामास बहुत वेळ लावणारा असा आळशी.
**दीर्घाध्वग**, पु० (गः) जासूद. २ उंट.
**दीर्घायुध**, पु० (धः) भाला.
**दीर्घायुस्**, वि० (युः) ज्याला पुष्कळ आयुष्य आहे तो. २ पु० (युः) सांवरीचें झाड. ३ असणाचें झाड. ४ कावळा. ५ मार्कंडेय ऋषि.
**दीर्घिका**, स्त्री० (का) ज्या विहिरीस आंत उतरण्यास पायऱ्या असतात ती विहीर. २ तळी.
**दीर्ण**, न० (र्णं) विदारण केलेलें. २ भ्यालेलें.
**दुकूल**, न० (लं) बारीक वस्त्र. २ पट्टवस्त्र, पाटांव.
**दुःकेशवालय**, पु० (यः) पिंपळाचें झाड.
**दुःख**, न० (खं) मनास जी पीडा ती.
**दुःखलोक**, पु० (कः) संसार.
**दुग्ध**, न० (ग्धं) दूध. २ पूरित. ३ पु० (ग्धः) सप्तसमुद्रांतील एक.
**दुःग्धतालीय**, न० (यं) दुधाचा फेंस.
**दुग्धि**, स्त्री० (ग्धिः) वनौषधि विशेष जीस दुधी असें म्हणतात ती.
**दुग्धिका**, स्त्री० (का) वनौषधि जीस दुधी असें म्हणतात ती.
**दुंदुभि**, पु० (भिः) वाद्यविशेष ज्यास भेरी असें म्हणतात तें. २ सूर्याचा सारथी जो अरुण नामा तो. ३ दैत्यविशेष. ४ वरुण. ५ स्त्री० (भिः) लहान मुलाचें खेळण्याचें एक साधन ज्यास देशांतरी तितिरिंग असें म्हणतात तें.
**दुंदुक्षिति**, पु० (तिः) विष्णूचा पिता.
**दुड्डुम**, पु० (मः) हरिद्वर्णपलांडु, हिरवा कांदा.
**दुःप्रधर्षिणी**, स्त्री० (णी) रानवांगी, डोरली वांयगी.
**दुर्**, अ० निषेध. २ दुष्ट ह्या अर्थी.
**दुरध्व**, पु० (ध्वः) दुर्मार्ग, वाईट रस्ता.
**दुरारोहा**, स्त्री० (हा) सांवरीचें झाड.
**दुरालभा**, स्त्री० (भा) वनौषधि जीस धमासा असें म्हणतात ती.
**दुरित**, न० (तं) पातक.
**दुरेपणा**, स्त्री० (णा) शापवचन, शापाचें भाषण.
**दुरोदर**, पु० (रः) द्यूतकार, फांसे वगैरे निर्जिव पदार्थांनीं खेळणारा. २ प्रतिज्ञा पूर्वक व्यवहारी प्रतिज्ञेप्रमाणें जें द्रव्यादिक घ्यावयाचें तें. ३ न० (रं) अप्राणिकारणक क्रीडा, निर्जिव पदार्थांनीं खेळणें.
**दुर्ग**, पु० (र्गः) किल्ला. २ वि० (र्गः र्गा- र्गं) दुर्गम.
**दुर्गत**, वि० (तः ता- तं) दरिद्री, निर्धन.
**दुर्गति**, स्त्री० (तिः) नरक. २ निर्धनत्व.
**दुर्गंध**, पु० (धः) अनिष्टगंध, वाईटगंध. २ वि० (धः धा- धं) दुर्गंधयुक्त.
**दुर्गसंचर**, पु० (रः) दुर्मार्ग, वाईट रस्ता. २ दुर्मार्गाचे ठायीं संचार.
**दुर्गा**, स्त्री० (र्गा) पार्वती. २ नीळ.
**दुर्जन**, पु०(नः) दुष्टजन. २ एके ठिकाणीं मिळाल्यांचें द्वैध करणारा.

**दुर्जात**, न० (तं) अयुक्त. २ व्यसन. ३ नपुंसक.

**दुर्दिन**, न० (नं) ज्या दिवशीं मेघांनीं सूर्य अगदीं आच्छादिलेला असतो तो दिवस. (रात्र अशी असेल तरी ती ही समजावी.)

**दुर्धर**, पु० (रः) नरकविशेष. २ औषधिविशेष ज्यास बैलघांटी असें म्हणतात तो.

**दुर्नामक**, पु० (कः) रोगविशेष ज्यास मूळव्याध असें म्हणतात तो.

**दुर्नामन्**, पु० (मा) जळूसारखा एक जलचर विशेष. २ मूळव्याधीचा रोग.

**दुर्बल**, वि० (लःला-लं) अशक्त.

**दुर्भगा**, स्त्री० (गा) दुर्भाग्य स्त्री.

**दुर्मनस्**, वि० (नाःनाःनः) ज्याचें चित्त व्याकूळ झालें आहे तो, विरस झालेला.

**दुर्मुख**, पु० (खः) नागविशेष. २ वानरविशेष. ३ वि० (खःखा-खं) अनर्गल मुख, तोंडाचा अचपट, तोंडाळ.

**दुर्हृद**, पु० (दः) शत्रु. २ दुष्ट स्वभावाचा.

**दुर्लभ**, वि० (भःभा-भं) मिळण्यास कठीण. २ ज्यास ओली खरूज झाली आहे तो.

**दुर्वर्ण**, वि० (र्णःर्णा-र्णं) वाईट वर्ण. २ न० (र्णं) रूपें.

**दुर्विध**, पु० (धः) खल, दुष्ट. २ दरिद्री, निर्धन.

**दुलि**, स्त्री० (लिः) कांसवीण.

**दुश्चर**, पु० (रः) पाण्यांतील लहान शिंप.

**दुश्च्यवन**, पु० (नः) इंद्र.

**दुःषमं**, अ० निंद्य ह्या अर्थी. उ० दुःषमं वर्ततेवधूः

**दुष्कृत**, न० (तं) पातक.

**दुष्टु**, अ० निंद्य ह्या अर्थी. उ० दुष्टु-खलत्वं.

**दुष्पत्र**, पु० (त्रः) वनौषधि ज्यास चोर ओंवा, किरमाणी ओंवा असें म्हणतात तो.

**दुष्य**, न० (ष्यं) वस्त्रगृह.

**दुःसम**, न० (मं) अयुक्त.

**दुस्थ**, पु० (स्थः) दरिद्री, निर्धन. २ मूर्ख. ३ वि० (स्थःस्था-स्थं) दुःखें करून युक्त.

**दुःस्पर्श**, वि० (र्शःर्शा-र्शं) स्पर्श करावयास अयोग्य. २ पु० (र्शः) वनौषधि ज्यास धमासा असें म्हणतात तो.

**दुस्पर्शा**, स्त्री० (र्शा) वनौषधि जीस रिंगणी असें म्हणतात ती.

**दुहितृ**, स्त्री० (ता) कन्या.

**दूत**, पु० (तः) दूत, निरोप सांगणारा.

**दूती**, स्त्री० (ती) दूतकर्म करणारी स्त्री.

**दूत्य**, न० (त्यं) दूताचें कर्म किंवा भाव.

**दून**, वि० (नःना-नं) संतप्त, तापविलेला.

**दूर**, वि० (रःरा-रं) व्यवहित, लांब.

**दूरदर्शिन्**, पु० (र्शी) पंडित, विद्वान. २ कावळा.

**दूर्वा**, स्त्री० (र्वा) दुर्वा.

**दूषक**, पु० (कः) दूषण ठेवणारा.

**दूषिका**, स्त्री० (का) नेत्रांतील मळ ज्यास उकीर असें म्हणतात तो. २ सोनाराची शलाका जीस सळई असें म्हणतात ती.

**दूषीका**, स्त्री० (का) नेत्रांतील मळ ज्यास उकीर, पू असें म्हणतात तो.

**दूष्य,** न० (ष्यं) वस्त्रांनीं केलेलें घर ज्यास डेरा, राहुटी, तंबू असें म्हणतात तो. २ वस्त्र. ३ वि० (ष्यःष्या-ष्यं) दूषण द्यावयास योग्य.

**दूष्या,** स्त्री० (ष्या) हत्तीच्या मध्यें बांधण्याचा एक रज्जुविशेष.

**दृग्भू,** स्त्री० (ग्भूः) सर्प. २ वज्र.

**दृढ,** वि० (ढःढा-ढं) काठिण्ययुक्त, कठीण. २ शक्त, समर्थ. ३ स्थूल, बळकट.

**दृढं,** अ० अतिशयार्थी.

**दृढसंधि,** वि० (धिःधिःधि) दृढसंधानयुक्त,, घट्ट मिळालेला, सांधलेला.

**दृण,** न० (णं) धनुष्य. २ पु० (णः) भ्रमर.

**दृति,** स्त्री० (तिः) चर्मपुटक, चामड्याचें पात्र. २ पु० (तिः) विस्तव पेटविण्याकरितां केलेला चामड्याचा भाता. ३ मत्स्य, मासा.

**दृश्,** स्त्री० (क्) नेत्र, डोळा. २ ज्ञान, बुद्धि. ३ दर्शन, पहाणें. ४ वीक्षक, पहाणारा.

**दृषत्,** पु० (द्) पाषाण, दगड. २ चटण्या वगैरे वाटण्याचा दगड ज्यास पाटा असें म्ह० तो.

**दृषद्वती,** स्त्री० (ती) पार्वती. २ नदीवि०. ३ कात्यायनी देवी.

**दृष्ट,** वि० (ष्टःष्टा-ष्टं) पाहिलेला. २ चोरादिकांपासून जें भय तें.

**दृष्टरजस्,** स्त्री० (जा) जीस प्रथमच ऋतु प्राप्त झाला आहे ती स्त्री.

**दृष्टांत,** पु० (तः) निदर्शन, उदाहरण. २ शास्त्र. ३ मरण.

**दृष्टि,** स्त्री० (ष्टिः) नेत्र, डोळा. २ ज्ञान. ३ दर्शन, पहाणें.

**देव,** पु० (वः) ईश्वर. २ राजा (नाटय प्रकरणांत.) ३ विष्णु. ४ वज्रटीक देव, ५ मेघ. ६ न० (वं) इंद्रिय.

**देवकीनंदन,** पु० (नः) विष्णु.

**देवकुल,** न० (लं) देवांचें घर, मंदीर, देऊळ.

**देवकुसुम,** न० (मं) लवंग.

**देवखातक,** न० (कं) प्राचीन सरोवर, फार काळचें तळें.

**देवछंद,** पु० (दः) शंभर सरांचा मुक्ताहार.

**देवजग्धक,** न० (कं) वनौषधि ज्यास गंजाण, रोहिस गवत असें म्ह० तें

**देवट्टि,** स्त्री० (टी) पक्षिवि०.

**देवतरु,** पु० (रुः) कल्पतरु.

**देवता,** स्त्री० (ता) देव.

**देवताड,** पु० (डः) वृक्षवि० ज्यास देवताली, देवडंगरी असें म्ह० तो. २ राहु नामा ग्रह.. ३ मेघ. ४ अग्नि.

**देवत्व,** न० (त्वं) देवभाव, ईश्वरपणा.

**देवदत्त,** पु० (त्तः) शाक्यमुनि बंधु. २ कोणी एक कल्पिलेला.

**देवद्रोणी,** स्त्री० (णी) देवयात्रा.

**देवद्र्यक्,** वि० (ङ्. द्रीची. क्) जो देवास पुजितो किंवा देवास जातो तो.

**देवन,** पु० (नः) खेळण्याचें साधन जो फांसा तो. २ न० (नं) क्रीडा, खेळ. ३ जिंकण्याची इच्छा. ४ व्यवहार. ५ क्रीडेची बाग.

**देवपथ,** पु० (थः) देवमार्ग.

**देवब्रम्हन्,** पु० (म्हा) देवल ऋषि.

**देवभूय.** न० (यं) देवभाव, देवत्व.

**देवमणि,** पु० (णिः) सूर्य. २ घोड्याच्या गळ्यावरचा भोंवरा ज्यास देवमण असें म्ह० तो. ३ विष्णूच्या गळ्यांतील माणि.

**देवमातृ,** स्त्री० (ता) देवांची माता.

**देवमातृक,** वि० (कः-का-कं) ज्या देशीं पर्जन्यानेंच धान्य पिकतें तो. देश.

**देवयज्ञ,** पु० (ज्ञः) वैश्वदेवांग जो होम तो.

**देवयात्रा,** स्त्री० (त्रा) देवयात्रा.

**देवयु,** पु० (युः) धार्मिक, धर्मानें वागणारा. २ यात्रा करणारा.

**देवर,** पु० (रः) नवऱ्याचा बंधु, दीर.

**देवराज,** पु० (जः) इंद्र.

**देवल,** पु० (लः) देवाच्या सेवेवर उपजीविका करणारा, देवळी. गुरव इत्यादि.

**देवलोक,** पु० (कः) स्वर्गलोक.

**देववल्लभ,** पु० (भः) उंडिणीचें झाड.

**देववृक्ष,** पु० (क्षः) सातवणाचें झाड. २ मंदारादि कल्पतरु.

**देवव्रत,** पु० (तः) भीष्म.

**देवसभा,** स्त्री० (भा) देवांची सभा.

**देवसभ्य,** पु० (भ्यः) देव सभेचा सभासद.

**देवसायुज्य,** न० (ज्यं) देवभाव, देवत्व.

**देवसेना,** स्त्री० (ना) इंद्राची कन्या. २ देवांचें सैन्य. ३ दिग्गजाची स्त्री, बायको.

**देवाजीव,** पु० (वः) देवाच्या सेवेवर उपजीविका करणारा, देवळी, गुरव इत्यादि.

**देवाजीविन्,** पु० (वी) देवाच्या सेवेवर उपजीविका करणारा, देवळी, गुरव इत्यादि.

**देवानांप्रिय,** पु० (यः) बकरा.

**देवावास,** पु० (सः) कल्पतरु.

**देविकोट,** पु० (टः) शोणितपुर.

**देवी,** स्त्री० (वी) पट्टाभिषिक्त जी राजाची स्त्री ती. २ वनौषधि जीस मुरवेल असें म्हणतात ती. ३ पिंडिका नांवाची एक-लताविशेष. ४ देवता.

**देवृ,** पु० (वा) नवऱ्याचा बंधू, दीर.

**देवोद्यान,** न० (नं) देवांची बाग.

**देश,** पु० (शः) ग्रामसमुदाय.

**देशपुर,** न० (रं) देश. २ नगर.

**देशरूप,** न० (पं) नीति.

**देशिक,** पु० (कः) गुरु. २ वि० (कः-का- कं) देशाचा.

**देष्णु,** पु० (ष्णुः) दाता. २ दुर्गम.

**देह,** पु० न० (हः हं) शरीर.

**देहयात्रा,** स्त्री० (त्रा) भोजन. २ मरण.

**देहली,** स्त्री० (ली) घराच्या दाराचा खालचा भाग, उंबरा, उंबरठा.

**देहिका,** स्त्री० (का) जंतुविशेष.

**दैतेय,** पु० (यः) दैत्य.

**दैत्य,** पु० (त्यः) दैत्य, राक्षस.

**दैत्यगुरु,** पु० (रुः) शुक्राचार्य.

**दैत्यदेव,** पु० (वः) वरुण.

**दैत्यपुरोधस्,** पु० (धाः) शुक्राचार्य.

**दैत्यमातृ,** स्त्री० (ता) दैत्यांची माता.

**दैत्या,** स्त्री० (त्या) चोर ओंवा, किरमाणी ओंवा. २ दारु. ३ वनौषधि जीस मुरा, तालीसपत्र, मोरमांशी असें म्हणतात ती.

**दैत्यारि,** पु० (रिः) विष्णु. २ देव.

**दैर्घ्य,** न० (र्घ्यं) लांबी.

**दैव,** न० (वं) सुखदुःखांचा, नियामक जो प्राक्तन कर्मानुसार ईश्वर संकल्प तो, नशीब,

**दैवत,** पु० न० (तः तं) देव.

**दैवदीप,** न० (पं) नेत्र.

**दैवप्रश्न**, पु० (श्नः) रात्रीस बाहेर निघतेसमयीं शुभाशुभ सूचक जी वाणी श्रवण होते ती. २ आकाशवाणी.

**दैवलेखक**, पु० ( कः ) ज्योतिषी.

**दैवज्ञ**, पु० ( ज्ञः ) ज्योतिषी.

**दैवज्ञा**, स्त्री० ( ज्ञा ) शुभाशुभ जाणणारी बायको.

**दोग्धृ**, पु० ( ग्धा ) वत्स, वासरूं. २ गवळी. ३ कवी.

**दोर्गेड**, पु० ( डः ) ठोंठा.

**दोर्ग्रह**, पु० (हः) बलवान पुरुष.

**दोला**, स्त्री० (ला) वनौ० जीस नीली, नीळ असें म्हणतात ती. २ हिंडोला, डोली इत्यादि.

**दोलिका**, स्त्री० ( का ) डोली, डोळी.

**दोष**, पु० ( षः ) दूषण. २ पाप. ३ क्लेश.

**दोषज्ञ**, पु० (ज्ञः) पंडित, विद्वान. २ वैद्य.

**दोषा**, स्त्री० ( षा ) भुज, बाहु. २ रात्र. ३ अ० रात्रीं, रात्रीचे ठायीं ह्या अर्थी.

**दोषातिलक**, पु० (कः) दीप. २ चंद्र.

**दोषैकदृक्**, पु० ( क् ) दोषमात्र पाहणारा.

**दोस्**, पु० (दोः) भुज, बाहु.

**दोहद**, पु० (दः) मनांतील इच्छिलेलें होण्यास देवास जें देणें तें. २ न० ( दं ) इच्छा. ३ गर्भिणीची इच्छा, डोहळा.

**दोहदलक्षण**, न० (णं( गर्भ.

**दोहदवती**, स्त्री० ( ती ) पदार्थ विशेषाची इच्छा करणारी गरोदर स्त्री, बायको.

**दोहनी**, स्त्री० ( नी ) दूध काढण्याचें भांडें, चरवी.

**दौकूल**, वि० ( लः ला- लं ) पट्ट वस्त्रानें वेष्टित.

**दौत्य**, न० ( त्यं ) दूताचें कर्म किंवा दूतत्व.

**दौर्वीण**, न० (णं ) दुर्वा. २ दुर्वांचा रस.

**दौष्यंति**, पु० ( तिः ) दुष्यंताचा पुत्र जो भरत तो.

**दौःसाधिक**, पु० ( कः ) द्वारपाळ.

**द्यु**, न० (द्यु) दिवस. २ गमन.

**द्युतकृत्**, पु० (त्) जुगार खेळणारा.

**द्युतपौर्णिमा**, स्त्री० (मा) अश्विनी पूर्णिमा, कोजागर.

**द्युति**, स्त्री० ( तिः ) किरण. २ कांति, शोभा.

**द्युमणि**, पु० (णिः) सूर्य.

**द्युमद्दी**, स्त्री० (द्दी) यममाता.

**द्युम्न**, न० (म्नं) धन, द्रव्य. २ बळ.

**द्युषद**, पु० (दः) देव.

**द्यूत**, पु० न० (तःतं) अप्रमाणिकरणक क्रीडा, निर्जीव पदार्थांचा खेळ, जुगार.

**द्यूतकारक**, पु० (कः) द्यूत करविणारा

**द्यूतकृत्**, पु० (त्) द्यूत करणारा, सोंगटीबाज, जुवेबाज इत्यादि.

**द्यूतबीज**, न० (जं) कवडी.

**द्योत**, पु० (तः) सूर्याचा प्रभा. (प्रभा सामान्याचें हें नांव असेंही कोणी म्हणतात.)

**द्यौ**, स्त्री० (द्यौः) स्वर्ग. २ आकाश.

**द्रगड**, पु० (डः) सूपवि०. २ वाद्यवि.

**द्रप्स**, पु० न० (प्सःप्सं) पातळ दहीं.

**द्रप्स्य**, न० (प्स्यं) पातळ दहीं.

**द्रव**, पु० (वः) द्रवत्वयुक्त. २ क्रीडा. पलायन, पळणें. ४ रस. २ दया.

**द्रवंती,** स्त्री० (ती) वनौषधि जीस मूषिकपर्णी, उंदीरकानी असें म्ह० ती.
**द्रविण,** न० (णं) पराक्रम. २ धन, द्रव्य. ३ सुवर्ण, सोनें. ४ बल, सामर्थ्य.
**द्रव्य,** न० (व्यं) धन. २ सत्व. ३ रूप रसादिक. ४ गुणाचे जे आश्रय ते प्रत्येक. ५ पितळ. ६ केशरादिकांची उटी. ७ औषध. ८ कल्याण. ९ झाडाचा चीक. १० पदार्थ. ११ द्रव्य.
**द्राक्,** अ० शीघ्रार्थी.
**द्राघिष्ठ,** वि० (ष्ठः ष्ठा-ष्ठं) अति दीर्घ.
**द्रावक,** पु० (कः) चोर. २ पाषाणवि०. ३ चतुर.
**द्राविड,** पु० (डः) देशवि०. २ जातिवि०. ३ मुख्य.
**द्राविडक,** पु० (कः) वनौषधि ज्यास कचर असें म्ह० तो.
**द्राक्षा,** स्त्री० (क्षा) द्राक्षांची वेल.
**द्रु,** पु० (द्रुः) वृक्ष, झाड.
**द्रुकिलिम,** न० (मं) देवदारु वृक्ष.
**द्रुघण,** पु० (णः) ब्रम्हदेव. २ मुद्गर, मुद्गल. ३ कुऱ्हाड.
**द्रुघन,** पु० (नः) मुद्गर, मुद्गल.
**द्रुण,** पु० (णः) विषकीट ज्यास विंचु असें म्ह० तो.
**द्रुणह,** पु० (हः) तरवारीचें म्यान.
**द्रुणि,** स्त्री० (णिः) डोण, दोण, टांकी.
**द्रुणी,** स्त्री० (णि) घोण. २ कूर्मी, कासवीण.
**द्रुत,** न० (तं) शीघ्र ह्या अर्थी. २ वि० (तःता-तं) द्रवीभूत, द्रवलेला.
**द्रुनख,** न० (खं) कांटा.
**द्रुम,** पु० (मः) वृक्ष, झाड. २ पारिजातक. ३ यक्षवि०. ४ गायनांतील स्वरवि०.
**द्रुमामय,** पु० (यः) लाक्षा, लाख.
**द्रुमोत्पल,** पु० (लः) वृक्षवि० ज्यास पांगारा असें म्ह० तो.
**द्रुवय,** न० (यं) प्रमाण.
**द्रुहिण,** पु० (णः) ब्रम्हदेव.
**द्रोण,** पु० (णः) काकवि० ज्यास डोमकावळा असें म्ह० तो. २ अश्वत्थाम्याचा बाप. ३ विष कीटवि० ज्यास विंचु असें म्ह० तो. ४ परिमाणवि० ज्यास अदमणी असें म्ह० ती. ५ देशवि०. ६ टांकी, दोण इत्यादि. ७ भोजन समयीं घृत घेण्याचें पात्र द्रोण.
**द्रोणकाक,** पु० (कः) काकवि० ज्यास डोमकावळा असें म्ह० तो.
**द्रोणदुग्धा,** स्त्री० (ग्धा) दोण परिमित दुध देणारी (गाय वगैरे.)
**द्रोणमुख,** पु० (खः) चारशें गांवांतील चांगला गांव.
**द्रोणक्षीरा,** स्त्री० (रा) द्रोण परिमित दूध देणारी (गाय वगैरे.)
**द्रोणायन,** पु० (नः) अश्वत्थामा.
**द्रोणि,** स्त्री० (णिः) द्रोण, टांकी.
**द्रोणिक,** वि० (कःका-कं) द्रोण परीमित धान्याचें (शेत.)
**द्रोणी,** स्त्री० (णी) दोण, टांकी. २ वनौषधि जीस नीली, नीळ असें म्ह० ती. ३ दोनशूर्परूप परिमाणविशेष.
४ मुष्टि=१ पावशेर=१ कुडव.
४ पावशेर=१ शेर=प्रस्थ.
४ शेर=१ पायली=आढक.
८ पायल्या=१ अदमणी=द्रोण.
२ अदमण्या=१ सूप=शूर्प.
१॥ सूप=१ दीडमण=खारी.

२ सूर्पे=१ द्रोणी=भार.
४ द्रोणी=१ वाह.

**द्रोणीदल**, पु० (लः) केवडा.

**द्रोहचिंतन**, न० ( नं ) शत्रूच्या वैराचें चिंतन.

**द्रोहाट**, पु० (टः) गाथाविशेष. २ व्याध, पारधी.

**द्वंद्व**, न० (द्वं) युग्म. २ स्त्री आणि पुरुष. ३ द्वय, दोन. ४ कलह. ५ रहस्य.

**द्वंद्वचारिन्**, पु० (री) चक्रवाकपक्षि.

**द्वयातिग**, पु० (गः) सत्वैकनिष्ठ, केवल सत्वगुणी. (व्यासादिक.)

**द्वात्रिंशदक्षरिन्**, पु० (री) बत्तीस अक्षरी (श्लोक.)

**द्वादशकर**, पु० (रः) गुरुनामा ग्रह.

**द्वादशलोचन**, पु० (नः) कार्तिक स्वामी.

**द्वादशाख्य**, पु० (ख्यः) बौद्धावतार.

**द्वादशात्मन्**, पु० (त्मा) सूर्य.

**द्वादशार्चि**, पु० (र्चिः) गुरुनामा. ग्रह.

**द्वापर**, न० (रं) द्वापारयुग. २ संशय.

**द्वार्**, न० (द्वाः) दार, द्वार.

**दार**, न० (रं) दार. २ जाणें. ३ उपाय.

**द्वारकंटक**, पु० (कः) अडसर.

**द्वारका**, स्त्री० ( का ) द्वारका, कृष्ण बलराम नगरी.

**द्वारकावती**, स्त्री० (ती) द्वारका.

**द्वारपाल**, पु० (लः) द्वारपाळ, देवडीदार.

**द्वास्थ**, पु० (स्थः) द्वारपाळ, देवडीदार.

**द्वास्थित**, पु० (तः) द्वारपाळ, देवडीदार.

**द्विक**, पु० ( कः ) कावळा. २ चक्रवाकपक्षि.

**द्विगुणाकृत**, वि० ( तः ता- तं ) दोन वेळ नांगरलेलें (शेत.)

**द्विज**, पु० ( जः ) पक्षि. २ चंद्र. ३ दंत, दांत. ४ ब्राम्हण. ५ ( स्मृतींत ब्राम्हण, क्षत्रिय आणि वैश्य, ह्या तीनही जाति द्विज म्हटल्या आहेत. )

**द्विजन्मन्**, पु० ( न्मा ) पक्षि. २ दंत, दांत. ३ ब्राम्हण.

**द्विजप्रपा**, स्त्री० ( पा ) झाडांस जी तळी करतात ती.

**द्विजराज**, पु० (जः) चंद्र. २ अनंत. ३ गरुड.

**द्विजलिंगिन्**, पु० ( गी ) क्षत्रिय.

**द्विजा**, स्त्री० ( जा ) सुगंधि द्रव्यविशेष श्याम रेणुकबीज असें म्हणतात तें. २ भारंगीची वेल.

**द्विजाति**, पु० ( तिः ) पक्षि. २ दंत, दांत. ३ ब्राम्हण. ४ अंडज.

**द्विजायनी**, स्त्री० (नी) यज्ञोपवीत.

**द्विजिव्ह**, पु० (व्हः) सर्प. २ खल, निंदासूचक पुरुष.

**द्वितीय**, पु० (यः) पुत्र. २ दुसरा. ३ वि० ( यः या- यं ) दोघ. ४ पु० ( यः ) शरीरांतील वायुविशेष.

**द्वितीया**, स्त्री० ( या ) तिथिविशेष. २ विवाहित स्त्री. ३ रूपावळींतील द्वितिया.

**द्वितीयाकृत**, वि० ( तः ता- तं ) दोन वेळ नांगरलेलें ( शेत. )

**द्विदेह**, पु० ( हः ) गणपति.

**द्विप**, पु० (पः) हत्ती. २ उंट.

**द्विपाद्य**, पु० (द्यः) द्विगुण दंड, दुप्पट दंड.

**द्विमुखाहि**, पु० (हिः) दुतोंडे.

**द्विरद**, पु० (दः) हत्ती.

**द्विरसन**, पु० (नः) सर्प. २ खल, निंदासूचक पुरुष.

**द्विरेफ**, पु० (फः) भ्रमर, भुंगा.
**द्विवर्षा**, स्त्री० (र्षा) दोन वर्षांची (गाय वगैरे.)
**द्विवेशरा**, स्त्री० (रा) बैलाची गाडी. २ लहान रथ.
**द्विष्**, पु० (ट्) शत्रु.
**द्विषत्**, पु० (त्) शत्रु.
**द्विष्ट**, न० (ष्टं) ताम्र, तांबें.
**द्विसीत्य**, वि० (त्यः त्या-त्यं) दोन वेळ नांगरलेलें (शेत.)
**द्विहल्य**, वि० (ल्यः ल्या- ल्यं) दोन वेळ नांगरलेलें (शेत.)
**द्विहायनी**, स्त्री० (नी) दोन वर्षांची (गाय वगैरे.)
**द्वीप**, पु० न० (पः पं) पाण्यामध्यें जें स्थल (देशादि) वसावयाजोगें असतें तें.
**द्वीपवती**, स्त्री० (ती) पृथ्वी. २ नदी.
**द्वीपिन्**, पु० (पी) व्याघ्र, वाघ.
**द्वेषण**, पु० (णः) शत्रु.
**द्वेष्य**, वि० (ष्यः ष्या- ष्यं) द्वेषयोग्य
**द्वैध**, न० (धं) विरोध. २ बलिष्ठाशीं संधि आणि दुर्बलाशीं युद्ध करणें. ३ विवाह.
**द्वैप**, पु० (पः) वाघाचे चामड्यानें वेष्टित (रथादिक.)
**द्वैपायन**, पु० (नः) व्यास.
**द्वैमातुर**, पु० (रः) गणपति. २ जरासंध.
**द्व्यष्ट**, न० (ष्टं)० ताम्र, तांबें.

## ध.

**ध**, पु० (धः) धर्म. २ कुबेर. ३ न० (धं) द्रव्य. ४ पु० स्त्री० (धः धा-) ब्रम्ह.
**धट**, पु० (टः) दिव्य प्रमाणविशेष.
**धटी**, स्त्री० (टी) वल्कल. २ कौपीन.
**धत्तूर**, पु० (रः) वनौ० ज्यास धोतरा असें म्हणतात तो.
**धद्ध**, पु० (द्धः) बद्ध. २ दांडगा.
**धन**, न० (नं) द्रव्य. २ गोधन, गाईंचा समूह.
**धनकलि**, पु० (लिः) कुबेर.
**धनंजय**, पु० (यः) अग्नि. २ अर्जुननामा पंडुराजाचा पुत्र.
**धनद**, पु० (दः) कुबेर. २ वि० (दः दा-दं) दाता.
**धनंददा**, स्त्री० (दा) लक्ष्मी.
**धनदानुज**, पु० (जः) रावण.
**धनपिशाचिका**, स्त्री० (का) लोभ.
**धनपिशाची**, स्त्री० (ची) इच्छा, लोभ.
**धनहारी**, स्त्री० (री) वनौषधि जीस चोरओवा, किरमाणीओवा असें म्हणतात तो.
**धनाधिप**, पु० (पः) कुबेर.
**धनिक**, पु० (कः) साधु. २ धनाढ्य.
**धनिका**, स्त्री० (कः) कोथिंबीर, धना. २ तरुण स्त्री.
**धनिन्**, पु० (नी) धनिक, धनाढ्य.
**धनिष्ठा**, स्त्री० (ष्ठा) नक्षत्रविशेष.
**धनीयक**, न० (कं) कोथिंबीर.
**धनुःपट**, पु० (टः) वृक्षविशेष ज्यास चार असें म्हणतात तो.
**धनुर्धर**, पु० (रः) धनुष्यानें युद्ध करणारा.
**धनुर्यास**, पु० (सः) वनौषधि ज्यास धमासा असें म्हणतात तो.
**धनुष्**, स्त्री० न० (नुः) धनुष्य.
**धनुष्मत्**, पु० (ष्मान्) धनुर्धर.
**धनुस्**, न० (नुः) धनुष्य. २ धनरास.

३ चाराचें झाड. ४ धनुर्धर.
**धनू**, स्त्री० ( नूः ) धनुष्य.
**धन्य**, वि० ( न्यः न्या- न्यं ) भाग्यवान, पुण्यवान.
**धन्या**, स्त्री० (न्या) धात्री, आंवळीचें झाड.
**धन्याक**, न० ( कं ) कोथिंबीर.
**धन्व**, न० ( न्वं ) धनुष्य.
**धन्वंतर**, न० ( रं ) चार हाताचें प्रमाण.
**धन्वंतरि**, पु० ( रि ) दिवोदास.
**धन्वन्**, न० ( न्व ) धनुष्य. २ स्थळ. २ पु० ( न्वा ) मारवाडदेश.
**धन्वयास**, पु० ( सः ) वनौषधि ज्यास धमासा असें म्हणतात तो.
**धन्विन्**, पु० (न्वी) धनरास. २ धनुर्धर. ३ अर्जुनवृक्ष, अर्जुनसादडा.
**धमन**, पु० ( नः ) विस्तव पेटविण्याचा चामड्याचा भाता. २ वनौषधि ज्यास देवनळ असें म्हणतात तो. ३ वि० ( नः ना- नं ) क्रूर.
**धमनि**, स्त्री० ( निः ) नाडी, शीर.
**धमनी**, स्त्री० ( नी ) नाडी, शीर. २ सुवासिक द्रव्यविशेष ज्यास नखला असें म्हणतात तें. ३ फुंकणी. ४ सुवासिक द्रव्यविशेष ज्यास पवारी असें म्हणतात तीं. ५ नळी.
**धमि**, स्त्री० (मिः) आंतडें.
**धम्मिल**, पु० (ल्लः) बांधलेले मस्तकाचे केश, बुचडा.
**धर**, पु० (रः) पर्वत. २ कूर्मराज, कांसवाचा राजा. ३ अष्टवसूंतील एक.
**धरण**, न० (णं) परिणामविशेष. २ धरणें. ३ पु० (णः) सेतु, पूल.
**धरणी**, स्त्री० (णी) पृथ्वी.
**धरणीधर**, पु० (रः) विष्णु.
**धरणीप्लव**, पु० (वः) समुद्र.
**धरा**, स्त्री० (रा) पृथ्वी. २ स्त्री गर्भाशय. ३ धातुविशेष.
**धरांकुर**, पु० (रः) पाण्याचा तुषार. २ दगड.
**धराधर**, पु० (रः) विष्णु. २ पर्वत.
**धरित्री**, स्त्री० (त्री) पृथ्वी.
**धरुण**, पु० (णः) उदक. २ स्वर्ग लोक. ३ ब्रम्हदेव. ४ मान्य.
**धर्म**, पु० न० (र्मः-र्मं) पुण्य. २ पु० (र्मः) श्रुति, स्मृतिविहित जो यागादि विधि तो. ३ यम. ४ न्याय. ५ स्वभाव. ६ आचार ७ न० (र्मं) धनुष्य. ८ यज्ञ. ९ हिंसा न करणें.
**धर्मकाय**, पु० (यः) बौद्धावतार.
**धर्मकारिणी**, स्त्री० (णी) शुद्ध स्त्री.
**धर्मकील**, पु० (लः) राजदंड.
**धर्मचक्र**, पु० (क्रः) बौद्धावतार.
**धर्मचिंता**, स्त्री० (ता) धर्म चिंतन, धर्मविचार.
**धर्मण**, पु० (णः) वृक्षभेद. २ सर्पविशेष.
**धर्मद्रवी**, स्त्री० (वी) गंगा नदी.
**धर्मधातु**, पु० (तुः) बौद्धवतार.
**धर्मध्वजिन्**, पु० (जी) उपजीविकेसाठीं जटा वाढविण्याचें वगैरे ढोंग करणारा, ढोंगी.
**धर्मपत्तन**, न० (नं) मिरीं. २ धर्मपूर.
**धर्मपुत्र**, पु० (त्रः) धर्मराज.
**धर्मभाणक**, पु० (कः) शिकणारा.
**धर्मराज**, पु० (जः) प्रेतपति, यम. २ युधिष्ठिर, धर्मराजा. ३ नास्तिकविशेष.
**धर्मवासर**, पु० (रः) पौर्णिमा.

**धर्मवाहन**, पु० (नः) महादेव.
**धर्मसंहिता**, स्त्री० (ता) मन्वादिकांनीं प्रणीत ज्या स्मृति त्या प्रत्येक.
**धर्षण**, पु० (णः) पराभव. २ मैथून.
**धर्षणी**, स्त्री० (णी) व्यभिचारिणी स्त्री.
**धर्षिणी**, स्त्री० (णी) व्यभिचारिणी स्त्री.
**धर्षित**, न० (तं) मैथून.
**धव**, पु० (वः) भर्ता, नवरा. २ वृक्षविशेष. ३ मनुष्य. ४ धूर्त. ५ वस्त्र.
**धवल**, वि० (लःला-लं) सुंदर. २ पु० (लः) स्वेच्छाचारी वृषभ, पोळ. ३ वि० (लः-ला-लं) शुक्लवर्ण, पांढरा.
**धवला**, स्त्री० (ला) गाय.
**धवित्र**, न० (त्रं) हरिणाच्या कातड्याचा विंझणा.
**धातकी**, स्त्री० (की) वृक्षविशेष ज्यास धायटी, धायफूल असें म्हणतात तो.
**धातु**, पु० (तुः) मनशीळ, गेरू, काव, सोनें, रुपें, तांबें, हरताळ, लोखंड, शिसें पारा, हिंगूळ, गंधक, अभ्रक, इत्यादि जे पर्वतापासून झालेले ते प्रत्येक. २ श्लेष्मा, पित्त इत्यादि. ३ आहार पचनापासून जो रस शरीरांत उत्पन्न होतो तो. ४ पृथ्वी, जल, तेज, वायु, आकाश हीं पांच प्रत्येक. ५ रूप, रस, गंध, स्पर्श, शब्द हे प्रत्येक. ६ इंद्रिय. ७ शब्द योनि जे भूवादिक धातु ते प्रत्येक.
**धातुनाशन**, न० (नं) पेज.
**धातुपुष्पिका**, स्त्री० (का) वृक्षविशेष ज्यास धायटी, धायफूल असें म्हणतात तो.
**धातुभृत्**, पु० (त्) पर्वत.
**धातुवादी**, पु० (दी) सोनार.
**धातृ**, पु० (ता) ब्रम्हदेव. २ पाळणारा.
**धातृपुष्पिका**, स्त्री० (का) वृक्षविशेष ज्यास धायटी, धायफूल असें म्हणतात तो.
**धात्री**, स्त्री० (त्री) उपमाता, दाई. २ आंवळीचें झाड. ३ पृथ्वी. ४ जननी, आई.
**धाना**, स्त्री० (ना) कोथिंबीर. २ स्त्री० ब० नि० (नाः) भाजलेले यव.
**धानुष्क**, पु० (ष्कः) धनुर्धर.
**धान्य**, न० (न्यं) भात, उडीद, मूग हरभरे इत्यादि धान्य. २ कोथिंबीर.
**धान्यक**, न० (कं) कोथिंबीर.
**धान्यचमस**, पु० (सः) पोहे.
**धान्यवर्धनी**, स्त्री० (नी) व्याज.
**धान्याक**, न० (कं) कोथिंबीर.
**धान्याम्ल**, न० (म्लं) कांजिक, कांजी.
**धामन्** न० (म) गृह, घर. २ देह, शरीर. ३ कांति. ४ प्रभाव. ५ स्थान. ६ जन्म ७ किरण.
**धामनिधि**, पु० (धिः) सूर्य.
**धामार्गव**, पु० (वः) वनौषधि ज्यास आघाडा असें म्हणतात तो. २ घोंसाळी, दोडकी.
**धाय्या**, स्त्री० (य्या) अग्नींत समिध टाकून अग्नि पेटण्याकरितां जी वेदाची ऋचा म्हणतात ती.
**धार**, पु० (रः) पाषाणभेद.
**धारणा**, स्त्री० (णा) नायमार्गस्थितिति, नीतिमार्गांत राहाणें.
**धारणी**, स्त्री० (णी) नाडी. २ स्नान. ३ नास्तिक मंत्रविशेष.
**धारा**, स्त्री० (रा) घोड्याच्या *पांच चाली आहेत त्या प्रत्येक. २ सैन्याचा पुढील

* भरधांव. २ तुरकीचाल. ३ दुडकीचाल. ४ वाजीचाल. ५ चौकचाल.

भाग. ३ पाण्याची वगैरे धार. ४ पर्वताचा तुटलेला कडा. ५ तरवार इत्यादि शस्त्रांची धार .६ हळद. ७ पंक्ति. ८ रात्र.

**धाराकदंबक,** पु० (कः) कळंबवृक्ष.

**धारांकुर,** पु० (रः) पाण्याचा तुषार. २ कठीणोदक, गार.

**धारांग,** पु० (गः) तीर्थ.

**धाराट,** पु० (टः) चातक पक्षि. २ घोडा.

**धाराधर,** पु० (रः) मेघ. २ तरवार.

**धारावनि,** पु० (निः) वायु.

**धारासंपात,** पु० (तः) पर्जन्यविशेष, संतत धार पर्जन्य.

**धार्त,** पु० (र्तः) द्यूत खेळणारा, सोंगटीबाज, जुवेबाज इत्यादि.

**धार्तराष्ट्र,** पु० (ष्ट्रः) ज्याचे पाय व टोंच काळी असून बाकी आंग पांढरें असा हंस पक्षिविशेष. २ कौरव. ३ सर्प.

**धार्मिक,** पु० (कः) धर्मानें वागणारा.

**धावन,** न० (नं) गमन. २ शुद्धि.

**धावनि,** स्त्री० (निः) वनौषधि जीस डवला पिठवण असें म्हणतात ती.

**धावनी,** स्त्री० (नी) वनौषधि जीस डवला, पिठवण असें म्हणतात ती.

**धिक्,** अ० निर्भर्त्सना, अपकारक शब्द बोलून भय लावणें. २ निंदा ह्या अर्थी. उ० धिक्त्वां ताडनार्हमनध्ययनशीलं. धिक् परस्त्रीगामिनं पुरुषं.

**धिक्कृत,** वि० (तःता-तं निर्भर्त्सित. २ निंदित.

**धियांपति,** पु० (तिः) पूर्वजिन.

**धिषण,** पु० (णः) ब्रहस्पति.

**धिषणा,** स्त्री० (णा) बुद्धि.

**धिष्ण्य,** न० (ष्ण्यं) स्थान. २ नक्षत्र. ३ अग्नि. ४ गृह, घर. ५ शक्ति.

**धी,** स्त्री० (धी) बुद्धि. २ ज्ञानविशेष.

**धीदा,** स्त्री० (दा) कन्या. २ बुद्धि.

**धींद्रिय,** न० (यं) *ज्ञानेंद्रिय.

**धीमत्,** पु० (मान) पंडित, विद्वान. २ बृहस्पति, सुरगुरु.

**धीर,** वि०(रःरा-रं) पंडित,. २ गंभीर. ३ कुंकुम. ४ पु० (रः) मंद. ५ स्वछंद.

**धीरा,** स्त्री० (रा) दारू (पिण्याची)

**धीलटि,** स्त्री० (टिः) कन्या.

**धीवर,** पु० (रः) मत्स्यमारणारा मनुष्य जातिविशेष ज्यास कोळी, ढिवर असें म्हणतात तो.

**धीशक्ति,** स्त्री० (क्तिः) बुद्धीचें †सामर्थ्य.

**धीसचिव,** पु० (वः) बुद्धीनें सहाय्य करणारा, बुद्धिवाद सांगणारा.

**धुत,** वि० (तः-ता-तं) किंचित कांपलेला. २ न० (तं) टाकलेलें.

**धुंधुमार,** पु० (रः) घरांतील धूर २ इंद्रगोप.

**धुनी,** स्त्री० (नी) नदी.

**धुर्,** स्त्री० (धूः) रथ, गाडी इत्यादिकांचा अग्रभाग ज्यास धूर असें म्हणतात ती.

**धुरंधर,** पु० (रः) स्त्री० न० (रा-रं) कार्यभार वाहणारा. २ रथाची धूर वाहणारा (घोडा, बैल इत्यादि )

**धुरीण,** वि० (णः-णा-णं) कार्यभार वाहणारा. २ रथाची धूर वाहणारा (घोंडा, बैल इत्यादि)

---

* कान. २ डोळे. ३ जिव्हा. ४ नाक. ५ त्वचा हीं पांच ज्ञानेंद्रियें.

† शुश्रूषा. श्रवण, ऐकणें. घेणें. धारण. ऊहापोहविचार. शिल्पशास्त्रादि विषयक ज्ञान. तत्वज्ञान. हे बुद्धीचे गुण सांगितले आहेत.

**धुर्य**, वि० (र्यः-र्या र्यं) कार्यभार वाहणारा. २ रथाची धूर वाहणारा (बैल, घोडा इत्यादि)

**धुवित्र**, न० (त्रं) हरिणाच्या कातड्याचा विंझणा.

**धुस्तुर**, पु० (रः) वनौ० ज्यास धोतरा, धोत्रा असें म्हणतात तो.

**धुस्तूर**, पु० (रः) वनौ० ज्यास धोतरा, धोत्रा असें म्हणतात तो.

**धू**, स्त्री० (धूः) कंपन, कापणें.

**धूत**, वि० (तः-ता तं) त्यक्त, टाकलेला. २ किंचित कांपलेला. ३ निंदा केलेला.

**धूप**, पु० (पः) धूप.

**धूपवृक्ष**, पु० (क्षः) देवदारुवृक्ष.

**धूपायित**, वि० (तः-ता-तं) संतप्त, तापविलेला.

**धूपित**, वि० (तः-ता-तं) संतप्त, तापविलेला.

**धूम**, पु० न० (मः-मं) धूर. २ पु० (मः) यम.

**धूमकेतव**, पु० (वः) केतुनामा ग्रह. २अग्नि, विस्तव.

**धूमकेतु**, पु० (तुः) अग्नि. २ उत्पात, धूममयतारा. ३ ग्रहविशेष.

**धूममहिषी**, स्त्री० (षी) धुकें.

**धूमयोनि**, पु० (निः) मेघ.

**धूमल**, वि० (लः-ला-लं) कांहीं काळा व कांहीं तांबडा.

**धूमार्णा**, स्त्री० (र्णा) यमाची स्त्री.

**धूमिका**, स्त्री० (का) धुकें.

**धूम्या**, स्त्री० (म्या) धूमांचा समूह.

**धूम्याट**, पु० (टः) पक्षिविशेष ज्यास फेंचुहार, मस्तकचूड असें म्हणतात तो.

**धूम्र**, वि० (म्रः-म्रा म्रं) कांहीं तांबडा व कांहीं काळा.

**धूम्रशूक**, पु० (कः) उंट.

**धूर्जटि**, पु० (टिः) महादेव.

**धूर्त**, पु० (र्तः) वनौषधि ज्यास धोतरा, धोत्रा असें म्हणतात तो. २ सोंगटीबाज, जुवेबाज इत्यादि. ३ प्रतारणा करणारा, ठक. ४ धूर्त. ५ कोल्हा.

**धूर्तिल**, पु० (लः) बैल.

**धूर्वह**, वि० (हः-हा-हं) कार्यभार वाहणारा. २ रथाची धूर वाहाणरा (घोडा, बैल इत्यादि.)

**धूलि**, स्त्री० (लिः) धूळ.

**धूलिगुच्छक**, पु० (कः) बुका.

**धूलिध्वज**, पु० (जः) वायु.

**धूली**, स्त्री० (ली) धूळ.

**धूसर**, वि० (रः-रा-रं) किंचित पांढरा.

**धूसरी**, स्त्री० (री) किन्नरी भेद. २ पु० (री) गर्दभ.

**धूस्तूर**, पु० (रः) वनौषधि ज्यास धोतरा, धोत्रा असें म्हणतात तो.

**धृतराष्ट्र**, पु० (ष्ट्रः) दुर्योधनाचा बाप. २ नागविशेष. ३ क्षत्रियविशेष.

**धृतराष्ट्री**, स्त्री० (ष्ट्री) हंसाची स्त्री.

**धृति**, स्त्री० (तिः) धैर्य. २ धारणा. ३ संतोष. ४ योगवि०. ५ यज्ञ.

**धृष्ट**, वि० (ष्टः-ष्टा-ष्टं) अविनीत, दांडगा, निर्लज्ज.

**धृष्णग्**, पु० (क्) दांडगा.

**धृष्णज्**, पु० (क्) अविनीत, दांडगा, निर्लज्ज.

**धृष्णि**, पु० (ष्णिः) किरण.

**धृष्णु**, वि० (ष्णुः-ष्णुः-ष्णु) अविनीत, दांडगा, निर्लज्ज.

**धेनी**, स्त्री० (नी) वनौषधि जीस नळी, पचारी असें म्ह० ती. २ पु० (नी) नदवि०.

**धेनु**, स्त्री० (नुः) नुकतीच विहालेली गाय. २ गाय.

**धेनुक**, पु० (कः) दैत्यवि०.

**धेनुका**, स्त्री० (का) हत्तीण. २ धेनु, गाय.

**धेनुष्या**, स्त्री० (ष्या) कर्ज फिटेपर्यंत कर्ज देणाराचे घरीं ठेविलेली दुबती गाय.

**धैनुक**, न० (कं) धेनूंचा समुदाय. २ स्त्रियांचें नृत्य.

**धैवत**, पु० (तः) गाण्याचे सात सुरांतील एक सूर, स्वर.

**धोतशिल**, न० (लं) स्फटिक.

**धोम्र**, न० (म्रं) धूम्रत्व. २ धुरांडें.

**धोरण**, न० (णं) हत्ती, घोडे इत्यादि वाहन.

**धौतकौशेय**, न० (यं) धुतलेलें रेशमी वस्त्र.

**धौरेय**, वि० (यःया यं) कार्यभार वाहणारा. २ रेयाची धूर वाहणारा (घोडा, बैल इत्यादि.)

**धौरितक**, न० (कं) घोड्याची गतीवि०, तुरकी गामचाल.

**ध्याम**, न० (मं) वनौषधि ज्यास गंजाण, रोहिस गवत असें म्ह० तें. २ सुगंधिवि० ज्यास दवणा असें म्ह० तो. ३ वि० (मःमा-मं) कृष्णवर्ण, काळा.

**ध्वज**, पु० (जः) पताका, निशाण. २ सुराजीवि, कलाल. ३ बाजेचा अवयव. ४ शिश्न. ५ चिन्ह.

**ध्वजिनी**, स्त्री० (नी) सैन्य, सेना.

**ध्वजोत्थान**, न० (नं) शक्रोत्सव, पूर्णिमा.

**ध्वनि**, पु० (निः) शब्द.

**ध्वनिग्रह**, पु० (हः) कान.

**ध्वनित**, वि० (तःता-तं) शब्दित, शब्दानें भरलेला.

**ध्वनिनाला**, स्त्री० (ला) वीणा. २ वेणु. ३ वाद्यवि० ज्यास काहल असें म्ह० तें.

**ध्वस्त**, वि० (स्तःस्ता-स्तं) नष्ट, नाश पावलेला. २ च्युत, गळालेला.

**ध्वांत**, न० (तं) अंधःकार, अंधार.

**ध्वांतोन्मेष**, पु० (षः) काजवा.

**ध्वान**, पु० (नः) शब्द.

**ध्वांक्ष**, पु० (क्षः) काकपक्षि, कावळा. २ मत्स्य मारणारा एक पक्षिवि० ज्यास बगळा असें म्ह० तो. ३ भिक्षुक. ४ गृह, घर. ५ कापसाची बी काढण्याचें यंत्रवि०.

**ध्वांक्षपुष्ट**, पु० (ष्टः) कोकीळ.

**ध्वांक्षी**, स्त्री० (क्षी) कंकोळ.

**ध्रुव**, पु० (वः) ध्रुव नामा जो उत्तानपाद राजाचा पुत्र तो. २ नक्षत्रवि०. ३ न० (वं) निश्चित. उ० ध्रुवंमूर्खः ४ वि० (वःवा-वं) शाश्वत. उ० जातस्यहिध्रुवोमृत्युर्ध्रुवंजन्ममृतस्यच. ५ पु० (वः) ज्या वृक्षाच्या फांद्या तोडल्या तो शाखा रहित वृक्ष. ६ महादेव. ७ विष्णु. ८ वटवृक्ष, वडाचें झाड. ९ योगवि०. १० न० (वं) तर्क. ११ निरंतर. १२ लौकर. १३ पु० (वः) शंकु. वसुभेद.

**ध्रुवा**, स्त्री० (वा) वनौषधि जीस सालपर्णी, डाव, डवला, सालवण असें म्हणतात ती. २ होमपात्र विशेष ज्यास स्रुक असें म्हणत तें. ३ वनौषधि मुरवेल असें म्हणतात ती.



## न.

**न**, पु० (नः) बुद्धावतार. २ बंध. ३ प्रस्तुत. ४ अ० अभावार्थी. उ० नगच्छति. ५. निषेध. ६ उपमा ह्या अर्थी.

**नकुल**, पु० (लः) पांडववि० २ पशु, मुंगूस

**नकुलप्लव**, पु० (वः) जलचरविशेष.

**नकुली**, स्त्री० वनौषधि जीस मुंगशी, मुंगुसवेल असें म्हणतात ती. २ जटामांशी लता.

**नकुलेष्टा**, स्त्री० (ष्टा) वनौषधि जीस मुंगशी, मुंगुसवेल असें म्हणतात. ती.

**नक्तं**, अ० रात्रीचेठायीं ह्या अर्थी.

**नक्तक**, पु० (कः) जीर्णवस्त्राचा तुकडा, फडकें.

**नक्तचारिन्**, पु० (री) घुबड.

**नक्तंचारिन्**, पु० (री) माजर.

**नक्तमाल**, पु० (लः) करवंज वृक्ष.

**नक्र**, पु० (क्रः) जलचरविशेष ज्यास सुसर असें म्हणतात ती. २ नाक.

**नक्रराज**, पु० (जः) जलचरविशेष ज्यास नाडे सावज, सुसर असें म्हणतात ती.

**नख**, पु० (खः) सुवासिक द्रव्यविशेष ज्यास नखला असें म्हणतात तें. २ हातपायांचीं नखें प्रत्येक. ३ न० (खं) पिंप. ४ कांसव.

**नखकुट्ट**, पु० (ट्टः) न्हावी.

**नखर**, पु० न० (रः रं) हातपायांचीं नखें प्रत्येक (अमर माला कोशांत हा शब्द तीनही लिंगीं म्हटला आहे.)

**नखाशी**, पु० (शीः) घुबड.

**नखी**, स्त्री० (खी) सुवासिक द्रव्य विशेष ज्यास नखला असें म्हणतात तें.

**नग**, पु० (गः) पर्वत. २ वृक्ष.

**नगपति**, पु० तिः) हिमालय.

**नगर**, न० स्त्री० (रं-री ) शहर.

**नगरीबक**, पु० (कः) कावळा.

**नगाटन**, पु० (नः) वानर.

**नगौकस्**, पु० (काः) पक्षि. २ सिंह. ३ शरभ (प्राणीविशेष.)

**नग्न**, वि० (ग्नः-ग्ना-ग्नं) नागवा. २ पु० (ग्नः) भाट. ३ दिगंबर योगी.

**नग्नाटक**, पु० (कः) दिगंबर योगी.

**नग्निका**, स्त्री० (का जीस ऋतु प्राप्त झाला नाहीं ती कन्या. २ दहा वर्षांची कन्या. असेही कोणी म्हणतात.

**नञ**, अ० निषेध. २ स्वरूप. ३ अतिक्रम. ४थोडका. ५ सादृश्य. ६ विरुद्ध. ७ निराळा ह्या अर्थी.

**नट**, पु० (टः) दिंड्याचें झाड. २ नट, नाचणारा. ३ अशोक वृक्ष. ४ कामुक, कामाविष्ट.

**नटन**, न० (नं) नाचणें.

**नटांतिका**, स्त्री० (का) लज्जा.

**नटी**, स्त्री० (टी) वनौषधि जीस नली, पवारी असें म्हणतात ती. २ पु० (टी) स्त्री वेश धारण करून नाच तमाशानें उपजीविका करणारा पुरुष. ३ स्त्री० (टी) नटी.

**नड**, पु० (डः) वनौषधि ज्यास देवनळ असें म्हणतात तो. २ पु० न० (डः डं) तृणविशेष.

**नडिनी**, स्त्री० (नी) कमलिनी.

**नड्या** स्त्री० (ड्या) नडसमूह.

**नड्वत्**, वि० (ड्वान्-ड्वती-त्) ज्या ठिकाणी नडनामक तृणविशेष पुष्कळ आहे तें स्थान.

**नड्वल**, वि० (लः-ला-लं) ज्या ठिकाणीं नड-नामक तृणविशेष पुष्कळ आहे ते स्थान.
**नत**, वि० ( तः-ता-तं ) नम्र. २ वांकडा.
**नतनासिक**, वि० ( कः-का-कं ) चपट्या नाकाचा.
**नंद**, पु० (दः) राजाविशेष. २ निधिविशेष.
**नंदक**, पु० ( कः ) हर्ष. २ कुलपालक. ३ विष्णूचें खड्ग. ४ बेडूक.
**नंदन**, न० ( नं ) इंद्राचें क्रीडारण्य. २ पु० ( नः ) पुत्र. ३ हर्ष देणारा.
**नंदपुत्री**, स्त्री० ( त्री ) पार्वती, गौरी.
**नंदा**, स्त्री० ( दा ) महाकुंभ, मोठा डेरा, माठ इत्यादि. २ गौरी, पार्वती. ३ तिथिविशेष.
**नंदि**, पु० न० ( दिः-दि ) द्युतांग. २ आनंद. ३ पु० ( दिः ) नंदाश्वर.
**नंदिकेश्वर**, पु० ( रः ) महादेवांचा नंदी. २ शिवद्वारपाळ.
**नंदिघोष**, पु० ( षः ) अर्जुनाचा रथ.
**नंदिन्**, पु० ( दी ) शिवद्वारपाळ. २ वृक्षविशेष ज्यास लाखीपिंपरी, गजहंड असें म्हणतात तो.
**नंदिनी**, स्त्री० ( नी ) गौरी, पार्वती. २ गंगानदी. ३ धेनुविशेष.
**नंदिनीसुत**, पु० ( तः) व्याडऋषि.
**नंदिवर्धन**, पु० ( नः ) महादेव.
**नंदिवृक्ष**, पु० ( क्षः) वृक्षविशेष ज्यास नांदरूख असें म्हणतात तो.
**नदी**, स्त्री० ( दी ) नदी.
**नदीकांत**, पु० ( तः) समुद्र. २ वृक्षविशेष ज्यास सिंधुआरि, निगडी, निर्गुडी असें म्हणतात तो. ३ जल, पाणी.
**नदीकांता** स्त्री० ( ता ) औषधिविशेष. २ जांबळीचें झाड.
**नदीन**, पु० ( नः ) समुद्र.
**नदीमातृक**, वि० ( कः-का-कं ) नदीचे पाण्यानें जो देश पिकतो तो.
**नंदीवृक्ष**, पु० ( क्षः ) वृक्षविशेष ज्यास नांदरूख असें म्हणतात तो.
**नंदीसरस्**, न० ( रः ) इंद्राचें सरोवर.
**नदीसर्ज**, पु० ( र्जः ) वृक्षविशेष ज्यास अर्जुनवृक्ष, अर्जुनसादडा असें म्हणतात तो.
**नंद्यावर्त**, पु० ( र्तः ) वर्तुलाकृती जो राजाचा वाडा तो.
**नध्री**, स्त्री० (ध्री) चर्ममय रज्जु, वादी.
**ननंदा**, स्त्री० (दा) नवऱ्याची बहीण, नणंद.
**ननांदा**. स्त्री० ( दा ) नणंद.
**ननु**, अ० प्रश्न. २ निश्चय. ३ आज्ञा. ४ सांत्वन. ५ आमंत्रण, संबोधन. ६ विरोधोक्ति ह्या अर्थीं. उ० ननुकिमेतत. २ नन्वयंयोगी. ३ ननुगच्छ. ४ ननुकोपं मुंचदयया्कुरु. ५ ननुराजन्. ६ ननु. एवं मन्यसेतर्हि किम पिनस्यात्. ७ आक्षेप. ८ प्रत्युत्तर. ९ वाक्यारंभ. १० अधिकार. ११ परकृति. १२ त्वरा. १३ अनुनय. १४ अवधारण.
**नपुंसक**, पु० ( कः ) षंढ, पौरुषशून्य पुरुषजाति.
**नप्तृ**, पु० ( प्ता ) सात्यकी.
**नप्त्री**, स्त्री० ( प्त्री ) पुत्राची कन्या, नात.
**नभःप्राण**, पु० ( णं ) वायु.
**नभश्चमस**, पु० ( सः ) चंद्र. २ इंद्रजाल, गारुडविद्या.
**नभश्चर**, पु० ( रः) पक्षि. देवविशेष. ३ मेघ. ४ वायु, वारा.

**नभस्**, पु० (भीः) वर्षाकाळ, पर्जन्यकाळ. २ न० (भः) आकाश. ३ पु० (भाः) श्रावणमास. ४ नाक. ५ बिसतंतु. ६ पिकदाणी. ७ स्वर्गलोक. ८ मेघ.

**नभसंगम**, पु० (मः) पक्षि.

**नभःसरित्**, पु० (त्) भागीरथी.

**नभस्य**, पु० (स्यः) भाद्रपदमास.

**नभस्वत्**, पु० (स्वान्) वायु, वारा.

**नभस्सद**, पु० (दः) देव.

**नभोगज**, पु० (जः) मेघ.

**नभोरेणु**, स्त्री० (णुः) धुकें.

**नमः**, अ० नमस्कारार्थी. उ० तुभ्यंनमः

**नमसित**, वि० (तःता-तं) अर्चित, पुजलेला.

**नमस्कारी**, स्त्री० (री) वनौषधि जीस लाजाळू असें म्ह० ती.

**नमस्या**, स्त्री० (स्या) पूजा.

**नमस्यित**, वि० (तःता-तं) अर्चित, पुजलेला.

**नमुचि**, पु० (चिः) दैत्यविशेष. २ काम, मदन.

**नमुचिसूदन**, पु० (नः) इंद्र.

**नय**, पु० (यः) नीति.

**नयन**, न० (नं) नेत्र, डोळा.

**नयपीठि**, स्त्री० (ठिः) सोंगट्यांचा पट.

**नयपीठी**, स्त्री० (ठी) न्यायस्थान.

**नर** पु० (रः) मनुष्य. २ विष्णु. ३ अर्जुन. ४ घोडा.

**नरक**, पु० (कः) पू, विष्ठा, रक्त, किडे इत्यादिकांचा जो समुदाय तो, दुर्गति. २ नरकासूर नामा दैत्य.

**नरकाजित्**, पु० (त्) विष्णु.

**नरकांतक**, पु० (कः) विष्णु.

**नरभू**, पु० (भूः) खंडवि०.

**नरमानिनी**, स्त्री० (नी) सकेशा स्त्री.

**नरवाहन**, पु० (नः) कुबेर.

**नरविष्कण**, पु० (णः) यमदूत.

**नरांग**. न० (गं) शिस्न.

**नरि**, स्त्री० (रिः) माडाची दारू.

**नरेंद्र**, पु० (द्रः) राजा. २ विषवैद्य, गारुडी.

**नर्तक**, पु० (कः) देवनळ. २ कीर्तन करणारा. ३ नट.

**नर्तकी**, स्त्री० (की) नाचणारी स्त्री. २ हत्तीण.

**नर्तन**, न० (नं) नाचणें.

**नर्तू** स्त्री० (र्तूः) नटी.

**नर्मकील**, पु० (लः) नवरा.

**नर्मट**, पु० (टः) सूर्य.

**नर्मठ**, पु० (ठः) पिंगटवर्ण.

**नर्मद**, पु० (दः) खेळगडी,

**नर्मदा**, स्त्री० (दा) नर्मदानदी.

**नर्मन्**, न० (र्म) क्रीडा.

**नर्मरा**, स्त्री० (रा) दरी. २ विस्तव पेटिवण्याचा चामड्याचा भाता. ३ वनौषधि जीस तेंडू, श्वेतनिशोत्तर असें म्ह० ती. ४ निष्फला.

**नल**, पु० (लः) वनौषधि ज्यास देवनळ असें म्ह० तो. २ नळराजा. ३ यम. ४ नळ नामा वानर. ५ न० (लं) कमळ.

**नलकूबर**, पु० (रः) कुबेराचा पुत्र.

**नलद**, न० (दं) वनौषधि ज्यास काळ्या वाळ्याचें मूळ असें म्ह० तें. २ पुष्परस.

**नलदा**, स्त्री० (दा) वनौषधि ज्यास जटामांशी लता असें म्ह० ती.

**नलमीन**, पु० (नः) मत्स्यवि० ज्यास बेगसा असें म्ह० तो.

**नला,** स्त्री० (ला) नेपाळ देशांत झालेली मनःशिला, मनशीळ.

**नलिन,** पु० न० (नःनं) कमळ.

**नलिनी,** स्त्री० (नी) कमलिनी. २ मंदाकिनी नदीविं०. ३ कमलांचा समुदाय. ४ काळे फुलाची निर्गुंडी. ५ कमळ. ६ माडाची दारू.

**नलिनेशय,** पु० (यः) विष्णु.

**नली,** स्त्री० (ली) वनौषधि जीस पवारी असें म्ह० ती.

**नल्व,** पु० (ल्वः) चारशें हात (स्थानादि) हें एक लांबीचें प्रमाण आहे.

**नव,** वि० (वःवा-वं) नूतन. २ पु० (वः) स्तुति. ३ कावळा.

**नवकलिका,** स्त्री० (का) नूतन कळी.

**नवछात्र,** पु० (त्रः) नवीन अध्ययन करणारा.

**नवतिका,** स्त्री० (का) चित्रें काढणारी स्त्री.

**नवदल,** न० (लं) पल्लव, पालवी.

**नवनीत.** न० (तं) लोणी.

**नवफलिका,** स्त्री० (का) नूतन. २ नूतन रजोदर्शन झालेली.

**नवमल्लिका,** स्त्री० (का) पुष्पलताविशेष जीस नेवाळी, थोर मोगरा, बटमोगरा, वेलमोगरा असें म्हणतात ती.

**नवमालिका,** स्त्री० (का) पुष्पलताविशेष जीस नेवाळी, थोरमोगरा, बटमोगरा, वेलमोगरा, असें म्हणतात ती.

**नववरिका,** स्त्री० (का) नूतन लग्न झालेली.

**नवांबर,** न० (रं) नूतन वस्त्र, कोरें वस्त्र.

**नवार्चि,** पु० (र्चिः) मंगळनामा ग्रह.

**नवीन,** वि० (नःना-नं) नूतन, नवें.

**नवोढा,** स्त्री० (ढा) नूतन लग्न झालेली.

**नवोधृत,** न० (तं) लोणी.

**नव्य,** वि० (व्यः व्या- व्यं) नूतन, नवें.

**नष्ट,** वि० (ष्टः ष्टा- ष्टं) नाश पावलेला. २ निलीन, अदृष्ट, गुप्त.

**नष्टचेष्टता,** स्त्री० (ता) चलनवलनादि क्रियेचा अभाव.

**नष्टाग्नि,** पु० (ग्निः) विछिन्नाग्नि, ज्याचा गृहाग्नि नष्ट झाला तो.

**नसा,** स्त्री० (सा) नाक.

**नस्तित,** पु० (तः) नाकांत वेसण घातलेला, वेसण्या [बैल, रेडा इत्यादि.]

**नस्तोत,** पु० (तः) नाकांत वेसण घातलेला, वेसण्या (बैल, रेडा इत्यादि.)

**नस्या,** स्त्री० (स्या) नाक.

**नस्योत,** पु० (तः) नाकांत वेसण घातलेला, वेसण्या (बैल, रेडा इत्यादि.)

**नहि,** अ० अभावार्थी उ० नहिस्वात्मा रामं विषय मृगतृष्णाभ्रमयति.

**नहुष,** पु० (षः) राजविशेष. २ नागविशेष.

**नक्षत्र,** न० (त्रं) आकाशांत ज्या तारा दिसतात त्या प्रत्येक.

**नक्षत्रनेमि,** पु० (मिः) ध्रुव. २ चंद्र. ३ स्त्री० (मिः) रेवती.

**नक्षत्रमाला,** स्त्री० (ला) सत्तावीस मोत्यांची एकसरी माळ.

**नक्षत्रेश,** पु० (शः) चंद्र.

**नाक,** पु० (कः) स्वर्ग. २ आकाश.

**नाकनाथ,** पु० (थः) इंद्र.

**नाकु,** पु० (कुः) वारुळ. २ पर्वत.

**नाकुली,** स्त्री० (ली) वनौषधि जीस मुंगसी मंगुसवेल असें म्हणतात ती. २ वनौ-

षाधि जीस एलापर्णी, कालिंदण असें म्हणतात ती. ३ वनौषधि ज्यास चवक असें म्हणतात ती.

**नाग**, पु० (गः) सर्प. २ हत्ती. ३ न० (गं) शिसें. ४ लवंग. ५ हा नाग शब्द उत्तरपद असतां श्रेष्ठार्थी होतो. उ० पुरुष नागः ६ सर्पविशेष. ७ नागकेसर. ८ पानवेल. ९ हस्तिनापूर. १० मेघ. ११ मोथा. १२ क्रूर आचरण करणारा. १३ उंडिणीचें झाड. १४ शरीरांतील वायुविशेष. १५ न० (गं) कथिल.

**नागकेशर**, पु० (रः) नागचाफा.

**नागकेसर**, पु० (रः) नागचाफा.

**नागजिह्विका**, स्त्री० (का) मनःशिला, मनशीळ.

**नागदंत**, पु० (तः) हस्तिदंत.

**नागदंती**, स्त्री० (ती) वनौषधि कायफळ, कुंभ्याचें झाड. २ शाकविशेष जीस कुरडूची शाक असें म्हणतात ती.

**नागपाश**, पु० (शः) वरुणाचें आयुध. २ करण.

**नागपुष्प**, पु० (ष्पः) नागचाफा, २ उंडिणीचें झाड.

**नागबल**, पु० (लः) भीमसेन.

**नागभृत्**, पु० (त्) निर्विष सर्प.

**नागमार**, पु० (रः) वृक्षविशेष.

**नागर**, न० (रं) सुंठ. २ जलतृणाचें मूळ, नागरमोथा. ३ वि० (रः रा-रं) नगरचा ४ त्रासलेला. ५ न० (रं) विदग्ध. ६ पु० (रः) दीर.

**नागरंग**, पु० (गः) नारिंगाचें झाड.

**नागलता**, स्त्री० (ता) शिस्न.

**नागलोक**, पु० (कः) पाताळ लोक.

**नागवला**, स्त्री० (ला) वनौषधि, जीस लहान चिकणा असें म्हणतात ती.

**नागवल्ली**, स्त्री० (ल्ली) पानवेल.

**नागवारिक**, पु० (कः) राजाच्या हत्तीचा माहुत.

**नागसंभव**, पु० (वः) सेंदूर, शेंदूर.

**नागसुगंधा**, स्त्री० (धा) वनौषधि जीस मुंगसी, मुंगुसवेल असें म्हणतात ती.

**नागांजना**, स्त्री० (ना) हत्तीण.

**नागांतक**, पु० (कः) गरुडपक्षि.

**नागाशन**, पु० (नः) गरुडपक्षि.

**नागाह्व**, न० (ह्वं) दिल्ली.

**नाचिकेत**, पु० (तः) अग्नि.

**नाट्य**, न० (ट्यं) नाचणें.

**नाडिकेर**, पु० (रः) नारळीचें झाड, माड.

**नाडिजंघ**, पु० (घः) कावळा.

**नाडिंधम**, पु० (मः) स्वर्णकार, सोनार.

**नाडी**, स्त्री० (डी) शीर. २ धान्यगुछाचें कांड, जोंधळा, बाजरी इत्यादिकांचें ताट. ३ साहा क्षण, घटका. ४ कपट्याची चर्या. ५ व्रणविशेष. ६ कमलदंड, भिसें.

**नाडीच**, पु० (चः) सुंठ.

**नाडीचरण**, पु० (णः) पाक्षि.

**नाडीतरंग**, पु० (गः) डोमकावळा.

**नाडीदेह**, पु० (हः) शिवगण.

**नाडीव्रण**, पु० (णः) सर्वदा वाहणारा व्रण.

**नाथवत्**, वि० (वान्-वती-त्) परतंत्र, पराधीन.

**नाद**, पु० (दः) शब्द.

**नांदीक**, पु० (कः) मंगलस्तंभ.

**नांदीकर**, पु० (रः) स्तुतिपाठक जनविशेष.

**नांदीवादिन्**, पु० (दी) स्तुतिपाठक जनविशेष.

**नादेयी**, स्त्री० (यी) जलवेत, पाण्यांतील वेत. २ नारिंगाचें झाड. ३ थोर एरण, टाकळा. ४ भुईआंवळीचें झाड. ५ जास्वंदीचें झाड. ६ वनौषधि जीस चवक असें म्हणतात ती.

**नाना**, अ० अनेक. २ उभय. ३ वांचून, विना ह्या अर्थी. उ० नानाविधाः जनाः २ नानारूपं नसज्जेत. ३ विष्णुं नाना मोक्षदोनास्ति.

**नानारूप**, वि० (पः पा-पं) बहुविध, नाना प्रकारचा.

**नापित**, पु० (तः) न्हावी, हजाम.

**नापितशालिका**, स्त्री० (का) न्हाव्याचें घर.

**नाभि**, स्त्री० (भिः) रथाचे चाकाचा मध्य. २ स्त्री० पु० (भिः भिः) नाभि, बेंबी. ३ पु० (भिः) क्षत्रिय. ४ कस्तुरी. ५ मुख्यराजा. ६ प्रधान. ७ स्त्री० (भिः) मृगविशेष.

**नाभिगुडक**, पु० (कः) नाभिरोग.

**नाभिजन्मन्**, पु० (न्मा) ब्रम्हदेव.

**नाभिनाला**, स्त्री० (ला) नाळसें.

**नाभील**, न० (लं) स्त्रियांची ऊरु आणि सक्थि ह्यांचा संधि. २ शरीरास जें दुःख तें. ३ गर्भांड.

**नाम**, अ० प्रसिद्धि. २ संभावना करण्यास योग्य. ३ क्रोध. ४ द्वेषस्वीकार. ५ निंदा ह्या अर्थी. उ० हिमालयोनाम नगाधिराजः २ भविष्यतियुद्धंनाम. ३ ममवैरी रावणोनामपापः ४ शत्रोःसकाशा द्धृष्हतिनाम. ५ कोनामायं प्रलपति मेविशतः सभायां. ६ विकल्प. ७ विस्मय. स्मरण.

**नामन्**, न० (म) नाम, नांव.

**नामधेय**, न० (यं) नाम, नांव.

**नाय**, पु० (यः) नीति.

**नायक**, पु० (कः) प्रभू. २ मध्यरत्न. ३ श्रेष्ठ.

**नार**, न० (रं) उदक, पाणी.

**नारक**, पु० (कः) नरक.

**नारकीट**, पु० (टः) निराशा करणें.

**नारंग**, पु० (गः) नारिंगाचें झाड. २ आवळे जावळे. ३ जारपुरुष.

**नारत**, न० (तं) मैथुन.

**नारद**, पु० (दः) नारदनामा ऋषि.

**नाराच**, पु० (चः) लोहमय बाण, लोखंडी बाण. २ तराजु. ३ उदक ४ हत्ती.

**नाराची**, स्त्री० (ची) लोखंडी बाणासारखी शलाकाविशेष, कांटा, तराजू.

**नारायण**, पु० (णः) विष्णु.

**नारायणी**, स्त्री० (णी) वनौषधि जीस सहस्त्रमुळी, शतावरी असें म्हणतात ती. २ गौरी, पार्वती.

**नारिकेल**, पु० (लः) नारळीचें झाड, माड.

**नारिकेलि**, पु० (लिः) नारळीचें झाड, माड.

**नारिकेली**, स्त्री० (ली) नारळीचें झाड, माड.

**नारी**, स्त्री० (री) स्त्री, बायको.

**नाल**, वि० (लः ला-लं) कमलदंड, भिसें. न० (लं) धान्यगुछाचें कांड, जोंधळा, बाजरी इत्यादिकांचें ताट.

**नालिक**, पु० (कः) रेडा.

**नालिका**, स्त्री० (का) अंकुश.

**नालिकेर**, पु० (रः) नारळीचें झाड, माड.

**नालिजंघ**, पु० (घः) कावळा.

**नाली**, स्त्री० (ली) भाजीचें देंट. २ वाद्य विशेष.

**नालीक**, पु० (कः) बाण. २ न० (कं) बाणाचें अग्र. ३ अंगविशेष. ४ कमळ.

**नालेत**, न० (तं) अश्रु.

**नाविक**, पु० (कः) नावेचें सुकाणू धरणारा

**नाव्य**, वि० (व्यः व्या- व्यं) नौकेनें उतरण्या जोगें (नद्यादिक.)

**नाश**, पु० (शः) मरण. २ अदर्शन. ३ पळणें.

**नासत्य**, पु० (त्यः) स्वर्गीचा वैद्य जो अश्विनीकुमार तो.

**नासंधि**, स्त्री० (धिः) योनी.

**नासा**, स्त्री० (सा) घराच्या दाराच्या बरग्यास लावून आडवें लांकूड घालितात तें ज्यास मस्तक पट्टी, गणेशपट्टी असें म्हणतात ती. २ नाक.

**नासाछिन्नी**, स्त्री० (न्नी) पक्षिविशेष.

**नासापूर्व**, न० (र्वं) हत्तीचें नाक.

**नासिका**, स्त्री० (का) नाक.

**नासिकामल**, पु० (लः) नाकांतील मळ, शेंबूड.

**नासिक्य**, न० (क्यं) नाक. २ पु० द्वि० (क्यौ) देवांचे वैद्य.

**नासीर**, न० (रं) गर्व.

**नास्तिकता**, स्त्री० (ता) नास्तिकपणा, नास्तिक बुद्धि.

**नाह**, पु० (हः) बंधन. २ पर्वताचें शिखर.

**नाहुषि**, पु० (षिः) ययातिराजा.

**नि**, अ० अत्यंत. २ नित्य. ३ संशय. ४ कुशलपणा. ५ मोठा. ६ जवळ. ७ आश्रय. ८ दान. ९ मोक्ष. १० बंधन. ११ राशी. १२ अधोभाव. १३ विन्यास ह्या अर्थी.

**निकट**, वि० (टः टा- टं) समीपचा, जवळचा.

**निकर**, पु० (रः) समूह.

**निकर्षण**, न० (णं) चांगली राहण्याची जागा.

**निकष**, पु० (षः) सोन्याची वगैरे घासून परीक्षा करण्याचा दगड ज्यास कसोटी, निसणा असें म्हणतात तो.

**निकषा**, स्त्री० (षा) राक्षसमाता. २ अ० जवळ. ३ मध्य ह्या अर्थी.

**निकषात्मज**, पु० (जः) राक्षस.

**निकामं**, अ० यथेच्छ, यथेष्ट ह्या अर्थी.

**निकाय**, पु० (यः) एक धर्म्यांचा जो समूह तो. उ० श्रोत्रियनिकायः २ घर. ३ वेध्य, निशाण ४ परमात्मा.

**निकाय्य**, पु० (य्यः) गृह, घर.

**निकार**, पु० (रः) अपकार. २ धान्य पेरणारा.

**निकारण**, न० (णं) वध, मारणें.

**निकाश**, पु० (शः) निश्चय.

**निकुंचक**, पु० (कः) मुष्टिरूप परिमाण.

**निकुंज**, पु० न० (जः-जं) सभोंवार वेली असून त्यांनीं आच्छादिलेली जागा, जाळी.

**निकुंभ**, पु० (भः) कुंभकर्णाचा पुत्र. २ वनौषधि जीस दांती असें म्हणतात ती.

**निकुरंब**, न० (बं) समूह.

**निकृत**, वि० (तः-ता-तं) नीचीकृत, हलका

केलेला. कापलेला २ मनाचा वांकडा. ३ न० (तं) वंचनायुक्त भाषण.

**निकृति**, स्त्री० (तिः) कपट. २ निंदा. ३ सोडणें.

**निकृष्ट**, वि० (ष्टः-ष्टा-ष्टं) अधम, निंद्य.

**निकेतन**, न० (नं) गृह, घर.

**निकोचक**, पु० (कः) वृक्षविशेष ज्यास पिस्ता असें म्हणतात तो.

**निक्कण**, पु० (णः) वीणा, सारंगी इत्यादि सूक्ष्म वाद्यांचा शब्द.

**निक्काण**, पु० (णः) वीणा, सारंगी इत्यादि सूक्ष्म वाद्यांचा शब्द,

**निखिल**, वि०(लः-ला-लं) समग्र. संपूर्ण.

**निगड**, पु० (डः) शृंखला, सांखळ, बेडी.

**निगण**, पु० (णः) यज्ञसंबंधी धूर.

**निगद**, पु० (दः) कथन, सांगणें.

**नि[illegible]**, पु० (मः) नगर, शहर. २ क्रय-[illegible] करून उपजीविका करणारा, वाणी [illegible] [illegible]ाचें कर्म, ४ वेद. ५ क्रियाकार.

**निगरण**, न० (णं) भोजन. २ पु० (णः) गळा.

**निगाद**, पु० (दः) क[illegible] सांगणें.

**निगार**, पु० (रः) गिळणें.

**निगाल**, पु० (लः) घोड्याचे गळ्यांत घाग-रमाळ बांधितात त्याच्या जवळचा गळ्या-चा प्रदेश,

**निगु**, पु० (गुः) मन,

**निग्रह**, पु० (हः) अस्वीकार, स्वीकार न कर-णें. २ बंधन. ३ भर्त्सन. ४ मर्यादा.

**निग्राह**, पु० (हः) शाप विशेष, शिवीचा एक भेद.

**निघ**, वि० (घः-घा-घं) ज्याची उंची, लांबी, रुंदी सारखी तो.

**निघस**, पु० (सः) भोजन.

**निघ्न**, वि० (घ्नः-घ्ना-घ्नं) अधीन, स्वाधीन.

**निचिकी**, स्त्री० (की) उत्तम गाय, चांगली गाय.

**निचित**, वि० (तः-ता-तं) व्याप्त.

**निचुल**, पु० (लः) जलवेत विशेष ज्यास इजर असें म्हणतात तो. २ वीणा, डोली इत्यादिकांचे अच्छादन वस्त्र, गवसणी. ३ निंबवृक्ष.

**निचुलक**, पु० (कः) वीणा, डोली इत्या-दिकांचें आछादनवस्त्र, गवसणी.

**निचोल**, पु० (लः) वीणा, डोली इत्यादि-कांचे अच्छादन वस्त्र, गवसणी.

**निचोलक**, पु० (कः) वीणा, डोली इत्यादि कांचे अच्छादन वस्त्र, गवसणी.

**निच्छवि**. पु० (विः) विदेहनगर.

**निज**, वि० (जः-जा-जं) स्वकीय, आपला. २नित्य.

**नितंब**, पु० (बः) स्त्रियांच्या कमरेचा पाठी-मागचा भाग. २ स्कंद. ३ तीर ४ प-र्वताचा मध्यभाग. ५ कमर.

**नितंबिनी**, स्त्री० (नी) स्त्रीविशेष.

**नितर**, पु० (रः) समुदाय. २ सामर्थ्य. ३ ठेवा. ४ न्यायेंकरून द्रव्य देणें.

**नितांतं**, अ० अतिशय ह्या अर्थी.

**नित्य**, वि० (त्यः-त्या-त्यं) अविनाशी. २ नि-रंतर.

**नित्यं**, अ० सतत, निरंतर ह्या अर्थी.

**नित्ययौवना**, स्त्री० (ना) द्रौपदी.

**निंदा**, स्त्री० (दा) दोष कथन. २ अपवाद.

**निदाघ**, पु० (घः) ग्रीष्मऋतु. २ घर्म, घाम. ३ ऊष्ण.

**निदाघकर**, पु० (रः) सूर्य.

**निदाघज**, पु० (जः) घर्म वायु.
**निदान**, न० (नं) उपादान, कारण.
**निदिग्ध**, वि० (ग्धःग्धा-ग्धं) वाढलेला.
**निदिग्धिका**, स्त्री० (का) वनौषधि जीस रिंगणी असें म्हणतात ती.
**निदेश**, पु० (शः) आज्ञा.
**निद्रा**, स्त्री० (द्रा) नीज, झोंप.
**निद्राण**, वि० (णःणा-णं) निजलेला.
**निद्रालु**, वि० (लुःलु-लु) निद्राशील, झोंपाळू.
**निद्रित**, वि० (तःता-तं) निजलेला.
**निधन**, पु० न० (नःनं) ब्रम्हदेव. २ मरण. ३ न० (नं) वंश, कुल. ४ नाश.
**निधि**, पु० (धिः) ठेवा. (निधि ९ आहेत ते हे १ महापद्म. २ पद्म. ३ शंख. ४ मकर. ५ कच्छप. ६ मुकुंद. ७ कुंद. ८ नील. ९ खर्व असें शास्त्रांत सांगितलें आहे.)
**निधिनाथ**, पु० (थः) कुबेर.
**निधुवन**, न० (नं) मैथून. २ कंप.
**निध्यान**, न० (नं) निरीक्षण, पहाणें.
**निनद**, पु० (दः) शब्द.
**निनाद**, पु० (दः) शब्द.
**निन्हव**, पु० (वः) निषेद. २ राठपणा. ३ अविश्वास. ४ निषेध वचन.
**निप**, पु० (पः) घट, तांब्या, घागर इत्यादि.
**निपठ**, पु० (ठः) पठण, पढणें.
**निपाठ**, पु० (ठः) पठण, पढणें.
**निपात**, पु० (तः) मृत्यु, मरण.
**निपातन**, न० (नं) अधोनयन, खालीं आणणें, पाडणें.
**निपान**, न० (नं) विहिरींतून काढलेलें पाणी ठेवण्यास दगडाची वगैरे केलेली जी टांकी, डोण, दोण इत्यादि ती.

**निपुण**, वि० (णःणा-णं) प्रवीण.
**निंब**, पु० (बः) निंबवृक्ष.
**निंबतरु**, पु० (रुः) कडू निंबाचें झाड.
**निबर्हण**, न० (णं) वध.
**निभ**, वि० (भःभा-भं) सदृश, सारखा. २ पु० (भः) कपट.
**निभालन**, न० (नं) दर्शन.
**निभृत**, वि० (तःता-तं) विनीत, नम्र.
**निमय**, पु० (यः) मोबदला, सदलाबदल.
**निमित्त**, न० (त्तं) कारण, चिन्ह, हेतु.
**निमिष**, पु० (षः) कालविशेष, निमिष. २ डोळे लावणें.
**निमेष**, पु० (षः) कालविशेष, निमिष. २ डोळे लावणें.
**निमेषरुट**, पु० (ट्) काजवा.
**निम्न**, वि० (म्नःम्ना-म्नं) गंभीर, खोल.
**निम्नगा**, स्त्री० (गा) नदी.
**नियति**, पु० (तिः) दैव. २ स्त्री० (तिः) नियम.
**नियंतृ**, पु० (ता) सारथि.
**नियम**, पु० (मः) स्वीकार. २ व्रत. ३ ज्या कर्मास बाह्य साधन लागतें तें कर्म. (हे नियम पांच आहेत ते हे १ शौच. २ संतोष. ३ तप. ४ स्वाध्याय. ५ ईश्वर. प्रणिधान.) ४ प्रतिज्ञा. ५ निश्चय. ६ बंध. ७ प्रतिज्ञापूर्वक निश्चय.
**नियातन**, न० (नं) अधोनयन, खालीं नेणें.
**नियामक**, पु० (कः) नौकेंतील मध्य स्तंभावर जलचर वगैरे दुष्ट प्राण्याचें निवारण करण्यास जो राहतो तो. २ नावाडी. ३ सभ्य. ४ गुरु. ५ सारथी.
**नियुत**, न० (तं) लक्ष संख्या.
**नियुद्ध**, न० (द्धं) बाहुयुद्ध.

**नियोज्य,** पु० स्त्री० (ज्यः ज्या) दास, चाकर.

**निर,** अ० निश्चय. २ निषेध. ह्या अर्थी उ० निरुक्त. २ निर्धनो राजा.

**निरंतर,** वि० (रः रा रं) सांद्र निबिड.

**निरय,** पु० (यः) नरक.

**निरर्गल,** वि० (लः ला लं) निर्बाध.

**निरर्थक,** वि० (कः का कं) व्यर्थ.

**निरवग्रह,** वि० (हः हा हं) स्वछंद, स्वतंत्र.

**निरसन,** न० (नं) निराकरण. २ वध. ३ प्रतिक्षेप. ४ खाकरून थुंकणें.

**निरस्त,** न० (स्तं) त्वरित बोलणें. २ वि० (स्तः स्ता स्तं) सोडलेला (बाण.) ३ निराकरण केलेला. ४ मनोभंग झालेला, खट्टु झालेला.

**निराकरिष्णु,** वि० (ष्णुः ष्णुः ष्णु) निंदाकरणशील.

**निराकृत,** वि० (तः ता तं) निराकरण केलेला.

**निराकृति,** स्त्री० (तिः) निराकरण. २ पु० (तिः) ज्याणें आपल्या शाखेचें अध्ययन केलें नाहीं तो. ३ आकार नसणें. ४ निवारण.

**निरामय,** वि० (यः या यं) रोग रहित, ज्याला रोग नाहीं तो.

**निरीश,** न० (शं) नांगराचें खालचें लाकूड, फाळ.

**निरीष,** न० (षं) नांगराचें खालचें लांकूड.

**निरूपण,** न० (णं) स्तुतिपाठक जनाचें भाषण. २ विचार. ३ दाखविणें.

**निरूह,** पु० (हः) विचारशून्य. २ निश्चित.

**निरोध,** पु० (धः) नाश. २ रोध.

**निर्ऋति,** स्त्री० (तिः) दरिद्र. २ पु० (तिः) दिक्पालविशेष.

**निर्गंधन,** न० (नं) वध.

**निर्गुंठी,** स्त्री० (ठी) निगडीचें झाड.

**निर्गुंडी,** स्त्री० (डी) निगडीचें झाड. २ काळे फुलाची निर्गुंडी, जीस रान निर्गुंडी असें म्ह० ती,

**निर्ग्रंथ,** पु० (थः) निर्द्रव्य. २ नागवा. ३ बाल.

**निर्ग्रंथक,** पु० (कः) दिगंबर योगी. २ निष्फळ.

**निर्ग्रंथन,** न० (नं) वध.

**निर्घट,** पु० (टः) पुष्कळ दाटी झालेला बाजार.

**निर्घात,** पु० (तः) वीज, विद्युल्लता.

**निर्घोष,** पु० (षः) शब्द.

**निर्जर,** पु० (रः) देव. २ वि० (रः रा रं) ज्याला जरा नाहीं तो.

**निर्जरा,** स्त्री० (रा) गुळवेल. २ वनौषधि जीस मुरा, तालीसपत्र, मोरमांशी असें म्ह० ती.

**निर्जितेंद्रियग्राम,** पु० (मः) सन्यासी. २ ज्याणें इंद्रियें जिंकिलीं आहेत तो.

**निर्झर,** पु० (रः) झरा. २ हत्ती. ३ सूर्य. ४ घोडा. २ ठिणगी.

**निर्झरिणी,** स्त्री० (णी) नदी.

**निर्झरिन्,** पु० (री) पर्वत.

**निर्णय,** पु० (यः) निश्चय. २ विचार.

**निर्णिक्त,** वि० (क्तः क्ता क्तं) शोभित, निर्मळ केलेला, शोधलेला.

**निर्णेजक,** पु० (कः) परिट.

**निर्दट,** पु० (टः) दयाशून्य, ज्यास दया नाहीं तो. २ ज्याचा कांहीं उपयोग नाहीं तो. ३ दुसऱ्याच्या निंदेविषयीं आसक्त, निंदक.

**निर्दर**, न० (रं) अतिशय. २ जल, पाणी. ३ वि० (रःरा-रं) कठीण. ४ निर्लज्ज.

**निर्देश**, पु० (शः) आज्ञा.

**निर्द्धार्य**, वि० (र्यः र्या- र्यं) ज्यास दुःख असतांही दुःखानें चित व्याकूल न होतां कार्याविषयीं जो उद्युक्त असतो तो.

**निर्बंध** पु० (धः) आग्रहवि०

**निर्भरं** अ० अतिशय ह्या अर्थी. उ० निर्भरंगच्छति.

**निर्भर्त्सन**, पु० (नः) निभर्त्सना. २ न० (नं) लाक्षा, लाख.

**निर्मद**, पु० (दः) मदशून्य हत्ती.

**निर्मल**, न० (लं) निर्माल्य. २ अभ्रक. ३ वि० (लःला-लं) स्वच्छ.

**निर्माण**, न० (णं) सिर्माण करणें. २ समंजसपणा. ३ पु० (णः) स्नान करणारा पुरुष.

**निमाल्य** न० (ल्यं) निर्माल्य.

**निर्मुक्त**, पु० (क्तः) मेंग टाकलेला सर्प. २ वि० (क्तःक्ता-क्तं) मोकळा झालेला, सुटलेला. ३ ज्याणें संग टाकला आहे तो.

**निर्मुट**, पु० (टः) पुष्प रहित वृक्ष. २ वाणी जातीचा.

**निर्मोक**, पु० (कः) सर्पाची त्वचा, मेंग. २ सोडणें. ३ आकाश.

**निर्याण**, न० (णं) हत्तीच्या नेत्रांचा प्रांत, भाग. २ मोक्ष ३ मार्गानें जाणें.

**निर्यातन**, न० (नं) वैरशुद्धि. २ दान देणें. ३ न्यासार्पण, ठेव परत देणें.

**निर्यास**, पु० (सः) डीक. (रभसको० पु० क्वाथ, कषाय, निर्यूषवेष्टक हीं डिकांचीं नांवे सांगितलीं आहेत.)

**निर्वपण**, न० (णं) दान, दाणें.

**निर्वर्णन**, न० (नं) निरीक्षण, पहाणें.

**निर्वह**, पु० (हः) कठीण. २ समर्थ. ३ स्थूळ.

**निर्वहण**, न० (णं) नाटकांत (मुख. २ प्रतिमुख. ३ गर्भ. ४ अवमर्श. ५ निर्वहण हे) पांच संधि सांगितले आहेत त्यांतील पांचवा संधि अथवा प्रस्तुत कथा समाप्ति.

**निर्वाण**, न० (णं) मुक्ति, मोक्ष. २ वि० (णःणा-णं) मुक्त. ३ न० (णं) हत्तींचें स्नान. ४ मावळणें. ५ सुख. ६ संगम. (ह्या निर्वाण शब्दाचा मुनि, अग्नि, हत्ती ह्यांजवर दुसऱ्या अर्थी प्रयोग होतो तसा वायूवर होत नाहीं; जसें विर्वाणोमुनिः इत्यादि प्रयोग होतात तसें निर्वाणोवातः असे होत नाहींत. वायु नाहींसा झाला तर तेथें निर्वात शब्दाचा प्रयोग होतो.)

**निर्वात** पु० (तः) गेलेला वारा, नाहींसा झालेला वारा.

**निर्वाद**, पु० (दः) निंदा. २ लोकापवाद. निर्णीत जो वाद तो.

**निर्वापण**, न० (णं) वध.

**निर्वार्य**, वि० (र्यःर्या-र्यं) निर्द्धारी.

**निर्वासन**, न० (नं) वध. २ हद्दीपार करणें.

**निर्वृति**, स्त्री० (तिः) उत्तम प्रकारची प्राप्ति. २ मावळणें. ३ सुख. ४ मोक्ष, मुक्ति.

**निर्वृत्त**, वि० (त्तःत्ता-त्तं) सिद्ध, निष्पन्न.

**निर्वेश**, पु० (शः) वेतन. २ उपभोग. ३ मूर्छा.

**निर्व्यूह**, पु० (हः) द्वार, दार. २ शेखर, शेंडीचें भूषण. ३ क्वाथरस, कढलेला

द्रव्यरस. ४ नागदंतक, घराच्या भिंतींतील खांब. ५ डीक.

**निर्हार**, पु० (रः) शल्य, कांटा इत्यादि काढणें.

**निर्हारिन्**, वि० (री-रिणी-रि) फार मनोहर जें सुगंधि द्रव्य तें.

**निर्हृति**, स्त्री० (तिः) नरक संबंधि जी अशोभा ती.

**निर्ह्राद**, पु० (दः) शब्द.

**निलय**, पु० (यः) ग्रह, घर.

**निलिंप**, पु० (पः) देव.

**निलिंपा**, स्त्री० (पा) दूध काढण्याचें भांडें, चर्वी.

**निवाह**, पु० (हः) समूह.

**निवात**, पु० (तः) आश्रय. २ वि० (तः ता-तं) वातवर्जित, निवारा. ३ न० (तं) शस्त्रास अभेद्यकवच, चिलखत. ४ कठीण. ५ समर्थ. ६ स्थूल.

**निवाप**, पु० (पः) पितृतर्पण.

**निवीत**, न० (तं) पांघरलेलें वस्त्र. २ कंठाचेठायीं सरळ माळेसारखें घातलेलें यज्ञोपवीत.

**निवृत**, वि० (तःता-तं) सर्वतः वेष्टित, चोहोंकडून वेढलेला.

**निवेश**, पु० (शः) सैन्याचें ठाणें, सेनेचा तळ, सेनेचा गोट. २ विन्यास. ३ विवाह.

**निःशम**, पु० (मः) शोक.

**निशमन**, न० (नं) दृष्टि. २ श्रवण करणें.

**निःशलाक**, वि० (कःकाकं) विजन, एकांत स्थल.

**निशा**, स्त्री० (शा) रात्र. २हरिद्रा, हळद ३ दारुहळद.

**निशाकर**, पु० (रः) कोंबडा.

**निशाचर**, पु० (रः राक्षस. २ कोल्हा. ३ पक्षिविशेष ज्यास पेंचा पक्षि असें म्हणतात तो. ४ सर्प.

**निशाचरी**, स्त्री० (री) व्यभिचारिणी स्त्री, बायको.

**निशाचर्मन**, न० (र्म) अंधःकार.

**निशाटन**, पु० (नः) पक्षिविशेष ज्यास घुबड असें म्हणतात तें.

**निशात**, वि० (तःता-तं) तीक्ष्णी कृत, पाजळलेला.

**निशांत**, न० (तं) गृह, घर. २ वि० तःता-तं) शांत. ३ न० (तं) प्रातःकाळ.

**निशापति**, पु० (तिः) चंद्र.

**निशामणि**, पु० (णिः) चंद्र.

**निशामन**, न० (नं) दर्शन. २ अवलोकन, पहाणें.

**निशारण**, न० (णं) वध.

**निशाह्वा**, स्त्री० (ह्वा) वनौषधिविशेष.

**निशामह**, पु० (हः) कुमुद पुष्प.

**निशित**, वि० (तःता-तं) तीक्ष्णी कृत, पाजळलेला.

**निशिपुष्पा**, स्त्री० (ष्पा) निर्गुडीचें झाड.

**निशीथ**, पु० (थः) मध्यरात्र. २ राजा.

**निशीथिनी**, स्त्री० (नी) रात्र.

**निशुंभ**, पु० (भः) निशुंभनामक दैत्य.

**निःशेष**, वि० षःषा-षं) संपूर्ण.

**निशैठ**, पु० (तः) बकपक्षि

**निःशोध्य**, वि० (ध्यःध्या-ध्यं) मळ घालविलेलें वस्त्र. (वस्त्रादि)

**निश्चय**, पु० (यः) निर्णय.

**निश्चारक**, पु० (कः) वायु. २ स्वछंद, स्वतंत्र.

**निश्चुकण**, पु० (णः) राखुंडी, दांतवण.
**निश्रेष्ठकरण**, पु० (ण) मदनबाण.
**निश्रेणि**, स्त्री० (णिः शिडी, निशीण. २ खजुराचें झाड.
**निःश्रेणि**, स्त्री० (णिः) शिडी, निशीण.
**निश्रेणी**, स्त्री० (णी) शिडी, निशीण.
**निश्रेयस**, न० (सं) मोक्ष, मुक्ति. २ कल्याण. ३ पु० (सः) महादेव.
**निःश्रेयस**, न० (सं) मोक्ष, मुक्ति.
**निषंग**, पु० (गः) बाण ठेवण्याचा भाता. २ संग.
**निषंगिन्**, पु० (गी) धनुर्धर, धनुष्यानें युद्ध करणारा.
**निषद्या**, स्त्री० (द्या) क्रय्यवस्तुशाला, दुकान. २ बाजार असेंही कोणी म्हणतात. ३ खाट.
**निषद्वर**, पु० (रः) चिखल.
**निषद्वरा**, स्त्री० (रा) रात्र.
**निषध**, पु० (धः) पर्वतविशेष. २ कठीण. ३ देशविशेष. ४ निषध देशाचा राजा.
**निःषमं**, अ० निंद्य ह्याअर्थी. उ० निःषमं वक्तिमेमूर्खः
**निषाद**, पु० (दः) गायनाचा स्वरविशेष. २ चंडाळ, चांडाळ. ३ कोळी नामें करून जी एक हिंदूंतील जाती ती. ४ व्याध, पारधी.
**निषादिन्**, पु० (दी) माहुत, महात.
**निषूदन**, न० (नं) वध.
**निष्क**, पु० न० (ष्कः ष्कं) सोन्याचे एकशें आठ *तोळे हें एक मान आहे. २ वक्षस्थळाचें भूषण. ३ सुवर्ण, सोनें. ४ सोन्याचा तोळा. ५ पल, सोन्याचे चार तोळे. ६ दीनार, बत्तीस गुंजांचें एक नाणें आहे. ७ न० (ष्कं) सोन्याचें पात्र. ८ पु० (ष्कः) चांडाळ.
**निष्कल**, न० (लं) कलारहित. २ वि० (लः ला- लं) नष्टवीर्य.
**निष्कला**, स्त्री० (ला) गतरजस्क बायको.
**निष्कली**, स्त्री० (ली) गतरजस्क बायको.
**निष्काशित**, वि० (तः ता- तं) निर्गमित, घालविलेला. २ अधिकारी.
**निष्कासित**, वि० (तः ता- तं) निर्गमित, घालविलेला.
**निष्कुट**, पु० (टः) घराजवळ केलेलें वन, बागबगीचा. २ शेत. ३ कवाड. ४ रहाण्याचें गृह, घर.
**निष्कुटि**, स्त्री० (टिः) वनौषधि जीस एला, इलायचीची वेल असें म्हणतात ती.
**निष्कुह**, पु० (हः) वृक्षगतविवर ज्यास ढोल असें म्हणतात ती.
**निष्क्रम**, पु० (मः) बुद्धिसामर्थ्य. २ निर्गम निघणें. ३ दुष्कुल.
**निष्क्रामित**, वि० (तः ता- तं) निर्गमित, बाहेर घालविलेला.
**निष्ठा**, स्त्री० (ष्ठा) नाटकांत पांच संधि आहेत त्यांतील पांचवी निर्बहणाख्य जी संधि ती अथवा प्रस्तुत कथा समाप्ति. २ निष्पत्ति, निष्पादन. ३ अदर्शन. ४ प्रध्वंस. ५ मागणें.
**निष्ठान**, न० (नं) व्यंजन, कढी.
**निष्ठीवन**, न० (नं) तोंडानें श्लेष्मा टाकणें, खाकरून थुंकणें.
**निष्ठुर**, वि० (रः रा- रं) कर्कश भाषण. २ कठिण. ३ निर्लज्ज.

* ८० गुंजा = १ तोळा.

**निष्ठेव,** पु० न० (वः वं) तोंडानें श्लेष्मा टाकणें, खाकरून थुंकणें.

**निष्ठेवन,** न० (नं) तोंडानें श्लेष्मा टाकणें, खाकरून थुंकणें.

**निष्ठ्यूत,** वि० (तः ता- तं) प्रेरित, सोडलेला, पाठविलेला.

**निष्ठ्यूति,** स्त्री० (तिः) तोंडानें श्लेष्मा टाकणें, खाकरून टाकणें.

**निष्णात,** वि० (तः ता- तं) निपूण, प्रवीण.

**निष्पक्व,** वि० (क्वः क्वा- क्वं) साकल्यें करून पक्व, चांगला कढलेला (काढा वगैरे.)

**निष्पन्न,** वि० (न्नः न्ना- न्नं) सिद्ध.

**निष्पार,** पु० (रः) सुपाचा वारा.

**निष्पाव,** पु० (वः) शुद्धीकरण, शुद्धकरणें. २ सुपाचा वारा. ३ शेंग. ४ वारा. ५ राजमेष. ५ वि० (वः वा- वं) निर्विकल्प.

**निष्प्रभ,** वि० (भः भा- भं) तेजोहीन, कांतिहीन.

**निष्प्रवाणि,** न० (णि) नूतन वस्त्र.

**निस्,** अ० निषेध. २ निश्चय. ३ साकल्य. ४ अतीत.

**निसंधि,** पु० (धिः) कठीण. २ समर्थ. ३ स्थूळ.

**निःसंपात,** पु० (तः) अर्धरात्र.

**निःसरण,** न० (णं) घराचें पुढील दार. २ निघणें. ३ मृत्यु. ४ उपाय. ५ मोक्ष.

**निसर्ग,** पु० (र्गः) स्वभाव. २ रूप.

**निसूदन,** न० (नं) वध.

**निसृष्ट,** वि० (ष्टः ष्टा- ष्टं) त्यक्त, टाकलेला. २ तिराईत.

**निस्तरण,** न० (णं) उपाय. २ तरणें.

**निस्तर्हण,** न० (णं) वध.

**निस्तल,** वि० (लः ला- लं) वाटोळा. २ चंचळ.

**निस्तुषित,** न० (तं) त्यक्त, टाकलेलें. २ लघुकृत, थोडें केलेलें.

**निस्त्रिंश,** पु० (शः) खड्ग, तरवार. २ निर्दय.

**निःस्नेह,** पु० (हः) जवस.

**निस्पंदन,** न० (नं) मंद गमन.

**निःस्राव,** पु० (वः) अन्नापासून झालेला मंड ज्यास नीस, पेज असें म्हणतात तीं.

**निःस्व,** वि० (स्वः स्वा- स्वं) दरिद्री.

**निस्वन,** पु० (नः) शब्द.

**निस्वान,** पु० (नः) शब्द.

**निहनन,** न० (नं) वध.

**निहाका,** स्त्री० (का) जलचरविशेष ज्यास पाण्यांतील घोरपड असें म्हणतात तीं.

**निहिंसन,** न० (नं) वध.

**निहीन,** वि० (नः ना- नं) नीच, पामर.

**नीकार,** पु० (रः) परिभव. २ धान्य उडविणें.

**नीकाश,** वि० (शः शा- शं) सदृश, सारखा

**नीच,** वि० (चः चा- चं) पामर. २ ऱ्हस्व.

**नीचैः,** अ० अल्प ह्या अर्थी उ० तथापि नीचैर्विनयाददृश्यत.

**नीड,** पु० न० (डः डं) पक्ष्यांचें घर ज्यास घरटा, कोटें असें म्हणतात तें. २ न० (डं) स्थान.

**नीडोद्भव,** पु० (वः) पक्षि.

**नीति,** स्त्री० (तिः) नय, न्याय. २ नेणें.

**नीतिघोष,** पु० (षः) बृहस्पतीचा रथ.

**नीध्र,** न० (ध्रं) वळचण, पडवी.

**नीप,** पु० (पः) कळंबाचें झाड. २ एक फूलझाड आहे ज्यास दुपारी असें म्हणतात तें. ३ निळा आशोक वृक्ष.

**नीर**, न० (रं) उदक, पाणी.

**नीरज**, न० (जं) कमळ. २ कुष्ठ.

**नीरस**, पु० (सः) शुष्क, रसरहित.

**नील**, वि० (लः ला- लं) नीलवर्ण. २ निधिविशेष. ३ पर्वतविशेष. ४ वानरविशेष. ५ पूर्वजिन.

**नीलकंठ**, पु० (ठः) भ्रमर, भुंगा. २ महादेव. ३ मयूर, मोर.

**नीलंगु**, पु० (गुः) कीटकविशेष ज्यास कुसुरडा असें म्हणतात तो.

**नीलपंक**, न० (कं) अंधकार.

**नीलमणि**, पु० (णिः) रत्नविशेष. ज्यास नीळ असें म्हणतात तें.

**नीललोहित**, पु० (तः) महादेव.

**नीलवसन**, पु० (नः) शनीनामा ग्रह.

**नीलवासस्**, पु० (साः) शनीनामाग्रह.

**नीलसरस्वती**, स्त्री० (ती) लक्ष्मी.

**नीला**, स्त्री० (ला) मक्षिका, माशी. २ नीलवर्ण.

**नीलांगु**, पु० (गुः) कीटकविशेष ज्यास कुसुरडा असें म्हणतात तो.

**नीलांजसा**, स्त्री० (सा) अप्सराविशेष. २ नदीविशेष. ३ विद्युल्लता, वीज.

**नीलांबर**, पु० (रः) बलराम. २ राक्षस.

**नीलांबुजन्मन्**, न० (न्म) निळें कमळ.

**नीलिका**, स्त्री० (का) काळे फुलाची निगुंडी. २ वनौषधि जीस रिंगणी असें म्हणतात ती.

**नीलिनी**, स्त्री० (नी) वनौषधि जीस नीली, नीळ असें म्हणतात ती.

**नीली**, स्त्री० (ली) वनौषधि जीस नीली, नीळ असें म्हणतात ती. २ रोगविशेष.

**नीलोत्पलिन**, पु० (ली) पूर्वजिन.

**नीवर**, पु० (रः) वास्तव्य. २ वणिजक.

**नीवाक**, पु० (कः) धनधान्यादिकांविषयीं जो लोकांचा अदरातिशय तो.

**नीवार**, पु० (रः) तृणधान्यविशेष ज्यास नेर, देवभात असें म्हणतात तें.

**नीवि**, स्त्री० (विः) क्रयविक्रय व्यवहारांतील जें मूल धन तें, भांडवल. २ निरी (वस्त्राची.)

**नीवी**, स्त्री० (वी) क्रयविक्रय व्यवहारांतील जें मूल धन तें, भांडवल. २ स्त्रियांच्या कमरेस जी नेसल्या वस्त्राची गांठ असते ती, लुगड्याची वगैरे गांठ.

**नीवृत्**, पु० (त्) ज्यांत लोकांची वस्ती आहे तो देश. २ गौडदेश.

**नीव्र**, न० (व्रं) तिवसाचें झाड. २ वळचण, पडवी. ३ अरण्य. ४ पु० (व्रः) समूह.

**नीशार**, पु० (रः) थंडी वारा अगदीं न लागण्या जोगें वस्त्रविशेष ज्यास रजई, दुलई इत्यादि म्हणतात ती.

**नीहार**, पु० (रः) थंडी, हींव, बर्फ.

**नु**, अ० पृच्छा. २ विकल्प ह्या अर्थी. उ० कोनुधावति. २ अयं भीमोनु धर्मोनु. ३ अनुनय. ४ अतीत. ५ वितर्क. ६ अपदेश. ७ हेतु. ८ अपमान.

**नुति**, स्त्री० (तिः) स्तुति.

**नुत्त**, वि० (त्तः त्ता- त्तं) प्रेरित, पाठविलेला, सोडलेला.

**नुन्न**, वि० (न्नः न्ना- न्नं) प्रेरित, पाठविलेला, सोडलेला.

**नूतन**, वि० (नः ना- नं) नवीन.

**नूत्न**, वि० (त्नः त्ना- त्नं) नवीन.

**नूद**, पु० (दः) पिंपळासारखा वृक्षविशेष ज्यास पारसापिंपळ असें म्हणतात तो.

**नूनं**, अ० तर्क. २ निश्चय ह्या अर्थी. उ० नूनमयं यज्वनांप्रियः २ क्षुद्रेपिनूनं शरणं प्रपद्ये. ३ स्मरण. ४ वाक्यपूरण.

**नूपुर**, पु० न० ( रः रं ) तोरड्या पैंजण.

**नृ**, पु० ( ना ) मनुष्य जाति. २ पुरुष.

**नृचक्षस्**, पु० ( क्षाः ) यमदूत.

**नृत्य**, न० ( त्यं ) नाचणें.

**नृप**, पु० ( पः ) राजा. २ क्षत्रिय.

**नृपति**, पु० ( तिः ) राजा.

**नृपलक्ष्मन्**, न० ( क्ष्म ) राजाचें छत्र.

**नृपसभ**, न० ( भं ) राजांची सभा, किंवा राजगृह.

**नृपाध्वर**, पु० ( रः ) यज्ञविशेष.

**नृपाभार**, पु० ( रः ) वाद्यविशेष.

**नृपासन**, न० ( नं ) राजासन, राजाची गादी.

**नृशंस**, वि० ( सः सा- सं ) क्रूर, परद्रोहशील, घातुक.

**नृसिंह**, पु० ( हः ) विष्णु.

**नेतृ**, पु० ( ता ) प्रभू.

**नेत्र**, न० ( त्रं ) नयन, डोळा. २ जटा, वृक्षाचें पाळ. ३ वस्त्रविशेष. ४ रथ. ५ विनेता. ६ नायक. ७ ताक घुसळण्याची दोरी.

**नेत्रपिंड**, पु० ( डः ) मांजर.

**नेत्रांबु**, न० ( बु ) अश्रु, नेत्रोदक.

**नेत्री**, स्त्री० (त्री) नदी. २ पु० (त्री) प्रभू.

**नेत्रोदक**, न० ( कं ) अश्रु.

**नेदिष्ठ**, वि० ( ष्ठः ष्ठा- ष्ठं ) अतिनिकट, फार जवळचा.

**नेपथ्य**, न० ( थ्यं) अलंकार घातलेल्याची शोभा. २ अलंकरण. ३ रंगभूमि. ४ वेषविशेष. ५ पु० ( थ्यः ) अलंकार.

**नेम**, पु० ( मः ) खंड. २ प्राकार ३ कपट.

**नेमि**, पु० ( मिः ) तिवसाचें झाड. २ स्त्री० ( मिः ) रथाच्या चाकाचा प्रांतभाग. ३ विहीर.

**नेमिन्**, पु० ( मी ) तिवसाचें झाड.

**नेमी**, स्त्री० ( मी ) रथाच्या चाकाचा प्रांतभाग.

**नैकभेद**, वि० ( दः दा- दं ) बहुविध, उच्चावच, सरसकट, लहान मोठें.

**नैगम**, पु० ( मः) क्रयविक्रयोपजीवि, वाणी. २ नागरिक, शहरचा. ३ उपनिषद.

**नैचिक**, न० ( कं ) गाईचें मस्तक.

**नैचिकी**, स्त्री० ( की ) उत्तम गाय.

**नैपाली**, स्त्री० ( ली ) नेपाळ देशांत झालेली जी मनशीळ ती. २ मनशीळ असेंही कोणी म्हणतात. ३ काळे फुलाची निर्गुंडी. ४ पुष्पलताविशेष जीस नेवाळी, थोर मोगरा, बट मोगरा, वेल मोगरा असें म्हणतात तो.

**नैमेय**, पु० ( यः ) परिवर्तन, मोबदला.

**नैय्यग्रोध**, पु० ( धः ) वडाचें फळ.

**नैय्यायिक**, पु० ( कः ) न्यायशास्त्री.

**नैऋत**, पु० ( तः ) राक्षस.

**नैषध**, पु० ( धः ) नळराजा.

**नैष्किक**, पु० ( कः ) रूप्याध्यक्ष, रुपे घेण्या देण्याच्या वगैरे कामाचा अधिकारी.

**नैस्त्रिंशिक**, पु० ( कः ) खड्गायुधी, निमचेकरी.

**नो**, अ० अभावार्थी. उ० नोजानासि.

**नौ**, स्त्री० ( नौः ) नौका, नाव, गलबत.

**नौकादंड**, पु० ( डः ) नौकावाहकदंड, वल्हें.

**न्यक्**, अ० धिःकारार्थीं. २ नीच. ३ खोल ह्या अर्थी.

**न्यंकु**, पु० ( कुः ) मृगविशेष ज्यास नागुण असें म्हणतात तो. (हा सांबराचा एक भेद आहे. ) २ ऋषि.

**न्यग्भावन**, न० ( नं ) अंतर्हित.

**न्यग्रोध**, पु० ( धः ) वडाचें झाड. २ व्याम, वांव. ३ शमीचें झाड.

**न्यग्रोधी**, स्त्री० ( धी ) वनौषधि जीस मूषिकपर्णी, उंदिरकानी असें म्हणतात ती.

**न्यच्**, वि० ( ङ्- नीची-क् ) ह्रस्व, सखल, ठेंगणा इत्यादि.

**न्यस्त**, वि० ( स्तः स्ता- स्तं ) निसृष्ट, निघालेला, सुटलेला. २ टाकलेला.

**न्यस्तशस्त्र**, पु० ( स्त्रः ) स्वर्गस्थ पितर. २ ज्याणें शस्त्र टाकलें तें.

**न्यक्ष**, पु० ( क्षः ) परशुराम. २ न० ( क्षं ) साकल्य. ३ वि० ( क्षःक्षा-क्षं ) निकृष्ट, अधम.

**न्याद**, पु० ( दः ) भोजन, जेवण.

**न्याय**, पु० ( यः ) नीति.

**न्याय्य**, वि० ( य्यः य्या-य्यं ) नीतीनें मिळावयाचें, युक्त.

**न्यास**, पु० ( सः ) निक्षेप, ठेवा, पुरलेलें द्रव्य.

**न्युंख**, पु० ( खः ) ओंकारविशेष. २ वि० ( खः खा- खं ) चांगला, सुंदर. ३ मनोरम. ४ पु० ( खः ) साम, सल्ला.

**न्युब्ज**, पु० ( ब्जः ) कुब्ज, कुबडा. २ रोगानें ज्याची पाठ किंवा तोंड वांकडें किंवा खालीं झालें तो. ३ दर्भमयस्त्रुवा (हवन पात्रविशेष.)

**न्युब्जखड्ग**, पु० ( ड्गः ) वांकडी तरवार.

**न्युक्ष**, पु० ( क्षः ) तृण. २ रेडा. ३ न० ( क्षं ) साकल्य. ४ वि० ( क्षः क्षा- क्षं ) निकृष्ट, अधम.

**न्यूंख**, पु० ( खः ) ओंकारविशेष. २ वि० ( खः खा- खं ) चांगला, सुंदर.

**न्यून**, वि० ( नः ना- नं ) निंद्य. २ कमी.

## प.

**प**, पु० (पः) वात, वारा. २ अंड. ३ पवित्र.

**पंक**, पु० न० (कःकं) पातक. २ चिखल.

**पंककर्वट**, पु० (टः) घट्ट चिखल.

**पंककीर**, पु० (रः) पक्षिवि० ज्यास कोंढा असें म्ह० तो.

**पंकग्राह**, पु० (हः) जलचरवि० ज्यास मगर असें म्ह० तो.

**पंकमंडुक**, पु० (कः) पाण्यांतील लहान शिंप.

**पंकशुक्ति**, स्त्री० (क्तिः) जळूसारखा एक जलचरवि०.

**पंकसूरण**, पु० (णः) कमळाचा कांदा.

**पंकार**, पु० (रः) शेवाळ. २ सेतु. ३ सोपान, जिना. ४ जलकुब्जक.

**पंकिल**, वि० (लःला-लं) पंकयुक्त.

**पंकेज**, पु० (जः) कमळ.

**पंकेरुह**, पु० न० (हःहं) कमळ.

**पक्ति**, स्त्री० (क्तिः) पाक, पक्वता. २ गौरव. ३ ओळ.

**पंक्ति**, स्त्री० (क्तिः) पंगत, ओळ. २ छंदोवि०, (ज्या वृत्ताचा दहा अक्षरांचा चरण असतो तें.) ३ दहा संख्या.

**पंक्तिम**, न० (मं) पक्क.

**पक्क**, वि० (क्कः-क्का-क्कं) पिकलेला, पक्कदशा पावलेला. २ विनाशोन्मुख, ज्याचा नाश जवळ आला तो. ३ अग्नि तापानें शिजविलेलें.

**पक्कण**, पु० (णः) भिल्लांचा गांव.

**पंगु**, पु० (गुः) जंघाविकल, पांगळा.

**पंचगुप्त**, पु० (प्तः) चार्वाकाचें तर्कशास्त्र. २ कांसव.

**पंचजन**, पु० (नः) मनुष्य. २ पुरुष. ३ दैत्यवि०.

**पंचता**, स्त्री० (ता) मरण. २ पांचांचा धर्म, पांचाचा भाव.

**पंचत्व**, न० (त्वं) मरण. २ पांचांचा धर्म, पांचांचा भाव.

**पंचदशी**, स्त्री० (शी) पूर्णिमा. २ अमावास्या. ३ वेदांत शास्त्रवि०.

**पंचनख**, पु० (खः) सिंह. २ गज, हत्ती.

**पचंपचा**, स्त्री० (चा) वनौषधि जीस दारूहळद असें म्ह० ती.

**पचंवचा**, स्त्री० (चा) वनौषधि जीस दारूहळद असें म्ह० ती.

**पंचभद्र**, पु० (द्रः) पंचकल्याणी घोडा. २ भूषित घोडा.

**पंचम**, पु० (मः) गायनाच्या स्वरांतील एक भेद. २ पांचवा.

**पंचमा**, स्त्री० (मा) द्रौपदी.

**पंचरसा**, स्त्री० (सा) आंवळीचें झाड.

**पंचरात्र**, न० (त्रं) पांच रात्री.

**पंचलक्षण***, न० (णं) पुराण.

**पंचवट**, पु० (टः) नवीन मुंज झालेला.

**पंचवीर**, पु० (रः) पूर्वजिन.

**पंचशर***, पु० (रः) काम, मदन.

**पंचशाख**, पु० (खः) हस्त, हात.

**पंचशिख**, पु० (खः) सिंह.

**पंचज्ञान**, पु० (नः) बौद्धावतार.

**पचा**, स्त्री० (चा) पाक, पचन.

**पंचांगगुप्त**, पु० (प्तः) कांसव.

**पचांगपुष्पित**, पु० (तः) भूषित घोडा.

**पंचांगुल**, पु० (लः) एरंडाचें झाड.

**पंचानन**, पु० (नः) महादेव. २ सिंह.

**पंचार्चि**, पु० (र्चिः) बुध नामा ग्रह.

**पंचालिका**, स्त्री० (का) वस्त्राची बाहुली. २ गीतिवि०.

**पंचाली**, स्त्री० (ली) पुतळी, बाहुली. २ गीतिवि०. ३ पु० (ली) देशविशेष. ४ सोंगटी.

**पंचावट**, पु० (टः) बाळंतें.

**पंचावस्थ**, पु० (स्थः) प्रेत.

**पंचास्य**, पु० (स्यः) सिंह. (पचि विस्तारे ह्या धातूर्योनें विस्तृतमुख असाही अर्थ आहे.)

**पचि**, पु० (चिः) अग्नि.

**पंजर**, पु० (रः) पिंजरा. २ शरीर.

**पंजिका**, स्त्री० (का) निःशेषपदव्याख्या. यमाचा. २ पाश.

**पंजीकर**, पु० (रः) शूद्रजातिविशेष.

**पट**, पु० न० (टः-टं) शोभनवस्त्र, चांगलें वस्त्र. २ साधारण वस्त्र. ३ चाराचें झाड.

**पटच्चर**, न० (रं) जीर्णवस्त्र- पु० (रः) चोर.

---

* उत्पत्ति. २ प्रत्युत्पत्ति. ३ वंश. ४ मन्वंतर. ५ वंशजांचें चरित्र हीं पांच लक्षणें पुराणाचीं म्हटलीं आहेत.

* कमळ. २ अशोकपुष्प. ३ आंब्याचें फूल, मोहोर. ४ मोगरीचें फूल. ५ निळें कमळ हे पांच मदनाचे बाण सांगितले आहेत.

**पटमय**, न० (यं) वस्त्रगृह.

**पटल**, न० (लं) घराचा आकार. २ नेत्ररोग. ३ समूह. ४ पिटक, फोड.५ परिच्छद. ६ तिलक. ७ काव्य पुराण नाटक भाग.

**पटलप्रांत**, पु० (तः) वळचण, पडवी.

**पटला**, स्त्री० (ला) समूह.

**पटवाप**, पु० (पः वस्त्रगृह.

**पटवासक**, पु० (कः) सुवासिक चूर्ण विशेष ज्यास बुका असें म्हणतात तो.

**पटह**, पु० (हः) वाद्यविशेष. २ संग्राम ध्वनि, युद्धांतील शब्द.

**पटा**, स्त्री० (टा) सर्पाची फणा, फडा. २ दांत.

**पटालका**, स्त्री० (का) जळू.

**पटि**, स्त्री० (टिः) वस्त्रविशेष. २ कुंभ्याचें झाड.

**पटी**, स्त्री० (टी) लहान वस्त्र.

**पटु**, पु० (टुः) वनौ० शाकविशेष, पडवळ. २ वि० (टुःटुःटु) चतुर, दक्ष. ३ समर्थ. ४ तीक्ष्ण, अमंद. ५ रोगरहित, निरोगी. धूर्त. निष्णांत.

**पटुपर्णी**, स्त्री० (र्णी) वनौषधि जीस स्वर्ण क्षीरी, पिंवळ असें म्हणतात ती.

**पटोल**, पु० (लः) शाकविशेष, पडवळ. २ औषध. ३ न० (लंः) वस्त्रविशेष.

**पटोलिका**, स्त्री० (का) शाकविशेष, पडवळ. २ व्यवस्थापत्र.

**पट्ट**, पु० (ट्टः) बसावयाचा लांकडी पाट. २ पेषाश्मा, कांहीं पदार्थ वाटण्याचा पाटा. ३ चवाठा. ४ राजाज्ञाविशेष. ५ क्षतादिकांस लावण्याची पट्टी. ६ राजादिकांनीं केलेलें शासनविशेष.

**पट्टिका**, स्त्री० (का) तांबडा लोध्र वृक्ष.

**पट्टिन्**, पु० (ट्टी) तांबडा लोध्र वृक्ष.

**पट्टिश**, पु० (शः) अयुधविशेष ज्यास धोप, पट्टा असें म्हणात तो.

**पंड**, पु० (डः) नपुंसक.

**पंडा**, स्त्री० (डा) बुद्धि.

**पंडित**, पु० (तः) विद्वान, २ पण्यविशेष. ज्यास लोबाण, ऊद असें म्हणतात तो. ३ न० (तं) गुणित, योग्य.

**पण**, पु० (णः) तांब्याचें तोळाभार नाणें, पैसा. २ द्यूत. ३ द्यूतांत वगैरे जय झाला असतां प्रतिज्ञा बांधल्याप्रमाणें जें घेतात तें, पैज. ४ वेतन. ५ मूल्य, विकलेल्या वस्तुचें मोल. ६ चार दमड्या. ७ सोळा पैसे ८ निर्बंध, आग्रहविशेष.

**पणव**, पु० (वः) वाद्यविशेष.

**पणायित**, वि० (तःता-तं) स्तुत, स्तवलेला.

**पणास्थि**, न० (स्थि) कवडी.

**पणित**, वि० (तःता-तं) स्तुत, स्तवलेला.

**पणितव्य**, वि० (व्यःव्या-व्यं) विकावयाची (वस्तु वगैरे.)

**पण्य**, वि० (ण्यःण्या-ण्यं विकावयाची (वस्तु वगैरे.)

**पण्यवीथिका**, स्त्री० (का) बाजार.

**पण्या**, स्त्री० (ण्या) वनौषधि जीस ज्योतिष्मतीलता, मालकांगणी असें म्हणतात ती.

**पण्याजिर**, पु० (रः) बाजार.

**पण्याजीव**, पु० (वः) क्रयविक्रयें करून उपजीविका करणारा वाणी.

**पण्याजीवक**, पु० (कः) कमळाचा कांदा

**पत्**, पु० न० (त-द्) चरण, पाय.

**पतग**. पु० (गः) पक्षि.

**पतंग**, पु० (गः) दीप पतंग. २ पक्षि. ३ सूर्य. ४ शालिविशेष, भातांतील एक भेद. ५ पुत्र.

**पतंगिका**, स्त्री० (का) पांढरा मध उत्पन्न करणारी माशी.

**पतत्**, पु० (न्) पतनशील, पडणारा. २ पक्षी.

**पतत्र**, न० (त्रं) पक्ष, पीस.

**पतत्रि**, पु० (त्रिः) पक्षी.

**पतत्रिन्**, पु० (त्री) पक्षि.

**पतद्ग्रह**, पु० (हः) पिकदाणी. २ सैन्याचा मागचा भाग.

**पतयालु**, वि० (लुः लुः लु) पतनशील, पडणारा.

**पताका**, स्त्री० (का) ध्वज. २ सौभाग्य.

**पताकिन्**, पु० (की) पताका धारण करणारा ज्यास निशाणकरी, जरीपटकेकरी वगैरे म्हणतात तो.

**पति**, पु० (तिः) भर्ता, नवरा. २ यजमान.

**पतिवत्नी**, स्त्री० (त्नी) सभर्तृका, जिचा नवरा जिवंत आहे ती बायको.

**पतिंवरा**, स्त्री० (रा) आपले इच्छेस येईल त्यास वरणारी स्त्री.

**पतिव्रता**, स्त्री० (ता) पतीच्या सेवेविषयीं जी तत्पर स्त्री ती.

**पत्तन** न० (नं) नगर, शहर. २ पु० (नः) मृदंग. ३ (राजधानी असेंही कोणी म्हणतात.)

**पत्तनवणिक्**, पु० (क्) शहरांतील वाणी.

**पत्ति**, पु० (त्तिः) पादगामी, पायांनीं जाणारा. २ गमन. ३ स्त्री० (त्तिः) एक रथ, एक हत्ती, तीन घोडे, पांच पादगामी इतकी मिळून पत्ति संज्ञक सेना होते.

**पत्तिसंहति**, स्त्री० (तिः) पादगाम्यांचा समूह, पायदळ.

**पत्नी**, स्त्री० (त्नी) विवाहित स्त्री.

**पत्र**, न० (त्रं) पर्ण, पान. २ पिछ, पक्ष. ३ हत्ती, घोडे इत्यादि वाहन. ४ पु० (त्रः) कांटा.

**पत्रझंकार**, पु० (रः) जलभोंवरा.

**पत्रणा**, स्त्री० (णा) बाणाची पत्र रचना.

**पत्रदारक**, पु० (कः) करवत.

**पत्रपरशु**, पु० (शुः) शस्त्रविशेष ज्यास कानस असें म्हणतात तो.

**पत्रपाश्या**, स्त्री० (श्या) ललाटाचें भूषण.

**पत्रपिशाचिका**, स्त्री० (का) पळसाचीं पानें डोकीवर बांधणें.

**पत्ररथ**, पु० (थः) पक्षि.

**पत्रलेखा**, स्त्री० (खा) कस्तूरी, केशर इत्यादिकांनीं गालावर पानाची आकृति काढितात ती. (ही चाल कलिंग देशीं प्रसिद्ध आहे.)

**पत्रवाह**, पु० (हः) बाण.

**पत्रशिरा**, स्त्री० (रा) पानाची शीर.

**पत्रहिम**, न० (मं) थंडीनें युक्त दुर्दीन.

**पत्रांग**, न० (गं) रक्तचंदन. २ रक्तचंदनासारखा वृक्षविशेष ज्यास रक्तसार, पतंग असें म्हणतात तो. ३ पु० (गः) भूर्जवृक्ष. ४ हत्तीचे शीरावर जो बिंदुसमूह असतो तो.

**पत्रांगुलि**, स्त्री० (लिः) कस्तुरी, केशर इत्यादिकांनीं गालावर पानाची आकृती काढितात ती. (ही चाल कलिंग देशीं प्रसिद्ध आहे.)

पत्रांजन, पु० ( नः ) शाई.
पत्रिन्, पु० ( त्री ) पक्षिविशेष ज्यास ससाणा असें म्हणतात तो. २ बाण. ३ पक्षि. ४ रथ. ५ कांड. ६ वृक्ष. ७ रथिक.
पत्रोपस्कर, पु० (रः) शाकविशेष.
पत्रोर्ण, पु० ( र्णः ) टिंड्याचें झाड. २ न० ( र्णं ) रेशमी वस्त्रविशेष.
पथ, पु० ( थः ) मार्ग.
पथिक, पु० ( कः ) मार्गस्थ, पांथस्थ.
पथिकसंतति, स्त्री० ( तिः ) प्रवाशी लोकांचा समुदाय.
पथिकसंहति, स्त्री० ( तिः ) प्रवाशी लोकांचा समुदाय.
पथिन्, पु० ( पंथाः ) मार्ग.
पथ्य, न० ( थ्यं ) हित. २ पथ्य.
पथ्या, स्त्री० ( थ्या ) हिरड्याचें झाड.
पद, न० ( दं ) व्यवसाय. २ त्राण, रक्षण. ३ स्थान. ४ चिन्ह. ५ पाद, पाय. ६ वस्तु. ७ विभक्त्यंत शब्द. ८ वाक्य. ९ पादचिन्ह. १० अपदेश.
पदग, पु० ( गः ) पादगामी, पायानें जाणारा.
पदरथी, स्त्री० ( थी ) वाहाणा.
पदवी, स्त्री० ( वी ) मार्ग. २ स्थान.
पदाजि, पु० ( जिः ) पादगामी, पायानें जाणारा.
पदात, पु० ( तः ) पादगामी, पायानें जाणारा.
पदाति, पु० ( तिः ) पादगामी, पायानें जाणारा.
पदातिक, पु० ( कः ) पायानें जाणारा.
पदाद्यवित, पु० ( तः ) पदें वगैरे जाणणारा.
पदार, पु० ( रः ) पायाची धूळ. २ दारा बाहेरचा एक प्रदेश.
पदार्थ पु० (र्थः) वस्तु.
पदिक, पु० ( कः ) पादगामी, पायानें जाणारा.
पद्ग, पु० ( द्गः ) पायगामी, पायानें जाणारा.
पद्धति, स्त्री० (तिः) मार्ग. २ पंक्ति, ओळ.
पद्धती, स्त्री० (ती) मार्ग.
पद्म, पु० न० (द्मः-द्मं) कमळ. २ संख्याविशेष. ३ नवानिधींतील एक. ४ सर्पविशेष. ५ हत्तीचे शरीरावर जो बिंदुसमूह असतो तो.
पद्मक, न० ( कं ) हत्तीचे शरीरावर जो बिंदुसमूह असतो तो. २ पद्मकाष्ठ ( औषधविशेष. )
पद्मचारिणी, स्त्री० ( णी ) स्थलकमलिनी. २ लक्ष्मी.
पद्मनाभ, पु० (भः) विष्णु.
पद्मपत्र, न० (त्रं) कमळाची पाकळी. २ पुष्कर नामक औषधीचें मूळ.
पद्मपाणि, पु० ( णिः ) सूर्य. २ बौद्धभेद.
पद्मबीज, पु० ( जः ) कमळाचें बीं.
पद्मराग, पु० ( गः ) रत्नविशेष ज्यास माणिक असें म्हणतात तें.
पद्मलांछन, पु० ( नः ) राजा. २ ब्रम्हदेव. ३ सूर्य. ४ कुबेर.
पद्मलांछना, स्त्री० ( ना ) वनौषधि जीस भारंग असें म्हणतात ती. २ लक्ष्मी. ३ स्थलकमलिनी.
पद्मा, स्त्री० ( द्मा ) लक्ष्मी. २ वनौषधि

जीस भारंग असें म्हणतात ती. ३ स्थलकमल.

**पद्माकर**, पु० ( रः ) तडाग, तळें.

**पद्माट**, पु० ( टः ) वनौषधि ज्यास टाकळा असें म्हणतात तो.

**पद्मालया**, स्त्री० ( या ) लक्ष्मी.

**पद्माक्ष**, पु० ( क्षः ) कमळाचें बीं.

**पद्मिन्**, पु० ( द्मी ) हत्ती.

**पद्मिनी**, स्त्री० ( नी ) कमलिनी. २ कमळाची देंटी. ३ कमळांचा समुदाय. ४ स्त्रीजातिविशेष.

**पद्य**, न० ( द्यं ) श्लोक. २ पु० ( द्यः ) शूद्र.

**पद्या**, स्त्री० ( द्या ) मार्ग.

**पनस**, पु० ( सः ) फणसाचें झाड. २ वानरविशेष. ३ कांटा.

**पनसा**, स्त्री० ( सा ) रोगविशेष.

**पनायित**, वि० ( तः ता- तं ) स्तुत, स्तवलेला.

**पनित**, वि० ( तः ता- तं ) स्तुत, स्तवलेला.

**पन्न**, वि० ( न्नः न्ना- न्नं ) गलित, गळालेला.

**पन्नग**, पु० ( गः ) सर्प. २ औषधिविशेष.

**पन्नगाशन**, पु० ( नः ) गरुडपक्षि.

**पन्नध्री**, स्त्री० ( ध्री ) वाहणा.

**पयस्**, न० ( यः ) उदक, पाणी. २ दुग्ध, दूध.

**पयस्य**, वि० ( स्यः स्या- स्यं ) दुधाचा विकार. ( तूप, दहीं इत्यादि. ) २ हित.

**पयस्या**, स्त्री० ( स्या ) वनौषधि जीस दुधी असें म्हणतात ती. २ वनौषधि जीस पिसोळा असें म्हणतात ती. ३ क्षिप्रा, खीर.

**पयस्विनी**, स्त्री० ( नी ) नदी. २ धेनु. ३ रात्र.

**पयोघन**, पु० ( नः ) कठिणोदक, गार.

**पयोधर**, पु० (रः) कुच, स्त्रियांचा स्तन. २ मेघ. ३ कोशकार ४ नारिकेल. ५ पाठीचा कणा.

**पर**, पु० ( रः ) शत्रु. २ वि० (रः रा- रं) दूर. ३ अनात्मा, आत्मभिन्न. ४ उत्तम. ५ श्रेष्ठ ६ न० ( रं ) केवळ. ७ पु० (रः) अन्य. ८ पलीकडचा.

**परग्रंथि**, स्त्री० (थिः) बोटाचें कांडें.

**परंज**, पु० ( जः ) तेल काढण्याचें यंत्र. २ सुरीचें पान. ३ फेंस.

**परंजय**, पु० ( यः ) वरुण.

**परजात**, वि० ( तः ता- तं ) परसंवर्धित, दुसऱ्यानें वाढविलेला.

**परतंत्र**, वि० ( त्रः त्रा- त्रं ) पराधीन.

**परंपर**, पु० ( रः ) आपल्या पुत्राचा प्रपौत्र. २ मृगविशेष.

**परंपरा**, स्त्री० ( रा ) परिपाटी, क्रम. २ हिंसा. ३ संतान.

**परंपराक**, न० ( कं ) यज्ञांतील पशुहनन.

**परपिंडाद**, वि० ( दः दा- दं ) परान्नोपजीवि.

**परपुरुष**, पु० (षः) विष्णु.

**परपुष्ट**, पु० (टः) कोकिलपक्षि.

**परपुष्टा**, स्त्री० (ष्टा) वेश्या, कळवंतीण.

**परभाग**, पु० (गः) सुसंपदा.

**परभाषा**, स्त्री० (षा) दुसऱ्याची भाषा.

**परभृत**,) पु० (तः) कोकिलपक्षि.

**परभृत्**, पु० (त्) काकपक्षि.

**परम्**, अ० नियोग. २ क्षेप ह्या अर्थी.

**परम**, पु० (मः) श्रेष्ठ.

**परमं**, अ० अंगिकार. २ अनुज्ञा ह्या अर्थी.
**परमान्न**, न० (न्नं) क्षीरान्न, पायस, क्षीर, खीर.
**परमृत्यु**, पु० (त्युः) कावळा.
**परमेष्ठिन्**, पु० (ष्ठी) ब्रम्हदेव.
**परवत्**, वि० (वान्. वती. वत्.) परतंत्र.
**परवाणि**, पु० (णिः) धर्माध्यक्ष. २ वत्सर, वर्ष.
**परःशत**, न० (तं) शंभराहून अधिक.
**परशु**, पु० (शुः) कुऱ्हाड.
**परश्वः**, अ० परवां ह्या अर्थी उ० परश्वो-सर्वं कर्म भविष्यति.
**परश्वध**, पु० (धः) कुऱ्हाड.
**परःसहस्र**, न० (स्रं) सहस्राहून अधिक.
**परा**, अ० मोक्ष. २ प्राधान्य. ३ प्रातिलोम्य. ४ धर्षण. ५ आभिमुख्य. ६ अत्यंत. ७ विक्रम, अति पराक्रम. ८ गति. ९ वध ह्या अर्थी.
**पराक**, पु० (कः) व्रत. २ खड्ग, तरवार.
**पराक्रम**, पु० (मः) शौर्य. २ सामर्थ्य. ३ उद्योग.
**पराग**, पु० (गः) पुष्पांतील रेणु. २ धूलि, धूळ. ३ सुवासिक चूर्ण विशेष. ४ चंद्र सूर्यग्रहण. ५ कर्पूर चूर्ण. ६ चंदन. ७ पर्वतविशेष.
**परांगव**, पु० (वः) समुद्र.
**पराङ्मुख**, वि० (खः खा- खं) विमुख.
**पराचित**, वि० (तः ता- तं) परसंवर्धित. दुसऱ्यानें वाढविलला.
**पराचीन**, वि० (नः ना- नं) विमुख. २ न० (नं) विरुद्ध.
**परांज**, पु० (जः) तेल्याचा घाणा.
**परांजन**, न० (नं) काजळ.
**पराजय**, पु० (यः) युद्धांत जो उत्साह-भंग तो.
**पराजित**, वि० (तः ता- तं) दुसऱ्यानें वाढविलेला. २ पराजय पावलेला.
**परादन**, पु० (नः) वनांतील घोडा.
**पराधीन**, वि० (नः ना- नं) परतंत्र.
**परान्न**, वि० (न्नः न्ना- न्नं) परान्नोपजीवि, दुसऱ्याचे अन्नानें उपजीविका करणारा. २ दुसऱ्याचे घरचें अन्न.
**पराभव**, पु० (वः) नाश. २ तिरस्कार.
**पराभूत**, वि० (तः ता- तं) पराजय पाव-लेला.
**परामृत**, न० (तं) मेघधार.
**परायण**, न० (णं) आसंग वचन, आसक्तीचें बोलणें. २ अत्यंत प्रिय. ३ आसक्त. ४ आश्रय.
**परारि**, अ० गेल्या वर्षाच्या मागचे वर्षी, तिगस्तां ह्या अर्थी उ० परारिगतःकांतः
**परारु**, पु० (रुः) पडवळीचें झाड.
**परार्घ्य**, वि० (र्घ्यः र्घ्या- र्घ्यं) प्रमुख, मुख्य.
**परासन**, न० (नं) वध.
**परासु**, वि० (सुः सुः सु) मृत, मेलेला.
**परास्कंदि**, पु० (दिः) चोर.
**परि**, अ० सर्व. २ भाव. ३ वर्जन. ४ व्याधि. ५ शेष. ६ जसें झालें तसें सांगणें. ७ भाग. ८ वीप्सा. ९ आलिंगन. १० लक्षण. ११ दोषाचें वर्णन. १२ निरसन. १३ पूजा. १४ व्याप्ति. १५ भूषण ह्या अर्थी.
**परिकूट**, पु० (टः) घर.
**परिकर**, पु० (रः) पर्यंक, पलंग. २ परिवार. ३ समूह ४ प्रगाढगात्रिका बंध, कमर बांधणें. ५ विचार. ६ आरंभ.

परिकर्मन्, न० (र्म) शरीरास केशर, चंदन इत्यादिकांची उटी काढणें.
परिकल्प, पु० (ल्पः) भय. २ कंप.
परिक्रम, पु० (मः) पादगति, पायांनीं जाणें. २ बकरा.
परिक्रिया, स्त्री० (या) चाकर लोकांचें वेष्टण, चाकर लोकांचा वेढा.
परिखा, स्त्री० (खा) खंदक, चर.
परिगत, न० (तं) प्राप्त. २ ज्ञात, जाणलेलें
परिग्रह पु० (हः) परिजन, चाकर लोक. २ सेनेच्या मागचा भाग. ३ पत्नी. विवाहित स्त्री. ४ स्वीकार. ५ मूल, मूळ. ६ शाप. ७ शपथ. ८ सूर्यग्रहण.
परिघ, पु० (घः) गदा. २ परिघनामा योग. ३ दाराचा अडसर. ४ घात. ५ घरे. वनौषधि ज्यास मुस्ता असें म्हणतात तो.
परिघातन, पु०(नः) गदा. २ परिघनामा योग तो.
परिघोष, पु० (षः) शब्द, नाद. २ अवाच्य. ३ मेघगर्जना.
परिचय, पु० (यः) अभ्यास.
परिचर, पु० (रः) सेनापतीच्या जवळ असणारा जन ज्यास तलावेदार असें म्हणतात तो.
परिचर्या, स्त्री० (र्या) उपासना.
परिचाय्य, पु० (य्यः) अग्निविशेष.
परिचारक, पु० (कः) दास, चाकर.
परिछद, पु० (दः) मंडपाद्युपकरण पट, छद, छत.
परिछेद, पु०(दः) काव्यपुराण नाटकभाग.
परिजन, पु० (नः) परिवार, चाकरलोक.
परिज्वन्, पु० (ज्वा) चंद्र. २ याज्ञिक. ३ दास, चाकर.
परिणत, वि० (तः-ता-तं) पक्क.
परिणय, पु० (यः) विवाह.
परिणाम, पु० (मः) प्रकृतीचा अन्यथा भाव. २ कोणतेही कर्माचा शेवट.
परिणाय, पु० (यः) खेळांत सोंकट्या इकडे तिकडे फिरविणें.
परिणाह, पु० (हः) विस्तार, रुंदी.
परितः, अ० सर्वतः. २ आसमंतात् आभर्थी.
परिताप, पु० (पः) दुःख. २ नरकविशेष.
परित्राण, न० (णं) जो मारण्यास उद्युक्त झाला त्याचें निवारण करणें.
परिदान, न० (नं) परिवर्तन, मोबदला.
परिदेवन, न० (नं) रोदनपूर्वक भाषण, रडत बोलणें.
परिधान, न० (नं) नेसावयाचें वस्त्र.
परिधाय, पु० (यः) जनस्थान. २ परिछेद. ३ स्त्रियांच्या कमरेचा पाठीमागचा भाग.
परिधि, पु० (धिः) सूर्याचे सभोंवार कदाचित मंडळाकार जो तेजोविशेष दिसतो तो. २ पलाशादिक, जे यज्ञिक वृक्ष त्यांची फांदी, समिध. ३ वस्तूचा घेर.
परिधिस्थ, पु० (स्थः) सेनापतीच्या जवळ असणारा दंडनायक ज्यास तलावेदार असें म्हणतात तो.
परिपण, पु० (ण) मूल धन, भांडवल.
परिपंथिन्, पु० (थी) शत्रु.
परिपाटी, स्त्री० (टिः) अनुक्रम.
परिपाटि, स्त्री०(टी) अनुक्रम.
परिपूर्णता, स्त्री० (ता) परिपूर्णपणा.
परिपेलव, न० (वं) वनौषधि ज्यास केवटी, जलमुस्ता असें म्हणतात तो.
परिप्लव, पु० (वः) स्त्री० न० (वा-वं) चंचळ.

**परिबर्ह**, पु० (र्हः) राजास योग्य जी वस्तु ती. २ परिछद. ३ परिवार.

**परिभव**, पु० (वः) अनादर.

**परिभाषण**, न० (णं) निंदायुक्त जो उपलंभ तो. उ० बटकीच्या पोरा तुला हें योग्यच आहे.

**परिभाषा**, स्त्री० (षा) सांज्ञिक शब्द.

**परिभूत**, वि० (तःता-तं) अवमानित, अवमान झालेला.

**परिमल**, पु० (लः) संघर्षणापासून उत्पन्न जो मनोहर गंध तो, सुगंधविशेष.

**परिमित**, न० (तं) यथायोग्य.

**परिरंभ**, पु० (भः) आलिंगन.

**परिवर्जन**, न० (नं) वध. २ सर्वथावर्जन.

**परिवर्त**, पु० (र्तः) मोबदला. २ काव्यपुराण नाटक भाग. ३ कूर्मराज. ४ प्रवर्तन.

**परिवर्तन**, न० (नं) मोबदला.

**परिवाद**, पु० (दः) निंदा. २ वीणा वाजविण्याचें साधन.

**परिवाप**, पु० (पः) जलस्थान. २ छत. ३ परियुप्ति.

**परिवापित**, वि० (तःता-तं) कृतमुंडण, ज्याणें मुंडण केलें तो.

**परिवार**, पु० (रः) चाकर लोक. २ खड्गकोश. ३ परिछद.

**परिवाह**, पु० (हः) तळ्यांतून वगैरे जलमार्गानें बाहेर जातें तो मार्ग. २ पर्वतविशेष. ३ योग्य वस्तु.

**परिवित्ति**, पु० (त्तिः) परिवेत्याचा ज्येष्ठ बंधु.

**परिवृढ**. पु० (ढः) प्रभु.

**परिवेत्तृ**, पु० (त्ता) ज्येष्ठ बंधूचा विवाह न होतां ज्या कनिष्ठ बंधूचा विवाह झाला तो.

**परिवेश**, पु० (शः) नेसावयाचें वस्त्र. २ वेष्टन.

**परिवेष**, पु० (षः) सूर्याचे सभोंवार कदाचित मंडळाकार जो तेजोवि० दिसतो तो. १ सभोंवतालें फिरविणें.

**परिव्याध**, पु० (धः) जलवेत. २ पांगाऱ्याचें झाड.

**परिव्राज्**, पु० (ट्ः) संन्यासी.

**परिव्राजक**, पु० (कः) संन्यासी.

**परिषत्**. स्त्री० (त्) सभा.

**परिषद्** स्त्री० (द्) सभा.

**परिष्कंद**, वि० (दःदा-दं) परिसंवर्धित, दुसऱ्यानें वाढविलेला.

**परिष्कंन**, वि० (नःना-नं) परिसंवार्धित, दुसऱ्यानें वाढविलेला.

**परिष्कार**, पु० (रः) आलंकार.

**परिष्कृत**, वि० (तःता-तं) आळंकृत, आळंकारयुक्त.

**परिष्टि**, स्त्री० (ष्टिः) उपासना. २ अत्यंत. ३ शोधणें.

**परिष्वंग**, पु० (गः) आलिंगन.

**परिसर**, पु० (रः) नदी, पर्वत इत्यादिकांचे जवळची भूमि. २ मृत्यु. ३ विधि.

**परिसर्प**, पु० (र्पः) परिवार जनाचें वेष्टन.

**परिसर्या**, स्त्री० (र्या) सभोंवार किंवा चहूंकडे सरणें.

**परिसार**, पु० (रः) सभोंवार किंवा चहूंकडे सरणें

**परिस्कंद**, वि० (दःदा-दं) परिसंवर्धित, दुसऱ्यानें वाढविलेला.

**परिस्कन्न**, वि० (न्नःन्ना-न्नं) परिसंवर्धित, दुसऱ्यानें वाढविलेला.

**परिस्कृत**, वि० (तःता-तं) अलंकृत, आळं-कारयुक्त.

**परिस्तोम**, पु० (मः) हत्तीच्या पाठीवरचें आस्तरण.

**परिस्पंद**, पु० (दः) रचना. २ क्रियावि०.

**परिस्रुत्**, स्त्री० (त्) मद्य, दारू.

**परिस्रुत**, वि० (तःता-तं) स्रवलेला.

**परिस्रुता**, स्त्री० (ता) मद्य, दारू.

**परिहास**, पु० (सः) थट्टा.

**परिक्षिप्त**, वि० (प्तःप्ता-प्तं) सर्वतः वेष्टित, चोहोंकडून वेढलेला.

**परिज्ञावलगु**, पु० (गुः) चंद्र.

**परिभाव**, पु० (वः) अनादर.

**परीरण**, पु० (णः) कांसव. २ दंड.

**परीरंभ**, पु० (भः) आलिंगन.

**परीवर्त**, पु० (र्तः) मोबदला.

**परीवाद**, पु० (दः) निंदा.

**परीवाप**, पु० (पः) पटमंडपाद्युपकरण, रावटीचें वगैरे साहित्य. २ पर्युप्ति, बीज पेरणें. ३ ह्रद, डोह, हौद.

**परीवार**, पु० (रः) परिजन, चाकर लोक. २ तरवारीचें म्यान. ३ रावटीचें वगैरे साहित्य.

**परीवाह**, पु० (हः) तळ्यांतून वगैरे पाणी बाहेर ज्या मार्गानें जातें तो मार्ग.

**परीष्टि**, स्त्री० (ष्टिः) श्राद्धाचे ठायीं भक्ति-पुरस्सर जी ब्राम्हणाची शुश्रूषा ती.

**परीसर्या**, स्त्री० (र्या) सभोंवार किंवा चहूं कडे सरणें.

**परीसार**, पु० (रः) सभोंवार किंवा चहूंकडे सरणें.

**परीहास**, पु० (सः) क्रीडा.

**परीक्षक**, पु० (कः) परिक्षा करणारा.

**परु**, पु० (रुः) वेळू, ऊंस, बोरू इत्यादि-कांचें पेर.

**परुत्**, अ० गतवर्षी, गुदस्तां ह्या अर्थी. उ० परुत्नागतःकांतः.

**परुष**, वि० (षःषा-षं) निष्ठुर (भाषण वगैरे.) २ न० (षं) चित्रवर्ण. ३ अचिक्कण, ओ-लसरपणा ज्यास नाहीं तें.

**परुस्**, न० (रुः) वेळू, ऊंस, बोरू इत्यादि-कांचें पेर.

**परेत**, वि० (तःता-तं) मृत, मेलेला. २ पु० (तः) भूतवि०.

**परेतराज्**, पु० (ट) प्रेतांचा जो राजा यम तो.

**परेद्यवि**, अ० दुसऱ्या दिवशीं ह्या अर्थी. उ० मित्रदृष्टपरेद्यवि.

**परेष्टुका**, स्त्री० (का) बहुत वेळां प्रसवलेली (गाय वगैरे.)

**परैधित**, वि० (तःता-तं) दुसऱ्यानें वाढवि-लेला.

**परोष्ठी**, स्त्री० (ष्ठी) पक्षयुक्त कीटकवि० ज्यास वाघुळ असें म्ह० तें.

**परोष्णी**, स्त्री० (ष्णी) पक्षयुक्त कीटवि० ज्यास वाघुळ असें म्ह० तें.

**परोक्ष**, वि० (क्षःक्षा-क्षं) अतींद्रिय.

**पर्कटिन्**, पु० (टी) पिंपरीचें झाड. २ सु-पारी वगैरे ह्याचें कोवळें फळ.

**पर्जनी**, स्त्री० (नी) वनौषधि जीस दारू-हळद असें म्ह० ती.

**पर्जन्य**, पु० (न्यः) इंद्र. २ गर्जना करणारा मेघ. ३ मेघाची घर्जना. ४ पर्जन्य.

**पर्ण**, न० (र्णं) पान. २ पु० (र्णः) पळ-साचें झाड. ३ न० (र्णं) पक्ष, पंख.

**पर्णभोजन**, पु० (नः) बकरा.

**पर्णशाला**, स्त्री० (ला) ऋषीचें घर.
**पर्णोटज**, पु० (जः) पर्णकुटी.
**पर्णास**, पु० (सः) वनौषधि ज्यास आजवेल, बाबरी असें म्ह० ती.
**पर्णी**, स्त्री० (र्णी) पळसाचें झाड.
**पर्पट**, पु० (टः) औषधवि०. २ न० (टं) पिष्टभेद.
**पर्परीण**, पु० (णः) पानाची शीर. २ पानांचा रस. ३ न० (णं) पर्व.
**पर्यंक**, पु० (कः) बाज, पलंग. २ परिकर.
**पर्यटन**, न० (नं) भ्रमण, फिरणें.
**पर्यंतभू**, स्त्री० (भूः) नदी, पर्वत इत्यादिकांचे जवळची भूमि.
**पर्यय**, पु० (यः) अतिक्रम.
**पर्यवस्था**, स्त्री० (स्था) विरोध.
**पर्यस्त**, पु० (स्तः) पतित, पडलेला. २ मारलेला.
**पर्याप्त**, वि० (तःता-तं) यथेच्छ, परिपूर्ण. २ न० (प्तं) तृप्ति. ३ शक्ति. ४ मान. ५ निवारण.
**पर्याप्ति**, स्त्री० (प्तिः) परिपूर्णता. २ सामर्थ्य. ३ मारण्यास जो उद्युक्त झाला त्याचें निवारण करणें.
**पर्याय**, पु० (यः) अनुक्रम. २ प्रस्ताव, प्रसंग. ३ एकार्थाचे दोन शब्द ते परस्परांचे पर्याय होत. ४ प्रकार निर्माण.
**पर्यावस्था**, स्त्री० (स्था) विरोध.
**पर्युदंचन**, न० (नं) ऋण, कर्ज.
**पर्येषणा**, स्त्री० (णा) श्राद्धामध्यें भाक्ति पुरःस्सर जी ब्राम्हणाची शुश्रुषा ती.
**पर्व**, न० (र्वं) ग्रंथाचा संधि (मोठा भाग.)
**पर्वत**, पु० (तः) डोंगर. २ वृक्ष. ३ शाकवि०. ४ मत्स्यवि०. ५ देववि०. ६ मुनिवि०.
**पर्वधि**, पु० (धिः) चंद्र.
**पर्वन्**, न० (र्व) वेळू, ऊंस, इत्यादिकांचें पेर. २ तिथिवि०. (अष्ठमी. अमावास्या. पूर्णिमा.) ३ उत्सव. ४ प्रस्ताव, प्रसंग. ५ अमावास्या व प्रतिपदा ह्यांचा संधि. ६ विषुवदादि पर्व. ७ ग्रंथवि०. ८ लक्षणांतर.
**पर्वरुट्**, पु० (ट्) डाळिंबीचें झाड.
**पर्वसंधि**, पु० (धिः) प्रतिपदा आणि पूर्णिमा किंवा अमावास्या ह्यांचें अंतर.
**पर्वावधि**, स्त्री० (धिः) बोटाचें कांडें.
**पर्शु**, पु० (र्शुः) फरशी, कुऱ्हाड.
**पर्शुका**, स्त्री० (का) पाठीचा अस्थिविशेष ज्यास बरगडी असें म्ह० ती.
**पल**, न० (लं) शास्त्रीय चार तोळे म्हणजे ३२० गुंजा. (ह्याचे शास्त्रीय मासे ६४ व हल्लीं लौकिक रीतीचे मासे ४० होतात.) २ आमिष, मांस.
**पलंकट**, पु० (टः) भितरा.
**पलंकर**, पु० (रः) पित्त.
**पलंकष**, पु० (षः) राक्षस.
**पलंकषा**, स्त्री० (षा) वनौषधि ज्यास गोक्षुर, सरांटा असें म्ह० तो. २ वनौषधि जीस एलापर्णी, कालिंदण असें म्ह० ती. ३ गुग्गुल वृक्ष. ४ पळसाचें झाड. ५ वनौषधिवि०. ६ लाक्षा, लाख.
**पलगंड**, पु० (डः) शिल्पिविशेष ज्यास गंवडी असें म्ह० तो.
**पलताशय**, पु० (यः) अजीर्ण.
**पलल**, न० (लं) मांस. २ पित्त. ३ तिलचूर्ण. ४ चिखल. ५ पु० (लः) राक्षस.

**पलक्षार**, पु० (रः) रक्त.

**पलाग्नि**, पु० (ग्निः) पित्त.

**पलांडु**, पु० (डुः) कांदा.

**पलायित**, न० (तं) अश्वगति.

**पलाल**, पु० न० (लःलं) फल रहित धान्य कांड ज्यास कडबा, बाटुक इत्यादि म्ह० तो.

**पलाश**, वि० (शःशा-शं) हरिद्वर्ण, हिरवा. २ न० (शं) पान. ३ पु० (शः) पळसाचें झाड. ४ कापूरकचरी आंबेहळद. ५ यमदूत. ६ राक्षस.

**पलाशन**, पु० (नः) पोपट. २ व्याघ्र. ३ राक्षस.

**पलाशिन्**, पु० (शी) वृक्ष, झाड. २ राक्षस. ३ यमाचा दूत.

**पलिक्री**, स्त्री० (क्री) केस पिकलेली म्हातारी बायको. २ लहान वयाची असून गर्भिणी स्त्री.

**पलित**, न० (तं) म्हातारपणानें जो केसास पांढरेपणा येतो तो. २ चिखल. ३ ताप, संताप.

**पल्यंक**, पु० (कः) पलंग, बाज इत्यादि.

**पल्याट**, पु० (टः) राहण्याचें घर. २ घराजवळ केलेलें वन, बाग इत्यादि.

**पल्ल**, पु० (ल्लः) धान्यगृह, कोठी.

**पल्लव**, पु० (वः) पालवी. २ पु० न० (वः वं) वृक्षाचा विस्तार. ३ अरण्य. ४ विस्तार.

**पल्लवा**, स्त्री० (वा) शृंगार. २ अलित्याचा रंग.

**पल्लवित**, न० (तं) लाखेनें रंगाविलेलें. २ पल्लवयुक्त. ३ वीणादिक वाद्य.

**पल्ली**, स्त्री० (ल्ली) कुंटण स्त्री. २ लहान गांव. ३ कीटक विशेष, पाल.

**पल्वल**, न० (लं) अल्प सरोवर.

**पव**, पु० (वः) धान्यादिकांचें शुद्धिकरण, पाखडणें, आसडणें इत्यादि.

**पवन**, पु० (नः) वायु. २ न० (नं) धान्यादिकांचें शुद्धिकरण, पाखडणें, आसडणें इत्यादि. ३ कुंभाराचें स्वैपाकघर.

**पवनव्याधि**, पु० (धिः) विष्णूचा प्रधान.

**पवनान**, पु० (नः) वायु.

**पवनाशन**, पु० (नः) सर्प. वायु भक्षण करून तपश्चर्या करणारा ऋषि.

**पवमान**, पु० (नः) वायु.

**पवारु**, पु० (रुः) कोरेती.

**पवि**, पु० (विः) इंद्राचें वज्र.

**पवित्र**, न० (त्रं) दर्भ. २ वि० (त्रः त्रा- त्रं) पूत, शुद्ध, निर्मळ. ३ न० (त्रं) यज्ञोपवीत. ४ वृष्टि. ५ तांबें. ६ उदक, पाणी.

**पवित्रक**, न० (कं) शणसूत्र, तागाची दोरी, सूत इत्यादि.

**पशु**, पु० (शुः) मृगादि प्राणी. २ प्रथम.

**पशुपति**, पु० (तिः) महादेव.

**पशुरज्जु**, स्त्री० (ज्जुः) पशु बांधण्याचा रज्जु विशेष ज्यास दावण असें म्हणतात तें.

**पशुश्वारि**, पु० (रिः) गर्दभ.

**पशुहरीतकी**, स्त्री० (की) आंबाड्याचें फळ.

**पश्चात्**, अ० पश्चिम दिशा. २ अंत्य ह्या अर्थी उ० पश्चादस्तंगतोरविः २ पार्श्वेमेवपसिनैमिपंबशी. ३ नंतर. ४ अधिकार. हेही अर्थ आहेत.

**पश्चात्ताप**, पु० (पः) मनोविकृतिविशेष.
**पश्चिम**, वि० (मः मा- मं) अंत्य, चरम, शेवटचा.
**पश्य**, अ० विस्मय. २ प्रशंसा. ३ पहा ह्या अर्थी.
**पष्ठवाड्**, पु० (ड्) ज्या बैलाच्या खांदावर दमून वठणीस येण्यासाठीं कांहीं लांकूड किंवा जूं बांधितात आणि फिरवितात तो, किरमिरीस घातलेला बैल.
**पष्ठौही**, स्त्री० (ही) लहान असून गाभण जी गाय ती.
**पस्त्य**, न० (स्त्यं) गृह, घर.
**पक्ष**, पु० (क्षः) पंधरा अहोरात्रें. २ पिच्छ, पीस. ३ सहाय. ४ कंकादि बाणोपयोगी पक्ष. ५ केशवाचक शब्दापुढें हा पक्ष शब्द असला तर त्याचा समूह असा अर्थ होतो. उ० कचपक्षः, केशपक्षः इत्यादि. ६ पार्श्व. ७ ग्रह. ८ साध्य. ९ निरोध. १० बल. ११ सखा. १२ चुल्ली. १३ रंध्र. १४ राजपार्श्व. १५ हत्तीची पाठ.
**पक्षक**, न० (कं) घराचे मागील दार. २ पु० (कः) पाठीमागील.
**पक्षचर**, पु० (रः) चंद्र. २ हत्ती.
**पक्षजन्मन्**, पु० (न्मा) चंद्र.
**पक्षति**, स्त्री० (तिः) प्रतिपदातिथि. २ पक्ष्यांच्या पिसांचें मूळ.
**पक्षती**, स्त्री० (ती) प्रतिपदातिथी. २ पक्ष्यांच्या पिसांचें मूळ.
**पक्षद्वार**, न० (रं) घराचे मागील दार.
**पक्षभाग**, पु० (गः) हत्तीचा पार्श्वभाग.
**पक्षसुंदर**, पु० (रः) मोहाचें झाड.
**पक्षांत**, पु० (तः) पूर्णिमा. २ अमावास्या.
**पक्षिणी**, स्त्री० (णी) पूर्वापरादिवसयुक्त रात्र, दोन दिवस व त्यामधील रात्र. २ पूर्णिमा. ३ पक्षीण, पक्ष्यांची स्त्री. ४ क्षुद्रदेवताविशेष.
**पक्षिन्**, पु० (क्षी) पक्षि.
**पक्षिशाला**, स्त्री० (ला) पाखरें राहण्याचें घर.
**पक्षिसिंह**, पु० (हः) गरूड.
**पक्षीग्राहक**, पु० (कः) बहिरी ससाणा.
**पक्षीमारक**, पु० (कः) बहिरी ससाणा.
**पक्ष्मन्**, न० (क्ष्म) नेत्रसंबंधीं जे केंस ते प्रत्येक. २ पुष्पांतील पराग. ३ फार सूक्ष्म जो तंतूचा वगैरे अंश तो.
**पा**, स्त्री० (पा) रक्षण. २ पिणें. ३ पवित्र.
**पाक**, पु० (कः) पचन. २ शिशु, बालक. ३ वृद्धपणीं जो केंसास पांढरेपणा येतो तो. ४ पात्रविशेष. ५ पक्कदशा.
**पाकल**, न० (लं) वनौषधि ज्यास कडुकोष्ट, गोडेंकोष्ट, असें म्हणतात तें. २ पु० (लः) कुंजरज्वर. ३ अंकुश.
**पाकशासन**, पु० (नः) इंद्र.
**पाकशासनि**, पु० (निः) इंद्राचा पुत्र.
**पाकस्थान**, न० (नं) पाकशाला, स्वैपाक घर.
**पाकिम**, न० (मं) पक्क.
**पाक्य**, न० (क्यं) कृत्रिम लवण विशेष ज्यास बिडलोण असें म्हणतात तें. २ पु० (क्यं) दग्धयवोत्पन्नक्षार ज्यास जवखार असें म्हणतात तो.
**पाखंड**, पु० (डः) बौद्धक्षपणकादिक नास्तिक.
**पांचजन्य**, पु० (न्यः) विष्णूचा शंख. २ शंख.

**पांचजन्यधर**, पु० (रः) विष्णु.

**पाचन**, न० (नं) प्रायश्चित्त. २ पु० (नः) अग्नि. ३ वि० (नः ना- नं) पाक करणारा.

**पाचना**, स्त्री० (ना) हिरड्याचें झाड.

**पाचाल**, न० (लं) पाचन. २ पु० (लः) अग्नि. ३ द्रव्य. ४ वारा.

**पांचालिका**, स्त्री० (का) पुतळी, बाहुली.

**पांचाली**, स्त्री० (ली) द्रौपदी.

**पाट्**, अ० संबोधनार्थी. उ० पाट्भीमयज्ञं रक्षस्व.

**पाटक**, पु० (कः) सेनाविशेष. २ वाद्य.

**पाटच्चर**, पु० (रः) चोर.

**पाटल**, वि० (लः ला- लं) कांहीं पांढरा असून तांबडा. २ न० (लं) पाटला पुष्प. ३ व्रीहि, भात. ४ लौकर पिकणारें व्रीहिविशेष.

**पाटला**, स्त्री० (ल) पाडळीची वेल.

**पाटलि**, स्त्री० (लिः) पाडळीची वेल.

**पाटलिक**, पु० (कः) दुसऱ्याचें मर्म जाणणारा. २ शिष्य. ३ जोशी.

**पाटली**, स्त्री० (ली) पाडळीची वेल.

**पाटविक**, पु० (कः) धूर्त.

**पाटलिपुत्रक**, न० (कं) नगरविशेष.

**पाटी**, स्त्री० (टी) पडदा.

**पाटीर**, पु० (रः) शाकविशेष, मुळा. २ शेत. ३ मेघ. ४ चाळण. ५ रक्तिमा. ६ वातिक.

**पाठ**, पु० (ठः) ब्रम्हयज्ञ. २ पठन, पढणें, वाचणें.

**पाठक**, पु० (कः) शिकणारा.

**पाठभू**, स्त्री० (भूः) वेदाध्ययनाची जागा.

**पाठहिका**, स्त्री० (का) गुंज.

**पाठा**, स्त्री० (ठा) वनौषधि ज्यास पाडवळी, पाहाडमूळ असें म्हणतात ती.

**पाठिन्**, पु० (ठी) वनौषधि ज्यास चित्रक वनस्पति, चिता असें म्हणतात ती.

**पाठीन**, पु० (नः) वनौषधि ज्यास चिता, चित्रक वनस्पति असें म्हणतात ती. २ मत्स्यविशेष. ३ गुग्गुलवृक्ष.

**पांडवाभीलसिंधुवृष**, पु० (षः) विष्णु.

**पांडु**, वि० (डुः डुः डु) शुक्लवर्ण, पांढरा. २ पु० (डुः) कुंतीचा पति.

**पांडुकंबल**, पु० (लः) पांढरी घोंगडी. २ पाषाणविशेष.

**पांडुकंबलिन्**, पु० (ली) पांढऱ्या कांबळ्यानें वेष्टित (रथादि.)

**पांडुपृष्ठ**, पु० (ष्ठः) वाईट लक्षणाचा.

**पांडुर** पु० (रः) स्त्री० न० (रा- रं) शुक्लवर्ण, पांढरा. २ न० (रं) गेळ्याचें झाड.

**पांडुरद्रुम**, पु० (मः) कुड्याचें झाड.

**पांडुशर्मिला**, स्त्री० (ला) द्रौपदी.

**पाणि**, पु० (णिः) हस्त, हात.

**पाणिगृहीती**, स्त्री० (ती) विवाहित स्त्री.

**पाणिघ**, पु० (घः) हातावर गायनाचा ताल धरणारा.

**पाणिन्**, पु० (णी) पाणिनी ऋषि.

**पाणिपीडन**, न० (नं) विवाह, लग्न.

**पाणिवाद**, पु० (दः) हातावर गायनाचा ताल धरणारा.

**पात**, वि० (तः ता- तं) पडलेला. २ संरक्षण केलेला.

**पातक**, न० (कं) पु० (कः) पाप.

**पातंगि**, पु० (गिः) शनिनामा ग्रह.

**पाताल**, न० (लं) पाताल लोक. २ वडवाग्नि. ३ छिद्र.

**पातिली**, स्त्री० ( ली ) जालीकृत रज्जु, जाळें. २ नारी, स्त्री० ३ पात्रविशेष.

**पातुक**, वि० ( कः का- कं ) पतनशील, पडणारा. २ न० ( कं ) पर्वताच्या कड्यावरून पडणारें पाणी. ३ पु० (कः) हत्ती.

**पात्र**, न० (त्रं) दोन तीरांचे मधील भाग. २ आयधण, भांडें. ३ योग्य. उ० दानपत्रं श्रोत्रियः ४ स्त्रुवादिक होमपात्र. ५ पर्ण, पान. ६ राजाचा प्रधान. ७ नाट्यानुकर्ता, नाचण्याचें अनुकरण करणारा. ( अन्यकोशीं हा पात्र शब्द तीन ही लिंगीं आहे. )

**पात्रट**, पु० ( टः ) कपाळ. २ देश.

**पात्रटीर**, पु० ( रः ) लोखंड, कांसें, रुपें ह्यांचें पात्र. २ लोखंडाचा मळ, कीट. ३ अग्नि.

**पात्रीय**, न० (यं) यज्ञसंबंधीं द्रव्य.

**पांथ**, पु० ( थः ) पथिक, मार्गस्थ.

**पाथस्**, न० ( थः) उदक, पाणी.

**पाथोद**, पु० (दः) मेघ.

**पाथोधि**, पु० (धिः) समुद्र.

**पाद**, पु० ( दः ) चरण, पाय. २ पर्वताजवळ जो लहानसा पर्वत असतो तो. ३ किरण. ४ चतुर्थांश. ५ मूळ बुंधा. ६ डाळिंबाचें झाड. ७ दुसऱ्याचे दोष वर्णन करणारा पुरुष.

**पादकटक**, पु० ( कः ) नूपुर, तोरड्या, पैंजण इत्यादि पादभूषण. २ ( पायांतील वाळे असेंही कोणाचें मत आहे. )

**पादगंडीर**, पु० (रः) पादचिन्ह.

**पादग्रहण**, न० (णं ) नामगोत्रोच्चारपूर्वक नमस्कार.

**पादचतर**, पु० (रः) अज, बोकड, बकरा. २ वालुकामय देश. ३ पिंपळाचें झाड. ४ डाळिंबाचें झाड. ५ दुसऱ्याचे दोष वर्णन करणारा पुरुष.

**पादज**, पु० (जः) शूद्र.

**पादत्राण**, पु० (णः) जोडा, वाहाण.

**पादप**, पु० (पः) वृक्ष. २ पादपीठ.

**पादपा**, स्त्री० ( पा ) पादत्राण, जोडा, पादुका.

**पादपाशी**, स्त्री० ( शी ) बेडी.

**पादबंधन**, न० ( नं ) पायांचें बंधन. २ गाय, म्हैस इत्यादि पशु.

**पादरथी**, स्त्री० ( थी ) वाहाणा, पादुका.

**पादवल्मीक**, न० (कं ) रोगविशेष ज्यास श्लीपद, वारुळ, वाळुक असें म्हणतात तें.

**पादविरजा**, स्त्री० (जा ) पादुका, वाहाणा.

**पादस्फोट**, पु० (टः) खोंटा फुटण्याचा रोग.

**पादांगद**, न० ( दं ) नूपुर, तोरड्या, पैंजण इत्यादि पादभूषण. २ ( पायांतील वाळे असेंही कोणाचें मत आहे.)

**पादांगदी**, स्त्री० ( दी ) तोरड्या, पैंजण इत्यादि पादभूषण.

**पादाग्र**, न० (ग्रं) पायाचें अग्र, चवडा.

**पादात**, पु० (तः) पायीं जाणारा. २ न० ( तं ) पायीं जाणारांचा समूह, पायदळ.

**पादातिक**, पु० ( कः ) पायीं जाणारा. २ न० ( कं ) पायीं जाणारांचा समूह, पायदळ.

**पादालिंदी**, स्त्री० ( दी ) नौका.

**पादाविक**, पु० ( कः ) पायीं जाणारा. २ न० ( कं ) पायीं जाणारांचा समूह, पायदळ.

**पादुका**, स्त्री० ( का ) पादत्राण, जोडा, वाहाण.

स्थिजादिक त्यांस जी तेथें राहण्याची जागा केलेली असते ती, किंवा यज्ञ शाळेचा पूर्व स्तंभ व पश्चिम स्तंभ ह्यांवर लांब लांकूड ठेवलेले असतें तें.

**प्राघार**, पु० (रः) घृतादिकांचें क्षरण, तुपाचा बिंदु टाकणें.

**प्राघुण**, पु० (णः) याचक.

**प्राघुणिक**, पु० (कः) अभ्यागत.

**प्राघूर्णिक**, पु० (कः) अभ्यागत.

**प्राचिका**, स्त्री० (का) वनमाक्षिका, रानमाशी.

**प्राची**, स्त्री० (ची) पूर्व दिशा.

**प्राचिन**, वि० (नःना-नं) पूर्व दिशेस झालेला. २ पुरातन. ३ न० (नं) शहर, घर, इत्यादिकांचे सभोंवार जें वेळूच्या बेटाचें वगैरे वेष्टन असतें तें.

**प्राचीनपनसांग**, पु० (गः) बेल वृक्ष.

**प्राचीनबर्हि**, पु० (र्हिः) इंद्र. २ राजवि०.

**प्राचीना**, स्त्री० (ना) वनौषधि जीस पहाडमूल, पाहाडमूळ असें म्ह० ती.

**प्राचीनामलक**, पु० (कः) आंवळीच्या झाडाचा एक भेद.

**प्राचीनावीत**, न० (तं) उजव्या खांद्यावरून घातलेलें यज्ञोपवीत.

**प्राचीर**, न० (रं) पुरातन.

**प्राचेतस**, पु० (सः) वाल्मिक ऋषि.

**प्राच्य**, वि० (च्यःच्या-च्यं) शरावती नदी पर्यंत जो पूर्व दक्षिण देश तो.

**प्राजन**, न० (नं) आसूड, चाबूक.

**प्रांजल**, पु० (लः) कुटिल.

**प्राजापत्य**, पु० (त्यः) प्रयाग क्षेत्र.

**प्राजितृ**, पु० (ता) सारथी.

**प्राज्य**, वि० (ज्यः ज्या- ज्यं) बहुल, पुष्कळ.

**प्राड्विवाक**, पु० (कः) न्यायाधीश.

**प्राण**, पु० (णः) शरीरांत संचार करणारा वायु. २ पराक्रम. ३ गंधरसविशेष ज्यास रक्तपाबोळ असें म्हणतात तो. ४ वारा. ५ ब्रम्हदेव.

**प्राणक**, पु० (कः) असणाचें झाड.

**प्राणनाथ**, पु० (थः) नवरा २ यम.

**प्राणाय्य**, पु० (य्यः) साधु. २ इच्छारहित. ३ संमत.

**प्राणिन्**, पु० (णी) जंतु, प्राणवान्.

**प्राणिहिता**, स्त्री० (ता) वाहाणा, पादुका, जोडा इत्यादि.

**प्राण्ह**, पु० न० (ण्हः ण्हं) दिवसाचे तीन भाग केले असतां त्यांतील पहिला भाग.

**प्रातः**, अ० प्रातःकाल ह्या अर्थी.

**प्रांतर**, न० (रं) ज्या मार्गी छाया, पाणी, इत्यादि नाहीं असा जो दूरचा मार्ग तो. २ अरण्य. ३ ढोल.

**प्रातराश**, पु० (शः) सकाळचें जेवण.

**प्रातर्गेय**, पु० (यः) स्तुतिपाठक. (भाट.)

**प्रातर्भोजन**, न० (नं) सकाळचें जेवण.

**प्राप्ति**, स्त्री० (तिः) परिपूर्णता. २ तर्जनी सहित विस्तृत जो अंगुष्ठ तो.

**प्रातिष्ठित**, न० (तं) साधारण.

**प्रातिहारक**, पु० (कः) गारुडी.

**प्राथमकल्पिक**, पु० (कः) ज्यानें अध्ययनास आरंभ केला आहे असा बटु.

**प्रादु**, अ० संभाव्य. २ प्रवृत्ति ह्या अर्थी.

**प्रादुः**, अ० नाम. २ प्रकाशित ह्या अर्थी. उ० प्रादुरासीच्चक्रपाणिः २ प्रादुर्बुद्धिर्भविष्यति.

**प्रादेश**, पु० (शः) तर्जनीसहित विस्तृत जो अंगुष्ठ तो.

**प्रादेशन**, न० (नं) दान.
**प्राध्व**, न० (ध्वं) नम्र. २ अति दूर मार्ग. ३ बंधन.
**प्राध्वं**, अ० आनुकूल्यार्थी.
**प्राध्वम्**, अ० अनुकूल. २ थट्टा अर्थी.
**प्राप्त**, वि० (प्तः प्ता- प्तं) लब्ध, मिळालेला. २ न० (प्तं) समंजस.
**प्राप्तपंचत्व**, वि० (त्वः त्वा- त्वं) मृत, मेलेला.
**प्राप्तरूप**, पु० (पः) पंडित, बुधजन. २ वि० (पः पा- पं) मनोहर, सुंदर.
**प्राप्ति**, स्त्री० (प्तिः) उदय, उत्पत्ति. २ अधिगम, लाभ.
**प्राप्य**, वि० (प्यः प्या- प्यं) मिळावयाजोगा.
**प्राभृत**, न० (तं) नजराणा. २ आज्ञा.
**प्राभृतक**, पु० (कः) नजराणा.
**प्राश्निक**, पु० (कः) सभासद.
**प्रामित्य**, न० (त्यं) कर्ज.
**प्राय**, पु० (यः) सन्यासपूर्वक भोजन त्याग. २ बाहुल्य. ३ नाश जाणविणारें चिन्ह. ४ अन्न, पाणी, नखाणें इत्यादि मरण्याचें चिन्ह. ५ मृत्यु. ६ तुल्य. ७ अनशन, भक्षण नकरणें.
**प्रायः**, अ० बाहुल्य. २ बहुत करून ह्या अर्थी.
**प्रारब्धि**, पु० (ब्धिः) हत्ती बांधण्याचा खांब.
**प्रार्थित**, वि० (तः ता- तं) मागितलेला. २ शत्रूनें रोधलेला. ३ मारलेला.
**प्रालंब**, न० (बं) गळ्यामध्यें सरळ लोंबणारी जी माळ ती.
**प्रालंबिका**, स्त्री० (का) नाभि पर्यंत लोंबणारी सोन्याची कंठी.
**प्रालेय**, न० (यं) हींव, थंडी. २ बर्फ.
**प्रावर**, पु० (रः) उत्तरीय वस्त्र. पांघरूण.
**प्रावार**, पु० (रः) उत्तरीय वस्त्र, पांघरूण.
**प्रावृत**, वि० (तः ता- तं) पांघरलेलें (वस्त्र.)
**प्रावृष्**, स्त्री० (ट्) वर्षाकाळ, वर्षाऋतु.
**प्रावृषा**, स्त्री० (षा) वर्षाऋतु.
**प्रावृषायणी**, स्त्री० (णी) वनौषधि जीस कुवली, कुहिरी असें म्हणतात. ती
**प्रावृषेण्य**, पु० (ण्यः) कदंब वृक्ष. २ वि० (ण्यः ण्या- ण्यं) वर्षाकालाचे ठायीं झालेला.
**प्रास**, पु० (सः) शस्त्रविशेष ज्यास सांग असें म्हणतात तें.
**प्रासंग**, पु० (गः) गाडीस जुंफलेल्या बैलाच्या खांद्यावर घातलेलें जूं, जोखड.
**प्रासंग्य**, वि० (ग्यः ग्या- ग्यं) नम्र होण्याकरितां गळ्यांत लांकूड बांधलेली गाय, बैल इत्यादि.
**प्रासाद**, पु० (दः) देव, राजे इत्यादिकांचें जें घर तें.
**प्रासादकुक्कुट**, पु० (टः) पारवा पक्षि.
**प्रासिक**, पु० (कः) प्रासायुधि, बल्लमकरी, विटेकरी.
**प्रास्थिक**, वि० (कः का- कं) प्रस्थ परिमित धान्याचें (शेत.)
**प्राज्ञ**, पु० (ज्ञः) पंडित, विद्वान.
**प्राज्ञा**, स्त्री० (ज्ञा) बुद्धिमति स्त्री. २ शुभाशुभ जाणणारी स्त्री.
**प्राज्ञी**, स्त्री० (ज्ञी) बुद्धिमति स्त्री.
**प्रिय**, पु० (यः) भर्ता, नवरा. २ वि० (यः या- यं) अभीष्ट. ३ पु० (यः) औषधिविशेष.

**प्रियक**, पु० [कः] कदंबवृक्ष, कळंबाचें झाड. २ असणाचें झाड. ३ प्रियंगुवृक्ष. ४ हरिणविशेष. ५ केशर. ६ पिंवळ्या सायल्याचें झाड.

**प्रियंगु**, पु० (गुः) प्रियंगुवृक्ष, ज्यास वाघांटी असें म्हणतात तो. २ कांग, राळे म्हणून जें तृण धान्य आहे तें. ३ स्त्री० (गुः) मोहोरी. ४ धान्यांश, कण, कणी.

**प्रियता**, स्त्री० (ता) प्रेम.

**प्रियदर्शन**, पु० (नः) मनोरम.

**प्रियंवद**, पु० [दः] स्त्री० न० [दाः- दं] प्रिय बोलणारा. २ पु० [दः] खेंचर.

**प्रियाल**, पु० (लः) चाराचें झाड.

**प्रीण**, पु० (णः) पुरातन.

**प्रीणन**, न० [नं] तृप्ति.

**प्रीत**, वि० [तः ता- तं] हृष्ट, हर्षयुक्त. २ न० [तं] थट्टा.

**प्रीति**, स्त्री० (तिः) हर्ष, प्रेमा. २ मदनाची स्त्री. ३ योगविशेष.

**प्रीतितृष**, पु० (षः) मदनपुत्र.

**प्रुष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) दग्ध, जळालेला.

**प्रेंखा**, स्त्री० (खा) हिंडोली, डोली. २ फिरणें. ३ घोड्याची गतिविशेष. ४ निद्राविशेष.

**प्रेंखित**, वि० (तःता-तं) किंचित कांपलेला.

**प्रेत**, पु० (त ) नरकामध्यें झालेला प्राणी. २ मृत. मेलेला. ३ प्राणीविशेष. ४ शव.

**प्रेंखोलित**, पु० (तः) चंचल.

**प्रेतपटह**, पु० (हः) वाद्यविशेष.

**प्रेतवाहित**, पु० (तः) प्रेत नेलेला.

**प्रेत्य**, अ० जन्मांतरी ह्या अर्थी. उ० प्रेत स्वर्गे महीयते. २ प्रेत्यानंत सुखायच.

**प्रेत्वन्**, पु० (त्वा) इंद्र. २ वारा.

**प्रेमन्**, न० (म) प्रेमा. २ पु० (मा) हर्ष. ३ स्त्री स्नेह.

**प्रेष्ठ**, वि० (ष्ठः ष्ठा- ष्ठं) अतिप्रिय.

**प्रेष्य**, पु० (ष्यः) चाकर.

**प्रेक्षा**, स्त्री० (क्षा) बुद्धि. २ नृत्येक्षण, नाच पहणें. ३ नृत्य. ४ ईक्षण, पहाणें.

**प्रैष**, पु० (षः) प्रेषण, पाठविणें. २ मर्दन, आवळणें. ३ क्लेश. ४ उन्माद.

**प्रैष्य**, पु० (ष्यः) चाकर.

**प्रोठ**, पु० (ठः) पिकदाणी.

**प्रोत**, न० (तं) वस्त्र. २ वि० (तः ता- तं) खचित.

**प्रोतोत्सादन**, न० [नं] छत्र [राजकीय.]

**प्रोथ**, पु० न० (थः- थं) घोड्याचें नाक. २ पु० (थः) कमर. ३ वस्त्रविशेष. ४ मुशाफर.

**प्रोष**, पु० (षः) दाह, जळणें.

**प्रोष्ठ**, पु० (ष्ठः) मत्स्यविशेष ज्यास सहरी असें म्हणतात तो.

**प्रोष्ठपदा**, स्त्री० (दा) पूर्वाभाद्रपदा नक्षत्र. २ उत्तराभाद्रपदा नक्षत्र.

**प्रोष्ठी**, स्त्री० (ष्ठी) मत्स्य विशेष ज्यास सहरी असें म्हणतात तो.

**प्रोह**, पु० (हः) हत्तीचें ढोपर. २ गज, हत्ती. ३ बोट. ४ वि० (हः हा- हं) निपूण. ५ पु० (हः) तर्क.

**प्रोक्षण**, न० (णं) यज्ञसंबंधीं जें पशुहनन तें. २ पवित्रीकरण.

**प्रोक्षित**, पु० (तः) यज्ञासाठीं मारलेला पशु. २ वि० (तः ता- तं) पवित्रीकृत. ३ मारलेला. ४ प्रोक्षण केलेला.

**प्रौढ**, वि० (ढः ढा- ढं) प्रवृद्ध, वाढलेला.

**प्रौष्ठपद**, पु० (दः) भाद्रपदमास.

**प्लव**, पु० (वः) चांडाळ. २ लहान नौका, होडी, पडाव, इत्यादि. ३ बेडूक. ४ न० (वं) केवडी, जलमुस्ता, क्षुद्रमोथा असें म्हणतात तो. ५ पु० (वः) पुडेरी, पाणकोंबडा. ६ वानर. ७ गति. ८ करंजवृक्ष. ९ व्याध, पारधी.

**प्लवक**, पु० (कः) नटविशेष.

**प्लवग**, पु० (गः) वानर. २ बेडूक. ३ सारथी. ४ सूर्याचा सारथी.

**प्लवंग**, पु० (गः) वानर. २ बेडूक. ३ सारथी.

**प्लवंगम**, पु० (मः) वानर. २ बेडूक. ३ सारथी.

**प्लक्ष**, पु० (क्षः) पिंपरीचें झाड ज्यास गोमांतक देशांत केळा असें म्हणतात तो. २ लाखी पिंपरी. ३ पु० न० (क्षः क्षा- क्षं) द्वीपविशेष.

**प्लाक्ष**, न० (क्षं) प्लक्षाचें फळ.

**प्लीहन्**, पु० (हः) वामकुक्षिस्था मांसपिंड विशेष.

**प्लीहशत्रु**, पु० (त्रुः) वनौषधि तांबडा रोहिडावृक्ष असें म्हणतात तो.

**प्लुत**, न० (तं) घोड्याची चौक चाल. २ पु० (तः) त्रिमात्रक स्वरविशेष.

**प्लुष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) दग्ध, जळालेला.

**प्लोष**, पु० (षः) दाह, जळणें.

**प्सात**, वि० (तः ता- तं) भक्षित, खाल्लेला.

---

## फ.

**फ**, पु० (फः) झंझावात. २ यक्षसाधन. ३ न० (फं) कर्कश बोलणें. ४ फूतकाति, फूकरणें. ५ निष्फळ भाषण.

**फंजिका**, स्त्री० (का) वनौषधि जीस भारंग असें म्हणतात ती.

**फट**, पु० स्त्री० (टः टा) सर्पाचा फणा, फडा.

**फण**, पु० स्त्री० (णः णा) सर्पाची फणा, फडा.

**फणधर**, पु० (रः) सर्प.

**फणाभर**, पु० (रः) सर्प.

**फणिज्जक**, पु० (कः) वनौषधि ज्यास जंबीर, पांढरा मरवा असें म्हणतात तो.

**फणिन्**, पु० (णी) सर्प.

**फफरीक**, न० (कं) मृदुपणा.

**फरूवक**, पु० (कः) पोफळीचें पान, झांवळी.

**फर्फरीक**, पु० (कः) पसरलेला हात.

**फल**, न० (लं) हेतु साध्यकार्य. (जसें यज्ञाचें फलस्वर्ग.) २ जायफळ. ३ बाणाचें अग्र. ४ ढाल. ५ नांगराचे खालचें लांकूड ज्यास फाळ असें म्हणतात तो. ६ वृक्षादिकांचें फळ. ७ वस्त्रकारणीभूत कापूस. ८ लाभ. ९ धान्य. १० साफ्य. ११ हरडा, बेहेडा आणि आंवळकठी ह्या तिहींचें कूट. १२ कंकोळ.

**फलक**, पु० न० (कः-कं) ढाल.

**फलकपाणि**, पु० (णि) ढाल धारण करणारा, ढालाईत.

**फलकिन्**, पु० (की) मत्स्यविशेष. २

ज्याणें ढाल धारण केली आहे तो, ढालाईत.

**फलत्रिक**, न० ( कं ) हरडा, बेहेडा, आणि आंवळकठी ह्या तिहींचें कूट, त्रिफळा.

**फलपूर**, पु० (रः) महाळुंगाचें झाड. २ महाळुंगीचें फळ, महाळुंग.

**फलवत्**, वि० ( वान्-वती-वत् ) ज्यास फळें आहेत तो. ( वृक्षादि. )

**फलस**, पु० ( सः ) फणसाचें झाड.

**फलाध्यक्ष**, पु० ( क्षः ) खिरणीचें झाड.

**फलिन्**, वि० ( ली- लिनी- लि ) ज्यास फळें आहेत तो. ( वृक्षादि. )

**फलिन**, वि० ( नः ना- नं ) ज्यास फळें आहेत तो ( वृक्षादि. )

**फलिनी**, स्त्री० (नी ) वनौषधि प्रियंगुवृक्ष ज्यास वाघांटी असें म्हणतात ती. २ अग्निशिखा जीस कळला असें म्हणतात ती वनौषधि.

**फली**, स्त्री० ( ली ) वनौषधि प्रियंगुवृक्ष ज्यास वाघांटी असें म्हणतात ती.

**फलेग्रहि**, पु० ( हिः ) फळ यावयाच्या समर्यी ज्यास फळें येतात तो. ( वृक्ष. )

**फलेरुहा**, स्त्री० ( हा ) वनौषधि जीस पाडळी असें म्हणतात ती.

**फलेलांकु**, पु० ( कुः ) वृक्षविशेष.

**फलोदय**, पु० ( यः ) स्वर्ग. २ लाभ.

**फल्गु**, पु० ( ल्गुः ) वनौषधि ज्यास काळा उंबर, बोखाडा, खर्वत असें म्हणतात तो. २ वि० ( ल्गुः ल्गुः ल्गु ) निर्बळ. ३ पु० ( ल्गुः ) निरर्थक. ४ पालन. ५ वेश्येचा उपभोग. ६ स्त्री० ( ल्गुः ) नदिविशेष.

**फांट**, न० ( टं ) अनायासानें झालेला कषायविशेष. २ पु० ( टः ) श्रम न करणारा.

**फाणि**, पु० ( णिः ) बाण. २ गूळ. ३ दधियुक्त भृष्टयवचूर्ण, दहीपीठ.

**फाणित**, न० (तं) राब, काकवी.

**फाल**, न० ( लं ) कार्पासवस्त्र, कापसाचें वस्त्र. २ नांगराचें खालचें लांकूड ज्यास फाळ असें म्हणतात तो. ३ महादेव. ४ बलराम.

**फाल्गुन**, पु० ( नः ) फाल्गुनमास. २ अर्जुन. ३ अर्जुन नांवाचा वृक्ष, अर्जुन सादडा.

**फाल्गुनानुज**, पु० ( जः ) वसंतऋतु. २ भीम.

**फाल्गुनिक**, पु० ( कः ) फाल्गुनमास.

**फाल्गुनी**, स्त्री० ( नी ) फाल्गुनी पूर्णिमा.

**फुल्ल**, वि० ( ल्लः ल्ला- ल्लं ) प्रफुल्लित ( वृक्षादिक. )

**फूत्कृति**, स्त्री० ( तिः ) फूकरणें.

**फेन**, पु० ( नः ) जलविकार, फेण. २ समुद्रफेण.

**फेनाग्र**, पु० ( ग्रः ) बुडबुडा ( पाण्याचा. )

**फेनिल**, पु० ( लः ) रीठावृक्ष. २ बदरीफल, बोर. ३ वि० ( लः ला- लं ) फेनयुक्त.

**फेरव**, पु० ( वः ) कोल्हा. २ रक्तप्राशन करणारा.

**फेरु**, पु० (रुः) कोल्हा.

**फेला**, स्त्री० ( ला ) भुक्तोत्सृष्ट, खाऊन टाकलेलें, भोगून टाकलेलें.

**फेलि**, स्त्री० ( लिः ) भुक्तोत्सृष्ट, खाऊन टाकलेलें, भोगून टाकलेलें.

## ब.

**ब**, पु० ( बः ) वरूण. २ समुद्र. ३ भग, सूर्य. ४ उदक, पाणी. ५ नेलेलें. ६ उत्साह. ७ तंतुसंतान. ८ वपन.
**बक**, पु० ( कः ) वनौषधि रुई मांदार. २ थोर बकुली. ३ पक्षिविशेष ज्यास बगळा असें म्हणतात तो. ४ पुष्पविशेष. ५ राक्षसविशेष. ६ कुबेर.
**बकजित्**, पु० ( त् ) भीमसेन.
**बकुल**, पु० ( लः ) बकुलीचें झाड.
**बकेरुका**, स्त्री० ( का ) पक्षिविशेष बगळा.
**बकोट**, पु० ( टः ) बकपक्षि.
**बचर**, पु० (रः) कोंबडा. २ शठ.
**बटु**, पु० ( टुः ) ब्रम्हचारी.
**बटुकरण**, न० ( णं ) मौंज, मुंज.
**बंठर**, पु० ( रः ) रज्जु. २ कुत्र्याचें शेंपूट. ३ कारवीचें झाड. ४ ताडाचें पान. ५ पयोधर.
**बडिश**, न० स्त्री० ( शं- शा- शी ) मत्स्यवेधन ज्यास गळ, गरी, असें म्हणतात ती.
**बत**, अ० खेद. २ करुणारस. ३ संतोष. ४ आश्चर्य. ५ आमंत्रण ह्या अर्थी. उ० अहो बतमहत्पापं. २ बतानिः स्वोसि ३ बतपतिरालिंगितः ४ अहो बतायं ध्रुवआपदेवं. ५ एहिबतसखे.
**बदर**, न० ( रं ) बोरीचें फळ, बोर.
**बदरा**, स्त्री० ( रा ) कार्पासी, कापशीण. २ वनौषधि जीस वाराहीकंद, डुकरकंद असें म्हणतात ती. ३ वनौषधि जीस कालिंदण, एलापर्णी असें म्हणतात ती.
**बदरामलक**, पु० ( कः ) वृक्षविशेष.
**बदरी**, स्त्री० ( री ) बोरीचें झाड.
**बंदिचोर**, पु० (रः) कैद केलेले चोर.
**बंदिपाठ**, पु० ( ठः ) भाटाची स्तुति.
**बंदी**, स्त्री० ( दी ) अटकाव, प्रतिबंध.
**बद्ध**, वि० ( द्धः द्धा- द्धं ) बांधलेला. २ अटकावलेला.
**बद्धशिख**, वि० ( खः खा- खं ) लहान बालक.
**बद्धशिखा**, स्त्री० ( खा ) मोथ्याचा एक भेद ज्यास कोकणांत फुरडी असें म्हणतात ती.
**बंध**, पु० ( धः ) मनोव्यथा, मनास जें दुःख तें. २ बंधन.
**बंधक**, पु० ( कः ) मोबदला.
**बंधकी**, स्त्री० ( की ) व्यभिचारिणी स्त्री. २ हत्तीण.
**बंधन**, न० ( नं ) बांधणें. २ बांधण्याचें साधन ( दोरी वगैरे. ) ३ पु० ( नः ) वध, ठार मारणें.
**बंधनवेश्मन्**, न० ( श्म ) बंदिखाना.
**बधांगक**, न० ( कं ) बंदिशाळा.
**बधिर**, वि० ( रः रा- रं ) श्रवणेंद्रियरहित, बहिरा, भेरा.
**बंधु**, पु० ( धुः ) सगोत्र, एकवंशी, भाऊबंद. २ मित्र. ३ भाऊ. ४ एक फुलझाड आहे ज्यास दुपारी असें म्हणतात तें.
**बंधुजीवक**, पु० ( कः ) एक फुलझाड आहे ज्यास दुपारी असें म्हणतात तें.
**बंधुता**, स्त्री० ( ता ) बंधूंचा समूह. २ बंधुपणा.
**बंधुर**, वि० ( रः रा- रं ) जो स्वभावतः उन्नत असून उपाधिवशें करून

किंचित नम्र होतो तो. २ भोजन. ३ नम्र. ४ रमणीय. ५ पु० (रः) मुगुट. ६ एक फुलझाड आहे ज्यास दुपारी असें म्हणतात तें. ७ बहिरा. ८ हंस.

**बंधुरा**, स्त्री० (रा) पण्यस्त्री. २ भाजलेल्या यवाचें पीठ.

**बंधुल**, पु० (लः) व्यभिचारिणीचा पुत्र.

**बंधुक**, पु० (कः) एक फुलझाड आहे ज्यास दुपारी असें म्हणतात तें. २ पिवळ्या सायल्याचें झाड.

**बंधुकपुष्प**, पु० (ष्पः) वनौषधि असणाचें झाड.

**बंधूर**, पु० (रः) स्त्री० न० (रा-रं) जो स्वभावतः उन्नत असून उपाधिवशें करून किंचित नम्र होतो तो.

**बंध्य** वि० (ध्यः-ध्या-ध्यं) फलहीन, वांझ.

**बभ्रु**, पु० (भ्रुः) मोठा मुंगूस. २ विष्णु. ३ अग्नि. ४ महादेव. ५ मुनि, ऋषि. ६ वि० (भ्रुः-भ्रुः-भ्रु) पिंगट वर्ण. ७ पु० (भ्रुः) चातक पक्षि.

**बभ्रुदीना**, स्त्री० (ना) उंदरीण.

**बरंडा**, स्त्री० (डा) पक्षिविशेष ज्यास साळूंकी असें म्हणतात ती.

**बरला**, स्त्री० (ला) गांधिणमाशी. २ हंस स्त्री.

**बराक**, पु० (कः) महादेव. २ वि० (कः-का-कं) शोक करण्यास योग्य.

**बरीवर्द**, पु० (र्दः) बैल.

**बर्बटी**, स्त्री० (टी) धान्यविशेष ज्यास चंवळी असें म्हणतात ती.

**बर्बर**, पु० (रः) वनौषधि ज्यास भारंग असें म्हणतात ती. २ पामर. ३ केंस. ४ वनौषधि ज्यास उच्चाटमूल, फुरडी असें म्हणतात ती. ५ देशविशेष.

**बर्बरा**, स्त्री० (रा) बर्बरी शाकविशेष जीस तिलवण, कानफोडी असें म्हणतात ती. २ पुष्पविशेष.

**बर्बरी**, स्त्री० (री) शाकविशेष. जीस तिळवण कानफोडी असें म्हणतात ती.

**बर्ह**, न० (र्हं) मोराचें पीस. २ पर्ण, पान. ३ परिवार. ४ वनौषधि ज्यास गंठीवन, भटोरा असें म्हणतात ती.

**बर्हपुष्प**, न० (ष्पं) वनौषधि ज्यास गंठीवन भटोरा असें म्हणतात ती.

**बर्हि**, पु० (र्हिः) अग्नि. दर्भ.

**बर्हिण**, पु० (णः) मयूर, मोर.

**बर्हिन्**, पु० (र्ही) मयूर, मोर.

**बर्हिपुष्प**, न० (ष्पं) वनौषधि ज्यास गंठीवन, भटोरा असें म्हणतात ती.

**बर्हिःपुष्प**, न० (ष्पं) वनौषधि ज्यास गंठीवन, भटोरा असें म्हणतात ती.

**बर्हिमुख**, पु० (खः) देव.

**बर्हिष्**, पु० (र्हिः) अग्नि.

**बर्हिष्ठ**, न० (ष्ठं) वनौषधि ज्यास वाळा असें म्हणतात तो.

**बर्हिस्**, पु० (र्हिः) अग्नि. २ कुष.

**बल**, पु० (लः) बलराम. २ न० (लं) सैन्य. ३ पराक्रम. ४ बळ, जोर. ५ सामर्थ्य. ६ स्थौल्य. ७ पु० (लः) काक, कावळा. ८ गंधरस ज्यास रक्त्याबोळ, बोळ असें म्हणतात. तो. ९ रूप. १० बळकट. ११ दैत्यविशेष.

**बलज**, पु० (जः) न (जं) क्षेत्र, शेत. २ शहराचा दरवाजा. ३ सहस्य. ४ युद्ध.

**बलजा**, स्त्री० (जा) एक फुलझाड आहे ज्यास जुई असें म्हणतात ती. २ स्त्रीविशेष वर स्त्री.

**बलदेव**, पु० (वः) बलराम. २ वारा.
**बलदेवा**, स्त्री० (वा) त्रायमाणानामें वनौषधि.
**बलभद्र**, पु० (द्रः) बलराम.
**बलभद्रा**, स्त्री० (द्रा) त्रायमाणा नामें वनौषधि. २ कुमारी.
**बलभद्रिका**. स्त्री० (का) त्रायमाणा नामक वनौषधि.
**बलभी**, स्त्री० (भी) घराच्या शाकारास आधारभूत जे वांसे, कडणी इत्यादि तें.
**बलय**, पु० (यः) कंठरोग. २ पु० न० (यःयं) कंकण.
**बलवत्**, वि० (वान्. वती. वत्) बळिष्ठ. २ अ० अतिशय ह्या अर्थी. उ० बलवन्निगूढ.
**बलास्थिति**, स्त्री० (तिः) सेनास्थान.
**बला**, स्त्री० (ला) वनौषधि जीस तुपकडी, चिकणा असें म्हणतात ती.
**बलाका**, स्त्री० (का) वकपक्षी विशेष ज्यास बाळेटोंक, बगळा असें म्हणतात तो.
**बलात्कार**, पु० (रः) बलात्कार, जुलूम.
**बलाराति**, पु० (तिः) इंद्र.
**बलाहक**, पु० (कः) मेघ. २ विष्णूचा घोडा. ३ पर्वत.
**बलि**, पु० (लिः) राजास द्यावयाचा भाग, सरकार सारा, दस्त, पट्टी, धारा, इत्यादि. २ पूजोपहार, पूजासाहित्य. ३ बलीनामा दैत्य. ४ अन्नादिकांचा बळी देतात तो. ५ चवरीचा दांडा. ६ स्त्री० (लिः) गृहकाष्ठविशेष. ७ पोटाचा अवयव. ८ त्वक्संकोच, वळी.
**बलिध्वंसिन्**, पु० (सी) विष्णु.
**बलिन**, वि० (नः ना- नं) म्हातारपणानें ज्याच्या आंगास वळ्या पडलेल्या असतात तो.
**बलिपुष्ट**, पु० (ष्टः) काक, कावळा.
**बलिभ**, वि० (भः भा- भं) म्हातारपणानें ज्याच्या आंगास वळ्या पडलेल्या असतात तो.
**बलिभुज्**, पु० (क्) काक, कावळा.
**बलिमुख**, पु० (खः) वानर.
**बलिसद्मन्**, न० (द्म) पाताळ, रसातल.
**बली**, पु० (ली) दैत्यविशेष.
**बलीक**, न० (कं) वळचण, पडवी.
**बलीमुख**, पु० (खः) वानर.
**बलीवर्द**, पु० (र्दः) बैल.
**बल्य**, पु० (ल्यः) प्रधान. २ धातु. ३ वि० (ल्यः ल्या- ल्यं) पुष्टिकारक.
**बल्लव**, पु० (वः) सैपाकी, आचारी. २ गवळी. ३ भीम.
**बल्लूर**, पु० (रः) न० (रं) नक्षत्र. २ अरण्य.
**बल्लूरा**, स्त्री० (रा) शुष्कमांस. २ डुकराचें मांस.
**बष्कय**, पु० (यः) एक वर्षाचा गाईचा वत्स.
**बष्कयणी**, स्त्री० (णी) चिरप्रसूतगो, फार वर्षांनीं विहालेली गाय.
**बष्कायिणी**, स्त्री० (णी) चिरप्रसूतगो, फार वर्षांनीं विहालेली गाय.
**बस्त**, पु० (स्तः) अज, बोकड.
**बस्वोकसार**, न० (रं) इंद्रपुर. २ पु० (रः) कुबेर.
**बहिः**, अ० बाह्यार्थी. उ० निष्क्रांतो बहिर्ग्रामात्.
**बहिःकुटिचर**, पु० (रः) कुळि, खेकडा.

**बहिर्द्वार**, न० (रं) बाहेरचें द्वार, दार.
**बहिर्ध्वजी**, स्त्री० ( जी ) पार्वती.
**बहु**, वि० ( हुः हुः हु ) बहुत, पुष्कळ. २ दोहोंहून ज्यास्त.
**बहुकर**, वि० ( रः रा- री- रं ) संमार्जनादिकारि, सडासंमार्जन करणारा. २ पु० (रः) उंट.
**बहुगर्ह्यवाक्**, वि० ( क् ) बहुत अवाच्य भाषण करणारा.
**बहुपाद्**, पु० ( त् ) वटवृक्ष, वडाचें झाड.
**बहुप्रद**, पु० ( दः ) दानशूर.
**बहुफल**, पु० ( लः ) कळंबाचें झाड.
**बहुफला**, स्त्री० ( ला ) आंवळीचें झाड.
**बहुमूल**, पु० ( लः) वेळूचा कोंब.
**बहुमूल्य**, वि० ( ल्यः ल्या- ल्यं ) मोठे किमतीचें ( वस्त्रादि. )
**बहुरूप**, पु० ( पः ) राळ, धूप. २ बौद्धभेद. ३ महादेव. ४ विष्णु. ५ सरडा. ६ काम, मदन. ७ धूनक.
**बहुरोमन्**, पु० (मा) मेंढा. २ आस्वल.
**बहुल**, वि० )लः ला- लं ) बहुत, पुष्कळ. २ कृष्णवर्ण, काळा. ३ पु० ( लः ) अग्नि. ४ आकाश. ५ कृष्णपक्ष.
**बहुला**, स्त्री० ( ला ) वनौषधि एला, इलायची. २ कृत्तिका नक्षत्र. ३ गाय. ४ वनौषधि जीस नीलीका, नीळ असें म्हणतात ती.
**बहुलीकृत**, वि० ( तः ता- तं ) सूप मारून भूस घालवून चांगलें निवडलेलें (धान्य.)
**बहुवारक**, पु० ( कः ) भोंकरीचें झाड.
**बहुविध**, वि० ( धः धा- धं) नाना प्रकारचा.
**बहुसुता**, स्त्री० ( ता ) वनौषधि जीस सहस्रमूली, शतावरी असें म्हणतात ती.
**बहुसुस्**, पु० ( सूः ) डुकर.
**बहुसूति**, स्त्री० ( तिः ) बहुत वेळ प्रसवलेली ( गाय. )
**बहुक्षम**, पु० (मः) बौद्धभेद.
**बाकुची**, स्त्री० ( ची ) वनौषधि जीस बाकुंची, बावंची असें म्हणतात ती.
**बाढं**, अ० अतिशय. २ स्वीकार. ३ दृढ. ४ प्रतिज्ञा ह्या अर्थी.
**बाण**, पु० ( णः ) बाण. २ बलीचा पुत्र जो बाण नामा दैत्य तो. ३ चार सरांचा मुक्ताहार. ४ केवळ. ५ कांड.
**बाणपुर**, न० (रं) शोणितपुर.
**बाणा**, स्त्री० ( णा ) निळा कुरंटक, काळा कोरंटा.
**बादर**, न० ( रं ) कार्पास वस्त्र, कापसाचें वस्त्र.
**बादरायण**, पु० ( णः ) व्यासऋषि.
**बाध**, पु० ( धः) निषेध. २ नास्तिक.
**बांधकिनेय**, पु० (यः) व्यभिचारिणीचा पुत्र.
**बांधव**, पु० (वः) सगोत्र, एकवंशी, भाऊबंद. २ मित्र. ३ बंधु.
**बाधा**, स्त्री० ( धा ) दुःख. २ मनःपीडा. ३ निषेध.
**बाधीनस**, पु० ( सः ) मत्स्यविशेष.
**बाभ्रवी**, स्त्री० ( वी ) गौरी, पार्वती.
**बारक**, पु० ( कः ) घोड्याची गति. २ वि० ( कः का- कं ) निषेध करणारा.
**बारला**, स्त्री० ( ला ) गांधिणमाशी. २ हंस स्त्री.
**बार्वटीर**, पु० (रः) कंचनीचा पुत्र.
**बार्हत**, न० (तं) रिंगणीचें फळ.
**बार्हद्रथि**, पु० ( थिः ) जरासंध.

**बाल,** वि० ( लः ला- लं ) मूर्ख. २ अर्भक, बालक. ३ न० पु० ( लं- लः ) वनौषधि ज्यास वाळा असें म्हणतात तो. ४ पुछ, शेंपटी. ५ केश, केंस. ६ पु० ( लः ) नारळ.

**बालक,** वि० ( कः का- कं ) मूर्ख. २ अर्भक, बालक. ३ पु० ( कः ) घोडा, हत्ती ह्यांचें शेंपूट. ४ अंगुली भूषण, आंगठी. ५ वनौषधि ज्यास वाळा असें म्हणतात तो.

**बालचर्य,** पु० ( र्यः ) कार्तिक स्वामी.

**बालतंत्र,** न० ( त्रं ) गार्भिणी अवस्था.

**बालतनय,** पु० ( यः ) खदिर वृक्ष, खैराचें झाड.

**बालतृण,** न० ( णं ) कोंवळें तृण.

**बालधि,** पु० ( धिः ) केशसमूहयुक्त जो शेंपटीचा अग्रभाग तो.

**बालपत्रक,** पु० ( कः ) खैरवृक्ष, खैराचें झाड.

**बालपाश्या,** स्त्री० ( श्या ) सीमंत भूषण, भांगाचें भूषण. २ ( प्राथमिक केशबंधनीभूत मुक्ताहार असें कोणी म्हणतात. )

**बालमूषिका,** स्त्री० ( का ) उंदराची एक लहान जाति.

**बालयज्ञोपवीतक,** न० ( कं ) नवीन मुंज झालेला.

**बालवायज,** न० ( जं ) पु० ( जः ) वैडुर्य नामक रत्न.

**बालवाह,** पु० ( हः ) उंट.

**बालव्रत,** पु० ( तः ) पूर्वजिन.

**बालसूर्य,** न० ( र्यं ) वैडूर्य नामक रत्न. २ पु० ( र्यः ) प्रातःकाळचा सूर्य.

**बालहस्त,** पु० ( स्तः ) केशसमूहयुक्त जो शेंपटीचा अग्रभाग तो.

**बाला,** स्त्री० ( ला ) कुमारी. २ सूक्ष्मएला लहान इलायचीची वेल. ३ हरिद्रा, हळद.

**बालिका,** स्त्री० ( का ) कर्णभूषण ज्यास बाळी असें म्हणतात ती. २ कुमारिका, लहान मुलगी.

**बालिश,** वि० ( शः शा- शं ) मूर्ख. २ शिशु, बालक.

**बाली,** स्त्री० ( ली ) अळंकारविशेष ज्यास बाळी असें म्हणतात ती.

**बालुका,** स्त्री० ( का ) वाळू, रेती.

**बालेय,** पु० ( यः ) गर्दभ. २ निःययांश्रा. ३ मुलाचें हित.

**बालेयशाक,** पु० ( कः ) शाकविशेष ज्यास भारंग असें म्हणतात ती.

**बालोपरीत,** पु० ( तः ) बाळंतें.

**बाल्य,** न० ( ल्यं ) बाळपणा, बाल्यावस्था.

**बाल्हिक,** न० ( कं ) कुंकुम. २ अश्वविशेष. ३ हिंग.

**बाल्हीक,** न० ( कं ) कुंकुम. २ अश्वविशेष. ३ हिंग. ४ पु० ( कः ) देशविशेष.

**बाष्प,** वि० ( ष्पः ष्पा- ष्पं ) ऊष्ण, २ न० ( ष्पं ) नेत्रोदक, अश्रु.

**बाष्पिका,** स्त्री० ( का ) हिंगवृक्षाची पत्री.

**बाष्पीका,** स्त्री० ( का ) हिंगवृक्षाची पत्री.

**बाहु,** पु० ( हुः ) भुज.

**बाहुक,** पु० ( कः ) नळराजा. २ सूर्य. ३ पक्षिविशेष ज्यास अंधकाक, जलकाक असें म्हणतात तो. ४ लहान सरोवर. ५ कुर्ले, खेकडा. ६ रथाचा सारथी.

**बाहुकंठ**, पु० (ठः) ठोंठा.

**बाहुज**, पु० (जः) क्षत्रिय. २ पोपट, कीर.

**बाहुदा**, स्त्री० (दा) नदीविशेष.

**बाहुमूल**, न० (लं) कक्ष, कांख.

**बाहुयुद्ध**, न० (द्धं) बाहुनीं लढणें, कुस्ती.

**बाहुल**, पु० (लः) कार्तिकस्वामी. २ शाक्यमुनी पूत्र.

**बाहुलेय**, पु० (यः) कार्तिकस्वामी.

**बिड**, न० (डं) कृत्रिमलवण, बिडलोण.

**बिडाल**, पु० (लः) मार्जार, मांजर.

**बिडौजस्**, पु० (जाः) इंद्र.

**बिंदु**, पु० (दुः) थेंब. २ ज्ञाता. ३ रोगविशेष. ४ भोंवयांचा मध्यभाग. ५ अनुस्वार.

**बिंदुतंत्र**, पु० (त्रः) घोडा. २ सोंगटयांचा पट. ३ खेळण्याचा फांसा.

**बिंब**, न० (बं) चंद्रमंडळ. २ वनौषधि तोंडलीची वेल. ३ प्रतिबिंब. ४ पु० (बः) सरडा.

**बिबाधातु**, स्त्री० (तुः) विटंबना.

**बिंबिका**, स्त्री० (का) वनौषधि ज्यास तोंडलीची वेल असें म्ह० ती.

**बिभीतक**, पु० (कः) धाटिंग वृक्ष, बेहेडयाचें झाड. २ बिबवा, बिबा.

**बिल**, न० (लं) छिद्र. २ पु० (लः) इंद्राचा घोडा. ३ पर्वताची दरी, विवर.

**बिलेशय**, पु० (यः) उंदीर. २ सर्प.

**बिल्व**, पु० (ल्वः) बिल्ववृक्ष. २ (ल्वं) फळ.

**बिस**, पु० न० (सः-सं) भिसें.

**बिसकंठिका**, स्त्री० (का) बगळा, बाळेटोंक, बाळेभोक.

**बिसनाभि**, स्त्री० (भिः) कमळाची देंटी.

**बिसप्रसून**, पु० न० (नः-नं) कमळ.

**बिसिनी**, स्त्री० (नी) कमलिनी, कमळीण.

**बिस्त**, पु० (स्तः) सोन्याचा ८० गुंजांचा तोळा.

**बीज**, न० (जं) रेत. २ बीं. ३ कारण. ४ तत्व. ५ अर्थ. ६ हेतु. ७ अंकूर. ८ काजवा. ९ पु० (जः) वंशांमध्यें उत्पन्न.

**बीजकोश**, पु० (शः) बियांचा कांदा.

**बीजपुष्प**, न० (ष्पं) धोतरा. २ वनौषधि गेळयाचें झाड.

**बीजपूर**, पु० (रः) महाळुंग.

**बीजमातृका**, स्त्री० (का) कमळांतील कोश.

**बीजाकृत**, वि० (तःता-तं) प्रथम बीं पेरून नंतर नांगरलेलें (शेत)

**बीजोदक**, न० (कं) मेघधार. २ कठिणोदक, गार.

**बीज्य**, वि० (ज्यःज्या-ज्यं) कुलीन.

**बीभत्स**, पु० (त्सः) आठ रसांतील एक रस. २ हिंस, क्रूर. ३ रोगी. ४ पार्थ, अर्जुन.

**बीभत्सु**, पु० (त्सुः) पार्थ, अर्जुन.

**बुक**, पु० (कः) रुईमांदार, थोर बकुली.

**बुक्क**, पु० (क्कः) अज, बकरा. २ घोडे विकणारा.

**बुक्का**, स्त्री० (क्का) हृदयांतील कमलाकार मांसभाग ज्यास काळीज असें म्हणतात तें.

**बुक्काग्रमांस**, न० (सं) हृदयांतील कमलाकार मांस भाग ज्यास काळीज असें म्हणतात तें.

**बुक्कार**, पु० (रः) सिंहनाद.

**बुद्ध**, (द्धः-द्धा-द्धं) अवगत, जाणलेला. २ नास्तिक. ३ पंडित. ४ पु० (द्धः) बुद्धावतार. ५ ज्ञानी.

**बुद्धि**, स्त्री० (द्धिः) सर्व व्यवहारांस कारण भूत जें ज्ञान तें.

**बुद्बुद**, पु० (दः) जलविकारविशेष, पाण्याचा बुडबुडा.

**बुध**, पु० (धः) पंडित. २ नऊ ग्रहांतील एक बुधनामा ग्रह.

**बुधान**, पु० (नः) गुरु. २ प्रवीण.

**बुधित**, वि० (तः-ता-तं) अवगत, जाणलेला.

**बुध्न**, पु० (ध्नः) महादेव. २ मूळ, बुंधा.

**बुध्न्य**, पु० (ध्न्यः) महादेव.

**बुभुक्षा**, स्त्री० (क्षा) क्षुधा, भूक.

**बुभुक्षित**, वि० (तः-ता-तं) भुकेलेला.

**बुष**, न० (षं) भूस.

**बुस**, न० (सं) भूस.

**बुकेश**, पु० (शः) शेवाळ. २ वडाचें झाड.

**बूकेशी**, स्त्री० (शी) वनौषधि ज्यास व्राकुंची, बावंची असें म्हणतात ती.

**बृहत्**, वि० (त्-ती-त्) विस्तृत, मोठा.

**बृहतपाटलि**, पु० (लिः) धोतरा.

**बृहतिका**, स्त्री० (का) उत्तरीय वस्त्र, आंगवस्त्र.

**बृहती**, स्त्री० (ती) वनौषधि रिंगणीचें झाड. २ लहान डोरली वांगी. ३ छंदोविशेष. ४ वाचा. ५ मोठें. ६ कावड.

**बृहत्काश**, पु० (शः) तृणविशेष.

**बृहत्कुक्षि**, पु० (क्षिः) बृहदुदर, दोंदील.

**बृहद्गृह**, पु० (हः) देशविशेष.

**बृहद्धूल**, पु० (लः) मोठा नांगर.

**बृहद्भानु**, पु० (नुः) अग्नि, विस्तव.

**बृहन्नल**, पु० (लः) वनौषधि ज्यास देवनळ असें म्हणतात तो. २ पार्थ, अर्जुन.

**बृहन्नला** स्त्री० (ला) अर्जुन.

**बृहस्पति**, पु० (तिः) देवांचा गुरु.

**बृंहित**, न० (तं) हत्तीची गर्जना.

**बोधकर**, पु० (रः) राजाचा स्तुतिपाठक (जन.)

**बोधि**, स्त्री० (धिः) बोध, उपदेश. २ पु० (धिः) समाधिविशेष. ३ पिंपळाचें झाड.

**बोधिद्रुम**, पु० (मः) पिंपळाचें झाड.

**बोधिनी**, स्त्री० (नी) वनौषधि ज्यास पिंपळी असें म्हणतात ती.

**बोल**, पु० (लः) गंध रसविशेष ज्यास बोळ, रक्तयाबोळ, असें म्हणतात तो.

**बौद्ध**, पु० (द्धः) नास्तिक. २ बौद्ध.

**बौधि**, पु० (धिः) पुरूरवा.

**ब्रध्न**, पु० (ध्नः) सूर्य.

**ब्रम्हकन्यका**, स्त्री० (का) सरस्वती.

**ब्रम्हचारिन्** पु० (री) ब्रम्हचर्य व्रत धारण केलेला, ब्रम्हचारी.

**ब्रम्हण्य**, पु० (ण्यः) पारसा पिंपळ. २ शनी नामा ग्रह.

**ब्रम्हत्व**, न० (त्वं) ब्रम्हभाव.

**ब्रम्हदर्भा**, स्त्री० (र्भा) वनौषधि ज्यास यवानी, ओंवा असें म्ह० तो.

**ब्रम्हदारु**, न० (रु) पारसा पिंपळ.

**ब्रम्हन्**, पु० (म्हा) ब्राम्हण. २ ब्रम्हदेव. ३ न० (म्ह) वेद. ४ तत्व. ५ चैतन्य. ६ तप, ब्रम्हचर्य. ७ ऋत्विजवि०. ८ यागवि०.

**ब्रम्हपुत्र**, पु० (त्रः) विषवि०. २ नदवि०. ३ क्षेत्रवि०. ४ नारद.

**ब्रम्हबंधु**, पु० (धुः) अधिक्षेप, ब्राम्हण निं-

देचा प्रयोग. उ० हे ब्रम्हबंधोदुष्टोसि. २ ब्राम्हणाची आज्ञा.

**ब्रम्हबिंदु**, पु० (दु:) वेद पठण करीत असतां तोंडांतून जलकण • निघतात ते प्रत्येक.

**ब्रम्हभू**, पु० (भू:) आनिरुद्ध, मदनाचा पुत्र.

**ब्रम्हभूय**, न० (यं) ब्रम्हत्व.

**ब्रम्हयज्ञ**, पु० (ज्ञ:) पंच महायज्ञांतील एक यज्ञ.

**ब्रम्हवर्चस**, न० (सं) सदाचार पाळून वेदाभ्यास करणें. २ तपस्वाध्यायादिकांचें तेज.

**ब्रम्हवर्त**, पु० (र्तः) ब्रम्हवर्त देश.

**ब्रम्हवाद**, पु० (द:) वेदशास्त्र वाद.

**ब्रम्हवादिन्**, पु० (दी) वेदांती.

**ब्रम्हसर्प**, पु० (र्प:) ब्रम्हसर्प.

**ब्रम्हसायुज्य**, न० (ज्यं) ब्रम्हभाव, ब्रम्हत्व.

**ब्रम्हसूत्र**, न० (त्रं) यज्ञोपवीत.

**ब्रम्हाग्रभू**, पु० (भू:) घोडा.

**ब्रम्हांजलि**, पु० (लि:) वेदाभ्यास करते वेळीं आरंभीं व शेवटीं प्रणवोच्चार करून जो नमस्कार करितात तो.

**ब्रम्हारण्य**, न० (ण्यं) वेदाध्ययनाची जागा.

**ब्रम्हासन**, न० (नं) ध्यान व योग ह्या विषयीं जें आसन तें.

**ब्रम्हाक्षर**, न० (रं) प्रणव, ओंकार.

**ब्रम्ही**, स्त्री० (म्ही) वनौषधि ज्यास भारंग असें म्ह० ती. २ शाकवि०. ३ मत्स्यवि०.

**ब्राम्ह**, न० (म्हं) आंगठ्याचें मूल, ब्रम्ह तीर्थ.

**ब्राम्हण**, पु० (ण:) चार वर्णांतील आद्य वर्ण. २ न० (णं) वेद. ३ ब्राम्हणांचा समुदाय.

**ब्राम्हणयष्टिका**, स्त्री० (का) वनौषधि ज्यास भारंग असें म्ह० ती.

**ब्राम्हणायन**, पु० (न:) कुलीन ब्राम्हण.

**ब्राम्हणी**, स्त्री० (णी) वनौषधि जीस भारंग असें म्ह० ती.

**ब्राम्हण्य**, न० (ण्यं) ब्राम्हणांचा समुदाय. २ ब्राम्हणांचा धर्म.

**ब्राम्ही**, स्त्री० (म्ही) वाणी, सरस्वती. २ सात मातृ देवतांतील पाहिली देवता. ३ जिचीं पानें कृष्णपक्षीं गळतात आणि शुक्लपक्षीं उत्पन्न होतात व जीस सोमलता असें म्ह० ती वल्ली, वेल.



## भ.

**भ**, न० (भं) नक्षत्र. २ किरण. ३ पु० (भ:) शुक्र नामा ग्रह. ४ भृगुनंदन.

**भंकारी**, स्त्री० (री) रानमाशी.

**भक्त**, न० (क्तं) अन्न, शिजलेला भात.

**भक्ततूर्य**, न० (र्यं) वाद्यवि०.

**भक्ति**, स्त्री० (क्ति:) सेवा. २ विभाग.

**भग**, पु० (ग:) सूर्य. २ न० (गं) योनि. ३ संपतीची शोभा. ४ इच्छा. ५ महात्म्य, ऐश्वर्य. ६ प्रयत्न. ७ वीर्य, पराक्रम. ८ कीर्ति. ९ ज्ञान. १० वैराग्य. ११ धर्म. १२ पुण्य. १३ मोक्ष, मुक्ति.

**भंग**, पु० (ग:) नाश. २ पाण्याची लहरी, लाट. ३ भेद. ४ पराभव. ५ रोग.

**भगंदर**, पु० (र:) रोगवि०.

**भगवत्**, पु० (वान्) ईश्वर. २ नास्तिक. ३ वि० (वान्- वती वत्) पूज्य.

**भगवती**, स्त्री० (ती) गौरी, पार्वती.
**भगसार्थ**, पु० (र्थः) वक्र, वांकडा.
**भंगा**, स्त्री० (गा) भांग. २ तागाचें बीं. ३ धान्यवि०.
**भगालिन्**, पु० (ली) महादेव.
**भंगि**, स्त्री० (गिः) कौटिल्य भेद. २ विछित्तिरूपहाव. ३ कुटिलपणा.
**भगिनी**, स्त्री० (नी) बहीण.
**भग्नपृष्ठ**, पु० (ष्ठः) सन्मुख.
**भंग्य**, वि० (ग्यःग्या-ग्यं) भांग किंवा तागाचें बीं उत्पन्न होण्याचें क्षेत्र, शेत.
**भजमान**, वि० (नःना-नं) नीतिप्राप्य, नीतीनें मिळावयाचें (द्रव्यादि.)
**भंजरु**, पु० (रुः) देवदारु वृक्ष.
**भट**, पु० (टः) योद्धा. २ अधमवि०.
**भंटाकी**, स्त्री० (की) वनौषधि ज्यास रानवांगी, डोरलीवांगी असें म्ह० ती.
**भटित्र**, न० (त्रं) लोहशलाकेनें संस्कृत जें मांसादि तें.
**भट्टार**, पु० (रः) पूज्य.
**भट्टारक**, पु० (कः) राजा (नाट्यप्रकरणामध्ये.) २ देव. ३ ऋषि.
**भट्टिनी**, स्त्री० (नी) पट्टाभिषिक्त स्त्रियांखेरीज ज्या अन्य राजस्त्रिया त्या प्रत्येक (नाट्य प्रकरणामध्यें.) २ ब्राम्हणाची स्त्री.
**भंड**, पु० (डः) नटवि०.
**भंडन**, न० (नं) कवच. २ युद्ध.
**भंडिर**, पु० (रः) शिरसनामा वृक्ष.
**भंडिरी**, स्त्री० (री) वनौषधि जीस मांजिष्ठा असें म्ह० ती.
**भंडिल**, पु० (लः) शिरसनामा वृक्ष.
**भंडी**, स्त्री० (डी) शिरस नामा वृक्ष.
**भंडीरी**, स्त्री० (री) वनौषधि जीस मंजिष्ठा असें म्ह० ती.
**भंडील**, पु० (लः) शिरसनामा वृक्ष.
**भणित**, न० (तं) रतिकूजित, रतिकालीन शब्दादि०.
**भणिति**, स्त्री० (तिः) पूर्वपक्ष.
**भद्र**, न० (द्रं) कल्याण. २ करणवि०. ३ मंगल. ४ सुवर्ण. ५ पु० (द्रः) महादेव. ६ वनौषधि ज्यास नागरमोथा असें म्ह० तो. ७ बलीवर्द, बैल. ८ सुख. ९ पक्षिवि० ज्यास ताजवा, दय्यर असें म्ह० तो. १० धान्यवि० ज्यास सांसव, शिरस असें म्ह० तें. ११ हत्तीची जातिवि०. १२ वि० (द्रःद्रा-द्रं) श्रेष्ट. १३ साधु.
**भद्रक**, पु० (कः) स्त्री० न० (का-कं) सुंदर. २ मनोरम.
**भद्रंकर**, पु० (रः) कल्याण करणारा.
**भद्रकाली**, स्त्री० (ली) कात्यायनी देवी. २ गाभिण माशी.
**भद्रकुंभ**, पु० (भः) पूर्णघट, भरलेली घागर, तांब्या इत्यादि.
**भद्रदारु**, पु० न० (रुःरु) देवदारूचें झाड.
**भद्रनामन्**, पु० (मा) पक्षिवि० ज्यास ताजवा, दय्यर असें म्ह० तो.
**भद्रपर्णी**, स्त्री० (र्णी) शिवणीचें झाड.
**भद्रबला**, स्त्री० (ला) वनौषधि जीस चांदवेल, कुब्जप्रसारिणी असें म्ह० ती.
**भद्रमुस्तक**, पु० न० (कः कं) वनौषधि ज्यास नागरमोथा असें म्ह० तो.
**भद्रयव**, पु० न० (वःवं) कुडयाची शेंग.
**भद्ररेणु**, पु० (णुः) इंद्राचा हत्ती.
**भद्रश्री**, पु० (श्रीः) मलयागरु, मैलागिरी चंदन.

**भद्रा**, स्त्री० (द्रा) लक्ष्मी. २ वनौषधि जी-स एलापर्णी, कालिंदण असें म्ह० ती. ३ वनौषधि ज्यास पिंपळी असें म्ह० ती. ४ स्वर्गांतील नदी जिला भागीरथी असें म्ह० ती. ५ तिथिवि०. ६ वनौ० जीस चांदवेल, कुब्जप्रसारिणी असें म्ह० ती. ७ कुंभ्याचें झाड. ८ वनौषधि ज्यास धमासा असें म्ह० तो.

**भद्राकरण**, न० (णं) मुंडन.

**भद्रात्मज**, पु० (जः) तलवार.

**भद्राश्व**, न० (श्वं) खंडवि०.

**भद्रासन**, न० (नं) रत्नजडित जें राजादिकांचें आसन तें.

**भनिर्मीलिका**, स्त्री० (का) कुटिलपणा.

**भंमरालिका**, स्त्री० (का) वनमाशी.

**भंमराली**, स्त्री० (ली) माशी.

**भय**, न० (यं) भीति. २ कुब्जनामाक वृक्षाचें फळ. ३ भयंकर.

**भयंकर**, वि० (रःरा-रं) भीतिकारक. २ भयानकनामा रसवि० (नाट्य प्रकरणांमध्यें.)

**भयडिंडिम**, पु० (मः) रणवाद्य, तासा.

**भयद्रुत**, वि० (तःता-तं) भयानें पळणारा.

**भयानक**, पु० (कः) भयानक नामारसवि० (नाट्य प्रकरणामध्यें.) २ राहु नामा ग्रह. ३ वाद्य. ४ वि० (कःका-कं) भयंकर.

**भयापह**, पु० (हः) मांडलिक राजा.

**भर**, पु० (रः) अतिशय. २ भार. (ओझ्याचा वगैरे.)

**भरण**, न० (णं) वेतन. २ पोषण.

**भरणी**, स्त्री० (णी) भरणी नक्षत्र. २ घोंसाळी. ३ दोडकी.

**भरण्य**, न० (ण्यं) वेतन.

**भरण्यभुज्**, वि० (क्) वेतन घेऊन चाकरी करणारा.

**भरण्या**, स्त्री० (ण्या) वेतन.

**भरत**, पु० (तः) स्त्री वेषानें नर्तन, गायन इत्यादि करून उपजीविका करणारा, नट. २ रामचंद्राचा बंधु. ३ नाट्य शास्त्र. ४ दुष्यंत राजाचा पुत्र. ५ नळ राजाचा मित्र.

**भरद्वाज**, पु० (जः) कुकुड कोंबडा. २ गुरुपुत्र, भारद्वाज ऋषि.

**भरु**, पु० (रुः) महादेव. २ नवरा. ३ सुवर्ण, सोनें.

**भर्ग**, पु० (र्गः) महादेव.

**भर्तृ**, पु० (र्ता) नवरा, पति. २ वि० (र्ता-र्त्री-र्तृ) धारण करणारा. ३ पोषण करणारा.

**भर्तृदारक**, पु० (कः) युवराजा. (नाट्य प्रकरणामध्यें.)

**भर्तृदारिका**, स्त्री० (का) राजाची कन्या. (नाट्य प्रकरणामध्यें.)

**भर्त्सन**, न० (नं) अपकारार्थक भाषण.

**भर्मक**, न० (कं) रोगविशेष. २ सुवर्ण, सोनें. ३ वनौषधि ज्यास वावडिंग असें म्ह० तें.

**भर्मन्**, न० (र्म.) सुवर्ण, सोनें. २ वेतन.

**भल्ल**, न० (ल्लं) कल्याण, २ पु० (ल्लः) भल्लुक, आश्वल. ३ शास्त्रवि०. ४ बाण, शर.

**भल्लातक**, पु० (कः) स्त्री० (की) वृक्षवि० ज्यास भिलावा, बिबवा असें म्हणतात तो.

**भल्लातकी**, स्त्री० (की) बिबवा, भिलावा असें म्ह० तो वृक्ष.

**भल्ली**, स्त्री० (ल्ली) वृक्षविशेष ज्यास बिबवा, भिलावा असें म्ह० तो.
**भल्लुक**, पु० (कः) अछभल्ल, आस्वल, रीस.
**भल्लूक**, पु० (कः) अछभल्ल, आस्वल, रीस.
**भव**, पु० (वः) महादेव. २ उत्पत्ति, जन्म. ३ कल्याण. ४ संसार. ५ सत्ता. ६ प्राप्ति.
**भवत्**, पु० (वान्) चांगला अर्थ. २ आपण.
**भवन**, न० (नं) गृह, घर. २ जन्म.
**भवभूति**, पु० (तिः) भवभूति कवि.
**भवरुत्**, पु० (त्) वाद्यवि०, प्रेतढक्का-
**भवानी**, स्त्री० (नी) गौरी, पार्वती.
**भविक**, न० (कं) कल्याण.
**भवितृ**, पु० (ता) स्त्री० न० (त्री-तृ) भवनशील, होणारा.
**भविनी**, स्त्री० (नी) पाठ (अध्ययनसंबंधी.)
**भविल**, पु० (लः) पाहिजे तसें बोलणारा.
**भविष्णु**, वि० (ष्णुःष्णुःष्णु) उत्पत्तिशील, उत्पन्न होणारा.
**भव्य**, न० (व्यं) कल्याण. २ फल, कार्य. ३ वि० (व्यःव्याव्यं) शुभ. ४ सत्य. ५ योग्य. ६ पुढें होणारा. ७ पु० (व्यः) वृक्षवि०.
**भव्या**, स्त्री० (व्या) पार्वती.
**भषक**, पु० (कः) कुत्रा.
**भसत्**, पु० (त्) वाद्यवि०.
**भसंत**, पु० (तः) दिन, रात्र इत्यादि काळ.
**भसदा**, स्त्री० (दा) योनि. २ देदिप्यमान.
**भसित**, न० (तं) भस्म.
**भस्म**, पु० (स्मः) भस्म.
**भस्मगंधिनी**, स्त्री० (नी) सुवासिक द्रव्यवि० ज्यास रेणुकबीज असें म्ह० तें.
**भस्मगर्भा**, स्त्री० (र्भा) शिसव्याचें झाड.
**भस्मतूल**, न० (लं) वावटळ. २ थंडी.
**भस्मन्**, न० (स्म) भस्म.
**भस्मराली**, स्त्री० (ली) माशी.
**भस्मरेखा**, स्त्री० (खा) भस्म लावणें.
**भस्त्रा**, स्त्री० (स्त्रा) विस्तव पेटविण्याचा चामड्याचा भाता.
**भक्षक**, पु० (कः) भक्षण करणारा. २ खादाड.
**भक्षकार**, पु० (रः) भक्ष्यपदार्थ करणारा.
**भक्षण**, न० (णं) भोजन, भक्षण करणें.
**भक्षित**, वि० (तः ता- तं) खाल्लेला.
**भक्ष्यकार**, पु० (रः) भक्ष्यपदार्थ करणारा.
**भक्ष्यंकार**, पु० (रः) भक्ष्यपदार्थ करणारा.
**भा**, स्त्री० (भा) कांति. २ गभस्ति, किरण.
**भाकूट**, पु० (टः) पर्वतविशेष. २ मत्स्यविशेष.
**भाग**, पु० (गः) वांटा, अंश. २ अर्ध. ३ भाग्य.
**भागधेय**, न० (नं) दैव. २ पु० (यः) सरकार सारा, दस्त, पट्टी.
**भागिनेय**, पु० (यः) बहिणीचा पुत्र, भाचा.
**भागियेनी**, स्त्री० (नी) बहिणीची कन्या, भाची.
**भांगीन**, वि० (नः ना- नं) भांग अगर तागाचें बीं उत्पन्न होण्याचें (शेत.)
**भागीरथी**, स्त्री० (थी) नदीविशेष.
**भाग्य**, न० (ग्यं) दैव. २ जन्मांतरीय शुभाशुभ कर्म. ३ ऐश्वर्य.

**भाजन**, न० ( नं ) योग्य. २ आयधण, भांडें.

**भांड**, न० ( डं ) आयधण, भांडें. २ भूषण, अलंकार. ३ घोड्याचा अलंकार. ४ वाण्याचें मूळभांडवळ.

**भांडपुष्प**, पु० (ष्पः) भुजंग.

**भातु**, पु० (तुः) सूर्य.

**भाद्र**, पु० (द्रः) भाद्रपदमास.

**भाद्रपद**, पु० (दः) भाद्रपदमास.

**भानु**, पु० (नुः) सूर्य. २ किरण.

**भानेमि**, पु० (मिः) सूर्य.

**भाम**, पु० ( मः ) क्रोध, राग. २ सूर्य. ३ दीप्ति.

**भामिनी**, स्त्री० ( नी ) कोपशीला, रागीट बायको.

**भार**, पु० (रः) बत्तीस पायल्या. २ विविध. ३ विष्णु. ४ सोन्याच्या वीस तुला.

५ गुंजा=१ मासा.

१६ मासे=१ तोळा.

४ तोळे=१ पल.

१०० पलें=१ तुला.

२० तुला=१ भार किंवा ८००० तोळे.

**भारत**, न० ( तं ) भरतखंड. २ व्यासकृत ग्रंथ (भारत.) ३ पु० ( तः ) नट.

**भारती**, स्त्री० ( ती ) सरस्वती. २ वचन. ३ वृत्ति. ४ पक्षिविशेष.

**भारद्वाज**, पु० ( जः ) पक्षिविशेष. २ द्रोणाचार्य. ३ भारद्वाज नामा मुनिविशेष.

**भारद्वाजी**, स्त्री० ( जी ) वनौषधि, अरण्यांत झालेली कापशीण, रान कापशीण.

**भारयष्टि**, स्त्री० (ष्टिः) खुंटी.

**भारव**, न० (वं) धनुष्याची दोरी.

**भारवाह**, पु० ( हः ) ओझेकरी, हेलकरी, हमाल इत्यादि.

**भारवि**, पु० (विः) सूर्य.

**भारिक**, पु० ( कः ) ओझेकरी, हेलकरी, हमाल इत्यादि.

**भारिन्**, पु० ( री ) ओझेकरी, हेलकरी, हमाल इत्यादि.

**भार्गव**, पु० ( वः ) शुक्राचार्य. २ परशुराम. ३ हत्ती. ४ धनुष्य धारण करणारा.

**भार्गवी**, स्त्री० ( वी ) गौरी, पार्वती. २ लक्ष्मी. ३ दुर्वा.

**भार्गी**, स्त्री० ( र्गी ) वनौषधि जीस भारंगीची वेल असें म्हणतात ती.

**भार्या**, स्त्री० ( र्या ) विवाहित बायको.

**भार्याट**, पु० ( टः ) अन्नाकरितां स्त्री देणारा.

**भार्याटिक**, पु० ( कः ) स्त्रीवश, स्त्रीचे आधीन झालेला. २ हरिणविशेष.

**भार्यापती**, स्त्री० ( ती ) बायको आणि नवरा.

**भार्यारु**, पु० ( रुः ) पर्वतविशेष. २ मृगविशेष. ३ परस्त्रीशीं गमन करणारा, जार.

**भाल**, न० ( लं ) कपाळ, ललाट. २ तेज.

**भालांक**, पु० ( कः ) मत्स्यविशेष. २ रक्तवर्ण. ३ कांसव. ४ लांकूड चिरण्याचें एक शस्त्र ज्यास करवत असें म्हणतात तें. ५ शाकविशेष. ६ मृगविशेष. महालक्षणयुक्त पुरुष. ८ महादेव.

**भालुक**, पु० ( कः ) आस्वल, रीस.

**भालूक**, पु० ( कः) आस्वल, रीस.

**भाव**, पु० ( वः ) विद्वान ( नाट्य प्रकरणामध्यें ) २ सत्ता. ३ स्वभाव. ४ अभिप्राय. ५ चेष्टा. ६ आत्मा. ७ जन्म. ८ मनोविकार. ९ क्रिया. १० लीला. ११ भावपदार्थ. १२ विभूति, ऐश्वर्य. १३ जंतु, प्राणी. १४ रती. १५ हावभाव. १६ वस्तु. १७ धर्म.

**भावना**, स्त्री० ( ना ) वासना. २ ध्यान. ३ गंध, माल्य, धूप इत्यादि कांहीं करून जो कांहींएक संस्कार करितात तो. ४ औषधांस पुट देतात तें.

**भावाट**, न० ( टं ) कल्याण. २ पु० ( टः ) साधूंचा समूह. ३ कामुक, कामाविष्ट. ४ नट.

**भावित**, वि० ( तः ता- तं ) सुवासिक द्रव्यानें सुगंधि. २ लब्ध, मिळालेला. ३ पुटित, रसादिकें करून पुट दिलेला.

**भावुक**, न० ( कं ) कल्याण. २ भक्तिमान.

**भाषा**, स्त्री० ( षा ) सरस्वती, वाणी, वचन.

**भाषित**, न० ( तं ) भाषण. २ वि० ( तः ता- तं ) उक्त, बोललेला.

**भाष्य**, न० ( ष्यं ) पदांच्या अर्थाचें विवरण, मूळ सूत्राचा अर्थ ज्या ग्रंथांत वर्णन केला असतो तो ग्रंथ.

**भाष्यकार**, पु० ( रः ) पतंजली ऋषि.

**भास्**, स्त्री० ( भा ) कांति. २ किरण. ३ प्रभाव.

**भास**, पु० ( सः ) पक्षिविशेष ज्यास गोष्ठकुक्कुट, गोठ्यांतील कोंबडा असें म्हणतात तो. २ प्रभा.

**भासंत**, पु० ( तः ) पक्षिविशेष. २ वि० ( तः ता- तं ) सुंदर आकार.

**भासुर**, पु० ( रः ) स्फटिक.

**भास्कर**, पु० ( रः ) सूर्य. २ अग्नि.

**भास्वत्**, पु० ( स्वान् ) सूर्य. २ देदिप्यमान.

**भित्त**, न० ( त्तं ) शकल, खंड.

**भित्ति**, स्त्री० ( त्तिः ) भिंत. २ प्रदेश. ३ कुड्य. ४ भेदकरणें.

**भिदा**, स्त्री० ( दा ) द्विधाभाव, भेदणें.

**भिंदिपाल**, पु० ( लः ) दगड मारण्याचें एक रज्जुयंत्र ज्यास गोफिण असें म्हणतात तें.

**भिदिर**, न० ( रं ) वज्र.

**भिदु**, पु० ( दुः ) वज्र.

**भिदुर**, न० ( रं ) वज्र.

**भिद्र**, पु० ( द्रः ) वज्र.

**भिन्न**, वि० ( न्नः न्ना- न्नं ) भेदलेला, विदारण केलेला. २ एके ठिकाणीं मिळालेला. ३ विकासित, विकासास पावलेलें ( कमलादि. ) ४ न० ( न्नं ) व्यतिरिक्त, निराळें, पृथक. ५ संगत.

**भिन्नक**, पु० ( कः ) बौद्ध. २ नास्तिक.

**भिषग्जित**, न० ( तं ) औषध.

**भिषज्**, पु० ( क् ) वैद्य.

**भिस्सटा**, स्त्री० ( टा ) जळालेलें अन्न ज्यास करप असें म्हणतात तें.

**भिस्सा**, स्त्री० ( स्सा ) अन्न.

**भिक्षा**, स्त्री० ( क्षा ) याचना, यांञा. २ सेवा, चाकरी. ३ वेतन. ४ भिक्षेनें मिळालेलें ( द्रव्य वगैरे )

**भिक्षाशिल्व**, न० ( ल्वं ) पैशून्य.

**भिक्षु**, पु० ( क्षुः ) सन्याशी. २ बौद्ध, भिक्षुक.

**भी**, स्त्री० ( भी ) भय.

**भीत**, वि० ( तः ता- तं ) भयशील, भित्रा. २ भियालेला. ३ भय पावणारा. ४ न० (तं) भय.

**भीति**, स्त्री० (तिः) भय.

**भीम**, पु० ( मः ) महादेव. २ भयानक नामा रस. ( नाटय प्रकरणामध्यें ) ३ वि० ( मः मा- मं ) भयंकर. ४ पु० ( मः ) धर्माचा कनिष्ट बंधु. ५ वेताच्या झाडांतील एक भेद.

**भीमरथी**, स्त्री० ( थी ) कालरात्र. २ भीमानदी.

**भीमविक्रांत**, पु० ( तः) सिंह.

**भीरु**, वि० ( रुः रुः रु ) भयशील, भित्रा. २ पु० ( रुः ) कोल्हा. ३ स्त्री० (रुः) उत्तम स्त्री. ४ साधारण स्त्री.

**भीरुक**, वि० ( कः का- कं ) भीरु, भयशील, भित्रा.

**भीलुक**, वि० ( कः का- कं ) भीरु, भयशील, भित्रा.

**भीषण**, न० ( णं ) भयानक नामा रस ( नाटय प्रकरणामध्यें. ) २ वि० ( णः णा-णं) भयंकर. ३ पु० (णः) वनौषधि ज्यास सालई असें म्हणतात ती.

**भीष्म**, वि० ( ष्मः ष्मा- ष्मं ) भीषण, भयंकर. २ पु० (ष्मः) भागीरथीचा पुत्र जो भीष्म तो.

**भीष्मसू**, स्त्री० (सूः) भागीरथी.

**भुक्त**, वि० (क्तः क्ता- क्तं) भक्षित, भक्षिलेला. २ न० (क्तं) भोजन.

**भुक्तसमुज्झित**, वि० (तः ता- तं) प्रथम भोगून नंतर टाकलेला.

**भुग्न**, वि० (ग्नः ग्ना- ग्नं) वक्र, वांकडा. २ व्यथित किंवा भग्न झालेला.

**भुज**, पु० (जः) बाहु.

**भुजग**, पु० (गः) सर्प.

**भुजंग**, पु० (गः) सर्प. २ जारपुरुष.

**भुजंगभुज्**, पु० (क्) मयूर, मोर.

**भुजंगम**, पु० (मः) सर्प.

**भुजंगहन**, पु० (हा) विष्णूच्या रथाचा ध्वज. २ गरुड.

**भुजगाशन**, पु० (नः) गरुडपक्षि.

**भुजंगाक्षी** स्त्री० (क्षी) वनौषधि जीस मुंगशी, मुंगुसवेल असें म्हणतात ती.

**भुजशिरस्**, न० (रः) खांद, खांदा.

**भुजा**, स्त्री० (जा) बाहु.

**भुजांतर**, न० (रं) वक्षस्थळ.

**भुजादल**, पु० (लः) हात.

**भुजिभारत**, पु० (तः) अग्नि.

**भुजिष्य**, पु० स्त्री० (ष्यः ष्या) दास, चाकर. २ पु० (ष्यः) स्वतंत्र. ३ हस्तसूत्र.

**भुजिष्या**, स्त्री० (ष्या) दासी. २ कंचनी, वेश्या.

**भुवन**, न० (नं) आकाश. २ उदक, पाणी. ३ भूतल. ४ चवदा भुवनांतील प्रत्येक.

**भुवन्यु**, पु० (न्युः) सूर्य. २ चंद्र. ३ अग्नि, विस्तव.

**भू**, स्त्री० (भूः) पृथ्वी, भूमि. २ स्थानमात्र.

**भूक**, न० (कं) छिद्र. २ काळ.

**भूकश्यप**, पु० (पः) विष्णूचा पिता.

**भूगर्भ**, पु० (र्भः) भवभूतिक विशेष. २ पृथ्वीचा गर्भ.

**भूजंबू**, पु० (बूः) गहूं. २ वृक्षविशेष ज्यास ह्या देशीं वेहकळी आणि कर्नाटक देशीं हलुमाणिका असें म्हणतात तो.

भूजा, स्त्री० (जा) बाहु. २ हस्त.

भूत, पु० (तः) पिशाच. २ देवयोनिविशेष. ३ कुमार. ४ प्रख्यात. ५ कृष्णचतुर्दशी. ६ वि० (तः ता- तं) सदृश, सारखा. ७ लब्ध, मिळालेला. ८ प्राणी. ९ अतीत, झालेला. १० युक्त, न्याय्य. ११ न० (तं) पृथिव्यादि पंचमहाभूतें तीं प्रत्येक. १२ सत्य.

भूतकेश, पु० (शः) वनौषधि ज्यास जटामांशी असें म्हणतात ती.

भूतधात्री, स्त्री० (त्री) पृथ्वी.

भूतयज्ञ, पु० (ज्ञः) बलिहरणादि.

भूतवास, पु० (सः) वनौषधि ज्यास धाटिंग बेहेडा असें म्हणतात तो वृक्ष.

भूतवृक्ष, पु० (क्षः) शाकोट वृक्ष. २ र्दिड्याचें झाड.

भूतवेशी, स्त्री० (शी) वनौषधि जीस पांढरी निर्गुंडी, कातरी निर्गुंडी असें म्हणतात ती.

भूतात्मन्, पु० (त्मा) ब्रम्हदेव. २ देह.

भूतावास, पु० (सः) वृक्षविशेष ज्यास धाटिंग, बेहेडा असें म्हणतात तो.

भूति, स्त्री० (तिः) ऐश्वर्य. २ भस्म. ३ अणिमादिक ज्या आठ विभूति त्या प्रत्येक. ४ मांसपाकविशेष. ५ उत्पत्ति. ६ हत्तीचा अलंकार.

भूतिक, न० (कं) वनौषधि ज्यास किराईत असें म्हणतात तें. २ कत्तृण, भूस्तृण इत्यादि सुगंधि तृणविशेष.

भूतीक, न० (कं) कत्तृण, भूस्तृण इत्यादि जें सुगंधि तृणविशेष तें. २ कापूर. ३ वनौषधि ज्यास किराईत असें म्हणतात तें.

भूतेश, पु० (शः) महादेव.

भूदार, पु० (रः) डुकर. २ राजा.

भूदेव, पु० (वः) ब्राम्हण.

भूनिंब, पु० (बः) वनौषधि ज्यास किराईत असें म्हणतात तें.

भूप, पु० (पः) राजा.

भूपदी, स्त्री० (दी) एक फुल झाड आहे ज्यास मोगरी असें म्हणतात ती.

भूभृत्, पु० (त्) पर्वत. २ राजा.

भूमयी, स्त्री० (यी) शनीमाता.

भूमि, स्त्री० (मिः) पृथ्वी. २ स्थानमात्र.

भूमिका, स्त्री० (का) रचना. २ सोंग घेणें, वेष बदलणें.

भूमिज, पु० (जः) घर. २ नरकविशेष. ३ भौमासुर.

भूमिजंबुका, स्त्री० (का) नारिंगीचें झाड.

भूमिजा, स्त्री० (जा) रामचंद्राची स्त्री, सीता.

भूमिपक्ष, पु० (क्षः) धूर.

भूमिलाभ, पु० (भः) मरण, मृत्यु. २ भूमिलाभ.

भूमिस्पृश्, पु० (क्) वैश्य. २ मनुष्य.

भूयस्, वि० (यान्-यसी-यः) बहुल, पुष्कळ. २ अ० पुनः ३ अधिकार ध्याअर्थी.

भूयिष्ठ, वि० (ठः-ठा-ठं) फार, अधीक.

भूरि, वि० (रिः-रिः-रि) बहुल, पुष्कळ. २ न० (रि) सुवर्ण, सोनें. ३ पु० (रिः) वासुदेव. ४ महादेव. ५ ब्रम्हदेव.

भूरिफेना, स्त्री० (ना) वनौषधि जीस शिकेकाई असें म्हणतात ती.

भूरिमाय, पु० (यः) कोल्हा.

भूरुंडी, स्त्री० (डी) शाकविशेष जीस थोर करडू असें म्हणतात. ती.

**भूर्ज**, पु० (र्जः) भूर्ज वृक्ष.
**भूलता**, स्त्री० (ता) लहान काडूं, गांडोळ असें म्हणतात तें.
**भूषण**, न० (णं) अलंकार. २ भूषण क्रिया, शोभविणें.
**भूषा**, स्त्री० (षा) भूषण.
**भूषित**, वि० (तःता-तं) अलंकृत
**भूषिता**, स्त्री० (ता) शुद्ध स्त्री.
**भूष्णु**, वि० ष्णुःष्णुः ष्णु) उत्पत्तिशील, उत्पन्न होणारा.
**भूस्तृण**, न० (णं) वेखंडासारखें जल तृणविशेष.
**भूक्षित्**, पु० (त्) डुकर.
**भृंग**, पु० (गः) भ्रमर, भुंगा. २ पक्षिविशेष ज्यास फेंचुहार, मस्तकचूड असें म्हणतात तो. ३ वनौषधि ज्यास म्हाका, माका असें म्हणतात तो. ४ न० (गं) वनौषधि ज्यास तज, दालचिनी असें म्हणतात ती.
**भृंगरजस्**, पु० (जाः) वनौषधि म्हाका, माका, असें म्हणतात तो.
**भृंगराज**, पु० (जः) वनौषधि ज्यास म्हाका माका असें म्हणतात तो. २ पक्षिविशेष.
**भृंगरीट**, पु० (टः) शिवगण,
**भृंगसोदर**, पु० (रः) वृक्षविशेष.
**भृंगार**, पु० (रः) सोन्याचें पात्रविशेष ज्यास झारी असें म्हणतात ती.
**भृंगारिन्**, पु० (री) भ्रमर, भुंगा.
**भृंगारी**, स्त्री० (री) कीटकविशेष ज्यास मुरकूट असें म्हणतात तें.
**भृंगिन्**, पु०( गी) शिवगण. २ नंदीश्वर.
**भृगु**, पु० (गुः) पर्वताचा तुटलेला कडा. २ मुनिविशेष. ३ राजविशेष. ४ महादेव. ५ शुक्राचार्य. ६ वर सात त्यापैकीं एक.
**भृंडि**, स्त्री० (डिः) लहरी, लाट.
**भृतक**, पु० (कः) चाकर, मजूर.
**भृति**, स्त्री० (तिः) वेतन. २ पोषण.
**भृतिभुज्**, पु० (क्) चाकर, मजूर.
**भृत्य**, पु० (त्यः) चाकर, मजूर.
**भृत्या**, स्त्री० (त्या) वेतन.
**भृशं**, अ० अतिशय ह्या अर्थी.
**भृष्टि**, स्त्री० (ष्टिः) भाजणें.
**भेक**, पु० (कः) बेडूक. २ मेघ.
**भेकभुज्**, पु० (क्) साधारण सर्प.
**भेकी**, स्त्री० (की) बेडकींतील एक लहान जाति.
**भेड्र**, पु० (ड्रः) मेंढा.
**भेद**, पु० (दः) एके ठिकाणीं मिळालेल्यांचें द्वैतकरण. २ विशेष. ३ विदारण.
**भेदित**, वि० (तःता-तं) भेद केलेला.
**भेरी**, स्त्री० (री) चर्मवाद्यविशेष.
**भेरुंड**, वि० (डःडा-डं) भयंकर.
**भेरुंडा**, स्त्री० (डा) देवताविशेष. २ पक्षिणीविशेष.
**भेल**, पु० (लः) मुनिविशेष. २ वि० लःला-लं) भित्रा. ३ अज्ञ. ४ न० (लं) नौका.
**भेलक**, पु० (कः) नौकाविशेष.
**भेलाद्या**, पु० (द्याः) परमर्षयः
**भेषज**, न० (जं) औषध.
**भैरव**, पु० (वः) भयानकनामा रस (नाट्यप्रकाराणामध्यें.) २ शिव, महादेव. ३ वि० (वःवा-वं) भयंकर.
**भैषज्य**, न (ज्यं) औषध.

**भैक्ष**, न० (क्षं) भिक्षासमूह.

**भो**, अ० संभोधनार्थी.

**भोग**, पु० (गः) सर्पाचें शरीर. २ सर्पाची फणा, फडा. ३ सुख. ४ कलावंती, हत्ती, घोडे इत्यादिकांचें पालन. ५ सैन्याचा रचनाविशेष. ६ धन. ७ व्यवहार, व्यापार.

**भोगगृह**, न० (हं) राहण्याचें घर.

**भोगधर**, पु० (रः) सर्प.

**भोगपिशाचिका**, स्त्री० (का) क्षुधा, भूक.

**भोगवत्**, पु० (वान्) सर्प. २ नाचणें.

**भोगवती**, स्त्री० (ती) नगरीविशेष. २ नदीविशेष.

**भोगावती**, स्त्री० (ती) नगरीविशेष, नागपुरी. २ नदिविशेष.

**भोगावली**, स्त्री० (ली) भाटाची स्तुती.

**भोगावास**, पु० (सः) राहण्याचें घर.

**भोगिकांत**, पु० (तः) वायु.

**भोगिन्**, पु० (गी) सर्प. २ राजा.

**भोगिनि**, स्त्री० ब० (न्यः) नागकन्या.

**भोगिनी**, स्त्री० (नी) पट्टाभिषिक्त स्त्री खेरीज जी दुसरी राजाची उपभोगार्थ स्त्री असते ती.

**भोजन**, न० (नं) जेवण.

**भोलि**, पु० (लिः) उंट.

**भौः**, अ० विषाद ह्या अर्थी.

**भौतिक**, पु० (कः) महादेव.

**भौती**, स्त्री० (ती) रात्र.

**भौम**, पु० (मः) मंगलनामा ग्रह. २ नरकविशेष. ३ वि० (मः मा- मं) भूमीपासून झालेला.

**भौरिक**, पु० (कः) स्वर्णाध्यक्ष, सोन्याच्या कारभाचा कामदार.

**भ्रकुंस**, पु० (सः) स्त्रियांचा वेष धारण करून नाचणारा पुरुष.

**भ्रकुटि**, स्त्री० (टिः) रागानें वक्र जी भोंवई ती.

**भ्रम**, पु० (मः) अयथार्थ ज्ञान, भ्रांति. २ पाण्याचा भोंवरा. ३ कुंद नांवाचें एक फुलझाड आहे. ४ फिरणें.

**भ्रमर**, पु० (रः) भुंगा. २ मानेवरचा उंच भाग. ३ कुंदपुष्प. ४ कामुक, कामाविष्ट.

**भ्रमरक**, पु० (क.) कपाळावर लोंबणारे जे केस ते प्रत्येक. २ भ्रमर, भुंगा.

**भ्रमि**, स्त्री० (मिः) भ्रांति.

**भ्रष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) च्युत, गळलेला.

**भ्राजिष्णु**, वि० (ष्णुः ष्णुः ष्णु) अतिशय शोभणारा.

**भ्रातरौ**, पु० (रौ) भाऊ आणि बहीण.

**भ्राति**, स्त्री० (तिः) फिरणें,

**भ्रांति**, स्त्री० (तिः) अयथार्थ ज्ञान, भ्रम.

**भ्रातृज**, पु० (जः) बंधूचा पुत्र, पुतण्या.

**भ्रातृजाया**, स्त्री० (या) बंधूची जाया, बंधूची बायको, भावजय.

**भ्रातृव्य**, पु० (व्यः) पुतण्या, बंधूचा पुत्र.

**भ्रात्रीय**, पु० (यः) पुतण्या, बंधूचा पुत्र.

**भ्रामक**, पु० (कः) कोल्हा. २ धूर्त. ३ सूर्यकांत. ४ भेद.

**भ्रामर**, न० (रं) मध. २ पाषाणविशेष.

**भ्रामरी**, स्त्री० (री) पार्वती.

**भ्राष्ट्र**, पु० (ष्ट्रः) भर्जनपात्र, खापर.

**भ्रुकुंस**, पु० (सः) स्त्रीवेष धारण करून नाचणारा पुरुष.

**भ्रुकुटि**, स्त्री० (टिः) रागानें वक्र जी भोंवई ती.

**भ्रूण**, पु० (णः) अर्भक, बालक. २ स्त्रीचा गर्भ.

**भ्रेष**, पु० (षः) भ्रंश, पतन.

## म.

**म**, पु० (मः) यम. २ समय, वेळ. ३ वीष ४ मधुसूदन. ५ महादेव.

**मकर**, पु० (रः) जलचरविशेष ज्यास मगर असें म्हणतात तो. २ मकर रास. ३ निधिविशेष.

**मकरंद**, पु० (दः) पुष्पसंबंधीं मधु, पुष्परस.

**मकरध्वज**, पु० (जः) मदन, काम. २ राक्षसविशेष, मगरीविशेष.

**मकरांक**, पु० (कः) मदन, काम.

**मकरालय**, पु० (यः) समुद्र.

**मकुट**, न० (टं) किरीट.

**मकुर**, पु० (रः) दर्पण, आरसा. २ बकुळ वृक्ष. ३ कुंभाराचा मडकीं करण्याचा दंड.

**मंकुर**, पु० (रः) दर्पण, आरसा.

**मकुष्टक**, पु० (कः) मठ, मटकी म्हणतात तें धान्य.

**मकुष्ठ**, पु० (ष्ठः) धान्य विशेष ज्यास मटकी असें म्हणतात तें. २ वि० (ष्ठः ष्ठा- ष्ठं) मंद चालणारा.

**मकुष्ठक**, पु० (कः) धान्यविशेष ज्यास मटकी असें म्हणतात तें.

**मकूति**, स्त्री० (तिः) शूद्रशासन.

**मकूलक**, पु० (कः) वनौषधि ज्यास दांती असें म्हणतात ती.

**मक्कोल**, पु० (लः) शिलाधातु.

**मख**, पु० (खः) यज्ञ.

**मखानल**, पु० (लः) यज्ञसंबंधीं अग्नि, त्रिस्तव.

**मगध**, पु० (धः) स्तुतिपाठविशेष. २ देशविशेष.

**मंगल**, न० (लं) कल्याण. २ पु० (लः) मंगळ नामा ग्रह. ३ न० (लं) सर्वार्थ रक्षण. ४ मंगल.

**मंगला**, स्त्री० (ला) पांढरी दुर्वा. २ उमा, पार्वती.

**मंगल्य**, पु० (ल्यः) धान्यविशेष ज्यास मसूर असें म्हणतात तें. २ पिंपळाचें झाड. ३ बेलाचें झाड. ४ न० (ल्यं) दहीं. ५ वि० (ल्यः ल्या ल्यं) कल्याणकारक.

**मंगल्यक**, पु० (कः) धान्यविशेष. ज्यास मसूर असें म्हणतात तें.

**मंगल्या**, स्त्री० (ल्या) मोगरीच्या फुलासारखा सुगंधिक चंदनविशेष. २ त्रायमाणानामें वनौषधि. ३ शमीचें झाड. ४ शाकविशेष ज्यास शोपेची भाजी असें म्हणतात ती. ५ वेखंड.

**मघ**, पु० (घः) द्वीपविशेष.

**मघवन्**, पु० (वा) इंद्र.

**मघा**, स्त्री० (घा) धान्यविशेष. २ नक्षत्रविशेष.

**मघाभव**, पु० (वः) शुक्र ग्रह.

**मघाभू**, पुं० भूः शुक्रग्रह.

**मघी**, स्त्री० (घी) धान्यविशेष.

**मंच**, पु० (चः) पलंग, बाज.

**मंचक**, पु० (कः) पलंग, बाज.

**मचर्चिका**, स्त्री० (का) प्रशस्त. (ह्या शब्दास लिंगांतर होत नाहीं.)

**मंजर**, न० (रं) पुष्पमंजिरी, केसर.

**मंजरि**, स्त्री० (रिः) केसर.

**मंजरी**, स्त्री० (री) केसर. २ वृक्षविशेष.

**मंजि**, स्त्री० (जिः) पुष्पमंजरी, केसर.

**मंजिका**, स्त्री० (का) वेश्या.

**मंजिफला**, स्त्री० (ला) केळ.

**मंजिष्ठा**, स्त्री० (ठा) वनौषधिविशेष.

**मंजीर**, पु० (रः) पादभूषण, नूपुर, तोरड्या, पैंजण इत्यादि.

**मंजील**, पु० (लः) पादभूषण, नूपुर, तोरड्या, पैंजणइत्यादि.

**मंजु**, वि० (जुःजुः जु) सुंदर.

**मंजुघोष**, स्त्री० (षः) पूर्वजिन.

**मंजुघोषा**, पु० (षा) जिचा आवाज मधुर, सुंदर ती.

**मंजुभद्र**, पु० (द्रः) पूर्वजिन.

**मंजुल**, वि० (लःला-लं) सुंदर. २ सभोंवताल्या वेली असून त्यांनीं आच्छादित जी जागा ती, जाळी. ३ जलांचल.

**मंजुश्री**, पु० (श्रीः) पूर्वजिन.

**मंजूषा**, स्त्री० (षा) वस्त्रें अलंकार इत्यादि ठेवण्याची पेटी.

**मज्जन्**, पु० (ज्जा) वृक्षादिकांचा स्थिरांश, ज्यास गाभा नर, असें म्हणतात तो.

**मंटूर**, न० (रं) लोखंडाचा मळ, कीट.

**मट्टक**, पु० (कः) आटाळें.

**मठ**, पु० (ठः) शिष्य, सन्यासी, क्षपणणक्, गोसावी इत्यादिकांचें राहण्याचें घर. २ गाडा, खांचर.

**मंठ**, पु० (ठः) कडवासुरण.

**मंड**, पु० (डः) एरंडाचें झाड. २ पु० न० (डःडं) पातळ द्रव्याचा वरचा द्रव ज्यास निवळी असें म्हणतात ती. ३ वृक्षादिकांचा स्थिरांश ज्यास गाभा नर, गर असें म्हणतात तो. ४ न० (डं) मोराचें पीस.

**मंडन**, न० (नं) अलंकार. २ वि० (नः-ना-नं) अलंकरणशील. ३ न० (नं) विवाह. ४ शुभकार्य.

**मंडप**, पु० (पः) मांडव. २ धान्य ठेवण्याचें गृह, कोठी, कोठार.

**मंडयंती**, स्त्री० (ती) स्त्री, बायको.

**मंडल**, न० (लं) वर्तुळ आकार. २ समुदाय. ३ चंद्रबिंब. ४ सैन्याचा स्थितिविशेष. ५ कुष्ठरोग, कोड. ६ पु० (लः) कुत्रा.

**मंडलक**, न० (कं) कुष्टरोग. २ (गजकर्ण असेंही कोणी म्हणतात.) ३ धनुर्धरांचा स्थितिविशेष. ४ बिंब. ५ आरसा.

**मंडलाग्र**, न० (ग्रं) तरवार, खड्ग.

**मंडलिन्** पु० (ली) साधारण सर्प.

**मंडली**, स्त्री० (ली) दुर्वा.

**मंडलेश**, पु० (शः) मांडलिक राजा.

**मंडलेश्वर**, पु० (रः) मांडलिक राजा.

**मंडहारक**, पु० (कः) सुराजीवि, कलाल.

**मंडा**, स्त्री० (डा) मद्य, पिण्याची दारू. २ आंवळीचें झाड.

**मंडित**, वि० (तःता-तं) अलंकृत.

**मंडूक**, पु० (कः) दिंड्याचें झाड. २ गुप्त प्रभाव पुरुष. ३ मुनिवि०. ४ बेडूक.

**मंडूकपर्ण**, पु० (र्णः) दिंड्याचें झाड.

**मंडूकपर्णी**, स्त्री० (र्णी) वनौषधि ज्यास मंजिष्ठा असें म्ह० ती. २ वनौषधि जीस भारंग असें म्ह०.

**मंडूकी**, स्त्री० (की) वनौषधि मंजिष्ठा.

**मंडूर**, न० (रं) लोखंडाचा मळ, कीट. २ पु० (रः) रसायणवि०.

**मंडोदक**, न० (कं) मनाचा संतोष. २ तृप्ति. ३ प्रीति, भक्षणाची इच्छा.

**मड्डु**, पु० (ड्डुः) वाद्यवि०.

**मड्डुक**, पु० (कः) वाद्यविशेष ज्यास मृदंग असें म्ह० तो.

**मणि**, पु० (णिः) रत्न. २ डेरा, माठ. ३ पाषाणवि० ज्यास चंद्रकांत, सूर्यकांत असें म्हणतात ते प्रत्येक. ४ कंठस्थ हाड, कंठावर मणी असतो तो. ५ शिस्न. ६ लिंगाचें अग्र.

**मणिक**, पु० (कः) मोठा कुंभ ज्यास माठ, डेरा असें म्ह० तो.

**मणित**, न० (तं) मैथुनसंबंधीं शब्द.

**मणिबंध**, पु० (धः) हात आणि प्रकोष्ठ ह्यांचा संधि, मनगट.

**मणिभद्र**, पु० (द्रः) पूर्वींचा यक्ष.

**मणिमाला**, स्त्री० (ला) मुक्ताहार. २ दंतक्षतवि०.

**मणीचक**, पु० (कः) पक्षिवि०. २ न० (कं) रुपें.

**मत**, न० (तं) इष्ट. २ जाणलेलें. ३ मत, अभिप्राय.

**मतंगज**, पु० (जः) हत्ती.

**मतल्लिका**, स्त्री० (का) प्रशस्त. (ह्या शब्दास लिंगांतर होत नाहीं.)

**मति**, स्त्री० (तिः) बुद्धि. २ इच्छा. ३ स्मृति.

**मंतु**, पु० (तुः) अपराध. २ मनुष्य. ३ प्रजापति.

**मत्कूण**, पु० (णः) दंतरहित हत्ती. २ ज्याला मिशा नाहींत तो पुरुष. ३ नारळ. ४ ढेंकूण.

**मत्कूट**, पु० (टः) मदनांकुश.

**मत्त**, पु० (त्तः) ज्याच्या गंडस्थळापासून मदस्त्राव होत असतो तो गज, हत्ती. २ माजलेला, उन्मत. ३ हर्षयुक्त.

**मत्तकाशिनी**, स्त्री० (नी) गुणांनीं उत्कृष्ट जी स्त्री ती.

**मत्तकासिनी**, स्त्री० (नी) गुणांनीं उत्कृष्ट जी स्त्री ती.

**मत्तवारण**, पु० (णः) मस्त हत्ती.

**मंत्र**, पु० (त्रः) गुप्तवाद, एकांतीचा विचार. २ वेदांचा अंश. ३ देवतादिकांचें साधनवि०. ४ उपदेश.

**मंत्रगंडक**, पु० (कः) विद्या.

**मंत्रव्याख्याकृत्**, पु० (त्) आचार्य.

**मंत्रिन्**, पु० (त्री) राजास बुद्धीचें सहाय्य करणारा प्रधान. २ मंत्रवेत्ता, जारणादि शास्त्र जाणणारा.

**मत्सर**, पु० (रः) दुसऱ्याचें कल्याण अथवा उत्कर्ष सहन न करणें. २ मत्सरयुक्त. ३ कृपण. ४ क्रोध, राग.

**मत्सरा**, स्त्री० (रा) माशी.

**मत्स्य**, पु० (त्स्यः) मासा. २ देशवि०.

**मत्स्यंडी**, स्त्री० (डी) राब, काकवी.

**मत्स्यनाशन**, पु० (नः) कुररी पक्षिवि०.

**मत्स्यपित्ता**, स्त्री० (त्ता) वनौषधि ज्यास कुटकी असें म्ह०.

**मत्स्यरंक**. पु० (कः) पक्षिवि०.

**मत्स्यराज**, पु० (जः) मत्स्यवि०.

**मत्स्यवेदन**, न० (नं) गळ, गरी.

**मत्स्याधानी**, स्त्री० (नी) मत्स्य ठेवण्याची करंडी.

**मत्स्याशन**, पु० (नः) मीनरंक पक्षिविशेष. २ बक, बगळा.

**मत्स्याक्षी**, स्त्री० (क्षी) वनौषधि जीस सोमलता असें म्हणतात ती. २ चाकवत. ३ मीनाकृती डोळे ज्या स्त्रीचे आहेत ती स्त्री.

**मंथ**, पु० (थः) मंथन करण्याचा दंड, रवि. २ सूर्य. ३ वध. ४ माथ्या.

**मंथज**, न० (जं) लोणी.

**मंथदंडक**, पु० (कः) मंथन करण्याचा दंड, रवीचा दांडा.

**मंथन**, न० (नं) घुसळणें.

**मंथनी**, स्त्री० (नी) ज्या भांड्यांत मंथन दंडानें दहीं घुसळतात तें भांडें.

**मंथर**, वि० ( रःरा- रं ) मंदगामी, मंद चालणारा. २ पु० (रः) जामदारखाना.३ फळ. ४ बाध. ५ मंथन दंड, रवि. ६ कुसुंबी. ७ मोठा. ८ वक्र, वांकडा.

**मंथरु**, पु० (रुः) चवरीचा वारा.

**मंथान**, पु० (नः) मंथन करण्याचा दंड. २ माथ्या.

**मथित**, वि० (तः ता- तं) मंथन केलेला. २ घांसलेला. ३ दमिवलेला.

**मथुरा**, स्त्री० (रा) शहरवि०, कंसाची नगरी.

**मद**, पु० (दः) गर्व. २ रेत. ३ कस्तुरी.४ हत्तीचें मदोदक. ५ हर्ष.

**मंद**, वि० (दः दा- दं) आळशी. २ मूर्ख.३ अल्प. उ० मंदोदरी. ४ अपटु, असमर्थ. ५ हीनभाग्य, निर्भाग्य. ६ पु० (दः) यम. ७ शनी. ८ रोगी. ९ स्वच्छंद. १० हत्तीची जातिविशेष.

**मदकल**, पु० (लः) मदोन्मत्त हत्ती. २ वि० (लः ला- लं) मदें करून स्पष्ट न बोलणारा. ३ पु० (लः) मद, गर्व.

**मंदगामिन्**, वि० (मी- मिनी- मि) मंद गमन करणारा.

**मंदजननी**, स्त्री० (नी) शनीची माता.

**मदन** पु० (नः) काम, रतिपति. २ वनौषधि धोत्र्याचें झाड. ३ मेण. ४ वसंत ऋतु. ५ वृक्षविशेष.

**मदनशलाका**, स्त्री० (का) कामोद्दीपक औषध. २ पक्षिविशेष ज्यास साळुंकी असें म्ह० ती.

**मदना**, स्त्री० (ना) मद्य, पिण्याची दारू.

**मदनांकुश**, पु० (शः) शिस्न.

**मदप्रयोग**, पु० (गः) प्रमदप्रयोग, उन्मत्तपणाचा उपाय.

**मदयित्नु**, पु० (त्नुः) उन्मत्त. २ मेघ. ३ न० (त्नु) मद्य.

**मंदर**, पु० (रः) पर्वतविशेष. २ मंदारवृक्ष. ३ स्वर्गलोक. ४ वि० (रःरा-रं) मंद.

**मदस्थान**, न० (नं) मद्यगृह, दारूचें दुकान.

**मंदाकिनी**, स्त्री० (नी) भागिरथी नदी.

**मंदामणि**, पु० (णिः) मोठा कुंभ, डेरा, माठ इत्यादि.

**मदाम्रात**, पु० (तः) वाद्यविशेष (हत्तीवरची नौबत.)

**मंदार**, पु० (रः) कल्पवृक्षविशेष. २ पुष्पवृक्षविशेष. ३ कडूनिंबाचें झाड. ४ रूईचें झाड. ५ हत्ती. ६ धूर्त.

**मदार्मद**, पु० (दः) मत्स्यविशेष.

**मदांबर**, पु० (रः) इंद्राचा हत्ती.

**मदाव्ह**, पु० (व्हः) कस्तुरी.

**मंदाक्ष**, न० (क्षं) लज्जा, लाज.

**मंदिर**, न० (रं) गृह, घर. २ नगर, ३ पु० (रः) समुद्र.

**मदिरा**, स्त्री० (रा) मद्य, पिण्याची दारू.

**मदिरागृह**, न० (हं) मद्याचें घर.

**मंदुरा**, स्त्री० (रा) अश्वशाला, घोड्याची पागा. २ शय्या.

**मदोत्कट**, पु० (टः) मदोन्मत्त हत्ती. २ राजाचा हत्ती. ३ मदें करून मस्त झालेला.

**मंदोदरीश**, पु० (शः) रावण.

**मंदोष्ण**, वि० (ष्णः-ष्णा-ष्णं) किंचित् उष्ण.

**मद्गु**, पु० (द्गुः) जलकाक, पाणकावळा.

**मद्गुर**, पु० (रः) मत्स्यविशेष ज्यास मगरा असें म्ह० तो.

**मद्य**, न० (द्यं) पिण्याची दारू.

**मद्यभाजन**, पु० (नः) मद्याचें भांडें.

**मंद्र**, वि० (द्रः-द्रा-द्रं) गंभीर (शब्द.)

**मधु**, पु० (धुः) चैत्र महिना. २ न० (धु) द्राक्षामद्य. ३ मधुकपुष्पोद्भवमद्य. ४ पु० (धुः) वनौषधि ज्यास हरणवेल, हरणदोडी असें म्हणतात ती. ५ पुष्परस, फुलांतील मध. ६ वसंतऋतु. ७ दैत्यविशेष. ८ मोह्याचें झाड. ९ न० (धु) मद, मध.

**मधुक**, पु० (कः) वनौषधि, मोह्याचें झाड. २ राजाचा स्तुतिपाठकविशेष. ३ ज्येष्ठमध. ४ न० (कं) गोडें कोष्ठ. ५ पक्षि. ६ रोगवि०. ७ कीटकवि०.

**मधुकंठ**, पु० (ठः) पक्षिविशेष ज्यास कोकीळ असें म्ह० तो.

**मधुकर**, पु० (रः) भ्रमर, भुंगा.

**मधुका**, स्त्री० (का) वनौषधि ज्यास गुळवेल असें म्ह० ती. २ वल्लीभेद.

**मधुकैटभ**, पु० (टः) भ्रमर, भुंगा.

**मधुकोष**, पु० (षः) मधाचें पोळें.

**मधुक्रम**, पु० (मः) मद्य प्यावयाचा परिपाठ किंवा त्याचा काल नियम.

**मधुजा**, स्त्री० (जा) धुवासाखर.

**मधुतृण**, न० (णं) ऊंस.

**मधुत्सव**, पु० (वः) चैत्री पूर्णिमा.

**मधुदीप**, पु० (पः) मदन, काम.

**मधुदूत**, पु० (तः) आंब्याचें झाड.

**मधुद्र**, पु० (द्रः) भ्रमर, भुंगा. २ कामुक, कामाविष्ट.

**मधुद्रुम**, पु० (मः) मोह्याचें झाड. २ आंबाड्याचें झाड.

**मधुप**, पु० (पः) भ्रमर, भुंगा.

**मधुपघ्न**, न० (घ्नं) मथुरा नगर.

**मधुपर्णिका**, स्त्री० (का) वनौषधि, शिवणीचें झाड. २ वनौषधि ज्यास नीली, नीळ असें म्हणतात ती.

**मधुपर्णी**, स्त्री० (र्णी) वनौषधि जीस गुळवेल असें म्हणतात ती. २ शिवणीचें झाड. ३ वनौषधि जीस नीली, नीळ असें म्हणतात ती.

**मधुपुष्प**, पु० (ष्पः) मोह्याचें झाड.

**मधुप्रिय**, पु० (यः) बलराम.

**मधुमक्षिका**, स्त्री० (का) मधमाशी.

**मधुयष्टिका**, स्त्री० (का) वनौषधि, गोडेंकोष्ठ. २ ज्येष्ठमध.

**मधुर**, वि० (रः-रा-रं) गोड, मधुर रसयुक्त. २ प्रिय, इष्ट. ३ पु० (रः) मधुर रस. ४ न० (रं) विष.

**मधुरक**, पु० (कः) वनौषधि ज्यास जीवक असें म्हणतात ती.

**मधुरत्वच**, पु० (चः) वृक्षविशेष.

**मधुरनिस्वना,** स्त्री० (ना) मधुर स्वरयुक्त स्त्री. २ मुरली.

**मधुरसा,** स्त्री० (सा) वनौषधि ज्यास मुरवेल असें म्हणतात ती. २ द्राक्षीची वेल. ३ वनौषधि जीस दुधी असें म्हणतात ती.

**मधुरा,** स्त्री० (रा) वनौषधि शाकविशेष जीस शोपेची भाजी असें म्हणतात ती. २ पेज. ३ बडीशेप. ४ नगरविशेष. ५ वनौषधि ज्येष्टमध. ६ वनौषधि जीस मुरवेल असें म्हणतात ती.

**मधुरिका,** स्त्री० (का) वनौषधि जीस बडीशेप असें म्हणतात ती.

**मधुरिपु,** पु० (पुः) विष्णु.

**मधुलिह्,** पु० (ट्) भ्रमर, भुंगा.

**मधुवार,** पु० (रः) मद्यपानाची परिपाटी.

**मधुव्रत,** पु० (तः) भ्रमर, भुंगा.

**मधुशिग्रु,** पु० (ग्रुः) वनौषधि तांबडा शेवगा.

**मधुश्रेणी,** स्त्री० (णी) वनौषधि जीस मूर, मुरवेल असें म्हणतात ती.

**मधुष्ठील,** पु० (लः) मोह्याचें झाड.

**मधुसारथि,** पु० (थिः) मदन, काम.

**मधुसूदन,** पु० (नः) भ्रमर, भुंगा. २ विष्णु.

**मधुस्रवा,** स्त्री० (वा) वनौषधि जीस हरणदोडी, हरणवेल असें म्हणतात ती.

**मधुक्षीर,** पु० (रः) खजुराचें झाड.

**मधूक,** पु० (कः) मोह्याचें झाड.

**मधूछिष्ट,** न० (ष्टं) मेण.

**मधूलक,** पु० (कः) पाण्यांत जो मोहावृक्ष उत्पन्न होतो तो.

**मधूलिका,** स्त्री० (का) वनौषधि जीस मुरवेल असें म्हणतात ती.

**मध्य,** पु० न० (ध्यः ध्यं) शरीराचा मध्यभाग, कमर. २ मध्यभाग. ३ अंत. ४ न० (ध्यं) वर्तुळाकृति. ५ वि० (ध्यः ध्या- ध्यं) अधम, निकृष्ट. ६ न्याय्य, युक्त.

**मध्यदेश,** पु० (शः) हिमाचल व विंध्याद्रि ह्यांचा मध्य, व विनशन (म्हणजे कुरुक्षेत्र) तीर्थाच्या पूर्वेस आणि प्रयागाच्या पश्चिमेस जो देश तो, मध्यदेश.

**मध्यम,** पु० (मः) गायनाच्या सात स्वरांतील एक स्वर. २ शरीराचा मध्यभाग, कमर. ३ मध्यदेश. ४ मधला. ५ उत्तम, आणि कनिष्ट नव्हे तो.

**मध्यलोक,** पु० (कः) पृथ्वी.

**मध्यमा,** स्त्री० (मा) जीस प्रथमच रजोदर्शन प्राप्त झालें आहे ती स्त्री. २ मध्यमांगुली. ३ कमळांतील केश.

**मध्यस्थ,** पु० (स्थः) तिराईत. २ दलाल. ३ उभयतांच्या मध्यें स्नेह किंवा वैर पाडणारा. ४ स्त्री० (स्था) कुंटण.

**मध्यक्ष,** न० (क्षं) प्रत्यक्ष.

**मध्यान्ह,** पु० न० (न्हः न्हं) दिवसाचा मध्यभाग.

**मध्वासव,** पु० न० (वः वं) मधुक पुष्पापासून उत्पन्न जें मद्य तें.

**मन,** न० (नं) हत्तीच्या पाठीचें मांस.

**मनआप,** पु० (पः) मनोरम.

**मनःशिल,** पु० (लः) धातुविशेष ज्यास मनशीळ असें म्हणतात तें.

**मनःशिला,** स्त्री० (ला) धातुविशेष ज्यास मनशीळ असें म्ह० तें.

**मनस्,** न० (नः) हृदय, अंतःकरण. २ बुद्धि.

**मनसादेवी**, स्त्री० (वी) जरत्कारूची स्त्री.

**मनस्कार**, पु० (रः) मनास जी सुखादिकांविषयीं तत्परता ती.

**मनस्ताल**, पु० (लः) पार्वतीचा सिंह.

**मनाक्**, अ० किंचित. २ मंद ह्या अर्थी.

**मनिछिद्रा**, स्त्री० (द्रा) औषधिविशेष जीस बैलघांटी असें म्हणतात ती.

**मनित**, वि० (तः ता· तं) अवगत, जाणलेला, मानिलेला.

**मनीषा**, स्त्री० (षा) बुद्धि. २ इच्छा.

**मनीषिन्**, पु० (षी) पंडित, विद्वान.

**मनु**, पुं० (नुः) विष्णु. २ सूर्यवंशांतील इक्ष्वाक राजाचा बाप. ३ स्मृति करणारा.

**मनुज**, पु० (जः) मनुष्य.

**मनुराट्**, पु० (ट्) कुबेर.

**मनुष्य**, पु० (ष्यः) मनुज, मनुष्य.

**मनुष्यधर्मन्**, पु० (र्मा) कुबेर.

**मनुष्ययज्ञ**, पु० (ज्ञः) आपल्या घरीं आलेल्यांचा अन्नोदकांनीं संतोष करणें.

**मनोगुप्ता**, स्त्री० (प्ता) धातुविशेष ज्यास मनशीळ असें म्हणतात तें.

**मनोजन्मन्**, पु० (न्मा) मदन, काम.

**मनोजव**, वि० ( वः वा- वं ) बापासारखा. २ पु० (वः) मारुती, हनूमान.

**मनोजवस**, वि० ( सःसा·सं ) बापासारखा.

**मनोरथ**, पु० (थः) इच्छा.

**मनोरम**, पु० (मः) स्त्री० न० ( मा- मं ) सुंदर. २ मनाला रमविणारा.

**मनोरमा**, स्त्री० (मा) लक्ष्मी. २ स्त्री. व्याकर्ण शास्त्रसंबंधीं कौमुदी टीका.

**मनोह्वा**, स्त्री० (ह्वा) धातुविशेष ज्यास मनशीळ असें म्हणतात तें.

**मनोहत**, वि० ( तः ता- तं ) मनांत विरस झालेला.

**मनोहर**, वि० ( रः रा- रं ) सुंदर. २ मनहरण करणारा.

**मनोहारिन्**, वि० ( री- रिणी· रि ) स्पष्ट (वचन.) २ सुंदर.

**मनोज्ञ**, वि० ( ज्ञः ज्ञा- ज्ञं ) सुंदर. २ मनोरम.

**मन्मथ**, पु० (थः) मदन, काम. २ कवठीचें झाड. ३ कामचिंता.

**मन्मन**, पु० (नः) गद्दिवरयुक्त भाषण. २ न० (नं) सुरताच्या वेळेस नवऱ्या बायकोचें जें भाषण तें.

**मन्या**, स्त्री० (न्या) मानेची पाठीमागची शीर.

**मन्यु**, पु० (न्युः) शोक. २ दैन्य. ३ कोप, राग. ४ यज्ञ.

**मन्वंतर**, न० (रं) देवांचीं ७१ एकाहत्तर युगें.

**मपष्ठक**, पु० ( कः ) धान्यविशेष ज्यास मठ, मटकी असें म्हणतात तें.

**मपुष्टक**, पु० ( कः) धान्यविशेष ज्यास मठ, मटकी असें म्हणतात तें.

**मय**, पु० ( यः ) उंट. २ विश्वकर्मा. ३ मयनामा दैत्य. अ० मिसळणें. उ० मनोमयी.

**मयट**, न० (टः) गवताचें घर.

**मयष्टक**, पु० ( कः ) धान्यविशेष ज्यास मठ, मटकी असें म्हणतात तें.

**मयु**, पु० ( युः ) देवयोनीविशेष, किन्नर. २ यज्ञसंबंधीं घोडा. ३ मृग. ४ घोडा.

**मयुष्टक**, पु० ( कः ) धान्यविशेष ज्यास मठ, मटकी असें म्हणतात तें.

**मयूख**, पु० (खः) किरण. २ शोभा. ३ ज्वाला. ४ ग्रंथाचें नांव.

**मयूर**, पु० (रः) मोर. २ वनौषधि ज्यास मोरशेंडा असें म्हणतात तो. ३ आघाड्याचें झाड.

**मयूरक**, पु० (कः) आघाड्याचें झाड. २ न० (कं) मोरचूद.

**मयूरचटक**, पु० (कः) कोंबडा.

**मरकत**, न० (तं) रत्नविशेष, पाच.

**मरण**, न० (णं) मृत्यु. २ पु० (णः) हत्या करणारा.

**मराल**, न० (लं) आर्द्र, ओलें. पु० (लः) राजहंस.

**मरिच**, न० (चं) मिरीं.

**मरीच**, न० (चं) मिरीं.

**मरीचि**, पु० (चिः) किरण. २ मरीच नामा ऋषि. (मरीचि शब्दास स्त्री लिंगत्वही कोठें सांगितलें आहे.)

**मरीचिका**, स्त्री० (का) मृगजळ.

**मरु**, पु० (रुः) निर्जल देश. २ पर्वत.

**मरुंडा**, स्त्री० (डा) उंच कपाळाची स्त्री. २ जीच्या भोंवया उंच आहेत ती.

**मरुत्**, पु० (त्) वायु. २ देव. ३ वनौषधि ज्यास गंठीवन, भटोरा असें म्ह० ती. ४ उंट. ५ आकाश.

**मरुत्पव**, पु० (वः) सिंह.

**मरुत्वत्**, पु० (वान्) इंद्र.

**मरुद्रथ**, पु० (थः) अश्व, घोडा.

**मरुद्वाह**, पु० (हः) धूर.

**मरुन्माला**, स्त्री० (ला) वनौषधि जीस पृक्का, पिंडिका असें म्हणतात ती.

**मरुबक**, पु० (कः) वनौषधि गेळ्याचें झाड. २ वनौषधि जंबीर, पांढरा मरवा. ३ पुष्पविशेष. ४ धोत्र्याचें झाड.

**मरुभू**, पु० ब० (भुवः) देशविशेष.

**मरोलि**, पु० (लिः) जलचर विशेष ज्यास सुसर असें म्हणतात तो.

**मर्कट**, पु० (टः) वानर. २ साळिंदर. ३ गलगंड पक्षिविशेष.

**मर्कटक**, पु० (कः) कीटकविशेष ज्यास कोळी असें म्हणतात तो. २ वानर. ३ धान्यविशेष.

**मर्कटी**, स्त्री० (टी) करंजवृक्षविशेष. २ वनौषधि जीस कुवली, कुहिरी असें म्हणतात. ती ३ वृक्षविशेष.

**मर्जू**, स्त्री० (र्जूः) शुद्धि. २ पु० (र्जूः) धांवणारा.

**मर्त्य**, पु० (र्त्यः) मनुष्य. २ पृथ्वी.

**मर्दन**, न० (नं) आंवळणें. २ रगडणें. ३ घोटणें. ४ पु० (नः) वाद्यविशेष ज्यास मृदंग असें म्हणतात तो.

**मर्दल**, पु० (लः) मृदंगासारखें एक वाद्य आहे.

**मर्मन्**, न० (र्म) संधिस्थान.

**मर्मर**, पु० (रः) वस्त्रें, पानें इत्यादि वाजून जो शब्द उत्पन्न होतो तो. २ न० (रं) वस्त्रविशेष.

**मर्मरी**, स्त्री० (री) दारुहळद.

**मर्मस्पृश्**, पु० (क्) मर्मभेद करणारा.

**मर्यादा**, स्त्री० (दा) न्याय मार्गानें वागणें. २ सीमा. ३ स्थिति.

**मल**, पु० न० (लः लं) बांरा प्रकारचे मळ.

---

१ वसा. २ शुक्र. ३ असृक्. ४ मज्जा. ५ कर्ण ६ विष्ठा. ७ मूत्र. ८ नख. ९ श्लेष्मा. १० अश्रु. ११ दूषिका. १२ स्वेद. (हे बारा प्रकारचे मळ होत.)

२ पाप. ३ वि० (लः ला- लं) कृपण. ४ अस्वच्छता करणारा.

**मलकारिका,** स्त्री० (का) चूल.

**मलदूषित,** वि० (तः ता- तं) मलीन, मळकट.

**मलन,** पु० (नः) सुवासिक द्रव्य विशेष ज्यास बुका असें म्हणतात तो. २ न० (नं) मर्दन.

**मलपू,** पु० (पूः) वृक्षविशेष ज्यास काळा उंबर, बोखाडा, खर्वत असें म्हणतात तो.

**मलय,** पु० (यः) मलयनामा पर्वत. २ पर्वताचा भाग. ३ देशविशेष. ४ बगीचा.

**मलयज,** पु० (जः) मलयागरु, मैलागिरि चंदन.

**मलया,** स्त्री० (या) वनौषधि जीस तेंडू, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती.

**मला,** स्त्री० (ला) नाळसें.

**मलिन,** वि० (नः ना- नं) अनुज्वल, मळकट. २ न० (नं) दूषित.

**मलिनमुख,** पु० (खः) अग्नि. २ गाईचें पुच्छ. ३ वि० (खः खा- खं) क्रूर.

**मलिना,** स्त्री० (ना) ऋतुमती स्त्री.

**मलिनी,** स्त्री० (नी) ऋतुमती स्त्री.

**मलिम्लुच,** पु० (चः) चोर, चोरी करणारा. २ मासविशेष. ३ अग्नि, विस्तव. ४ अधिक महिना.

**मलिष्ठा,** स्त्री० (ष्ठा) मलिन स्त्री.

**मलीमस,** पु० (सः) स्त्री० न० (सा- सं) अनुज्वल, मळकट. २ पु० (सः) लोखंड.

**मल्ल,** पु० (ल्लः) बाहुयुद्धाविषयीं जो कुशल तो. २ गाल. ३ पात्र. ४ मत्स्यविशेष. ५ बळकट. ६ सोमल. ७ न० (ल्लं) कल्याण.

**मल्लक,** पु० (कः) पुष्पवल्लीविशेष जीस मोगरी असें म्हणतात ती.

**मल्लतूर्य,** न० (र्यं) वाद्यविशेष.

**मल्लनाग,** पु० (गः) इंद्राचा हत्ती. २ वात्स्यायन नांवाचा ऋषि.

**मल्लभू,** स्त्री० (भूः) तालमीची जागा.

**मल्लयात्रा,** स्त्री० (त्रा) पैलवानांचें गमन.

**मल्लिक,** पु० (कः) हंसविशेष.

**मल्लिका,** स्त्री० (का) पुष्पवल्ली विशेष जीस मोगरी असें म्हणतात ती. २ मत्स्य विशेष. ३ मृत्तिका पात्रविशेष.

**मल्लिकाक्ष,** पु० (क्षः) हंसपाक्षिविशेष.

**मल्लिपत्र,** न० (त्रं) कोथिंबीर. २ बडीशेप. ३ वेखंडाचा भेद.

**मशक,** पु० (कः) पक्षि विशेष. २ मशक.

**मस्,** पु० (माः) महिना. २ चंद्र.

**मसार,** पु० (रः) रत्नविशेष ज्यास नील असें म्हणतात तें.

**मसि,** स्त्री० (सिः) जटामांसीलता. २ कज्जल, काजळ. ३ पत्रांजन, शाई.

**मसिपण्य,** पु० (ण्यः) लेखक.

**मसिमणि,** स्त्री० (णिः) दऊत.

**मसिवर्धन,** न० (नं) धातुविशेष ज्यास बोळ, रक्त्याबोळ असें म्हणतात तो.

**मसी,** स्त्री० (सी) जटामांसीलता. २ कज्जल, काजळ.

**मसीजल,** न० (लं) शाई.

**मसुर,** पु० स्त्री० (रः रा) मसुर नामक धान्य. २ पु० (रः) विडा रंगणें.

**मसुरा,** स्त्री० (रा) वेश्या. २ मसुर नामक धान्य.

**मसूर,** पु० स्त्री० (रः रा) मसुर नामक धान्य.

**मसूरक**, पु० (कः) उपबर्हण, उशी. २ मसुर नामक धान्य.

**मसूरविदला**, स्त्री० (ला) वनौषधि ज्यास काळा तेंडू, तिधारें, निगडी असें म्हणतात ती.

**मसूरा**, स्त्री० (रा) वेश्या. २ धान्यविशेष (मसुर.)

**मसूरी**, स्त्री० (री) रोगविशेष. २ व्रणविशेष. ३ उशी.

**मसृण**, वि० (णः णा- णं) स्निग्ध, ओला. २ जो कर्कश नव्हे तो.

**मस्कर**, पु० (रः) वेणु, वेळू.

**मस्करिन्**, पु० (री) सन्यासी.

**मस्तक**, पु० (कः) डोकें.

**मस्तिष्क**, न० (ष्कं) मस्तकांत तुपासारखा जो स्नेह उत्पन्न होतो ज्यास मेंदु असें म्हणतात तो.

**मस्तु**, न० (स्तुं) दह्यावरची निवळी. २ दहीं गाळलें असतां वस्त्रांतून जें पाणी गळतें तें.

**मस्तुलुंग**, पु० (गः) मेंदु.

**मह**, पु० (हः) उत्साह. २ तेज.

**महत्**, न० (त्) राज्य. २ पु० (हान्) तत्वविशेष. ३ वि० (हान्. हती. हत्) वृद्ध, विस्तीर्ण, मोठा.

**महती**, स्त्री० (ती) नारदाची वीणा.

**महत्तर**, पु० (रः) फार मोठा.

**महस्**, न० (हः) तेज. २ उत्साह.

**महाकच्छ**, पु० (च्छः) समुद्र. २ वरुण.

**महाकंद**, पु० (दः) लसूण. २ शाकविशेष, मुळा.

**महाकपित्थ**, पु० (त्थः) वृक्षविशेष.

**महाकांता**, स्त्री० (ता) पृथ्वी.

**महाकाय**, पु० (यः) महाकाळ.

**महाकाल**, पु० (लः) महाकाळ. २ वृक्षविशेष. ३ महादेव. ४ कृपण.

**महाकुल**, पु० (लः) सज्जन.

**महांग**, पु० (गः) उंट.

**महाघोष**, पु० (षः) अतिघोषण. २ न० पु० (षं- षः) बाजार.

**महाघोषा**, स्त्री० (षा) वनौषधि जीस अतिविषा, अतिविख असें म्हणतात ती.

**महाचंड**, पु० (डः) यमाचा सेवक.

**महाजाली**, स्त्री० (ली) दोडकी, घोंसाळी.

**महातारा**, स्त्री० (रा) लक्ष्मी.

**महादंत**, पु० (तः) हस्तिदंत.

**महादेव**, पु० (वः) शिव.

**महाधन**, वि० (नः ना- नं) मोठे किमतीचें (वस्त्रादि) २ न० (नं) सुवर्ण, सोनें. ३ पण्यविशेष ज्यास लोबाण, ऊद असें म्हणतात तो.

**महानट**, पु० (टः) महादेव.

**महानद**, पु० (दः) वाद्यविशेष.

**महानस**, पु० (सः) सैंपाकघर, पाकशाळा.

**महानाद**, पु० (दः) हत्ती. २ वर्षाकालाचा मेघ. ३ मोठी गर्जना.

**महानील**, पु० (लः) भृंगराज, माका. २ रत्नविशेष. ३ नागविशेष.

**महापद्म**, पु० (द्मः) नागविशेष. २ पु० न० (द्मः द्मं) निधिविशेष. ३ पु० (द्मः) संख्याविशेष.

**महाबल**, न० (लं) सिसें. २ वि० (लः) ला- लं) बळिष्ठ, बलिष्ठ. ३ पु० (लः) बौद्धावतार.

**महाबिल**, न० (लं) आकाश.

**महाबृहती**, स्त्री० (ती) डोरली वांगी.

**महाबोधि**, पु० (धिः) बौद्धावतार.
**महाभीभ**, पु० (भः) महाकाल.
**महाभीष्म**, पु० (ष्मः) शंतनु.
**महामद**, पु० (दः) गज, हत्ती.
**महामात्र**, पु० (त्रः) राजाचा मुख्य प्रधान. २ माहुतांमध्यें श्रेष्ठ. ३ संपन्न, धनवान.
**महामुनि**, पु० (निः) अगस्त्य ऋषि. २ कोथिंबीर, धना. ३ बौद्धावतार.
**महामूल्य**, पु० (ल्यः) पद्मराग. २ वि० (ल्यः ल्या- ल्यं) मोठ्या मोलाचा.
**महामृग**, पु० (गः) हत्ती.
**महारजत**, न० (तं) सुवर्ण, सोनें.
**महारजन**, न० (नं) कुसुंभा. २ सुवर्ण, सोनें.
**महारण्य**, न० (ण्यं) मोठें अरण्य.
**महारस**, पु० (सः) खजुराचें झाड. २ ऊंस.
**महाराज**, पु० (जः) पूर्वजिन. २ सार्वभौमराजा.
**महाराजिक**, पु० (कः) देवांचा गणविशेष.
**महारूपक**, न० (कं) नाटक (ग्रंथ.)
**महारौरव**, पु० (वः) नरकविशेष.
**महार्घ**, पु० (र्घः) बहुमोल, फार मोल. २ लावापक्षि. ३ महाग.
**महालय**, पु० (यः) विहार. २ तीर्थक्षेत्र. ३ परमात्मा.
**महावात**, पु० (तः) मोठा वारा.
**महाविष**, पु० (षः) कालसर्प.
**महावीर**, पु० (रः) शूर. २ गरुडपाक्षि. ३ सिंह. ४ यज्ञसंबंधीं अग्नि.
**महावीर्य**, पु० (र्यः) बौद्धभेद.
**महावीर्या**, स्त्री० (र्या) यममाता.
**महाव्रतिन्**, पु० (ती) नवीन मुंज झालेला.
**महाशंख**, न० (खं) मनुष्याचा अस्थिविशेष. ३ कपाळ. ४ संख्याविशेष.
**महाशय**, वि० (यः या- यं) चित्ताचा उदार, व दयाळू.
**महाशल्क**, पु० (ल्कः) मत्स्यविशेष.
**महाशूद्री**, स्त्री० (द्री) गोपालिका, गवळण.
**महाश्रमण**, पु० (णः) शाक्यमुनि.
**महाश्री**, स्त्री० (श्री) लक्ष्मी.
**महाश्वेता**, स्त्री० (ता) वनौषधि काळी भुई कोंहळी. २ सरस्वती. ३ धुवासाखर.
**महासहा**, स्त्री० (हा) एक फुलझाड आहे ज्यास आबोली असें म्हणतात तें. २ वनौ० रानउडीद.
**महासुख**, न० (खं) मैथून. २ पु० (खः) बौद्धावतार.
**महासेन**, पु० (नः) कार्तिकस्वामी. २ महासैन्याचा पति.
**महास्वन**, न० (नं) वाद्यविशेष.
**महिका**, स्त्री० (का) हींव, बर्फ. २ महिरावणाची नगरी.
**महिर**, पु० (रः) सूर्य.
**महिला**, स्त्री० (ला) स्त्री, बायको. २ वनौषधि प्रियंगुवृक्ष ज्यास वाघांटी असें म्हणतात ती.
**महिष**, पु० (षः) रेडा. हल्या. २ गवापशू.
**महिषध्वज**, पु० (जः) यम.
**महिषवाहन**, पु० (नः) यम.

**महिषी**, स्त्री० (षी) पट्टाभिषिक्त स्त्री. २ म्हैस. ३ औषधिविशेष.

**मही**, स्त्री० (ही) पृथ्वी. २ वनौषधि जीस कुटकी असें म्हणतात ती. ३ नदीविशेष.

**महीध्र**, पु० (ध्रः) पर्वत.

**महीप्राचीर**, पु० (रः) समुद्र.

**महीरुह**, पु० (हः) वृक्ष.

**महीलता**, स्त्री० (ता) जलचरविशेष ज्यास केंचू, कांडूं, दानवार, गांडोळ असें म्हणतात तें.

**महीसुत**, पु० (तः) मंगळ नामा ग्रह.

**महीक्षित्**, पु० (त्) राजा.

**महेच्छ**, वि० (च्छः च्छा- च्छं) महाशय, मोठा उदार, व दयाळू.

**महेंद्र**, पु० (द्रः) इंद्र. २ पर्वतविशेष.

**महेरणा**, स्त्री० (णा) वनौषधि जीस सालई असें म्हणतात ती.

**महेरुणा**, स्त्री० (णा) वनौषधि जीस सालई असें म्हणतात ती.

**महेश्वर**, पु० (रः) महादेव. २ देशांतरीचे सर्व राजे ज्यास नम्र आहेत असा जो राजा तो.

**महोत्पल**, न० (लं) कमळ.

**महोत्साह**, वि० (हः हा- हं) दुराप कृत्याविषयीं जो उत्साहानें उद्योग करितो तो.

**महोदय**, पु० (यः) कान्यकुब्ज देश. २ आधिपत्य. ३ मोक्ष. ४ पर्वविशेष.

**महोद्यम**, वि० (मः मा- मं) दुराप कृत्याविषयीं जो उत्साहानें उद्योग करितो तो.

**महोपासक**, पु० (कः) बौद्ध भिक्षुशिष्य.

**महोषधी**, स्त्री० (धी) वनौषधि जीस कुटकी असें म्हणतात ती.

**महोक्ष**, पु० (क्षः) मोठा बैल, पोळ.

**महौषध**, न० (धं) वनौषधि जीस अतिविषा, अतिविख असें म्हणतात ती. २ सुंठ. ३ लसूण.

**मक्ष**, पु० (क्षः) स्वदोषगुप्तता.

**मक्षिका**, स्त्री० (का) माशी.

**मंक्षु**, अ० शीघ्र. २ अत्यंत ह्या अर्थी.

**मा**, स्त्री० (मा) लक्ष्मी. २ अ० निवारणार्थी उ० माकुरु. ३ विकल्प ह्या अर्थीही आहे.

**माकंद**, पु० (दः) अतिमधुर जो आंबा त्याचें झाड.

**मागध**, पु० (धः) स्तुतिपाठकविशेष. २ वैश्यापासून क्षत्रियीचे ठायीं झालेला पुत्र. ३ देशविशेष. ४ वि० (धः धी- धं) मगध देशांत उत्पन्न झालेला. ५ पु० (धः) पांढरें जिरें. ६ भाट.

**मागधी**, स्त्री० (धी) एक फुलझाड आहे ज्यास जुई असें म्हणतात ती. २ वनौषधि जीस पिप्पली, पिंपळी असें म्हणतात ती.

**माघ**, पु० (घः) माघमास. २ माघकाव्य.

**माघ्य**, पु० (घ्यः) कुंदाचें झाड.

**माचल**, पु० (लः) कैद केलेला चोर. २ जलचरविशेष ज्यास नाडेसावज, सुसर असें म्हणतात ती. ३ रोग. ४ बळजोरीनें चोरी करणारा.

**माचिका**, स्त्री० (का) माशी.

**माठर**, पु० (रः) सूर्याचा सेवकविशेष. २ व्यास ऋषि.

**माढि**, स्त्री० (ढिः) पानाची शीर. २ दैन्य.

**माढी**, स्त्री० (ढी) पानाची शीर. २ दैन्य.

**माणव**, पु० (वः) बालक, बाळ.
**माणवक**, पु० (कः) बालक, बाळ. २ वीस सरांचा मुक्ताहार. ३ वाईट चालीचा पुरुष. ४ वडाचें झाड.
**माणव्य**, न० (व्यं) बालकांचा समूह.
**माणिक्य**, न० (क्यं) रत्नविशेष ज्यास माणिक असें म्हणतात तें.
**माणिबंध**, न० (धं) शेंदेलोण.
**माणिमंथ**, न० (थं) शेंदेलोण.
**मातंग**, पु० (गः) हत्ती. २ चंडाळ, चांडाळ.
**मातरपितरौ**, पु० (रौ) आई आणि बाप.
**मातरिश्वन्**, पु० (श्वा) वायु.
**मातलि**, पु० ( इंद्राचा सारथि.
**मातापितरौ**, पु० (रौ) आई आणि बाप.
**मातामह**, पु० (हः) आईचा बाप.
**माति**, स्त्री० (तिः) परिमाण.
**मातुल**, पु० (लः) आईचा भाऊ, मावळा, मामा. २ वनौ० धोत्र्याचें झाड. ३ धान्यविशेष.
**मातुलपुत्रक**, पु० (कः) मामाचा पुत्र. २ धोत्र्याचें फळ.
**मातुला**, स्त्री० (ला) मावळण, मामी.
**मातुलानी**, स्त्री० (नी) मावळण, मामी. २ तागाचें बीं. ३ भांग.
**मातुलाहि**, पु० (हिः) सर्पविशेष, ज्यास आधेलें, दिवड असें म्हणतात तें.
**मातुली**, स्त्री० (ली) मावळण, मामी.
**मातुलुंगक**, पु० (कः) वनौ० महाळुंगीचें झाड.
**मातृ**, स्त्री० (ता) आई. २ गाय. ३ गौर्यादि देवता. ४ ब्रम्हण्यादि माता. ५ पृथ्वी.

**मातृका**, स्त्री० (का) आई. २ उपमाता. ३ देवताविशेष.
**मातृकेशट**, पु० (टः) मामा.
**मातृमुख**, पु० (खः) मूर्ख.
**मातृष्वसेय**, पु० (यः) आईच्या बहिणीचा मुलगा, माउसभाऊ.
**मातृष्वसेयी** स्त्री० (यी) आईच्या बहिणीची मुलगी, माउसबहीण.
**मातृष्वस्त्रीय**, पु० (यः) आईच्या बहिणीचा मुलगा, माउसभाऊ.
**मातृष्वस्त्रीया**, स्त्री० (या) आईच्या बहिणीची मुलगी, माउसबहीण.
**मात्रं**, अ० अवधारणा. २ साकल्य ह्या अर्थीं. उ० पयोमात्रं भुंक्ते.
**मात्रा**, स्त्री० (त्रा) सूक्ष्म, बारीक. २ परिछेद. ३ अल्प. ४ परिमाण. ५ अक्षरावयव, मात्रा. ६ द्रव्य. ७ कर्णभूषण. ८ काल. ९ वृत्त. १० रसायण, हेमगर्भादि.
**माद**, पु० (दः) हर्ष.
**माद्रिपति**, पु० (तिः) पंडुराजा.
**माधव**, पु० (वः) विष्णु. २ वसंतऋतु ३ वैशाख मास. ४ यादव.
**माधवक**, पु० (कः) न० (कं) मधुक पुष्पापासून झालेलें मद्य.
**माधवी**, स्त्री० (वा) बडीशेप. २ वनौषधि जीस कुसरी, कस्तुर मोगरा, मधुमाधवी असें म्हणतात ती. ३ कुंटण स्त्री. ४ मद्य, दारू. ५ गाई म्हशी इत्यादि संपत्ती. ६ द्राक्षारस. ७ साखर.
**माधवीलता**, स्त्री० (ता) एक फुलझाड आहे ज्यास कुसरी, कस्तुर मोगरा, मधुमाधवी असें म्ह० ती.

**माधुर**, न० (रं) पुष्पलताविशेष जीस मोगरी असें म्ह० ती.

**माध्वी**, स्त्री० (ध्वी) मधुक पुष्पापासून झालेलें मद्य.

**माध्वीक**, न० (कं) मधुक पुष्पापासून झालेलें मद्य.

**मान**, न० (नं) तुलामान, प्रस्यमान, आणि अंगुलीमान याप्रमाणे तीन आहेत तीं प्रत्येक. २ पु० (नः) दुसऱ्यापेक्षां आपला उत्कर्ष चिंतन करण्यानें जी अहंता ती, अहंकार. ३ सत्कार.

**मानग्रंथी**, स्त्री० (थी) अपराध.

**मानरंध्रा**, स्त्री० (ध्रा) वाद्यवि०.

**मानव**, पु० (वः) मनुष्य.

**मानस**, न० (सं) मन. २ मानस सरोवर.

**मानसौकस्**, पु० (कः) हंस पक्षि.

**मानिन्**, पु० (नीः) ज्याला मान अहंकार आहे तो. २ सत्कारार्ह, सत्कार करण्यास पात्र आहे तो.

**मानिनी**, स्त्री० (नी) प्रणयकोपवती स्त्री. २ वनौषधि, प्रियंगु वृक्ष ज्यास घाघांटी असें म्ह० ती.

**मानुष**, पु० (षः) मनुष्य.

**मानुष्यक**, न० (कं) मनुष्यांचा समूह.

**मामक**, वि० (कःका-कं) माझा. २ पु० (कः) मामा.

**माय**, पु० (यः) विष्णु.

**माया**, स्त्री० (या) इंद्रजाल, गारुड. २ बुद्धि. ३ लक्ष्मी. ४ गौर्यादि देवता.

**मायाकर**. पु० (रः) गारुडी.

**मायाद**, पु० (दः) जलचरविशेष.

**मायादेवीसुत**, पु० (तः) बुद्धाचा आवंतर भेद.

**मायाविन्**, पु० (वी) गारुडी.

**मायु**, पु० (युः) पित्त.

**मायुराज**, पु० (जः) कुबेराचा पुत्र.

**मायूर**, न० (रं) मयूराचा समूह.

**मार**, पु० (रः) मदन. २ विघ्न. ३ मरण.

**मारक**, पु० (कः) हत्या करणारा.

**मारजित्**, पु० (त्) नास्तिक.

**मारण**, न० (णं) वध.

**मारि**, स्त्री० (रिः) मारणें. २ वर्ष.

**मारिष**, पु० (सः) सभ्य (नाटय प्रकरणामध्यें.)

**मारिषा**, स्त्री० (षा) दक्षाची माता.

**मारी**, स्त्री० (री) चंडी देवी. २ जनाचा नाश होणें ज्यास महामारी असें म्हणतात ती. ३ पार्वती.

**मारीच**, पु० (चः) राजाचा हत्ती. २ कंकोळ. ३ राक्षसविशेष. ४ यजन करविणारा ब्राम्हण.

**मारीची**, स्त्री० (ची) देवताविशेष. २ ईश्वरी माया.

**मारीष**, पु० (षः) सभ्य (नाटय प्रकरणामध्यें.) २ शाकविशेष.

**मारीषा**, स्त्री० (षा) दक्षाची माता.

**मारुंड**, पु० (डः) सर्पाचें आंडें. २ रस्ता, मार्ग.

**मारुत**, पु० (तः) वायु.

**मार्कव**, पु० (वः) भृंगराजा, म्हाका.

**मार्ग**, पु० (र्गः) मार्गशीर्ष मास. २ रस्ता. घाट. ३ कस्तुरी. ४ शोधणें. ५ गुदस्थान,

**मार्गण**, पु० (णः) बाण. २ याचक. ३ न० (णं) शोधणें. ४ मागणें.

**मार्गधेनु**, पु० (नुः) चार कोसांचें मान, प्रमाण.

**मार्गधेनुक,** न० (कं) चार कोस (प्रमाण.) २ योग.

**मार्गशीर्ष,** पु० (र्षः) मार्गशीर्ष मास.

**मार्गित,** वि० (तःता-तं) शोधलेला.

**मार्जन,** पु० (नः) लोध्रवृक्ष. २ न० (नं) प्रोक्षणानें शुद्ध करणें.

**मार्जना,** स्त्री० (ना) प्रोक्षणादिकें करून शरीर शुद्ध करणें, मार्जन.

**मार्जार,** पु० (रः) मांजर.

**मार्जारक,** पु० (कः) मांजर.

**मार्जारकर्णी,** स्त्री० (र्णी) चामुंडा देवी.

**मार्जारीय,** पु० (यः) शूद्र. २ मांजर. ३ देहशुद्धि.

**मार्जिता** स्त्री० (ता) लेह्य पदार्थविशेष ज्यास श्रीखंड असें म्हणतात तें.

**मार्तंड,** पु० (डः) सूर्य. २ डुकर.

**मार्तांड,** पु० (डः) सूर्य.

**मार्तिक,** पु० (कः) मातीचा परळ.

**मार्दंग,** पु० (गः) वाद्यविशेष ज्यास मृदंग असें म्हणतात तो.

**मार्दंगिक,** पु० (कः) मृदंग वाजविण्याविषयीं कुशल, मृदंगी, पखवाजी.

**मार्द्वीक,** न० (कं) द्राक्षा मद्य.

**मार्ष्टि,** स्त्री० (ष्टिः) प्रोक्षणादिकें करून देहशुद्ध करणें, मार्जन.

**माल,** पु० (लः) क्षेत्र. २ जातिविशेष, माळी.

**मालक,** पु० (कः) निंबवृक्ष.

**मालती,** स्त्री० (ती) एक फुलझाड आहे ज्यास जाई, चमेली असें म्हणतात ती.

**मालय,** पु० (यः) चंदनवृक्ष, मैलागिरी चंदन.

**मालव,** पु० (वः) देशविशेष.

**माला,** स्त्री० (ला) फुलांची माळ. २ वनौषधि जीस पिंडिका असें म्हणतात ती.

**मालाकार,** पु० (रः) शिल्पिवि० ज्यास माळी असें म्हणतात तो.

**मालातृणक,** न० (कं) जलतृणविशेष.

**मालिक,** पु० (कः) शिल्पिवि० ज्यास माळी असें म्हणतात तो. २ पक्षिविशेष.

**मालिका,** स्त्री० (का) एक फुलझाड आहे ज्यास वेलमोगरा, नेवाळी असें म्हणतात ती. २ माळ (अलंकार) ३ नदीविशेष.

**मालिनी,** स्त्री० (नी) माळ्याची स्त्री. २ वृत्तविशेष. ३ गौरी, पार्वती. ४ चंपा. ५ मंदाकिनी. ६ मातृका, देवताविशेष. ७ नगरीविशेष, कर्णपूर. ८ नदीविशेष.

**मालु,** स्त्री० (लुः) पत्रलता. २ स्त्री, बायको.

**मालुधान,** पु० (नः) सर्पविशेष ज्यास आधेलें, दिवड असें म्हणतात तें.

**मालुधानी,** स्त्री० (नी) लताविशेष.

**मालूर,** पु० (रः) बिल्ववृक्ष, बेलाचें झाड.

**माल्य,** न० (ल्यं) फुलांची माला. २ फूल.

**माल्यवत्,** पु० (वान्) माल्यवान पर्वतविशेष.

**माल्लवी,** स्त्री० (वी) पैलवानाचें गमन.

**माशब्दिक,** पु० (कः) निषेधकारी.

**माष,** पु० (षः) पांच गुंजांचा मासा. २ उडीद. ३ मूर्ख. ४ फळ.

**माषपर्णी,** स्त्री० (र्णी) वनौषधि जीस रान उडीद असें म्ह० ती.

**माषीण,** वि० (णःणा-णं) उडीद उत्पन्न होण्याचें (शेत.)

**माष्य,** वि० (ष्यः ष्या-ष्यं) उडीद उत्पन्न होण्याचें (शेत.)

**मास**, पु० (सः) महिना, दोन पक्ष.
**मांस**, न० (सं) मांस, मास.
**मासमान**, पु० (नः) वर्ष, संवत्सर.
**मासर**, पु० (रः) अन्नापासून झालेला मंड ज्यास नीस, पेज असें म्ह० ती.
**मांसल**, वि० (लःला-लं) बळिष्ठ, मांसल.
**मांसिक**, पु० (कः) मांस विकून उपजीविका करणारा, खाटिक, खाटकी असें म्हणतात तो.
**मांसी**, स्त्री० (सी) कंकोळ. २ जटामांसीलता असें म्ह० ती.
**मासीधानी**, स्त्री० (नी) दऊन.
**मासोपवासिनी**, स्त्री० (नी) एक महिना उपोषण करणारी स्त्री.
**मास्म**, अ० निवारण ह्या अर्थी. उ० मास्मकार्षीरिदंपुत्र.
**मास्तिस्क**, पु० (स्कः) मेंदु.
**माहाकूल**, पु० (लः) सज्जन.
**माहिर**, पु० (रः) इंद्र.
**माहिष्य**, पु० (ष्यः) क्षत्रियापासून वैश्येचे ठायीं झालेला पुत्र. (ह्याची वृत्ति जोसपण, शकुन सांगणें.)
**माहेयी**, स्त्री० (यी) गाय.
**माक्षिक**, न० (कं) मध, मद.
**मितद्रु**, पु० (द्रुः) समुद्र.
**मितंपच**, वि० (चः चा चं) कृपण.
**मित्र**, पु० (त्रः) सूर्य. २ न० (त्रं) सखा, मित्र. ३ पु० (त्रः) दैत्यविशेष. ४ सुगंधी द्रव्य.
**मिथः**, अ० परस्पर. २ एकांत स्थल ह्या अर्थी. उ० वासिष्ठ कौंडिण्यमैत्रावरुणानां मिथोनविवाहः २ मिथोमंत्रयते.
**मिथिला**, स्त्री० (ला) मिथिला नगर.
**मिथुन**, न० (नं) मिथुनरास. २ स्त्री आणि पुरुष. ३ द्वय, दोन.
**मिथ्या**, अ० असत्य ह्या अर्थी. उ० मिथ्योक्त.
**मिथ्यादृष्टि**, स्त्री० (ष्टिः) नास्तिकता, नास्तिक बुद्धि.
**मिथ्याभियोग**, पु० (गः) खोटा आक्षेप, खोटी फिर्याद.
**मिथ्याभिशंसन**, न० (नं) मिथ्यापापोद्भावन.
**मिथ्यामति**, स्त्री० (तिः) अयथार्थ ज्ञान.
**मिद्ध**, न० (द्धं) चित्ताभिसंक्षेप. २ आळस. ३ द्रव्य.
**मिशि**, स्त्री० (शिः) बडीशेप.
**मिशी**, स्त्री० (शी) बडीशेप.
**मिश्रक**, न० (कं) देवबाग.
**मिश्रकारण**, न० (णं) इंद्राचें वन.
**मिश्रेया**, स्त्री० (या) बडीशेप.
**मिष**, न० (षं) कपट. २ पु० (षः) स्पर्धा करणें.
**मिसि**, स्त्री० (सिः) बडीशेप. २ जटामांसीलता. ३ शोप म्हणून जी शाक आहे ती. ४ ओवा.
**मिसी**, स्त्री० (सी) बडीशेप.
**मिहिका**, स्त्री० (का) हींव, बर्फ.
**मिहिर**, पु० (रः) सूर्य. २ वृद्ध.
**मिहिरमणि**, पु० (णिः) सूर्य.
**मिहिराण**, पु० (णः) महादेव.
**मीढ**, वि० (ढः ढा- ढं) मूत्रित, मुतलेला.
**मीन**, पु० (नः) मत्स्य, मासा. २ मीन रास.
**मीनकेतन**, पु० (नः) मदन, काम.
**मीनगोधिका**, स्त्री० (का) तळी.
**मीनर**, पु० (रः) जलचरविशेष ज्यास सुसर असें म्हणतात ती.

**मीनरंक**, पु० (कः) मीनरंकपक्षिविशेष.

**मीनीम्रोण**, पु० (णः) पक्षिविशेष ज्यास ताजवा, दय्यर असें म्हणतात तो.

**मीमांसक**, पु० (कः) मीमांसा शास्त्र जाणणारा.

**मीरथ**, पु० (थः) उंट जुंफलेला रथ.

**मुकुट**, न० (टं) किरीट-

**मुकुंद**, पु० (दः) विष्णु. २ वनौषधि ज्यास पालकी, पोईशाक, वास्तु, कांकारा असें म्हणतात ती. ३ रत्नविशेष. ४ निधि-विशेष.

**मुकुंदु**, पु० (दुः) वनौषधि ज्यास पालकी, पोईशाक, वास्तु, कांकारा असें म्हणतात ती.

**मुकुर**, पु० (रः) दर्पण, आरसा.

**मुकुल**, पु० (लः) न० (लं) किंचित फुललेली कळी.

**मुकुष्ठक**, पु० (कः) धान्यविशेष ज्यास मठ, मटकी असें म्हणतात तें.

**मुकूलक**, पु० (कः) वनौषधि ज्यास दांती असें म्हणतात तो.

**मुक्त**, वि० (क्तः क्ता- क्तं) ज्याला मोक्ष प्राप्त झाला आहे तो. २ सोडलेला. स्त्री० (क्ता) मौक्तिक, मोती.

**मुक्तकंचुक**, पु० (कः) मेंग टाकलेला सर्प.

**मुक्ता**, स्त्री० (क्ता) मोती.

**मुक्ताफल**, न.० (लं) कापूर. २ मोती.

**मुक्तावली**, स्त्री० (ली) मोत्यांचा हार.

**मुक्तास्फोट**, पु० (टः) ज्यांत मोती पिकतें तो शिंपा.

**मुक्ति**, स्त्री० (क्तिः) मोक्ष. २ सोडणें.

**मुख**, न० (खं) पुढील दार. २ तोंड. ३ प्रारंभ. ४ उपाय. ५ निःसरण, निघणें. ६ नाटकांतील संधिविशेष. ७ शब्द. ८ ग्रंथादिकांची प्रस्तावना.

**मुखघंटा**, स्त्री० (टा) मुखवाद्य.

**मुखपंच**, पु० (चः) याचक.

**मुखपूरण**, पु० (णः) चूळ (पाण्याची.)

**मुखर**, वि० (रः रा- रं) अनर्गलमुख, तोंडाळ.

**मुखवाद्य**, न० (द्यं) वाजंत्री.

**मुखवासन**, पु० (नः) तोंडास सुवासिक करणारें (तांबुलादि.)

**मुखसुर**, न० (रं) ताडाची दारू.

**मुखास्त्र**, पु० (स्त्रः) खेंकडा, कुरली.

**मुख्य**, पु० (ख्यः) आद्यपक्ष. २ प्रमुख.

**मुग्ध**, वि० (ग्धःग्धा-ग्धं) मूर्ख. २ सुंदर.

**मुचकुंद**, पु० (दः) वृक्षविशेष. २ मांधात्याचा पुत्र, (राजा.)

**मुचिर**, पु० (रः) दान देणारा.

**मुंजकेशिन्**, पु० (शी) विष्णु.

**मुंड**, वि० (डः डा- डं) मुंडन केलेला. २ शिरोहीनदेह, धड. ३ पु० (डः) राहु नामा ग्रह. ४ दैत्यविशेष. ५ न० (डं) मस्तक.

**मुंडन**, न० (नं) पवन. २ रक्षण.

**मुंडा**, स्त्री० (डा) मस्तक.

**मुंडित**, वि० (तः ता- तं) मुंडन केलेला.

**मुंडिन्**, पु० (डी) नापित, न्हावी.

**मुद्**, स्त्री० (त्) हर्ष.

**मुदिर**, पु० (रः) मेघ. २ कामुक, कामाविष्ट. ३ हर्ष पावणारा.

**मुद्ग**, पु० (द्गः) धान्यविशेष ज्यास मूग असें म्हणतात तें.

**मुद्गपर्णी**, स्त्री० (र्णी) वनौ० काकमूग, रानमूग.

**मुद्गभुग्**, पु० (क्) अश्व, घोडा.

**मुद्गर**, पु० (रः) मुद्गल. २ न० (रं) पुष्पविशेष.

**मुद्गल**, पु० (लः) जीव. २ मुद्गल. ३ मुद्गलाचार्य.

**मुधा**, अ० व्यर्थ ह्या अर्थी.

**मुनि**, पु० (निः) बुद्ध. २ मौनव्रत धारण केलेला, वाग्यत. ३ ऋषि. ४ वृक्षविशेष, अगस्ता.

**मुनिद्रुम**, पु० (मः) अगस्त्य ऋषि. २ अगस्त्याचें झाड.

**मुनिपित्तल**, न० (लं) तांबें.

**मुनिपुत्रक**, पु० (कः) पक्षिविशेष ज्यास ताजवा, दय्यर असें म्हणतात तो. २ मुनिपुत्र.

**मुनिभेषज**, न० (जं) लंघन. २ हिरडा. ३ पु० (जः) अगस्त्याचा वृक्ष.

**मुनींद्र**, पु० (द्रः) बुद्ध. २ मुनिश्रेष्ठ.

**मुर**, न० (रं) वनौषधि ज्यास अतिविषा, अतिविख असें म्हणतात तें. २ पु० (रः) वनौषधि ज्यास देवनळ असें म्हणतात तो. ३ दैत्यविशेष.

**मुरज**, पु० (जः) वाद्यविशेष ज्यास मृदंग असें म्हणतात तो.

**मुरजफल** पु० (लः) फणसाचें झाड.

**मुरंदला**, स्त्री० (ला) नदीविशेष.

**मुरमर्दन**, पु० (नः) विष्णु.

**मुरला**, स्त्री० (ला) नदीविशेष.

**मुरा**, स्त्री० (रा) वनौषधि जीस मोरमांसी, तालीसपत्र असें म्हणतात ती. २ भुई आंवळी, वाळूक, कांकडी. ३ पति व पुत्रयुक्त स्त्री. ४ केळीचें झाड. ५ पांढरा भुई कोहळा. ६ वनौषधि जीस दुधि असें म्हणतात ती. ७ वनौषधि जीस क्षीरकाकोली असें म्हणतात ती. ८ वनौषधि ज्यास काळा उंबर, बोखाडा, खर्वत असें म्हणतात तो वृक्ष. ९ काळा भुई कोहळा.

**मुर्मर**, पु० (रः) तुषाग्नि. २ काम, मदन. ३ सूर्याचा घोडा.

**मुषा**, स्त्री० (षा) सुवर्णादि तैजस पदार्थांच्या पाकार्थ पात्रविशेष ज्यास मूस असें म्हणतात ती.

**मुषित**, वि० (तः ता- तं) चोरलेला. २ तोडलेला.

**मुषी**, स्त्री० (षी) सुवर्णादि तैजस पदार्थांच्या पाकार्थ पात्रविशेष ज्यास मूस असें म्हणतात ती.

**मुष्क**, पु० (ष्कः) अंडकोश, आंड, वृषण. २ वृक्षविशेष. ३ मांसल्ला.

**मुष्कक**, पु० (कः) वनौषधि ज्यास मोरवा असें म्हणतात तो वृक्ष.

**मुष्टि**, स्त्री० पु० (ष्टिः ष्टिः) मूठ. २ स्त्री० (ष्टिः) फळ.

**मुष्टिंधय**, पु० (यः) बालक.

**मुष्टिबंध**, पु० (धः) मुठींत घट्ट घेणें, धरणें.

**मुसल**, पु० (लः) मुसळ.

**मुसला**, स्त्री० (ला) वनौषधि जीस कंद, मुसलकंद असें म्हणतात ती. २ वनौषधि जीस मूषकपर्णी, उंदिरकानी असें म्हणतात ती. ३ गृहगोधिका, पाल.

**मुसलिन्**, पु० (ली) बळराम.

**मुसली**, स्त्री० (ली) वनौषधि ज्यास कंद, मुसलकंद असें म्हणतात ती. २ गृहगोधा, पाल.

**मुसल्य**, वि० (ल्यः ल्या- ल्यं) मुसळानें मारण्यास योग्य.

**मुस्त**, पु० (स्तः) वनौषधि ज्यास मुस्ता, नागरमोथा असें म्हणतात तो.

**मुस्तक**, पु० (कः) वनौषधि ज्यास मुस्ता, नागरमोथा असें म्हणतात तो.

**मुस्ता**, स्त्री० (स्ता) वनौषधि ज्यास मुस्ता, नागरमोथा असें म्हणतात तो.

**मुहिर**, पु० (रः) काम, मदन. २ मूर्ख.

**मुहुः**, अ० पुनःपुनः ह्या अर्थी. उ० मुहुः पश्यसिकौतेय.

**मुहुर्भाषा**, स्त्री० (षा) बहुत शोकयुक्त जें भाषण तें.

**मुहूर्त**, पु० (र्तः) बाराक्षण. २ उत्तम जी वेळा ती.

**मूक**, वि० (कः का- कं) मुका. २ पु० (कः) दैन्य.

**मूढ**, वि० (ढः ढा- ढं) मूर्ख. २ पु० (ढः) बालक. ३ भलती चेष्टा करणारा.

**मूत**, वि० (तः ता- तं) बद्ध, बांधलेला.

**मूत्र**, न० (त्रं) मूत.

**मूत्रकृच्छ्र**, पु० (च्छ्रः) रोगविशेष.

**मूत्रला**, स्त्री० (ला) कांकडी.

**मूत्रित**, वि० (तः ता- तं) मुतलेला.

**मूर्ख**, वि० (र्खः र्खा- र्खं) विचार शून्य, मूर्ख. २ पु० (र्खः) धान्यविशेष, उडीद.

**मूर्छा**, स्त्री० (र्छा) मूर्छन, मूर्छा.

**मूर्छाल**, वि० (लः ला- लं) मूर्छित.

**मूर्छित**, वि० (तः ता- तं) मूर्छाल, मूर्छित. २ मोहित. ३ उंच वाढलेला.

**मूर्ण**, वि० (र्णः र्णा- र्णं) बद्ध, बांधलेला.

**मूर्त्त**, वि० (र्त्तः र्त्ता- र्त्तं) कठीण. २ मूर्छित. ३ मूर्तिमान, प्रत्यक्ष.

**मूर्त्ति**, स्त्री० (र्त्तिः) देह. २ काठिण्य.

**मूर्त्तिमत्**, वि० (मान् मती- मत्) कठीण.

**मूर्धकर्परी**, स्त्री० (री) छत्री.

**मूर्धन्**, पु० (र्धा) मस्तक.

**मूर्धाभिषिक्त**, पु० (क्तः) क्षत्रिय. २ राजा. ३ प्रधान.

**मूर्वा**, स्त्री० (र्वा) वनौषधि जीस मुरवेल असें म्हणतात ती.

**मूल**, न० (लं) वृक्षादिकांचें मूळ, बुंधा. २ प्रकृति. ३ झाडाचें पाळ. ४ मूळनामक नक्षत्र. ५ पार्श्व. ६ निकुंज. ७ शिफा, फांदी. ८ स्वीय. ९ शिला. १० वशीकरण. ११ प्रतिष्ठा. १२ समीप. १३ मूळचें भांडवल. १४ कारण.

**मूलक**, न० (कं) शाकविशेष, मुळा.

**मूलदेव**, पु० (वः) कंस. २ ग्रामदेवता.

**मूलधन**, न० (नं) क्रयविक्रयादि व्यवहारांतील मूळधन, भांडवल.

**मूलभद्र**, पु० (द्रः) कंस. २ ग्रामदेवता.

**मूली**, स्त्री० (ली) पाल.

**मूल्य**, न० (ल्यं) मोल. २ वेतन. ३ प्रश्न.

**मूषक**, पु० (कः) उंदीर.

**मूषा**, स्त्री० (षा) सुवर्णादि तैजस पदार्थांच्या पाकार्थ पात्रविशेष ज्यास मूस असें म्हणतात ती.

**मूषिक**, पु० (कः) उंदीर.

**मूषिकपर्णी**, स्त्री० (र्णी) वनौषधि जीस उंदीरकानी असें म्हणतात ती.

**मूषिका**, स्त्री० (का) उंदिरीण.

**मूषिकांचन**, पु० (नः) गणपति.

**मूषित**, वि० (तः ता- तं) चोरलेला.

**मर्षी**, स्त्री० (र्षी) सुवर्णादि तैजस पदार्थां-

च्या पाकार्थे पात्रविशेष ज्यास मूस असें म्हणतात ती.
**मृग**, पु० (गः) हरिण. २ हरिणादिक श्वापद जाति. ३ शोधणें. ४ मृगशीर्ष नक्षत्र. ५ हत्तीविशेष. ६ मागणें.
**मृगणा**, स्त्री० (णा) शोधणें.
**मृगतृष्णा**, स्त्री० (ष्णा) मृगजळ.
**मृगद्विष्**, पु० (ट्) सिंह.
**मृगधूर्तक**, पु० (कः) कोल्हा.
**मृगनाभि**, पु० (भिः) कस्तुरी.
**मृगनेत्रा**, स्त्री० (त्रा) रात्रभेद. २ स्त्री विशेष.
**मृगबंधनी**, स्त्री० (नी) जाळें.
**मृगमद**, पु० (दः) कस्तुरी.
**मृगया**, स्त्री० (या) शिकार, पारध.
**मृगयु**, पु० (युः) व्याघ्र, पारधी. २ कोल्हा. ३ ब्रम्हदेव.
**मृगरिपु**, पु० (पुः) सिंह.
**मृगवधाजीव**, पु० (वः) व्याध, पारधी.
**मृगव्य**, न० (व्यं) शिकार, पारध.
**मृगशिरस्**, न० (रः) मृगशिर नक्षत्र.
**मृगशीर्ष**, न० (र्षं) नक्षत्रविशेष.
**मृगांक**, पु० (कः) चंद्र.
**मृगादन**, पु० (नः) श्वापदविशेष ज्यास तरस असें म्हणतात तो.
**मृगारि**, पु० (रिः) व्याघ्र, वाघ. २ सिंह.
**मृगाशन**, पु० (नः) सिंह.
**मृगाक्षिन्**, पु० (क्षी) विशाळ. २ मृगाचे नेत्र.
**मृगित**, वि० (तः ता- तं) शोधलेला.
**मृगी**, स्त्री० (गी) स्त्रीविशेष. २ मृगी.
**मृगेंद्र**, पु० (द्रः) मृगाशन, सिंह.
**मृजा**, स्त्री० (जा) प्रोक्षणादिकें करून देह पवित्र करणें, मार्जन.
**मृड**, पु० (डः) महादेव.
**मृडानी**, स्त्री० (नी) पार्वती.
**मृणाल**, पु० न० (लः लं) भिशें, भिसें. २ न० (लं) वनौषधि ज्यास काळ्या वाळ्याचें मूळ असें म्हणतात तें.
**मृत**, वि० (तः ता- तं) मेलेला. २ न० (तं) नित्ययाश्रा. ३ मृत्यु.
**मृतकांतक**, पु० (कः) कोल्हा.
**मृतमत्त**, पु० (त्तः) कोल्हा.
**मृतस्नात**, वि० (तः ता- तं) मृतोद्देशेंकरून स्नान केलेला.
**मृतालक**, न० (कं) वनौषधि जीस तूर असें म्हणतात ती.
**मृत्कर**, पु० (रः) कुंभार.
**मृत्कांश्य**, पु० (श्यः) मातीचा परळ.
**मृत्किरा**, स्त्री० (रा) जलचरविशेष.
**मृत्तालक**, न० (कं) वनौषधि जीस तूर असें म्हणतात ती.
**मृत्तिका**, स्त्री० (का) माती.
**मृत्यु**, पु० स्त्री० (त्युः त्युः) मरण. २ पु० (त्युः) यम.
**मृत्युंजय**, पु० (यः) महादेव.
**मृत्युपुष्प**, पु० (ष्पः) शिरसाचें झाड.
**मृत्युफला**, स्त्री० (ला) केळीचें झाड.
**मृत्युबीज**, पु० (जः) वेळू.
**मृत्युभंगुरक**, पु० (कः) वाद्यविशेष.
**मृत्युली**, स्त्री० (ली) औषधविशेष.
**मृत्युवंचन**, पु० (नः) महादेव. २ बेलाचें झाड. ३ डोमकावळा.
**मृत्सा**, स्त्री० (त्सा) प्रशस्तमृत्तिका, चांगली माती. २ तुवरिका, तूर.

**मृत्स्ना**, स्त्री० (त्स्ना) प्रशस्तमृत्तिका, चांगली माती. २ तुवरिका, तूर.
**मृत्स्नाभांडक**, पु० (कः) पात्रविशेष.
**मृद्**, स्त्री० (त्) मृत्तिका, माती.
**मृदंग**, पु० (गः) मृदंग, पखवाज. २ शब्द.
**मृदु**, वि० (दुः दुः दु) कोमल, कोंवळा, मऊ. २ अतीक्ष्ण.
**मृदुत्वच्**, पु० (क्) भूर्जवृक्ष.
**मृदुल**, वि० (लः ला- लं) कोमल, कोंवळा.
**मृद्दग**, न० (गं) कथील.
**मृद्वीका**, स्त्री० (का) द्राक्षीची वेल.
**मृध**, न० [धं] युद्ध.
**मृन्मरु**, पु० (रुः) दगड.
**मृषा**, अ० असत्य, मिथ्या ह्या अर्थी. उ० उच्छ्रायसौंदर्यगुणामृषोद्याः
**मृष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) ज्याचा मळ घालविला तो, निर्मळ, शुद्ध केलेला.
**मृष्टरुक**, पु० (कः) दाता. २ गोड खाणारा. ३ अतिथींचा द्वेष.
**मृक्षण**, न० (णं) तेल.
**मेकलकन्यका**, स्त्री० (का) नर्मदा नदी.
**मेखलकन्यका**, स्त्री० (का) नर्मदा नदी.
**मेखला**, स्त्री० (ला) स्त्रीकटिभूषण, कमरपट्टा. २ तरवार, कटयार, खंजीर इत्यादिकांचे मुठीस जें चामड्याचें बंधन ज्याला डाली असें म्हणतात ती. ३ पर्वताचा कडा.
**मेघ**, पु० (घः) मेघ. २ वनौषधि ज्यास मुस्ता, नागरमोथा असें म्हणतात तो.
**मेघकफ**, न० (फं) काठिणोदक, गार.
**मेघज्योति**, पु० (तिः) वीज, विद्युल्लता.
**मेघनाद**, पु० (दः) वरुण. २ रावणाचा पुत्र ज्याला इंद्रजित असें म्हणतात तो. ३ मेघाची गर्जना.
**मेघनादाजित**, पु० (तः) लक्ष्मण.
**मेघनादानुलासिन्**, पु० (सी) मयूर, मोर.
**मेघनामन्**, पु० (मा) वनौषधि ज्यास मुस्ता, नागरमोथा असें म्हणतात तो.
**मेघपुष्प**, न० (ष्पं) उदक, पाणी. २ विष्णूच्या रथाचा घोडा. ३ अभ्र.
**मेघमाला**, स्त्री० (ला) मेघमंडळ.
**मेघवर्त्मन्**, न० (र्त्म) आकाश.
**मेघवाहन**, पु० (नः) इंद्र.
**मेघाध्वन्**, पु० (ध्वा) आकाश.
**मेघास्थि**, स्त्री० (स्थिः) कठिणोदक, गार.
**मेघास्थिवर्षण**, न० (णं) मेघधार. २ गारांचा पर्जन्य.
**मेचक**, पु० (कः) काळे गोकर्णाच्या फुलासारखा जो रंग तो किंवा मोराचे कंठासारखा जो रंग तो. २ मोराचे पिसांवर जें नेत्राकार चिन्ह तें. ३ न० (कं) अंजनविशेष ज्यास सुरमा असें म्हणतात तो. ४ अंधकार. ५ वि० (कः का- कं) काळ्या रंगानें युक्त.
**मेठ**, पु० (ठः) माहुत.
**मेंड**, पु० (डः) माहुत.
**मेढ्र**, पु० (ढ्रः) शिश्न. २ मेंढा, एडका.
**मेदक**, पु० (कः) सुराकल्क. २ (मद्यविशेष असेंही कोणी म्ह०.)
**मेदस्**, न० (दः) मांसजन्यस्नेह, ज्यास मांदें, चरबी असें म्हणतात ती.
**मेदिनी**, स्त्री० (नी) पृथ्वी.
**मेदिनीद्रव**, पु० (वः) धुरळा.
**मेदुर**, वि० (रः रा- रं) सांद्रस्निग्ध, अत्यंत निबिड.

**मेद्र**, पु० (द्रः) मृदंग.
**मेध**, पु० (धः) यज्ञ.
**मेधा**, स्त्री० (धा) धारणाविशिष्ट बुद्धि.
**मेधाजित्**, पु० (त्) कात्यायन ऋषि.
**मेधारुद्र**, पु० (द्रः) कालीदास कवि.
**मेधाविन्**, पु० (वी) पोपट, कीर. २ व्याड-ऋषि. ३ बुद्धिवान. ४ शुक.
**मेधाविनी**, स्त्री० (नी) सरस्वती.
**मेधि**, स्त्री० (धिः) पशूंस बांधण्यास पुरलेलें काष्ठ ज्यास मेढ असें म्हणतात तें.
**मेधिर**, पु० (रः) बुद्धिवान.
**मेध्य**, वि० ( ध्यः ध्या- ध्यं ) पवित्र.
**मेध्या**, स्त्री० (ध्या) वनौषधि जीस तेंडू, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती. २ वेखंड.
**मेनकात्मजा**, स्त्री० (जा) पार्वती.
**मेना**, स्त्री० (ना) हिमालयाची स्त्री.
**मेनाद्**, पु० (दः) मयूर, मोर. २ अज, बोकड. ३ मांजर.
**मेनाधव**, पु० (वः) हिमालय.
**मेरु**, पु० (रुः) पर्वतविशेष.
**मेलक**, पु० (कः) संगम.
**मेला**, स्त्री० (ला) वनौषधि जीस नीळी, नीळ असें म्हणतात ती. २ शाई. ३ संगम. ४ जटामांशीलता.
**मेलांधु**, स्त्री० (धुः) दऊत.
**मेलानंदन**, पु० (नः) दऊत.
**मेष**, पु० (षः) मेषरास. २ मेंढा, एडका. ३ औषधविशेष. ४ स्तंभ.
**मेषकंबल**, पु० (लः) कांबळें.
**मेषी**, स्त्री० (षी) मेंढी.
**मेह**, पु० (हः) मूत्ररोग. ( हा रोग दोन प्रकारचा असतो. एक रक्तमेह आणि दुसरा शुभ्रमेह. )
**मेहन**, न० (नं) शिश्न. २ मूत्र.
**मैत्र**, पु० (त्रः) ब्राम्हण. २ स्नेही.
**मैत्रावरुणि**, पु० (णिः) अगस्तिऋषि. २ वाल्मिकऋषि.
**मैत्रिन्**, पु० (त्री) बौद्धावतार.
**मैत्री**, स्त्री० (त्री) स्नेह.
**मैत्रेय**, पु० (यः) भावि बुद्ध देव. २ मैत्रेय ऋषि.
**मैत्रेयिका**, स्त्री० (का) मित्रयुद्ध.
**मैत्र्य**, न० (त्र्यं) मैत्री, स्नेह.
**मैथिली**, स्त्री० (ली) सीता.
**मैथुन**, न० (नं) सुरत. २ संगति, भार्यादिकांचा संबंध.
**मैरेय**, न० (यं) उंसाच्या रसापासून झालेलें मद्य. २ धातकीपुष्प, गूळ, धान्य, पाणी, ह्यापासून झालेलें मद्य.
**मैहिषीपाल**, पु० (लः) म्हशी राखणारा.
**मोग**, पु० (गः) रोगविशेष.
**मोघ**, पु० (घः) स्त्री० न० (घा- घं ) निरर्थक. २ हीन.
**मोघा**, स्त्री० (घा) पाटलीवृक्ष. २ वावडिंगाचें झाड.
**मोच**, पु० (चः) शेवग्याचें झाड.
**मोचक**, पु० (कः) शेवग्याचें झाड २ विरक्त पुरुष.
**मोचा**, स्त्री० (चा) सांवरीचें झाड. २ कदली, केळीचें झाड.
**मोचाट**, पु० (टः) काळें जिरें, काळेंरें. २ मलय पर्वतापासून झालेला चंदन.
**मोण**, पु० (णः) शुष्कफल. २ जलचरविशेष ज्यास सुसर असें म्हणतात तो. ३ माशी. ४ सर्प. ५ पात्रविशेष ज्यास करंडा असें म्हणतात तो.

**मोदक,** पु० (कः) भक्ष्यपदार्थविशेष. २ वि० (कः का- कं) आनंदकारक.

**मोरट,** न० (टं) उंसाचें मूळ. २ पुष्पविशेष. ३ गाईचें ताजें दूध. ४ आकोट पुष्प.

**मोरटा,** स्त्री० (टा) वनौषधि जीस मुरवेल असें म्हणतात ती.

**मोरिच्य,** पु० (च्यः) हरिण.

**मोषक,** पु० (कः) चोर.

**मोह,** पु० (हः) मूर्छा. २ अविद्या.

**मोहन,** पु० (नः) मदनबाण. २ न० (नं) भुलविणें.

**मोक्ष,** पु० (क्षः) मुक्ति. २ मोरव्याचें झाड. ३ पाडळीची वेल.

**मौकुलि,** पु० (लिः) काकपक्षि, कावळा.

**मौक्तिक,** न० (कं) मोतीं.

**मौद्गलि,** पु० (लिः) कावळा.

**मौद्गीन,** वि० (नःना-नं) मुगाचें (शेत.)

**मौन,** न० (नं) मौन्य, उगें राहणें.

**मौरजिक,** पु० (कः) मृदंगी, पखवाजी.

**मौर्वी,** स्त्री० (र्वी) धनुष्याची दोरी जिला चिल्ला असें म्हणतात ती.

**मौलि,** पु० (लिः) शिखा, शेंडी. २ किरीट, मुगुट. ३ बांधलेले केश, बुचडा. (इतर कोशांत वर लिहिलेल्या अर्थी स्त्रीलिंगीहि सांगितला आहे.) ४ अशोकवृक्ष. ५ स्त्री० (लिः) भूमि.

**मौहूर्त,** पु० (र्तः) ज्योतिषी, जोशी.

**मौहूर्तिक,** पु० (कः) ज्योतिषी, जोशी.

**म्लानिनी,** स्त्री० (नी) कमळाच्या देंटीचा भेद.

**म्लिष्ट,** पु० (ष्टः) म्लान. २ अव्यक्तवाणी, कुवचन.

**म्लेंछ,** पु० (छः) अधमविशेष. यवनादि १८ प्रकारचे कामधेनूच्या क्रोधापासून झालेले. २ पापाविषयीं जो आसक्त तो.

**म्लेंछदेश,** पु० (शः) चातुर्वर्ण्य व्यव[स्था] ज्या देशीं नाहीं असा जो देश तो.

**म्लेंछभोजन,** पु० (नः) गहुं.

**म्लेंछमुख,** न० (खं) ताम्रक, तांबें.

**म्लेंछास्य,** न० (स्यं) तांबें.

**म्लेंछित,** पु० (तः) अपशब्द.

---

## य.

**य,** पु० (यः) वायु. २ हत्ती. ३ योग. ४ वाहन. ५ जाणारा.

**यकृत,** न० (त्) दक्षिण कुक्षिस्थ मांसपिंडविशेष.

**यजमान,** पु० (नः) यागाविषयीं ऋत्विजांस आज्ञा करणारा. २ यजमान.

**यज्वन्,** पु० (ज्वा) विधिपूर्वक ज्याणें याग केला तो.

**यज्वनांपति,** पु० (तिः) चंद्र.

**यत,** अ० कारण ह्या अर्थी.

**यतः,** अ० हेतु, कारण ह्या अर्थी.

**यति,** पु० (तिः) संन्यासी. २ धान्य पेरणारा. ३ श्लोकाचा चरण.

**यतिन्,** पु० (ती) संन्यासी.

**यतिमैथुन,** न० (नं) संन्याशाचें मैथुन.

**यंतृ,** पु० (ता) सारथी. २ हास्तिपक, म्हात, माहुत.

**यंत्र,** न० (त्रं) मृग बंधनीविशेष. २ यंत्र.

**यंत्रण,** न० (णं) रक्षण. २ बंधन. ३ नियमन.

**यथा**, अ० साम्य, सादृश्य. २ परिमाण. ३ प्रशंसा ह्या अर्थीं.

**यथाजात**, वि० (तःता तं) मूर्ख.

**यथातथं**, अ० सत्यार्थीं. उ० गुरुर्यथातथं-वक्ति.

**यथायथं**, अ० यथायोग्य ह्या अर्थीं. उ० यथायथंपलायंते.

**यथार्थं**, अ० सत्यार्थीं. उ० यथार्थं मुक्तं-नान्यत्.

**यथार्हवर्ण**, पु० (र्णः) चार पुरुष, बातमी-दार.

**यथास्वं**, अ० यथायोग्य ह्या अर्थीं. उ० यथास्वमाश्रमेचके.

**यथेप्सित**, न० (तं) यथेच्छ.

**यद्**, अ० अवधृति. २ गर्हा ह्या अर्थीं.

**यदि**, अ० पक्षांतरार्थी उ० शुचिमनोयद्य-स्तितीर्थेनकिं.२ गर्हा ह्या अर्थीं.

**यदु**, पु० ब० (दवः) देशविशेष. २ पु० (दुः) ययाति राजाचा पुत्र.

**यदृच्छा**, स्त्री० (च्छा) स्वेच्छा, स्वतंत्रता.

**यद्वत्**, अ० प्रश्न. २ वितर्क ह्या अर्थीं.

**यम**, पु० (मः) शरीर मात्रेंकरून साध्य व नित्य जें *कर्म तें. २ प्रेतांचा राजा जो यम तो. ३ इंद्रिय निग्रह. ४ ढोरगा पक्षि. ५ जुंवळें मनुष्य. ६ शनी नामा ग्रह. ७ कावळा.

**यमक**, पु० (कः) शब्दालंकार. २ योग साधनविशेष.

**यमकालिंदी**, स्त्री० (दी) यमाची माता.

**यमकीट**, पु० (टः) पक्षिविशेष.

* अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रम्हचर्य, परिग्रह, हीं पांच कर्में होत.

**यमन**, न० (नं) बंधन. २ उपरति. ३ पु० (नः) यम. ४ रागभेद (गायनांतील.)

**यमनिका**, स्त्री० (का) पडदा, कनात.

**यमराज्**, पु० (ट्) प्रेतपति जो यम तो.

**यमल**, पु० (लः) युग्म.

**यमवाहन**, पु० (नः) रेडा.

**यमस्वसा**, स्त्री० (सा) पार्वती. २ यमुना नदी.

**यमी**, स्त्री० (मी) यमुना नदी.

**यमुना**, स्त्री० (ना) यमुना नदी.

**यमुनाभ्रातृ**, पु० (ता) प्रेतपति जो यम तो.

**यमूना**, स्त्री० (ना) यमुना नदी.

**यमरुका**, स्त्री० (का) वाद्यविशेष, दंडढक्का.

**ययु**, पु० (युः) अश्वमेध यज्ञास उपयुक्त जो अश्व तो.

**यव**, पु० (वः) जव म्हणून जें धान्य आहे तें. २ सातू धान्य.

**यवक्य**, वि० (क्यःक्या क्यं) लहान यव उ-त्पन्न होण्याचें (शेत.)

**यवन**, पु० (नः) जातिविशेष. २ देशवि०. ३ वेगवान घोडा.

**यवनिका**, स्त्री० (का) पडदा, कनात.

**यवफल**, पु० (लः) वनौ० वेणु, वेळु. २ कुड्याचें झाड.

**यवशूक**, पु० (कः) क्षारविशेष ज्यास जव-खार असें म्हणतात तो. २ जवाचें कूस.

**यवस**, न० (सं) पशूंचें भक्ष्य तृण.

**यवक्षार**, पु० (रः) दग्ध यवांकुर क्षार, जवखार.

**यवागू**, स्त्री० (गूः) द्रवदोदन, अटवल, पातळ भात, कण्हेरी.

**यवाग्रज**, पु० (जः) यवखार, जवखार.

**यवानिका**, स्त्री० (का) वनौषधि ज्यास ओंवा असें म्हणतात तो.

**यवानी**, स्त्री० (नी) वनौषधि ज्यास ओंवा असें म्हणतात तो.

**यवास**, पु० (सः) वनौषधि ज्यास धमासा असें म्हणतात तो.

**यविष्ठ**, पु० (ष्ठः) कनिष्ठ बंधु.

**यवीयस्**, पु० (यान्) कनिष्ठ बंधु. २ वि० (यान्- यसी- यः) अति तरुण.

**यव्य**, वि० (व्यः-व्या-व्यं) यव उत्पन्न होण्याचें (शेत.)

**यशःपटह**, पु० (हः) वाद्यविशेष, ढक्कावाद्य.

**यशस्**, न० (शः) कीर्ति.

**यशोधरेय**, पु० (यः) शाक्य मुनिपुत्र.

**यष्टि**, स्त्री० (ष्टिः) काठी. २ शस्त्रभेद. ३ हाराचा सर. ४ लता, वेल.

**यष्टिका**, स्त्री० (का) तळीं, पाण्याचें डबक. २ सोटा, काठी. ३ एक सराची माळ.

**यष्टिमधुक**, न० (कं) वनौषधि ज्यास गोडें काष्ठ असें म्हणतात तें.

**यष्टी**, स्त्री० (ष्टी) काठी.

**यष्टृ**, पु० (ष्टा) यजमान.

**यक्ष**, पु० (क्षः) कुबेर. २ देवयोनिविशेष. ३ पिंपळाचें झाड.

**यक्षकर्दम**, पु० (मः) कापूर, कृष्णागरु, कस्तुरी, चंदन, केशर, हे पदार्थ एके ठिकाणीं कुटून, केलेलें महा सुगंधि द्रव्य.

**यक्षधूप**, पु० (पः) राळ धूप.

**यक्षरस**, पु० (सः) पुष्पमधाची दारू.

**यक्षराज्**, पु० (ट्) कुबेर. २ पैलवानांची तालमीची जागा.

**यक्षरात्रि**, स्त्री० (त्रिः) कार्तिक शुद्ध प्रतीपदा.

**यक्ष्मन्**, पु० (क्ष्मा) क्षयरोग.

**यज्ञ**, पु० (ज्ञः) अध्वर, याग.

**यज्ञद्रव्य**, न० (व्यं) यज्ञसंबंधीं द्रव्य.

**यज्ञपुरुष**, पु० (षः) विष्णु.

**यज्ञवाट**, पु० (टः) यज्ञाची जागा.

**यज्ञस्थान**, पु० न० (नः नं) यज्ञाची जागा.

**यज्ञांग**, पु० (गः) उंबराचें झाड.

**यज्ञिय**, वि० (यः-या-यं) यज्ञ कर्मास योग्य. २ पु० (यः) द्वापारयुग.

**या**, स्त्री० (या) यात्रा. २ प्राप्ति. ३ त्याग. ४ कीर्ति.

**याग**, पु० (गः) यज्ञ.

**याचक**, पु० (कः) यांच्ञा करणारा, मागणारा.

**याचनक**, पु० (कः) याचक, यांच्ञा करणारा.

**याचना**, स्त्री० (ना) यांच्ञा.

**याचित**, वि० (तः-ता-तं) मागितलेला.

**याचितक**, वि० (कः-का-कं) आणलेला, उसणा, उसणवार. (जिन्नस.)

**याजक**, पु० (कः) ऋत्विज, याज्ञिक. २ राजाचा हत्ती.

**याजकगज**, पु० (जः) राजाचा हत्ती.

**याच्ञा**, स्त्री० (याच्ञा) याचना.

**यातना**, स्त्री० (ना) नरक पीडा. २ दुःख.

**यातयाम**, वि० (मः-मा-मं) प्राप्त परिणाम. २ परिभुक्त, भोगून टाकलेला.

**यातु**, न० (तु) राक्षस. २ पांथस्थ.

**यातुधान**, न० (नं) राक्षस.

**यातृ**, स्त्री० (ता) बंधु बंधूंच्या परस्पर भार्या, जावा.

**यात्रा**, स्त्री० (त्रा) प्रयाण. २ गमन साधन. (वाहनादिक.) ३ देव पूजेचा उत्सव. ४ भ्रमण, पर्यटन.
**यादःपति**, पु० (तिः) समुद्र.
**यादव**, पु० (वः) केशव.
**यादवी**, स्त्री० (वी) पार्वती.
**यादस्**, न० (दः) जलजंतु.
**यादसांपति**, पु० (तिः) वरुण नामा देव. २ समुद्र.
**यान**, न० (नं) शत्रूस जिंकण्याच्या इच्छेनें जाणें. २ हत्ती, घोडे इत्यादि वाहन. ३ गति.
**यानमुख**, न० (खं) रथादिकांचा अग्र भाग.
**यापन**, न० (नं) निराकरण. २ कालक्षेप. ३ वर्तन.
**याप्य**, वि० (प्यः प्या प्यं) निकृष्ट, निंद्य.
**याप्ययान**, न० (नं) यानविशेष ज्यास पालखी असें म्हणतात ती.
**याम**, पु० (मः) प्रहर. २ योगाचें साधन-विशेष.
**यामघोष**, पु० (षः) वाद्यविशेष, दंड ढक्का.
**यामनाली**, स्त्री० (ली) वाद्यविशेष.
**यामनेमि**, पु० (मिः) इंद्र.
**यामल**, न० (लं) युग्म.
**यामि**, स्त्री० (मिः) बहिण. २ कुलवधु, कुलस्त्री.
**यामिकिनी**, स्त्री० (नी) कुलिन स्त्री.
**यामिनी**, स्त्री० (नी) रात्र.
**यामुन**, न० (नं) सौवीरांजन, सुरमा.
**याम्य**, पु० (म्यः) अगस्तिऋषि. २ चंदन.
**याम्या**, स्त्री० (म्या) रात्र. २ दक्षिण दिशा. ३ भरणी नक्षत्र.

**यायजूक**, पु० (कः) वारंवार यज्ञ करणारा.
**यायावर**, पु० (रः) जरत्कारु. २ यज्ञ संबंधीं घोडा.
**याव**, पु० (वः) लाक्षा, लाख.
**यावक**, पु० (कः) अर्धेशिजलेलेयव, घुगऱ्या. २ धान्यविशेष.
**यावत्**, अ० साकल्य. २ निश्चय. ३ अवधि. ४ परिणाम ह्या अर्थी. उ० यावद्दत्तं तावद्भुक्तं. २ श्रोत्रियंयावदामत्रय. ३ मूलाच्छाखांयावत्प्रकांडः ४ यावत्स्वर्णं तावद्रजतं. ५ प्रशंसा. ६ परिच्छेद. ७ अधिकार. ८ संभ्रम. ९ पक्षांतर ह्या अर्थीही आहे.
**यावन**, पु० (नः) सुवासिक द्रव्यविशेष ज्यास लोबाण, ऊद असें म्हणतात तो.
**यावान्**, पु० (न) वेगवान.
**यावानी**, स्त्री० (नी) औषधिविशेष.
**याष्टीक**, पु० (कः) यष्टिधारण करणारा, दांडेवाला.
**यास**, पु० (सः) वनौषधि ज्यास धमासा असें म्हणतात तो. २ निंब वृक्ष.
**याज्ञसेनी**, स्त्री० (नी) द्रौपदी.
**याज्ञिक**, पु० (कः) याजक ऋत्विज, यज्ञकर्म करणारा. २ दर्भ.
**युक्त**, वि० (क्तः क्ता क्तं) न्याय्य. २ सहित. ३ न० (क्तं) यथायोग्य. ४ चार हाताचें प्रमाण.
**युक्तरसा**, स्त्री० (सा) वनौषधि जीस एलापर्णी कालिंदण असें म्हणतात ती.
**युक्ति**, स्त्री० (क्तिः) योजणें. २ न्याय. ३ तजवीज. ४ थोड्या उपायानें मोठें कार्य होण्याचा मार्ग.
**युग**, न० (गं) कृत, त्रेता, द्वापार आणि

कलि हे चार काल विभाग प्रत्येक. (हीं चार युगें झालीं म्हणजे देवांचें एक युग होतें.) २ द्वय, युग्म. ३ रथादिकांचा अवयव विशेष. ४ हात प्रमाण. ५ औषध.

**युगकीलक**, पु० (कः) खीळ.

**युगंधर**, पु० न० (रःरं) रथादिकांच्या ज्या काष्ठास घोडे, बैल बांधितात तें काष्ठ ज्यास दांडी असें म्हणतात ती.

**युगपत्**, अ० एककाळीं ह्याअर्थी उ० युगपदाहुताः

**युगपत्रक**, पु० (कः) कांचन वृक्ष.

**युगपार्श्वग**, पु० (गः) जे नवे बैल वठणीस येण्याकरितां त्यांच्या खांद्यावर जूं घालून फिरवितात ते प्रत्येक.

**युगुल**, न० (लं) युग्म, द्वय.

**युगांशक**, पु० (कः) वर्ष.

**युगांसक**, पु० (कः) वर्ष.

**युगल**, न० (लं) युग्म, द्वय.

**युग्म**, न० (ग्मं) द्वय, दोन.

**युग्य**, न० (ग्यं) हत्ती, घोडे इत्यादि सामान्य वाहन. २ पु० (ग्यः) जूं वाहाणारा बैल.

**युज**, पु० द्वि० (जौ) देवांचे वैद्य.

**युंजान**, पु० (नः) सारथी. २ ब्राम्हण.

**युत**, वि० (तःता-तं) जुळलेला. २ न० (तं) चार हातांचें प्रमाण.

**युतक**, न० (कं) संशय. २ युग. ३ कन्यादानकालीं दिलेलें द्रव्य. ४ स्त्रीच्या वस्त्राची आंचळी.

**युद्ध**, (द्धं) न० लढाई.

**युध्**, स्त्री० (धू) युद्ध, लढाई.

**युधिष्ठिर**, पु० (रः) धर्मराज.

**युध्म**, पु० (ध्मः) युद्ध.

**युयुधान**, पु० (नः) सात्यकी.

**युवगंड**, पु० (डः) रोगविशेष.

**युवति**, स्त्री० (तिः) तरूण बायको.

**युवती**, स्त्री० (ती) तरूण बायको.

**युवन्**, पु० (वा) तरूण पुरुष. २ श्रेष्ठ. ३ स्वाभाविक शक्तिमान.

**युवराज**, पु० (जः) भावि बुद्ध देव.

**यूतक**, पु० (कः) वस्त्रभेद. २ कन्यादान कालीं दिलेलें द्रव्य. ३ संशय.

**यूथ**, न० (थं) सजातीय प्राण्यांचा समुदाय. उ० मृगयूथं.

**यूथनाथ**, पु० (थः) यूथांमध्यें मुख्य.

**यूथप**, पु० (पः) यूथांमध्यें मुख्य.

**यूथा**, स्त्री० (था) एक फुलझाड आहे ज्यास जुई असें म्हणतात ती.

**यूथीका**, स्त्री० (का) एक फुलझाड ज्यास जुई असें म्हणतात ती.

**यूथी**, स्त्री० (थी) एक फुलझाड ज्यास जुई असें म्हणतात ती.

**यूप**, पु० न० (पःपं) क्लिन्न रक्त, पु. २ (पः) अश्वत्थाकार वृक्षविशेष ज्यास पारसा पिंपळ असें म्हणतातते. ३ (पं) यज्ञांगस्तंभ.

**यूपकटक**, पु० (कः) यज्ञस्तंभावर केलेला वलयाकार काष्ठविकार.

**यूपद्रु**, पु० (द्रुः) खैर वृक्ष, खैराचें झाड.

**यूपाग्र**, न० (ग्रं) यज्ञस्तंभाचें अग्र.

**यूष**, न० (षं) द्रव द्रव्याचा अग्रिमभाग, मंड, निवळी.

**योक्त**, न० (क्तं) जूं बांधण्याची दोरी ज्यास जुंकणी असें म्हणतात ती.

**योग**, पु० (गः) कवच. २ उपाय. ३

ध्यान. ४ संगति. ५ युक्ति. ६ अपूर्व जो अर्थ तो. ७ प्राप्ति. ८ शरीर. ९ स्थैर्य. १० प्रयोग. ११ विष्कंभादिक २७ योग. १२ औषध. १३ विश्वास दिलेल्याचा घात करणारा. १४ द्रव्य. १५ कार्मण, कर्मकुशल.

**योगचारानिलिन्**, पु० (ली) मारुती, हनूमान.

**योगनाविक**, पु० (कः) मत्स्यविशेष.

**योगित**, पु० (तः) उन्मत्त कुत्रा.

**योगेष्ठ**, न० (ष्ठं) शिसें.

**योग्य**, न० (ग्यं) वनौषधि ज्यास ऋद्धि, केवणी, मुरडशेंग असें म्हणतात ती. २ पुष्प. ३ वि० (ग्यः ग्या-ग्यं) सांप्रतिक, सांप्रतचें. ४ अनुरूप. ५ प्रवीण. ६ शक्त. ७ उत्तम.

**योग्या**, स्त्री० (ग्या) सूर्याची स्त्री.

**योजन**, न० (नं) चार कोस. २ परमात्मा. ३ योग.

**योजनगंधा**, स्त्री० (धा) व्यासमाता. २ सीता. ३ कस्तुरी.

**योजनपर्णी**, स्त्री० (र्णी) वनौषधि जीस मंजीष्ठा असें म्हणतात ती.

**योजनवल्ली**, स्त्री० (ल्ली) वनौषधि जीस मंजिष्ठा असें म्हणतात ती.

**योत्र**, न० (त्रं) जूं बांधण्याची दोरी ज्यास जुंफणी असें म्हणतात ती.

**योद्धृ**, पु० (द्धा) योद्धा.

**योध**, पु० (धः) योद्धा.

**योनि**, स्त्री० (निः) स्त्रियांचें उपस्थ. २ कारण.

**योनी**, स्त्री० (नी) स्त्रियांचें उपस्थ, उत्पत्तिस्थान, स्मरमंदिर. २ रत्नादिकांची खाण.

**योन्यर्श**, पु० (र्शः) मांसाची गांठ, मांस.

**योषनलक्षण**, न० (णं) कुच, स्तन. २ सौंदर्य.

**योषा**, स्त्री० (षा) स्त्री, बायको.

**योषित्**, स्त्री० (त्) स्त्री, बायको.

**योषिता**, स्त्री० (ता) स्त्री, बायको.

**यौतक**, न० (कं) कन्यादानकालीं दिलेलें द्रव्य.

**यौतुक**, न० (कं) कन्यादानकालीं दिलेलें द्रव्य.

**यौवत**, न० (तं) तरुण स्त्रियांचा समुदाय. २ मान, परिमाण.

**यौवन**, न० (नं) तारुण्य.

**यौवनलक्षण**, न० (णं) कुच, स्तन. २ सौंदर्य.

**यौवनाश्व**, पु० (श्वः) मांधाता राजा.

## र.

**र**, पु० (रः) अग्नि. २ तीक्ष्ण.

**रंक**, वि० (कः का- कं) कृपण. २ मंद. ३ गरीब. ४ भिकारी.

**रंकु**, पु० (कुः) मृगविशेष ज्यास चितळ, चिता असें म्हणतात तो.

**रक्त**, वि० (क्तः क्ता- क्तं) अनुरक्त. २ रक्तवर्ण. ३ न० (क्तं) कुंकुं. ४ तांबें. ५ रक्त ६ वि० (क्तः क्ता- क्तं) ज्याला तांबडा रंग दिला आहे तो. ७ पु० (क्तः) वृक्षविशेष.

**रक्तक**, पु० (कः) बंधुक, दुपारी म्हणून जें एक फुल झाड आहे तें. २ रक्त वस्त्र. ३ मायाळु.

**रक्तकंदल**, पु० (लः) विद्रुममणी.
**रक्तगंध**, पु० (धः) रक्ताबोळ.
**रक्तचंदन**, न० (नं) रक्तचंदन. २ पतंग, तांबडा शिसव.
**रक्तचूर्ण**, पु० (र्णः) शेंदूर.
**रक्तधातु**, न० (तु) धातुविशेष.
**रक्तप**, पु० (पः) राक्षस.
**रक्तपा**, स्त्री० (पा) जळू. २ डाकिनी, शूद्रदेवताविशेष.
**रक्तपारद**, पु० (दः) हिंगूळ.
**रक्तपिंड**, पु० (डः) जास्वंदीचें फूल.
**रक्तफला**, स्त्री० (ला) तोंडलीची वेल.
**रक्तमंजर**, पु० (रः) निंबवृक्ष.
**रक्तरेणु**, पु० (णुः) शेंदूर. २ पळसाची कळी.
**रक्तवटी**, स्त्री० (टी) रोगविशेष. २ व्रण विशेष.
**रक्तवालक**, न० (कं) शेंदूर.
**रक्तवालुक**, न० (कं) शेंदूर.
**रक्तसंकोचपिशुन**, न० (नं) कुंकुम.
**रक्तसंध्यक**, न० (कं) तांबडें कमळ.
**रक्तसरोरुह**, पु० न० (हः हं) तांबडें कमळ.
**रक्तसंज्ञ**, पु० (ज्ञः) कुंकु. २ रंग. ३ पिंजर.
**रक्तांग**, पु० (गः) वनौषधि जीस शुंडारोचनी असें म्हणतात ती. २ मंगलनामा ग्रह. ३ पोंवळें. ४ कुंकु.
**रक्तांगा**, स्त्री० (गा) वनौषधि जीस हरणवेल, हरणदोडी असें म्हणतात ती.
**रक्ताक्ष**, पु० (क्षः) रेडा. २ क्रूर. ३ पारवापाक्षि. ४ चकोर पाक्षि.
**रक्तोत्पल**, न० (लं) तांबडें कमळ.
**रक्तोपल**, न० (लं) गेरू, काव. २ तांबडा, दगड.
**रंग**, पु० न० (गः- गं) कथील. २ पु० (गः) राग, रक्तिमा. ३ नृत्य. ४ रणभूमि. ५ खल. ६ रंग, वर्ण.
**रंगबीज**, न० (जं) रुपें.
**रंगमातृ**, स्त्री० (ता) कुंटण स्त्री. २ लाक्षा, लाख. ३ वृक्षविशेष. ४ रोगविशेष.
**रंगाजीव**, पु० (वः) शिल्पिविशेष ज्यास रंगारी असें म्हणतात तो.
**रघुकार**, पु० (रः) कालीदास कवि.
**रचना**, स्त्री० (ना) रचना, अवयवांचा एकीभाव करणें.
**रजक**, पु० (कः) वस्त्रधावक, परीट. २ (धर्मशास्त्रांत रंगारी हाही अर्थ आहे.)
**रजत** न० (तं) रुपें. २ सोनें. ३ सित, शुभ्र. ४ हार.
**रजतप्रस्थ**, पु० (स्थः) कैलास.
**रंजन**, न० (नं) रक्तचंदन. २ वि० शोभिवणारा पदार्थ. ३ सुखदायक पदार्थ.
**रजनि**, स्त्री० (निः) रात्र. २ चाकवत म्हणून जी शाकविशेष ती.
**रजनी**, स्त्री० (नी) रात्र. २ चाकवत म्हणून जी शाकविशेष ती. ३ हरिद्रा, हळद. ४ वनौषधि जीस नीली, नीळ असें म्हणतात ती.
**रंजनी**, स्त्री० (नी) वनौषधि जीस नीली, नीळ असें म्हणतात ती. २ वनौषधि जीस शुंडारोचनी असें म्हणतात ती. ३ वनौषधि जीस मंजिष्ठा असें म्हणतात ती.
**रजनीजल**, न० (लं) दंव, दहिवर.
**रजनीमुख**, न० (खं) प्रदोष काळ.

**रजस्**, न० (जः) रजोगुण. २ धुळी, धूळ. ३ स्त्रीरज, न्हाण. ४ पराग. ५ भस्म.

**रजस्वल**, पु० (लः) रेडा. २ सौरभ.

**रजस्वला**, स्त्री० (ला) विटाळशी बायको.

**रजोबल**, पु० (लः) अंधःकार.

**रजोमूर्ति**, पु० (र्तिः) ब्रम्हदेव.

**रज्जु**, स्त्री० (ज्जुः) सुंब, दोरी, चऱ्हाट. २ सर्पाकार रचलेला केशवेश, वेणी.

**रंड**, वि० (डः डा- डं) हस्तादि वर्जित.

**रंडा**, स्त्री० (डा) वनौषधि जीस उंदिरकानी असें म्हणतात ती. २ विधवा. ३ व्यभिचारिणी स्त्री.

**रण**, पु० न० (णः- णं) युद्ध. २ पु० (णः) शब्द करणें. ३ शब्द ४ कोंपरा.

**रणतूर्य**, न० (र्यं) रणवाद्य.

**रणभीरु**, पु० (रुः) लढण्यास भित्रा.

**रणरंक**, पु० (कः) रणभीरु, लढण्यास भित्रा.

**रणरण**, न० (णं) विवाह. २ पु० (णः) पक्षिविशेष.

**रणरणक**, पु० (कः) मदन, काम.

**रत**, न० (तं) मैथुन. २ गुह्य.

**रतकूजित**, न० (तं) मैथुन संबंधीं शब्द.

**रतगुरु**, पु० (रुः) नवरा.

**रतज्वर**, पु० (रः) कावळा.

**रतताली**, स्त्री० (ली) कुंटण स्त्री.

**रतनारीच**, पु० (चः) मदन, काम. २ कुत्रा. ३ मैथुनाच्या वेळेस स्त्रियांच्या मुखांतून जो सीत्कार निघतो तो.

**रतनिधि**, पु० (धिः) पक्षिविशेष ज्यास ताजवा, दय्यर असें म्हणतात तो.

**रतर्धिक**, न० (कं) मंगल. २ दिवस.

**रतव्रण**, पु० (णः) कुत्रा.

**रतहिंडक**, पु० (कः) स्त्रिया पळवून नेणारा चोर.

**रतांघ्रि**, स्त्री० (घ्रिः) धुर्के.

**रति**, स्त्री० (तिः) मदनाची स्त्री. २ प्रीति. ३ मैथुन. ४ गुह्य.

**रतिकुहर**, न० (रं) योनि, स्मरमंदिर.

**रतिक्रिया**, स्त्री० (या) मैथुन कर्म.

**रतिगृह**, न० (हं) योनि.

**रतिदेव**, पु० (वः) राजविशेष. २ विष्णु.

**रतिपति**, पु० (तिः) मदन, काम.

**रतिमदा**, स्त्री० (दा) अप्सरा.

**रतिरमण**, पु० (णः) मदन, काम.

**रतिलक्ष**, न० (क्षं) मैथुन.

**रत्न**, न० (त्नं) सोनें, हिरा, पाच, पोंवळें, मोतीं हीं पांच रत्नें प्रत्येक. (कोणी ९ व कोणी १४ रत्नें म्हणतात.) २ स्वजाती श्रेष्ठ, आपल्या जातीमध्यें श्रेष्ठ. ३ मार्ग. ४ फार चांगला.

**रत्नगर्भ**, पु० (र्भः) कुबेर.

**रत्नगर्भा**, स्त्री० (र्भा) पृथ्वी.

**रत्नसानु**, पु० (नुः) मेरुपर्वत.

**रत्ना**, स्त्री० (त्ना) नदी.

**रत्नाकर**, पु० (रः) समुद्र.

**रत्नि**, पु० (त्निः) मुंडाहात.

**रथ**, पु० (थः) वेत. २ रथ. ३ देह.

**रथकट्या**, स्त्री० (ट्या) रथांचा समूह.

**रथकार**, पु० (रः) करण जातीय स्त्रीचे ठायीं माहिष्यापासून झालेला पुत्र. २ सुतार.

**रथगुप्ति**, स्त्री० (प्तिः) शस्त्रादिक ठेवण्यास व रक्षणार्थ रथास लोहादिमय जें आवरण असतें तें.

**रथद्रु**, पु० (द्रुः) तिवसाचें झाड.
**रथद्रुम**, पु० (मः) तिवसाचें झाड.
**रथांग**, पु० (गः) चक्रवाक पक्षि. २ न० (गं) रथाचा अवयव. ३ चक्र, चाक.
**रथिक**, पु० (कः) रथाचा स्वामी.
**रथिन्**, पु० (थी) रथावर बसून युद्ध करणारा. २ रथाचा स्वामी.
**रथिन**, पु० (नः) रथाचा स्वामी.
**रथ्य**, पु० (थ्यः) रथ वाहणारा घोडा.
**रथ्या**, स्त्री० (थ्या) गांवांतील लहान मार्ग. २ रथांचा समूह. ३ राजमार्ग.
**रद**, पु० (दः) दंत, दांत. २ विलेखन.
**रदन**, पु० (नः) दंत, दांत.
**रदनच्छद**, पु० (दः) ओष्ठ, ओंठ.
**रंध्र**, न० (ध्रं) छिद्र. २ दूषण.
**रंध्रबभ्रु**, पु० (भ्रुः) मोठा मुंगुस.
**रभस**, पु० (सः) वेग. २ हर्ष.
**रंभा**, स्त्री० (भा) कदली, केळ. २ एक अप्सरा आहे.
**रम**, पु० (मः) कांत. २ तांबडा अशोक वृक्ष. ३ काम, मदन.
**रमण**, पु० (णः) पति, नवरा. २ अरुण नामक जो सूर्याचा सारथी तो. ३ मदन, काम. ४ न० (णं) पडवळीचें मूळ.
**रमणा**, स्त्री० (णा) रमविणारी स्त्री, बायको.
**रमणी**, स्त्री० (णी) रमविणारी बायको.
**रमणीय**, वि० (यः या- यं) सुंदर.
**रमति**, पु० (तिः) नायक. २ स्वर्ग.
**रमा**, स्त्री० (मा) लक्ष्मी.
**रम्य**, वि० (म्यः म्या- म्यं) सुंदर. २ पु० (म्यः) सोनचाफा. ३ न० (म्यं) पडवळीचें मूळ.
**रम्यक**, पु० (कः) पडवळीचें मूळ.
**रम्या**, स्त्री० (म्या) रात्र.
**रय**, पु० (यः) वेग.
**रल्लक**, पु० (कः) कांबळें.
**रव**, पु० (वः) शब्द.
**रवण**, वि० (णः णा- णं) शब्दशील, नादाचा.
**रवि**, पु० (विः) सूर्य.
**रविनंदन**, पु० (नः) सुग्रीव. २ शनी नामा ग्रह.
**रवीषु**, पु० (षुः) मदन, काम.
**रशना**, स्त्री० (ना) जिव्हा. २ स्त्रीकटिभूषण, दाव, कमरपट्टा.
**रश्मि**, पु० (श्मिः) किरण. २ रज्जु. ३ घोड्याचे दोरे. ४ पक्ष.
**रस**, पु० (सः) शृंगारादिक नवरस. २ गंधरस, रक्तयाबोळ. ३ पारद, पारा. ४ विष. ५ वीर्य, तेज. ६ गोड आंबट इत्यादि षड्रस. ७ राग, प्रीति. ८ द्रव. ९ उदक, पाणी. १० देह. ११ धातूविशेष. १२ स्वाद. १३ शरीरांतील धातुविशेष.
**रसकेसर**, पु० (रः) कापूर.
**रसगंध**, पु० (धः) रक्तयाबोळ, बोळ.
**रसगर्भ**, न० (र्भं) दर्विका नामक वनौषधीच्या काढ्यापासून झालेलें अंजन.
**रसन**, न० स्त्री० (नं-ना) जिव्हा. २ न० (नं) स्वाद. ३ ध्वनि, शब्द.
**रसना**, स्त्री० (ना) वनौषधिविशेष जीस रास्ना असें म्हणतात ती. २ जिव्हा.
**रसनामल**, पु० (लः) जिव्हेचा मळ (लाळ वगैरे.)
**रसनालिह्**, पु० (ट्) कुत्रा.

**रसवती,** स्त्री० (ती) पाकस्थान, पाकशाळा, स्वैंपाकघर.

**रसज्ञा,** स्त्री० (ज्ञा) जिव्हा.

**रसा,** स्त्री० (सा) पृथ्वी. २ वनौषधि जीस पाडवळी, पाहाडमूळ असें म्हणतात ती. ३ वनौषधि जीस सालई असें म्हणतात ती. ४ जिव्हा. ५ कांगा, राळ.

**रसांजन,** न० (नं) दारुहळदीचे काढ्यांत सम भाग शेळीचें दूध घालून केलेलें अंजन.

**रसातल,** न० (लं) पाताळ.

**रसायन,** न० (नं) विष. २ जरा, व्याधि इत्यादिकांस हरण करणारें औषध. ३ पु० (नः) पक्षिराज. ४ वनौषधि वावडिंग.

**रसायनफला,** स्त्री० (ला) हिरड्याचें झाड.

**रसाल,** पु० (लः) आम्रवृक्ष. २ ऊंस. ३ ऊद. ४ गंधरसविशेष ज्यास बोळ, रक्त्याबोल असें म्हणतात तो.

**रसाला,** स्त्री० (ला) श्रीखंड. २ जीभ. ३ दुर्वा. ४ पांढरा भुईकोहळा.

**रसिक,** वि० (कः का- कं) रसयुक्त. २ गोड बोलणारा.

**रसिका,** स्त्री० (का) आंब्याचा रस. २ उंसांचा रस.

**रसित,** न० (तं) मेघांची गर्जना. २ पक्ष्यांचा शब्द. ३ वि० (तः ता- तं) सुवर्णादि रत्नखचित जो पदार्थ तो.

**रसोन,** पु० (नः) लसूण.

**रसोनक,** पु० (कः) लसूण.

**रसोपल,** न० (लं) मोती.

**रहस्,** न० (हः) एकांत स्थल. २ तत्व. ३ गुह्य. ४ रत.

**रंहस्,** न० (हः) वेग.

**रहस्य,** वि० (स्यः स्या- स्यं) एकांत स्थळीं झालेला. (विचार वगैरे) २ गौप्य.

**रहस्या,** स्त्री० (स्या) नदीविशेष.

**रक्षस्,** न० (क्षः) राक्षस.

**रक्षःसभ,** न० (भं) राक्षसांचें घर किंवा सभा.

**रक्षा,** स्त्री० (क्षा) भस्म. २ रक्षण, राखणें. ३ लाक्षा, लाख.

**रक्षित,** वि० (तः ता- तं) रक्षण केलेला.

**रक्षिवर्ग,** पु० (र्गः) राजादिकांचा रक्षण करणारा गण.

**रक्षोघ्न,** न० (घ्नं) पेज. २ पु० (घ्नः) बिब्बा. ३ पु० (घ्नः) रामचंद्र.

**रक्षोजननी,** स्त्री० (नी) रात्र.

**रक्षोभ,** पु० (भः) हत्ती बांधण्याचा खांब.

**रक्ष्ण,** पु० (क्ष्णः) राखणें, रक्षण.

**रा,** पु० (राः) धन, द्रव्य. २ सोनें.

**रांकव,** वि० (वः वा- वं) मृगाच्या लवेपासून झालेलें वस्त्र.

**राका,** स्त्री० (का) पूर्णचंद्रयुक्त पूर्णिमा. २ ओली खरूज. ३ नदीविशेष. ४ नूतन ऋतु प्राप्त झालेली स्त्री.

**राग,** पु० (गः) प्रीति. २ मत्सरपणा. ३ रंग. ४ क्लेश. ५ राजा. ६ तांबडा. ७ शंका घेणारा.

**रागचूर्ण,** पु० (र्णः) खदिरवृक्ष, खैराचें झाड. २ मदन, काम.

**रागरज्जु,** पु० (ज्जुः) काम, मदन.

**रागलता,** स्त्री० (ता) मदन स्त्री, रती.

**रागसूत्र,** न० (त्रं) तुलासूत्र. २ पटसूत्र.

**रागाग्नि,** पु० (निः) बौद्धावतार.

**रागिन्**, पु० (गी) कामी पुरुष. २ आसक्त. ३ गाणारा, गायक.
**राघव**, पु० (वः) समुद्रांतील मोठा मत्स्यविशेष. २ रामचंद्र.
**राज्**, पु० (ट्) राजा.
**राजक**, न० (कं) राजांचा समुदाय.
**राजकशेरु**, पु० (रुः) वनौषधि नागरमोथा.
**राजग्रीव**, पु० (वः) मत्स्यविशेष.
**राजघ**, पु० (घः) खर.
**राजजंबु**, पु० (बुः) जांबाच्या झाडाचा भेद. २ खजुराचें झाड.
**राजताल**, पु० (लः) पूगवृक्ष, सुपारीचें झाड.
**राजन्**, पु० (जा) चंद्र. २ राजा. ३ प्रभु. ४ क्षत्रिय. ५ यक्ष. ६ इंद्र.
**राजन्य**, पु० (न्यः) क्षत्रिय.
**राजन्यक**, न० (कं) क्षत्रियांचा समूह.
**राजन्वत्**, वि० (न्वान्- न्वती- न्वत्) धर्मशील व चांगला असा राजा ज्या देशांत आहे तो देश.
**राजपटोलक**, पु० (कः) पडवळीचें झाड.
**राजपट्ट**, पु० (ट्टः) मणिविशेष.
**राजपुत्र**, पु० (त्रः) बुध नांवाचा ग्रह. २ राजपुत्र.
**राजफल**, पु० (लः) पडवळ.
**राजबदर**, न० (रं) लवण.
**राजबला**, स्त्री० (ला) वनौषधि जीस कुब्जप्रसारिणी, चांदवेल असें म्हणतात ती.
**राजबीजिन्**, वि० (जी- जिनी- जि) राजवंशांत उत्पन्न झालेला.
**राजभद्दिका**, स्त्री० (का) पक्षिविशेष.
**राजमल्ल**, पु० (ल्लः) उद्भट.
**राजमाष**, पु० (षः) उडदांचा एक भेद. २ चंवळ्या.
**राजराज**, पु० (जः) कुबेर. २ सार्वभौमराजा. ३ चंद्र.
**राजर्षि**, पु० (र्षिः) जन्मेजय राजा.
**राजवत्**, वि० (वान्- वती- वत्) राजसत्ताक (देश.)
**राजवंश्य**, वि० (श्यः श्या- श्यं) राजवंशांत उत्पन्न झालेला.
**राजवाह्य**, पु० (ह्यः) विजय हत्ती.
**राजवृक्ष**, पु० (क्षः) बाहव्याचें झाड. २ चाराचें झाड.
**राजशृंग**, पु० (गः) मत्स्यविशेष ज्यास मंगरा असें म्हणतात तो. २ न० (गं) सुवर्णदंडाचें छत्र.
**राजसदन**, न० (नं) राजाचें घर, राजवाडा.
**राजसभा**, स्त्री० (भा) राजाची सभा.
**राजसर्षप**, पु० (पः) मोहोरीचा एक भेद.
**राजसूय**, न० (यं) यागविशेष.
**राजस्कंद**, पु० (दः) घोडा.
**राजहंस**, पु० (सः) हंसपक्षिविशेष. २ नृपामध्यें जो उत्तम नृप, राजा तो.
**राजहस्तिन्**, पु० (स्ती) राजाचा हत्ती.
**राजादन**, न० (नं) वनौ० चाराचें झाड. २ खिरणीचें झाड. ३ वृक्षविशेष.
**राजामस्**, पु० (माः) चंद्र.
**राजार्ह**, न० (र्हं) कृष्णागरुचंदन. २ वि० (र्हः र्हा र्हं) राजाला योग्य.
**राजालुक**, पु० (कः) शाकविशेष, मुळा.

**राजाहि**, पु० (हि:) दुतोंडें.

**राजि**, स्त्री० (जि:) रेषा किंवा जींत अंतर नाहीं अशी पंक्ति, (ओळ) ती.

**राजिका**, स्त्री० (का) कृष्णसर्षप, काळी मोहोरी, राई. २ क्षेत्र, शेत. ३ रेघ.

**राजिल**, पु० (ल:) निर्विषसर्पविशेष ज्यास मालुंड, दुतोंडें असें म्हणतात तें.

**राजील**, पु० (ल:) निर्विषसर्प, दुतोंडें.

**राजीव**, पु० (व:) मत्स्यविशेष ज्यास राया असें म्हणतात तो. २ पु० न० (व:वं) कमळ. ३ पु० (व:) हत्ती. ४ हरिण वि०.

**राज्यांग**, न० (गं) राजाची सात* अंगें आहेत तीं प्रत्येक.

**राढा**, स्त्री० (ढा) दीप्ति. २ देशविशेष. ३ शोभा.

**रात्रक**, न० (कं) वेश्येचे गृहीं एक वर्ष वास करणें.

**रात्रि**, स्त्री० (त्रि:) सूर्यास्तापासून सूर्योदयपर्यंत जो काल तो.

**रात्रिचर**, पु० (र:) राक्षस.

**रात्रिंचर**, पु० (र:) राक्षस.

**रात्रिमट**, पु० (ट:) यमदूत.

**रात्रिमणि**, पु० (णि:) चंद्र.

**रात्रिवेदिन्**, पु० (दी) कोंबडा.

**राद्ध**, न० (द्धं) दोन किंवा तीन दिवसानीं जेवणें.

**राद्धांत**, पु० (त:) सिद्धांत.

**राध**, पु० (ध:) वैशाखमास.

**राधन**, न० (नं) साधन. २ प्राप्ति.

* राजा.२ आमात्य. ३ मित्र.४ भनागार. ५ देश भूमि. ६ दुर्गमस्थान. ७ सेना. हीं राज्याचीं सात अंगें होत.

**राधना**, स्त्री० (ना) भाषण.

**राधरंक**, पु० (क:) नांगर. २ कठिणोदकगार.

**राधा**, स्त्री० (धा] विशाखानक्षत्र. २ गोपी. ३ आंवळीचें झाड. ४ वनौषधि जीस विष्णुक्रांता असें म्हणतात ती. ५ विद्युल्लता, वीज. ६ धनुर्धरांचें चित्र.

**राधेय**, पु० (य:) कर्ण.

**रांभ**, पु० (भ:) संन्यासादि व्रताचे ठायीं ग्राह्य जो वेळूचा दंड तो.

**राम**, पु० (म:) बलराम २ दाशरथी राम. ३ पशुविशेष. ४ परशुराम. ५ रूपानें सुंदर जो मृगविशेष तो. ६ वि० (म:मा-मं) नील, नीलवर्ण. ७ सुंदर. ८ शुभ्र. ९ पु० (म:) घोडा. १० वरुण. ११ न० (मं) वनौषधि ज्यास वथुवा, चंदनबटुवा असें म्हणतात ती. १२ कडूकोष्ठ.

**रामठ**, न० (ठं) हिंग.

**रामणीयक**, वि० (क: का -कं) सुंदर.

**रामदूत**, पु० (त:) मारुती.

**रामा**, स्त्री० (मा) रमविणारी बायको. २ नदीविशेष.

**रामिल** पु० (ल:) रमण, कांत. २ काम, मदन.

**राल**, पु० (ल:) राळ, धूप.

**रावण**, पु० (ण:) रावण.

**राशि**, पु० (शि:) धान्यादिकांची रास, पुंज. २ मेष, वृषभादिक बारा राशी.

**राष्ट्र**, पु० न० (ष्ट्र:ष्ट्रं) जनपद, देश. २ मरणादिक उपद्रव.

**राष्ट्रनिवासिन्**, पु० (सी) नगरवासी.

**राष्ट्रिका**, स्त्री० (का) वनौषधि जीस रिंगणी असें म्हणतात ती.

**राष्ट्रिय**, पु० (यः) राजाच्या बायकोचा भाऊ (नाटयप्रकरणामध्यें)

**रास**, पु० (सः) कोल्हाळ, बहुतांनीं केलेला अस्पष्ट शब्द. दोन गवळ्यांची क्रिडाविशेष.

**रासभ**, पु० (भः) गर्दभ.

**रासेरस**, पु० (सः) सभा. २ रास, क्रीडाविशेष. ३ शृंगार.

**रास्ना**, स्त्री० (स्ना) वनौषधि जीस एलापर्णी, कालिंदण असें म्हणतात ती. २ वनौ० जीस मुंगशी, मुंगुस वेल असें म्हणतात ती.

**राहु**, पु० (हुः) नवग्रहांतील एक ग्रह.

**राहुत्सृष्ट**, पु० (ष्टः) लसूण.

**राहुमूर्धभिद्**, पु० ( त् ) विष्णु.

**राक्षस**, पु० (सः) देवयोनीविशेष, राक्षस. २ साठ संवत्सरांतील ४९ वा संवत्सर.

**राक्षसी**, स्त्री० (सी) चोर ओंवा, किरमाणी ओंवा. २ राक्षसाची बायको.

**राक्षसेंद्र**, पु० (द्रः) रावण. २ बाणासुर.

**राक्षा**, स्त्री० (क्षा) लाक्षा, लाख.

**रिक्त**, न० (क्तं) अरण्य. २ रिकामें.

**रिक्तक**, वि० (कःका·कं) रिकामा.

**रिक्थ**, न० (क्थं) धन, द्रव्य.

**रिंखण**, न० (णं) धर्मादिकांपासून चलन. २ हातापायांनीं जें बालकाचें गमन तें, रांगणें.

**रिंखा**, स्त्री० (खा) वनौषधि जीस कुवली, कुहिरी असें म्हणतात ती. २ अश्वगतिविशेष. ३ नर्तन, नाचणें.

**रिंगण**, न० (णं) धर्मादिकांपासून चलन. २ हातापायांनीं जें बालकाचें गमन तें, रांगणें.

**रिटि**, पु० (टिः) महादेवाचा नंदी. २ शिवगण.

**रिपु**, पु० (पुः) शत्रु.

**रिष्ट**, न० (ष्टं) कल्याण. २ अमंगल. ३ अशुभा भाव. ४ पु० (ष्टः) तरवार. ५ फेनयुक्त.

**रिष्टि**, पु० (ष्टिः) खड्ग, तरवार. २ कल्याण. ३ स्त्री० (ष्टिः) देशविशेष. ४ वस्त्र.

**रीढा**, स्त्री० (ढा) अनादर.

**रीण**, वि० (णःणा·णं) प्रस्रुत, स्रवलेला.

**रीति**, स्त्री० (तिः) पितळ. २ प्रचार, लोकाचार, चाल. ३ स्यंद, प्रस्रवण. ४ लोहकिट्टार, किटाळ. ५ कूट.

**रीतिपुष्प**, न० (ष्पं) अत्यंत तापलेल्या पितळापासून निघालेलें फूल ज्यास जस्ताचें फूल असें म्हणतात तें.

**रीती**, स्त्री० (ती) पितळ.

**रुक्प्रातिक्रिया**, स्त्री० (या) रोग निरसन, रोग घालविणें.

**रुक्म**, न० (क्मं) सुवर्ण, सोनें. २ लोखंड.

**रुक्मकारक**, पु० (कः) सोनार.

**रुक्मिदारिन्**, पु० (री) बलराम.

**रुग्ण**, वि० (ग्णःग्णा·ग्णं) व्यथित. २ भिन्न, मोडलेला. (हस्तपादादि.)

**रुचक**, पु० (कः) एरंडाचें झाड. २ महाळुंगाचें झाड. ३ न० (कं) मधुवर्ण लवणविशेष ज्यास संचळखार असें म्हणतात तें. ४ मीठ.

**रुचि**, स्त्री० (चिः) कांति. २ अत्यासक्ति, स्पृहा. ३ किरण. ४ शोभा. ५ आलिंगन. ६ गोडी.

**रुचिर**, वि० (रःरा·रं) सुंदर.

**रुच्य**, वि० (च्यःच्या·च्यं) सुंदर.

**रुच्**, स्त्री० (क्) कांति. २ रोग. ३ शोभा. ४ इच्छा.

**रुजा**, स्त्री० (जा) रोग. २ भंग.

**रुट्**, स्त्री० ( ट् ) क्रोध, राग.

**रुंड**, पु० (डः) मस्तकहीन व क्रियायुक्त शरीर ज्यास धड असें म्हणतात तें.

**रुंडिका**, स्त्री० (का) दूत कर्म करणारी स्त्री. २ लढाई झालेली जागा.

**रुत**, न० (तं) पक्ष्यांचा शब्द.

**रुदित**, न० (तं) रोदन, रडणें.

**रुद्ध**, वि० (द्धः-द्धा-द्धं) वेष्टित, रोधलेला, वेढलेला.

**रुद्र**, पु० (द्रः) महादेव.

**रुद्राक्रीड**, पु० (डः) स्मशान, मसनवटी.

**रुद्राणी**, स्त्री० (णी) पार्वती.

**रुधिर**, न० (रं) रक्त. २ कुंकुं. ३ पु० (रः) मंगळ नामा ग्रह.

**रुबुक**, पु० (कः) एरंडाचें झाड.

**रुमा**, स्त्री० (मा) सुग्रीवाची स्त्री. २क्षारसमुद्र.

**रुरु**, पु० (रुः) मृगविशेष ज्यास रोहें, भुवार असें म्हणतात तो. २ दैत्य.

**रुशत्**, पु० स्त्री० न० ( न्- शती- शत् ) अमंगल वचन.

**रुषित**, न० (तं) लिप्त. २ युक्त.

**रुहा**, स्त्री० (हा) दुर्वा.

**रुक्ष**, वि० (क्षः क्षा- क्षं ) प्रेमरहित, निस्नेह. २ अचिक्कण, ओलसरपणा ज्यास नाहीं तो.

**रूढ**, न० (ढं) उत्पन्न. २ प्रसिद्ध. ३ चढलेला.

**रूप**, वि० ( पः [illegible] पं ) सदृश, सारखा. २ न० (पं) स्वभाव. ३ सौंदर्य. ४ पु० (पः) लोक. ५ पशुवृंद. ६ ग्रंथवृत्ति. ७ नाटकादि. ८ आकार. ९ श्लोक. १० शब्द. ११ ऐक्यभाव. १२ पांच विषयांतील चौथा विषय.

**रूपक**, न० (कं) नाटकादि. २ काव्यालंकार. ३ आकार.

**रूपास्त्र**, पु० ( स्त्रः ) मदन, काम.

**रूप्य**, न० (प्यं) रुपें. २ नाणें ( रुपया, पावली इत्यादि. ) ३ वि० (प्यः प्या- प्यं ) प्रशस्तरूपी, स्वरूपसुंदर. ४ सुंदर.

**रूप्याध्यक्ष**, पु० (क्षः) रुप्याच्या कामावरचा कामदार.

**रूबुक**, पु० (कः) एरंडाचें झाड.

**रूषित**, वि० (तः ता- तं ) गुंठित, गुंडाळलेला किंवा धूलिलिप्त.

**रूक्ष**, वि० ( क्षः क्षा- क्षं ) निःस्नेह, प्रेमरहित. २ अचिक्कण, ओलसरपणा ज्यास नाहीं तो.

**रेक**, पु० (कः) बेडूक. २ नीच.

**रेचक**, पु० (कः) जवखार. २ रेच. जुलाब करणारा पदार्थ.

**रेचन**, न० (नं) रोगविशेष. २ दंत रोग. ३ रेचकपदार्थ.

**रेचनी**, स्त्री० (नी) वनौषधि जीस तेंडू, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती. २ शुंडारोचनी नामक वनौषधिविशेष.

**रेचित**, न० (तं) घोड्याची एक चाल जीस दुडकी चाल असें म्हणतात ती.

**रेणु**, पु० स्त्री० ( णुः णुः ) धूलि, धूळ. २ वेळू.

**रेणुक**, पु० (कः) वाटाणा.

**रेणुका**, स्त्री० (का) सुवासिक द्रव्यविशेष ज्यास रेणुकबीज असें म्हणतात तें. २ परशुरामाची माता.

**रेणुरूषित**, पु० (तः) गर्दभ.
**रेणुवास**, पु० (सः) भ्रमर.
**रेणुसार**, पु० (रः) कापूर.
**रेतस्**, न० (तः) रेत. २ पारा.
**रेप**, वि० ( पः पा- पं ) निकृष्ट, निंद्य. २ क्रूर.
**रेफ**, वि० ( फः फा- फं ) निकृष्ट, निंद्य. २ कुत्सित. ३ पु० (फः) रवर्णार्ध.
**रेभण**, न० (णं ) गाई, बैलांचें ओरडणें, हंबारणें.
**रेरिहाण**, पु० (णः) महादेव. २ आकाश.
**रेवंतमनुदस्रसू**, स्त्री० ( सूः) यमाची माता.
**रेवति**, स्त्री० ( तिः ) मदनाची स्त्री.
**रेवती**, स्त्री० (ती) बलरामाची स्त्री.
**रेवतीरमण**, पु० (णः ) बलराम.
**रेवा**, स्त्री० (वा) नर्मदा नदी.
**रेपस्**, वि० ( पः पाः पः ) अधम. २ क्रूर. ३ कृपण.
**रैवत**, पु० (तः) पर्वतविशेष. २ महादेव.
**रोक**, न० (कं ) छिद्र. २ पु० (कः) व्यवहारविशेष. ३ कांति.
**रोग**, पु० (गः ) व्याधि. २ कोष्ट कोळिंजन.
**रोगहारिन्**, पु० (री) वैद्य.
**रोचन**, पु० (नः) सांवरीच्या झाडांतील एक भेद.
**रोचना**, स्त्री० ( ना) गाईचा पूज्यभाग. २ तांबडें कमळ. ३ औषधिविशेष जीस गोरोचन असें म्हणतात ती. ४ उत्कृष्ट स्त्री.
**रोचनी**, स्त्री० (नी ) वनौषधि जीस तेंडू, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती.
**रोचिष्णु**, वि० ( ष्णुः ष्णुः ष्णु ) अतिशयें करून शोभणारा, कांतिमान.
**रोचिस्**, न० (चिः) कांति.
**रोड**, पु० (डः) चूर्ण, चूर. २ वि० ( डः डा- डं ) तृप्त.
**रोदन**, न० ( नं ) नेत्रोदक. २ आरडणें, रडणें.
**रोदना**, स्त्री० (ना) वनौ० जीस धमासा असें म्हणतात ती.
**रोदनी**, स्त्री० (नी) वनौषधि जीस धमासा असें म्हणतात ती.
**रोदस्**, न० (दः) रोदसी, पृथ्वी आणि आकाश.
**रोदसी**, न० द्वि० (सी) पृथ्वी आणि आकाश. ( ही स्त्रीलिंगी प्रमया असें कोणी म्हणतात. )
**रोदस्यौ**, स्त्री० द्वि० (स्यौ) पृथ्वी आणि आकाश.
**रोध**, पु० (धः) तीर. २ निरोध. ३ नाश. ४ पूल. ५ बांधारा.
**रोधन**, पु० (नः) बुध नामा ग्रह.
**रोधस्**, न० (धः) तीर.
**रोधावक्रा**, स्त्री० (क्रा) नदी.
**रोध्र**, न० (ध्रं) अपराध. २ पाप. ३ पु० (ध्रः) वृक्षविशेष. ४ हत्ती बांधण्याची जागा.
**रोप**, पु० (पः) बाण. २ टोंचणें.
**रोमगुछ**, पु० (छः) चवरी.
**रोमगुत्स**, न० (त्सं) चवरी.
**रोमंथ**, पु० (थः) पशूंचें चर्वित चर्वण, रवंथ.
**रोमन्**, न० (मः) आंगावरचा केस.
**रोमश**, पु० (शः) मेंढा. २ ज्याला पुष्कळ केस आहेत तो.

**रोमशा,** स्त्री० (शा) काकडी.

**रोमहर्षण,** पु० (णः) रोमांच. २ पुत्र. ३ धाटिंगवृक्ष, बेहेडयाचें झाड.

**रोमांच,** पु० (चः) रोमांच.

**रोमांचित,** वि० ( तः ता- तं ) रोमांचयुक्त.

**रोमोद्भेद,** पु० (दः) रोमांच.

**रोष,** पु० (षः) क्रोध, राग.

**रोषण,** पु० (णः) पारा. २ सोन्याची परीक्षा पाहण्याची कसोटी. ३ न० ( णं ) सोनें. ४ वि० ( णः णा- णं ) कोपिष्ठ.

**रोहक,** पु० (कः) प्रेतविशेष.

**रोहिणी,** स्त्री० (णी) गाय. २ रोहिणी नक्षत्र. ३ दूध काढण्याचें भांडें, चरवी. ४ कंठरोगविशेष. ५ विद्युल्लता, वीज. ६ वनौषधि जीस केदार, कुटकी असें म्हणतात ती ७ रक्तवर्ण. ८ कुंभ्याचें झाड. ९ बलरामाची माता.

**रोहिणीश,** पु० (शः) चंद्र.

**रोहित्,** पु० (त्) सूर्य. २ स्त्री० (त्) हरिणी. ३ लताविशेष.

**रोहित,** वि० ( तः ता- तं ) रक्तवर्ण. २ पु० (तः) मृगविशेष. ३ मत्स्यविशेष. ४ न० ( तं ) सरळ. ५ इंद्राचें धनुष्य.

**रोहितक,** पु० ( कः ) तांबडा रोहिडावृक्ष.

**रोहिताश्व,** पु० (श्वः) अग्नि. २ हरिश्चंद्राचा पुत्र.

**रोहिन्,** पु० (ही) तांबडा रोहिडा वृक्ष. २ पिंपळाचें झाड. ३ वडाचें झाड.

**रौद्र,** पु० (द्रः) नाटकांतील आठ रसांतील एक रस. २ धर्म. ३ रस. ४ वि० ( द्रः द्रा- द्रं ) तीव्र. ५ भयंकर.

**रौद्रा,** स्त्री० ( द्रा ) चंडी देवीविशेष.

**रौमक,** न० ( कं ) सांबरलवण, सांबरलोण.

**रौरव,** पु० (वः) नरकविशेष. २ घोर.

**रौहिण,** पु० (णः) मैलागिरी चंदन. २ रक्तचंदनाचें झाड.

**रौहिणेय,** पु० (यः) बलराम. २ बुध नामा ग्रह. ३ व[illegible].

**रौहिष,** न० (षं) तृणविशेष ज्यास गंजाण, रोहिसगवत असें म्हणतात तें. २ पु० (षः) मृगविशेष ज्यास रोही असें म्हणतात तो.

**ऱ्हद,** पु० (दः) खोल जो जलाशय तो, डोहो, डोह.

**ऱ्हदग्रह,** पु० (हः) जलचरविशेष.

**ऱ्हदिनी,** स्त्री० (नी) नदी.

**ऱ्हसिष्ठ,** वि० ( ष्ठः ष्ठा- ष्ठं ) अतिशय ऱ्हस्व.

**ऱ्हस्व,** वि० ( स्वः स्वा- स्वं ) खुजा, वामनमूर्ति, ठेंगणा. २ ऱ्हस्व.

**ऱ्हस्वगवेधुका,** स्त्री० ( का ) वनौषधि जीस बला ऱ्हस्वचिकणा असें म्हणतात ती.

**ऱ्हस्वांग,** पु० ( गः ) जीवक नामक वनौषधि.

**ऱ्हादिनी,** स्त्री० ( नी ) इंद्राचें आयुध जें वज्र तें. २ विद्युल्लता, वीज. ३ नदी. ४ वनौषधि जीस सालई असें म्हणतात ती. ५ भ्रमण. ६ मैथुन.

**ऱ्हास,** पु० (सः) ध्वनि. २ ऱ्हास, मोड.

**ऱ्ही,** स्त्री० (ऱ्हीः) लज्जा, लाज.

**ऱ्हीक**, पु० (कः) बौद्ध. २ नास्तिक.
**ऱ्हीण**, वि० (णः णा- णं) लज्जित, लाजलेला.
**ऱ्हीत**, वि० (तः ता- तं) लज्जित.
**ऱ्हीन**, वि० (नः ना- नं) लज्जित, लाजलेला.
**ऱ्हीबेर**, न० (रं) वनौ० ज्यास वाळा असें म्हणतात तो.
**ऱ्हेषा**, स्त्री० (षा) घोड्याचा शब्द.

## ल.

**ल**, पु० (लः) इंद्र.
**लंका**, स्त्री० (का) राक्षसांची नगरी. २ डाहाळी. ३ देवताविशेष. ४ व्यभिचारिणी स्त्री. ६ राक्षसी.
**लकुच**, न० (चः) ओटीचें झाड.
**लंकेश**, पु० (शः) रावण.
**लंकोपिका**, स्त्री० (का) वनौषधि जीस पृक्का, पिंडिका असें म्हणतात ती.
**लक्तक**, पु० (कः) जीर्ण वस्त्र खंड, छाटी, फडकें इत्यादि.
**लखंड**, न० (डं) मनोरम.
**लगुड**, पु० (डः) काठी, दांडा, लांकूड.
**लग्न**, न० (ग्नं) मेषादि बारा राशींचा उदय. २ पु० (ग्नः) स्तुतिपाठक, भाट. ३ वि० (ग्नः ग्ना- ग्नं) आसक्त. ४ लज्जित.
**लग्नक**, पु० (कः) जामीन.
**लंघन**, न० (नं) उपवास, उपास. २ उल्लंघन. ३ उडणें.
**लघिष्ठ**, पु० (ष्ठः) अतिअल्प.
**लघु**, न० (घु) सत्वर. २ पु० (घुः) वनौषधि जीस पिंडिका असें म्हणतात ती. ३ न० (घु) काळ्या वाळ्याचें मूळ. ४ पिंपळी. ५ वनौषधिविशेष. ६ वि० (घुः घ्वी- घु) इष्ट. ७ मनोज्ञ. ८ अल्प. ९ निःसार.
**लघुकाय**, पु० (यः) बकरा.
**लघुखट्विका**, स्त्री० (का) लहान खाट, बाज
**लघुगर्ग**, पु० (र्गः) जलचरविशेष.
**लघुजंगल**, पु० (लः) लावापक्षि.
**लघुमांस**, पु० (सः) तित्तिरपक्षि.
**लघुलय**, न० (यं) वनौ० काळ्या वाळ्याचें मूळ.
**लघ्वी**, स्त्री० (घ्वी) लहान रथ. २ बैलाची गाडी. ३ लाघवयुक्त. ४ रथविशेष.
**लंज**, पु० (जः) पंगु. २ नांदरुखीचें झाड.
**लज्जा**, स्त्री० (ज्जा) लाज.
**लज्जाशील**, वि० (लः ला- लं) लोक लज्जायुक्त, लाजरा.
**लज्जित**, वि० (तः ता- तं) लाजलेला,
**लट्वा**, स्त्री० (ट्वा) ग्रामचटका, गांवांतील चिमणी. २ करंज वृक्षविशेष. ३ फलविशेष. ४ वाद्यविशेष.
**लडह**, न० (हं) मनोरम.
**लता**, स्त्री० (ता) वल्ली, वेल. २ वृक्षाची शाखा. ३ प्रियंगु नामा वृक्ष. ४ पिंडिकालता. ५ ज्योतिष्मती जीस मालकांगोणी असें म्हणतात ती वनौषधि. ६ कस्तुरी. ७ दुर्वा. ८ एक फुलझाड आहे ज्यास कुसरी, कस्तुरीमोगरा मधुमाधवी असें म्हणतात ती.
**लतांबुज**, पु० (जः) भोंपळ्याचें फूल.

**लतामणि**, पु० (णिः) पोंवळें.

**लतायावक**, न० (कं) नूतन पल्लव.

**लतार्क**, पु० (र्कः) हिरवा पलांडु.

**लतालक**, पु० (कः) हत्ती.

**लताशंकतरु**, पु० (रुः) सायाचें झाड.

**लपन**, न० (नं) मुख, तोंड.

**लंपाक**, पु० (कः) लंपट. २ देशविशेष.

**लपित**, न० (तं) भाषण. २ वि० (तः ता-तं) उक्त, बोललेला.

**लंबकर्ण**, पु० (र्णः) बकरा. २ वृक्षविशेष. ३ लंबकर्ण, गर्दभ.

**लंबन**, न० (नं) नाभि पर्यंत लोंबणारी कंठी. २ लोंबणें.

**लंबा**, स्त्री० (बा) कडू भोंपळा. २ लक्ष्मी. ३ गौरी, पार्वती.

**लंबोदर**, पु० (रः) गणपति. २ चूल.

**लंबौष्ठ**, पु० (ष्ठः) उंट.

**लब्ध**, वि० (ब्धः ब्धा- ब्धं) प्राप्त, मिळालेला.

**लब्धवर्ण**, वि० (र्णः र्णा- र्णं) पंडित, विद्वान.

**लभ्य**, वि० (भ्यः भ्या- भ्यं) नीतिप्राप्य, न्यायानें मिळावयाचा.

**लमपट्ठ**, न० (ठ्ठ) विपरीत.

**लय**, पु० (यः) गायन, वाद्य, नाच इत्यादिकांचें समकालिक अवसान. २ न० (यं) वनौ० काळ्या वाळ्याचें मूळ. ३ पु० (यः) विनाश. ४ आलिंगन.

**लयपुत्री**, स्त्री० (त्री) नटी.

**लयारंभ**, पु० (भः) नट.

**ललज्जिव्ह**, वि० (व्हः व्हा- व्हं) हिंसा करणारा प्राणी. २ पु० (व्हः) उंट. ३ कुत्रा.

**ललंतिका**, स्त्री० (का) नाभिपर्यंत लोंबणारी कंठी.

**ललना**, स्त्री० (ना) स्त्रीविशेष. २ कामुक स्त्री. ३ जिव्हा.

**ललाट**, न० (टं) भाल, कपाळ.

**ललाटगा**, स्त्री० (गा) भस्म लावणें.

**ललाटिका**, स्त्री० (का) ललाट भूषण. २ टिळा.

**ललाम**, न० (मं) पुच्छ, शेंपटी. २ घोड्याचें वगैरे कपाळावरचा पुंड्र. ३ घोड्याचें भूषण. ४ घोडा. ५ प्रधान, मुख्य. ६ केतु, ध्वज. ७ शृंग. ८ चिन्ह. ९ प्रभाव. १० रम्य.

**ललामक**, न० (कं) बाशिंगासारखी कपाळावर लोंबणारी फुलांची माळ, शिघळी.

**ललामन्**, न० (म) पुच्छ, शेंपटी. २ घोड्याचें वगैरे कपाळावरचा पुंड्र. ३ घोड्याचें भूषण. ४ घोडा. ५ प्रधान, मुख्य. ६ केतु, ध्वज. ७ शृंग. ८ चिन्ह. ९ प्रभाव.

**ललित**, न० (तं) स्त्रियांचा एक हाव आहे. २ वि० (तः ता- तं) सुंदर. ३ न० (तं) हारविशेष.

**लव**, वि० (वः वा- वं) सूक्ष्म, बारीक. २ पु० (वः) धान्यादि छेदन, धान्यादि कापणें. ३ सीतेचा पुत्र. ४ लेश. ५ विनाश. ६ तृणविशेष. ७ किंचित कालमान.

**लवंग**, न० (गं) सुवासिकद्रव्यविशेष, लवंग.

**लवण**, पु० (णः) खारट रस. २ मीठ. ३ न० (णं) सौंदर्य. ४ पु० (णः) समुद्रविशेष. ५ राक्षसविशेष. ६ वि० (णः णा- णं) मिठानें युक्त जो पदार्थ तो.

**लवणा**, स्त्री० (णा) नदीविशेष.

**लवणोद**, पु० (दः) समुद्रविशेष ज्यास क्षार समुद्र असें म्हणतात तो.

**लवन**, न० (नं) धान्यादिकांचें छेदन.

**लवित्र**, न० (त्रं) इळा, कोयता इत्यादि.

**लशून**, न० (नं) लसूण.

**लसा**, स्त्री० (सा) वनौषधिविशेष.

**लस्तक**, पु० (कः) धनुष्याचा मध्यभाग.

**लक्ष**, न० (क्षं) कपट. २ वेध्य, निशाण. ३ लक्षसंख्या.

**लक्षण**, न० (णं) चिन्ह. २ पु० (णः) सारस नामा पक्षि. ३ न० (णं) नांव, संज्ञा.

**लक्षणा**, स्त्री० (णा) सारसनामा पक्ष्याची स्त्री.

**लक्षा**, स्त्री० (क्षा) लक्षसंख्या.

**लक्ष्मण**, वि० (णः णा णं) लक्ष्मीवान. २ पु० (णः) रामाचा बंधु जो लक्ष्मण नामा तो. ३ दुर्योधनाचा पुत्र.

**लक्ष्मणा**, स्त्री० (णा) सारस पक्ष्याची स्त्री. २ औषधिविशेष.

**लक्ष्मन्**, न० (क्ष्म) चिन्ह. २ प्रधान, मुख्य.

**लक्ष्माप**, पु० (पः) वायु.

**लक्ष्मी**, स्त्री० (क्ष्मीः) ऐश्वर्य, संपत्ति. २ वनौषधि जीस केवणी, मुरडशेंग असें म्हणतात ती. ३ शोभा. ४ समृद्धि. ५ औषधि. ६ विष्णूची स्त्री.

**लक्ष्मीगृह**, न० (हं) तांबडें कमळ.

**लक्ष्मीपति**, पु० तिः) विष्णु. राजा.

**लक्ष्मीपुत्र**, पु० (त्रः) मदन. २ घोडा.

**लक्ष्मीवत्**, वि० (वान् वती तू) लक्ष्मीवान.

**लक्ष्य**, न० (क्ष्यं) इष्टसिध्यर्थ वास्तविकार्थ गुप्त ठेवून अर्थांतर सांगणें, कपट. २ वेध्य, निशाण. ३ चित्त, मन.

**ला**, स्त्री० (ला) दान. २ ग्रहण, घेणें.

**लांगल**, न० (लं) नांगर.

**लांगलिकी**, स्त्री० (की) वनौषधि जीस वागचवका, कळलावी असें म्हणतात ती.

**लांगलिन्**, पु० (ली) रेवतीरमण, बलराम. २ नारळाचें झाड.

**लांगली**, स्त्री० (ली) वनौषधि जीस मोगुड, जलपिंपळी असें म्हणतात ती. २ नारळाचें झाड, माड. ३ पुष्पविशेष. ४ तृण राज, ताडमाड.

**लांगुल**, न० (लं) पुच्छ, शेंपटी, दांडी. २ शिस्न.

**लांगूल**, न० (लं) पुच्छ, शेंपटी, दांडी.

**लांछन**, न० (नं) चिन्ह. २ मान. ३ डाग, दूषण.

**लाज**, पु० (जः) नि० ब० भाजलेले व्रीही, लाह्या. २ ओले तांदूळ. ३ न० (जं) काळ्या वाळ्याचें मूळ.

**लाजा**, स्त्री० (जा) लाह्या.

**लाट**, पु० (टः) वस्त्र. २ देशविशेष.

**लाबु**, पु० (बुः) काळा भोंपळा.

**लाबू**, पु० (बूः) काळा भोंपळा.

**लाभ**, पु० (भः) मूळ धनावर अधिक मिळालेलें, नफा, फायदा.

**लामज्जक**, न० (कं) काळ्या वाळ्याचें मूळ.

**लालसा**, स्त्री० (सा) अतिशय इच्छा. २ याञ्चा. ३ औत्सुक्य, उद्यमयुक्तता.

**लाला**, स्त्री० (ला) लाळ.

**लालाटिक**, वि० (कः का कं) कोप किंवा प्रसन्नता जाणण्यासाठीं यजमानाच्या लला-

टाकडे पाहणारा. २ धन्याचें काम करण्यास अशक्त किंवा आळशी.

**लाव**, पु० (वः) पक्षिविशेष ज्यास लावा असें म्हणतात तो.

**लावक**, पु० (कः) लावापक्षि.

**लासक**, पु० (कः) मयूर, मोर. २ आटाळें. ३ नृत्य करणारा.

**लासिका**, स्त्री० (का) नाचणारी स्त्री.

**लास्फोटनी**, स्त्री० (नी) वेध पाडण्याचें शस्त्रविशेष ज्यास सामता वगैरे म्हणतात तो.

**लास्य**, न० (स्यं) नृत्य, नाचणें.

**लाक्षा**, स्त्री० (क्षा) लाख.

**लाक्षाप्रसादन**, पु० (नः) तांबडा लोध्रवृक्ष.

**लाक्षावृक्ष**, पु० (क्षः) पळसाचें झाड.

**लिकुच**, पु० (चः) ओटीचें झाड.

**लिखित**, वि० (तः ता- तं) लिहिलेला.

**लिंग**, न० (गं) चिन्ह. २ शिस्न. ३ अनुमान. ४ सांख्य शास्त्रोक्त प्रकृति. ५ शिवमूर्तिविशेष. ६ व्याप्य.

**लिंगवृत्ति**, पु० (त्तिः) उपजीविकेसाठीं जटादि धारण करणारा, ढोंगी.

**लिपि**, स्त्री० (पिः) लिहिलेलें अक्षर.

**लिपिकर**, पु० (रः) लेखक.

**लिपिकार**, पु० (रः) लेखक.

**लिपी**, स्त्री० (पी) लिहिलेलें अक्षर.

**लिप्त**, वि० (तः प्ता- प्तं) विलिप्त. २ खादित, खाल्लेलें. ३ विषानें लिप्त.

**लिप्तक**, पु० (कः) विषयुक्तबाण.

**लिप्सा**, स्त्री० (प्सा) इच्छा.

**लिबि**, स्त्री० (बिः) लिहिलेलें अक्षर.

**लिबिंकर**, पु० (रः) लेखक.

**लिबी**, स्त्री० (बी) लिहिलेलें अक्षर.

**लिक्षा**, स्त्री० (क्षा) यूकांड, ऊचें अंडें, लिख.

**ली**, स्त्री० (ली) आलिंगन. २ चपळ.

**लीढ**, वि० (ढः ढा-ढं) भक्षित, खाल्लेलें.

**लीला**, स्त्री० (ला) स्त्रियांचा हावविशेष.

**लीलोद्यान**, न० (नं) क्रीडारण्य, क्रीडेचा बाग.

**लुंटाक**, पु० (कः) कावळा.

**लुंठन**, न० (नं) पायबंद.

**लुठित**, वि० तः ता-तं) लोळणारा (घोडा वगैरे.)

**लुब्ध**, वि० (ब्धः ब्धा- ब्धं) अभिलाषशील. २ ज्याला इच्छा आहे तो. ३ पु० (ब्धः) व्याध, पारधी.

**लुब्धक**, पु० (कः) व्याध पारधी. २ व्याघ्र, वाघ.

**लुलाप**, पु० (पः) महिष, गवा.

**लुलाय**, पु० (यः) महिष, गवा.

**लूता**, स्त्री० (ता) ऊर्णनाभ, कोळी. २ मुंगी. ३ रोगविशेष.

**लून**, वि० (नः ना- नं) छेदलेला.

**लूनक**, पु० (कः) पशु. २ छेदलेला.

**लूम**, न० (मं) पुच्छ, शेपटी.

**लेख**, पु० (खः) देव. २ न० (खं) पत्र.

**लेखक**, पु० (कः) लेखक, लिहिणारा.

**लेखन**, न० (नं) छेद. २ भूर्ज वृक्ष. ३ लिहिणें.

**लेखनिक**, पु० (कः) जासूद.

**लेखनी**, स्त्री० (नी) लेखणी.

**लेखर्षभ**, पु० (भः) इंद्र.

**लेखा**, स्त्री० (खा) रेषा. २ लिपि.

**लेप**, पु० (पः) भोजन. २ लेपन, लिंपणें.

**लेपक**, पु० (कः) शिल्पविशेष. ज्यास गवंडी असें म्हणतात तो.

**लेपकामिनी**, स्त्री० (नी) सडासंमार्जन करणारी (स्त्री.)

**लेलिहान**, पु० (नः) सर्प.

**लेश**, पु० (शः) कण. २ लेश.

**लेष्टु**, पु० (ष्टुः) मृत्तिकाखंड, ढेंकूळ, डिफळ.

**लेह**, पु० (हः) भोजन.

**लोक**, पु० (कः) जन. २ भुवन, स्वर्गपातालादि लोक.

**लोकजित्**, पु० (त्) नास्तिक. २ काम, मदन.

**लोकनाथ**, पु० (थः) बौद्धभेद.

**लोकबांधव**, पु० (वः) सूर्य.

**लोकबंधु**, पु० (धुः) सूर्य.

**लोकमातृ**, स्त्री० (ता) लक्ष्मी.

**लोकायत**, न० (तं) चार्वाकांचें तर्कशास्त्र.

**लोकायतिक**, पु० (कः) देहात्मवादि जो बौद्ध तो.

**लोकालोक**, पु० (कः) पर्वतविशेष.

**लोकेश**, पु० (शः) ब्रम्हदेव. २ बौद्धभेद.

**लोकेश्वर**, पु० (रः) बौद्धभेद.

**लोचक**, पु० (कः) काजळ. २ निळें वस्त्र. ३ डोळ्यांतील बाहुली. ४ मांसपिंड. ५ स्त्रियांच्या ललाटाचें आभरण. ६ केळ. ७ निर्बुद्धि. ८ कर्णपूर.

**लोचका**, स्त्री० (का) कानांतील अलंकारविशेष. २ वनौषधि जीस मुरवेल असें म्हणतात ती.

**लोचन**, न० (नं) नेत्र, डोळा.

**लोचनामय**, पु० (यः) नेत्ररोग.

**लोचमर्कट**, पु० (टः) वनौषधि ज्यास मोरशेंडा, अजमोदा असें म्हणतात ती.

**लोचमस्तक**, पु० (कः) वनौषधि ज्यास मोरशेंडा, अजमोदा असें म्हणतात ती.

**लोत**, न० (तं) चोरीचें धन.

**लोत्र**, न० (त्रं) चोरीचें धन.

**लोध्र**, पु० (ध्रः) लोध्रवृक्ष.

**लोपाक**, पु० (कः) कोल्हा.

**लोपामुद्रा**, स्त्री० (द्रा) अगस्ति ऋषिची पत्नी.

**लोपाशिका**, स्त्री० (का) कोल्ही.

**लोत्र**, न० (त्रं) चोरलेलें धन.

**लोमन्**, न० (म) आंगावरील बारीक केंस, लंव.

**लोमश**, पु० (शः) मुनिविशेष. २ मेंढा. ३ वि० (शःशा-शं) ज्याला पुष्कळ केंस आहेत तो.

**लोमशा**, स्त्री० (शा) जटामांशी लता. २ वेखंड. ३ वनौषधि जीस कुवली, कुहिरी असें म्हणतात ती.

**लोमालिका**, स्त्री० (का) कोल्ही.

**लोल**, वि० (लःला-लं) चंचल. २ सतृष्ण, साकांक्ष, उत्सुक.

**लोला**, स्त्री० (ला) जिव्हा. २ कमळ. ३ लक्ष्मी.

**लोलुप**, वि० (पःपा-पं) अति तृष्णाशील.

**लोलुभ**, वि० (भःभा-भं) अति तृष्णाशील.

**लोष्ठ**, पु० न० (ष्ठःष्ठं) मृत्तिका खंड, ढेंकूळ, डिखळ.

**लोष्टभेदन**, पु० (नः) डिफळें फोडण्याचा मुद्गर.

**लोह**, पु० न० (हःहं) कृष्णागरु चंदन. २ पु० (हः) लोखंड. ३ सोनें रुपें इत्यादि सर्व तेजस किंवा सोनें, रुपें, तांबें, पितळ, कांसें, कथील, शिसें हीं आठ प्रत्येक.

लोहकार, पु० (रः) शिल्पिविशेष ज्यास लोहार असें म्हणतात तो.

लोहनाल, पु० (लः) बाणविशेष.

लोहपृष्ठ, पु० (ष्ठः) ज्याचीं पिसें बाणास उपयोगी पडतात असा पक्षिविशेष.

लोहल, वि० (लःला-लं) अस्पष्ट बोलणारा.

लोहवर, न० (रं) सुवर्ण, सोनें.

लोहाभिसार, पु० (रः) खांडे नवमीस किंवा विजयादशमीस शस्त्र स्थापना करितात ती.

लोहिका, स्त्री० (का) लोखंडी पात्र.

लोहित, वि० (तःता-तं) रक्तवर्ण. २ पु० (तः) मृगविशेष. ३ नदविशेष. ४ मंगळ नामा ग्रह. ५ कुंकुम. ६ रक्तचंदन. ७ कमलासारखा सुगंधि चंदनविशेष. ८ रक्त.

लोहितक, न० (कं) रत्नविशेष ज्यास माणिक असें म्हणतात तें.

लोहितचंदन, न० (नं) कुंकुम, कुंकुं.

लोहितांग पु० (गः) मंगळ नामा ग्रह.

लोहितायस्, न० (यः) तांबें.

लोहिताश्व, पु० (श्वः) अग्नि.

लौकायतिक, पु० (कः) देहात्मवादी जो बौद्ध तो.

लौहित्य, न० (त्यं) रक्तवर्ण. २ पु० (त्यः) नदवि०.

ल्यावण, न० (णं) सौंदर्य.

ल्हादिनी, स्त्री० (नी) वनौषधि जीस सालई असें म्हणतात ती.

---

## व.

व, अ० साम्यार्थी. २ न० (वं) वरुण. ३ सांतवन. ४ पु० (वः) वायु, वारा.

वंक, पु० (कः) नदीचें पात्र. २ भंगूर.

वंकसेन, पु० (नः) अगस्त्याचा वृक्षविशेष.

वंकिल, पु० (लः) कांटा.

वक्तव्य, वि० (व्यःव्या-व्यं) निंद्य. २ वचनार्ह, बोलण्यास योग्य. ३ अहीन.

वक्तृ, वि० (क्ता- क्त्री- क्तृ) बोलणारा. २ पंडित.

वक्त्र, न० (क्त्रं) मुख, तोंड. २ वस्त्रवि०.

वक्त्रखुर पु० (रः) दांत.

वक्त्रज, पु० (जः) ब्राम्हण.

वक्त्रासव, पु० (वः) अधरोष्ठ रस.

वक्र, वि० (क्रःक्रा-क्रं) वांकडा. २ पु० (क्रः) शनी नामा ग्रह. ३ कुब्ज वृक्ष. ४ महादेव. ५ न० (क्रं) चक्राकार जें जल खालीं जातें तें, जलभोंवरा.

वक्रग्रीव, पु० (वः) उंट.

वक्रनक, पु० (कः) दुर्जन. २ राघु, पोपट.

वक्रनाल, न० (लं) वाजंत्रें.

वक्रनासिक, पु० (कः) घुबड. २ राघु.

वक्रपुच्छ, पु० (च्छः) कुत्रा.

वक्रभणित, न० (तं) कुटिल भाषण.

वक्रा, स्त्री० (क्रा) भस्म लावणें. २ कुब्जा कंसाची अंगलेप, उटी देण्याची दासी.

वंग, न० (गं) कथील. २ शिसें. ३ वांगें. ४ कापूर. ५ पु० (गः) देशविशेष.

वच, पु० (चः) कीर, राघु.

वंचक, पु० (कः) स्त्री० न० (का-कं)

प्रतारणा करणारा, ठकविणारा. २ खल, दुर्जन. ३ धूर्त. ४ पु० (कः) घरांतील मुंगूस. ५ कोल्हा.

**वचक्नु**, पु० (क्नुः) ब्राम्हण. २ वि० (क्नुः क्नुः क्नु) अतिवक्ता.

**वचंडा**, स्त्री० (डा) साळुंखी.

**वचन**, न० (नं) भाषण.

**वचनग्राहिन्**, वि० (ही- हिणी- हि) वचनांत वागणारा.

**वचनेस्थित**, वि० (तः ता- तं) वचनग्राही, वचनांत वागणारा.

**वचस्**, न० (चः) भाषण.

**वचा**, स्त्री० (चा) वेखंड. अक्कलकाढा. २ सरस्वती. ३ वचन. ४ पक्षिविशेष ज्यास साळुंखी असें म्हणतात ती. ५ स्वल्प.

**वंचित**, वि० (तः ता- तं) ठकविलेला किंवा ठकलेला.

**वंचुक**, पु० (कः) कोल्हा.

**वंजनी**, स्त्री० (नी) सडासंमार्जन करणारी.

**वंजुल**, पु० (लः) तिवसाचें झाड. २ अशोकवृक्ष. ३ वेत.

**वज्र**, पु० न० (ज्रः ज्रं) इंद्राचें आयुध. २ हिरा. ३ पु० (ज्रः) शेर. ४ निवडुंग. ५ वज्रयोगविशेष. सत्तावीस योगांतील पंधरावा योग. ६ विद्यादि गुणांहीं करून दुसऱ्याचा पराभव करण्यास जो समर्थ तो. ७ न० (ज्रं) मूर्ख. ८ आंवळीचें झाड.

**वज्रकपालिन्**, पु० (ली) वज्रटीक देव.

**वज्रकालिका**, स्त्री० (का) ईश्वरी माया.

**वज्रटीक**, पु० (कः) वज्रटीक देव.

**वज्रतुंड**, पु० (डः) गरुड. २ गणपती.

**वज्रद्रु**, पु० (द्रुः) वनौषधि शेर, निवडुंग.

**वज्रधर**, पु० (रः) पूर्वजिन. २ इंद्र.

**वज्रनिर्घोष**, पु० (षः) वज्राचा शब्द.

**वज्रनिष्पेष**, पु० (षः) वज्राचा शब्द.

**वज्रपाणि**, पु० (णिः) इंद्र.

**वज्रपुष्प**, न० (ष्पं) तिळाचें फूल.

**वज्रवल्ली**, स्त्री० (ल्ली) वृक्षविशेष.

**वज्रवाराही**, स्त्री० (ही) ईश्वरी माया.

**वज्रसूर्य**, पु० (र्यः) बौद्धभेद.

**वज्रा**, स्त्री० (ज्रा) वनौषधि ज्यास शेर, निवडुंग असें म्हणतात तें. २ वनौ० गुळवेल.

**वज्राशनि**, पु० (निः) वज्र.

**वज्रिन्**, पु० (ज्री) इंद्र. २ हिरा. ३ बुद्ध. ४ अवगत, जाणलेला.

**वज्री**, स्त्री० (ज्री) निवडुंगाचा भेद.

**वट**, पु० (टः) वडाचें झाड. २ पु० न० (टः टं) सुंब, दोरी, चऱ्हाट इत्यादि.

**वटक**, पु० (कः) पिष्टक भेद, वडा.

**वंटक**, पु० (कः) भाग, वांटा. २ अंकुश.

**वटि**, स्त्री० (टिः) जंतुविशेष.

**वटी**, स्त्री० (टी) दोरी, चऱ्हाट. २ वृक्षविशेष. ३ जटाजूट.

**वंठ**, पु० (ठः) ज्याचें लग्न झालें नाहीं तो. २ खुजा, ठेंगणा. ३ भाला.

**वठर**, पु० (रः) मंद. २ वांकडे मनाचा.

**वंठाल**, पु० (लः) युद्धविशेष. २ नौका, होडी. ३ कुदळ.

**वडभी**, स्त्री० (भी) माडी.

**वडवा**, स्त्री० (वा) ब्राम्हणाची स्त्री. २ घोडी. ३ पाणी भरणारी दासी. ४ स्त्रीजातिविशेष.

**वडवानल**, पु० (लः) वडवाग्नि.

**वडवामुख**, पु० (खः) वडवाग्नि.
**वड्ड**, वि० ( ड्डः ड्डा-ड्डं ) विस्तीर्ण, विस्तृत.
**वण**, पु० (णः) व्रण.
**वणिज्** , पु० (क्) वाणी.
**वणिज्य**, न० (ज्यं) वाण्याचें कर्म, वाणीपणा.
**वणिज्या**, स्त्री० ( ज्या ) वाण्याचें कर्म, वाणीपणा.
**वत्** , अ० साम्यार्थी.
**वत**, अ० खेद. २ करुणा रस. ३ संतोष. ४ आश्चर्य. ५ आमंत्रण ह्या अर्थी. उ० वत शब्द पहा.
**वतंस**, पु० (सः) मस्तकाचें भूषण. २ कानाचें भूषण.
**वत्स**, न० ( त्सं ) वक्षस्थळ. २ पु० (त्सः) तर्णक, गोवत्स, गोऱ्हा. ३ संवत्सर, वर्ष. ४ बालक.
**वत्सक**, पु० (कः) कुड्याचें झाड.
**वत्सतर**, पु० (रः) किंचित तरुण जो गोवत्स तो.
**वत्सनाभ**, पु० (भः) विषविशेष, बचनाग, बचुनाग.
**वत्सपत्तन**, न० (नं) नगरविशेष.
**वत्सर**, पु० न० (रः- रं) वर्ष, संवत्सर.
**वत्सल**, वि० (लः ला- लं) स्निग्ध, दयाळू. २ पु० (लः) तृणाग्नि.
**वत्सादनी**, स्त्री० (नी) वनौषधि जीस गुळवेल असें म्हणतात ती.
**वद**, वि० (दः दा- दं) वक्ता, बोलका.
**वदन**, न० (नं) मुख, तोंड.
**वंदना**, स्त्री० (ना) स्तुति. २ वंदन करणें.
**वंदनीया**, स्त्री० (या) गाईचा पूज्य भाग.
**वदन्य**, वि० (न्यः न्या- न्यं दानशूर, दाता.
**वंदा**, स्त्री० (दा) लताविशेष. २ भिक्षुकी. ३ निबिड वृक्ष.
**वदान्य**, वि० (न्यः न्या- न्यं) दान शूर, दाता. २ ज्याची वाणी सुंदर तो.
**वंदारु**, वि० (रुः रुः रु) वंदनशील.
**वदाल**, पु० (लः) मत्स्यविशेष.
**वदावद**, वि० (दः दा- दं) वक्ता, बोलका.
**वंदिन्** , पु० (दी) स्तुति पाठक, भाट.
**वंदी**, स्त्री० (दी) केशांशा बुचडा.
**वंदीकाल**, पु० (लः) बळजोरीनें चोरी करणारा.
**वध**, पु० (धः) ठार मारणें, घात.
**वधस्थान**, न० (नं) वधाचें स्थान.
**वधस्थाली**, स्त्री० (ली) वधाचें स्थान.
**वधु**, स्त्री० (धुः) वनौषधि जीस कापूर कचरी, आंबेहळद असें म्हणतात ती. २ वनौषधि जीस उपरसाल, उपलसरी असें म्हणतात ती. ३ साधारण स्त्री.
**वधू**, स्त्री० (धूः) स्त्री, बायको. २ वनौषधि जीस स्पृक्का, पिंडिका असें म्हणतात ती. ३ पुत्राची भार्या, सून. ४ नूतन विवाह झालेली स्त्री.
**वधूजन**, पु० (नः) स्त्रीसमूह. २ स्त्री.
**वधूटशयन**, न० (नं) खिडकी.
**वधूटी**, स्त्री० (टी) नूतन सून.
**वंध्य** वि० (ध्यः ध्या- ध्यं) ज्यास कधींच फळ येत नाहीं तो. (वृक्षादि.)
**वंध्या**, स्त्री० (ध्या) जिला कांहीं मूल बाळ नाहीं ती स्त्री, वांझ.
**वध्री**, स्त्री० (ध्री) चर्ममय रज्जु, वादी.
**वन**, न० (नं) अरण्य. २ उदक, पाणी. ३ प्रस्रवण. ४ गृह, घर. ५ प्रवाह.
**वनछाग**, पु० (गः) मेंढा. २ मोठा वानर.

**वनज**, पु० (जः) विष्णूचा हत्ती. २ ज्या वृक्षाचें लांब कांडें नाहीं मुळासच फांद्या फुटलेल्या असतात तो वृक्ष, खुरटें झाड. ३ न० (जं) कमळ.

**वनजा**, स्त्री० (जा) वनौषधि जीस काकमूग, रानमूग असें म्हणतात ती. २ वनौषधि जीस मुस्ता, नागरमोथा असें म्हणतात ती.

**वनतिक्त**, पु० (क्तः) मोहाचें झाड.

**वनतिक्तिका**, स्त्री० (का) वनौषधि जीस पाडाळी, पाहाडमूळ असें म्हणतात ती.

**वनद**, पु० (दः) मेघ.

**वनप्रिय**, पु० (यः) कोकिल पक्षी.

**वनमक्षिका**, स्त्री० (का) मोठी डांस, रानमाशी.

**वनमालिन्**, पु० (ली) विष्णु.

**वनमालिनी**, स्त्री० (नी) वनौषधि जीस वाराहीकंद, डुकरकंद असें म्हणतात ती. २ द्वारका.

**वनमुद्ग**, पु० (द्गः) मट, मटकी. (धान्यविशेष.)

**वनवासन**, पु० (नः) गेंडा.

**वनशृंगाट**, पु० (टः) वनौषधि जीस सराटा असें म्हणतात ती.

**वनश्वन्**, पु० (श्वा) कोल्हा. २ जवादिमांजर. ३ वाघ.

**वनस्पति**, पु० (तिः) फुलावांचून ज्यास फळ येतें तो वृक्ष. (फणस, उंबर इत्यादि.) २ वृक्ष, झाड. ३ निबिड वृक्ष.

**वनाखु**, पु० (खुः) ससा.

**वनाखुक**, पु० (कः) मूग.

**वनायु**, पु० (युः) हरिण.

**वनायुज**, पु० (जः) देशविशेषाचा घोडा.

**वनालक्त**, न० (क्तं) धातुविशेष.

**वनालिका**, स्त्री० (का) वृक्षविशेष.

**वनाहिर**, पु० (रः) डुकर.

**वनित**, वि० (तः-ता-तं) मागितलेलें. २ सेवित, सेविलेलें.

**वनिता**, स्त्री० (ता) स्त्री, बायको. २ अत्यंत प्रीतीची स्त्री.

**वनीपक**, पु० (कः) याचक.

**वनीयक**, पु० (कः) याचक.

**वनौकस्**, पु० (काः) वानर.

**वन्य**, वि० (न्यः-न्या-न्यं) वनामध्यें उत्पन्न झालेला.

**वन्या**, स्त्री० (न्या) वनसमूह.

**वन्हि**, पु० (न्हिः) अग्नि. २ वनौषधि ज्यास चिता, चित्रक असें म्हणतात तो.

**वन्हिशिख**, न० (खं) कुसुंभा. २ मिरचीचें झाड.

**वपन**, पु० (नः) बीं पेरणें. २ मुंडण.

**वपरु**, पु० (रुः) वृक्षविशेष.

**वपा**, स्त्री० (पा) छिद्र. २ मांसजन्य स्नेह, चरबी, मांदें.

**वपुस्**, न० (पुः) देह, शरीर.

**वप्तृ**, पु० (प्ता) बाप. २ वापक.

**वप्र**, पु० न० (प्रः-प्रं) खंदकांतून माती काढून केलेली रास. २ क्षेत्र, शेत. ३ न० (प्रं) शिसें. ४ पु० (प्रः) समुदाय. ५ बाप.

**वप्रा**, स्त्री० (प्रा) धूळ. २ पर्वताचा कडा. ३ नदीचा तट.

**वमथु**, पु० (थुः) वमन, ओकणें. २ हत्तीच्या सोंडेच्या अग्रापासून निघालेला जलकण.

**वमन**, न० (नं) ओकणें.

**वमि,** स्त्री० (मिः) वमन, ओकणें, वांती. २ पु० (मिः) अग्नि.

**वयस्,** न० (यः) पक्षि. २ उम्मर, वय.

**वयस्थ,** वि० (स्थः स्था-स्थं) तरुण.

**वयस्था,** स्त्री० (स्था) आंवळीचें झाड. २ हिरड्याचें झाड. ३ जीचीं पानें शुक्लपक्षीं उत्पन्न होतात आणि कृष्णपक्षीं गळतात अशी एकलता जीस सोमलता असें म्हणतात ती. ४ लहान कावळीची वेल.

**वयस्य,** वि० (स्यः स्या-स्यं) सखा, स्नेही.

**वर,** न० (रं) कुंकुम. २ पु० (रः) वेष्टण, वेढणें. ३ वि० (रःरा-रं) श्रेष्ठ. ४ देवापासून जें अभीप्सित तें. ५ न० (रं) किंचिदिष्ट. ६ पु० (रः) जामात, जांवई. ७ महादेव.

**वरं,** अ० केवळ ह्या अर्थी.

**वरक्रतु,** पु० (तुः) इंद्र.

**वरचंदन,** पु० (नः) कृष्णागरु चंदन. २ न० (नं) सुवासिक द्रव्यविशेष ज्यास पीतचंदन असें म्हणतात तें. ३ देवदार.

**वरट,** पु० (टः) गांधीणमाशांतील पुरुषजाति. २ हंसपक्षि.

**वरटा,** स्त्री० (टा) हंसपक्ष्याची स्त्री. २ गांधीणमाशी.

**वरटी,** स्त्री० (टी) गांधीणमाशी.

**वरंड,** पु० (डः) मुखरोग. २ वेदीचा मध्य. ३ संघ, समूह.

**वरंडक,** पु० (कः) वर्तुळ.

**वरण,** पु० (णः) ठोंबें, शिरीं इत्यादिकें करून केलेलें वेष्टन, वई, कुंपण. २ वायवर्णा वृक्ष. ३ सेतु, पूल, बांध. ४ उंट.

**वरण्य,** वि० (ण्यः ण्या-ण्यं) प्रमुख, मुख्य.

**वरत्रा,** स्त्री० (त्रा) हत्तीस मध्यें बांधण्यास उपयुक्त जो चर्मरज्जु तो. २ चर्मरज्जु, वादी.

**वरद,** वि० (दः दा-दं) वरदाता, वर देणारा. २ प्रसन्न.

**वरदा,** स्त्री० (दा) कन्या.

**वररुचि,** पु० (चि) कात्यायनऋषि.

**वरलब्ध,** पु० (ब्धः) चांफ्याचें झाड.

**वरवत्सला,** स्त्री० (ला) सासु.

**वरवर्णिनी,** स्त्री० (नी) गुणानी उत्कृष्ट जी बायको ती. २ हरिद्रा, हळद. ३ लाक्षा, लाख. ४ वनौषधि जीस तेडू, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती.

**वरा,** स्त्री० (रा) हिरडा, बेहेडा, आणि आंवळकटी ह्या तिहींचें चूर्ण, त्रिफळा.

**वरांग,** न० (गं) मस्तक. २ योनि. ३ गूळ तयार करते वेळीं जी रसावर साय येते ती. ४ पु० (गः) गज, हत्ती.

**वरांगक,** न० (कं) वनौ० तज, दालचिनी.

**वराटक,** पु० (कः) बीजकोश, बीयांचा कांदा. २ पु० न० (कः कं) सुंब, दोरी, चऱ्हांट. ३ पु० (कः) सांबाचा जटाजूट. ४ न० (कं) कवडी.

**वराण,** पु० (णः) इंद्र.

**वरारोहा,** स्त्री० (हा) गुणोत्कृष्ट स्त्री.

**वराशि,** पु० (शिः) स्थूलवस्त्र, महावस्त्र.

**वरासि,** पु० (सिः) महावस्त्र. २ उत्कृष्ट तरवार.

**वराह,** पु० (हः) डुकर. २ विष्णु. ३ परिमाणविशेष. ४ पर्वतविशेष. ५ वनौ० ज्यास मुस्ता, नागरमोथा असें म्हणतात तो.

**वराचकाली**, स्त्री० (ली) वृक्षविशेष.

**वरिवसित**, वि० ( तः ता- तं ) उपासित, ज्याची शुश्रूषा केली तो.

**वरिवस्या**, स्त्री० (स्या) उपासना.

**वरिवस्यित**, वि० (तः ता- तं ) उपासित, ज्याची शुश्रूषा केली तो.

**वरिष्ठ**, न० (ष्ठं) ताम्र, तांबें. २ अतिशय मोठा. ३ मिरीं. ४ पु० (ष्ठः) तित्तिरपक्षि. ५ वि० ( ष्ठः ष्ठा- ष्ठं ) श्रेष्ठ. ६ उत्तम.

**वरी**, स्त्री० (री) वनौषधि जीस सहस्त्रमूली, शतावरी असें म्हणतात ती. २ शनीची माता.

**वरीयस्**, वि० ( यान् - यसी- यः ) फार मोठा. २ फार उत्तम. ३ अति तरुण. ४ पु० (यान्) योगविशेष.

**वरुण**, पु० (णः) वरुण नामा देवयोनीविशेष. २ वायवण्याचें झाड. ३ तट, कोठ. ४ उदक, पाणी. ५ न० ( णं ) वेष्टण.

**वरुणा**, स्त्री० (णा) नदीविशेष.

**वरुणात्मजा**, स्त्री० (जा) मद्य, दारू.

**वरूथ**, पु० (थः) रथास रक्षणासाठीं वगैरे केलेलें लोहादिमय अवरण. २ न० (थं) चर्म. ३ घट.

**वरूथिनी**, स्त्री० (नी) सेना, सैन्य.

**वरोरस**, पु० (सः) काढा.

**वरोल**, पु० (लः) भ्रमरविशेष.

**वर्कर**, पु० स्त्री० (रः री ) तरुण जो पशु जातीय तो. २ पु० (रः) यट्टा. ३ अज, बकरा.

**वर्कराट**, पु० (टः) कटाक्ष. २ स्त्रियांच्या स्तनावर नवऱ्यानें केलेलें नखक्षत. ३ दोन प्रहराच्या वेळच्या सूर्याची प्रभा, तेज.

**वर्ग**, पु० (र्गः) सजातीयांचा समूह. उ० मनुष्यवर्गः शैलवर्गः इत्यादि. २ काव्य पुराण नाटक भाग.

**वर्च**, पु० ( र्चः ) बुध नामा जो चंद्राचा पुत्र तो.

**वर्चस्**, न० (र्चः) तेज. २ विष्ठा. ३ रूप. ४ पु० (र्चाः) चंद्राचा पुत्र.

**वर्चस्क**, न० (स्कं) विष्ठा.

**वर्जन**, न० (नं) हिंसा. २ त्याग.

**वर्ण**, पु० (र्णः) ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, शूद्र हे चार वर्ण प्रत्येक. २ हत्तीच्या पाठीवरचें आस्तरण. ३ शुक्लनीलादिक रंग. ४ स्तुति. ५ पु० न० ( र्णः र्णं ) अक्षर. ६ पु० ( र्णः ) कीर्ति. ७ गुणकथा. ८ पु० न० ( र्णः र्णं ) भेद. ९ रूप. १० विलेपन.

**वर्णक**, न० (कं) शरीरास लावावयाचें सुगंधि द्रव्यविशेष ज्यास उटणें असें म्हणतात तें. २ पु० (कः) कीर्तन करणारा. ३ चंदन. ४ उत्कर्षाचें कथन.

**वर्णकपिका**, स्त्री० (का) दऊत.

**वर्णका**, स्त्री० (का) वनौषधि जीस नीली, नीळ असें म्हणतात ती.

**वर्णज्येष्ठ**, पु० (ष्ठः) ब्राम्हण.

**वर्णतूली**, स्त्री० (ली) लेखणी.

**वर्णदूत**, पु० (तः) लेख. २ पत्र.

**वर्णबिलाडक**, पु० (कः) श्लोक चोरणारा.

**वर्णाट**, पु० (टः) गाणारा. २ चितारी. ३ कामुक, कामाविष्ठ. ४ स्त्रीकृतजीवन.

**वर्णाभू**, पु० ( भूः ) जलचरविशेष ज्यास

गांडूळ असें म्हणतात तें. २ स्त्री० (भूः) वनौषधि जीस घेंटुळी असें म्हणतात ती.

**वर्णिका,** स्त्री० (का) काजळ.

**वर्णित,** वि० (तः ता- तं) स्तुत, स्तवलेला.

**वर्णिन्,** पु० (र्णी) ब्रम्हचारी. २ लेखक. ३ चितारी.

**वर्तक,** न० (कं) घोड्याचा खूर. २ विचित्र पंखांचा पक्षिविशेष ज्यास गार्जीण असें म्हणतात तो.

**वर्तकी,** स्त्री० (की) पक्षि.

**वर्तन,** न० (नं) जीवन, जीविका. २ वि० (नः ना- नं) वर्तनशील, वर्तणारा. ३ पु० (नः) खुजा. ४ न० (नं) वृत्ति. ५ पाठविणें. ६ न० स्त्री० (नं- ना) वात (दिव्याची.)

**वर्तनि,** स्त्री० (निः) मार्ग. २ पु० (निः) पूर्वदेश.

**वर्तनी,** स्त्री० (नी) मार्ग.

**वर्तरूक,** पु० (कः) नदविशेष. २ कावळ्याचा घरटा. ३ पाण्याचा खळगा. ४ द्वारपाळ.

**वर्ति,** स्त्री० (र्तिः) शरीरास लावावयाचें सुगंधि द्रव्यविशेष ज्यास उटणें असें म्हणतात तें. २ औषध निर्माण करणें. ३ नयनांजय. ४ दिव्याची वात. ५ पु० (र्तिः) दिवा.

**वर्तिका,** स्त्री० (का) रान चिमणी, वर्टई.

**वर्तिष्णु,** वि० (ष्णुः ष्णुः ष्णु) वर्तनशील.

**वर्तुल,** वि० (लः ला- लं) वाटोळा.

**वर्त्मन्,** न० (र्त्म) मार्ग. २ नेत्राच्छादक चर्मपुट, डोळ्याची पापणी.

**वर्त्मनि,** स्त्री० (निः) मार्ग.

**वर्त्मनी,** स्त्री० (नी) मार्ग.

**वर्द्ध,** न० (र्द्धं) शिसें. २ चर्मरज्जु, वादी.

**वर्द्धक,** पु० (कः) वनौ० भारंगीची वेल.

**वर्द्धकि,** पु० (किः) सुतार.

**वर्द्धन,** वि० (नः ना- नं) वर्धनशील, वाढाळू. २ न० (नं) वाढणें, वृद्धि. ३ छेदन.

**वर्द्धनी,** स्त्री० (नी) घटी.

**वर्द्धमान,** वि० (नः ना- नं) वाढणारा. २ पु० (नः) एरंडाचें झाड.

**वर्द्धमानक,** पु० (कः) पात्रविशेष ज्यास मालटी असें म्हणतात तें.

**वर्द्धित,** न० (तं) आसक्त, तत्पर. २ पूर्ण केलेलें.

**वर्द्धिष्णु,** (ष्णुः ष्णुः ष्णु) वर्द्धनशील, वाढाळू.

**वर्द्धी,** स्त्री० (र्द्धी) चामड्याची वादी.

**वर्धन,** न० (नं) वृद्धि. २ छेदन. ३ वि० (नः ना- नं) वृद्धि पावणारा. ४ न० (नं) कळशी.

**वर्धमान,** पु० (नः) प्रश्नभेद. २ पात्रविशेष ज्यास मालटी असें म्हणतात तें. ३ एरंडाचें झाड. ४ विष्णु. ५ वि० (नः ना- नं) वाढणारा.

**वर्मण,** पु० (णः) नारिंगाचें झाड.

**वर्मन्,** न० (र्म) कवच, चिलखत.

**वर्मित,** त्रि० (तः ता- तं) कवचभृत्, कवच धारण करणारा.

**वर्य,** वि० (र्यः र्या- र्यं) प्रमुख, मुख्य. २ पु० (र्यः) काम, मदन.

**वर्या,** स्त्री० (र्या) स्वयंवर करणारी स्त्री.

**वर्य्य,** वि० (र्य्यः र्य्या- र्य्यं) प्रमुख, मुख्य.

**वर्वट,** पु० (टः) धान्यविशेष, चवळ्या.

**वर्षटी**, स्त्री० (टी) धान्यविशेष, चवळया.
**वर्षणा**, स्त्री० (णा) माक्षिका, माशी.
**वर्षरा**, स्त्री० (रा) शाकाविशेष जीस तिळवण, कानफोडी असें म्हणतात ती.
**वर्ष**, न० (र्षं) वृष्टि. २ पु० न० (र्षः र्षं) संवत्सर. ३ पु० (र्षः) इलावृत्तादिक पृथ्वीचीं आठ खंडें. ४ न० (र्षं) भरतखंड. ५ पु० (र्षः) वर्षाकाळ.
**वर्षप्रिय**, पु० (यः) चातक पक्षि.
**वर्षवर**, पु० (रः) नपुंसक, खोजा. (जे प्रथम अल्प बल असून पुढें नपुंसक झाले व स्वभावानें स्त्रियांसारखे आणि कोणत्याही कार्याविषयीं जात्या जे दुष्ट नव्हेत ते वर्षवर असें म्हटलें आहे.)
**वर्षा**, स्त्री० (र्षा) वर्षाऋतु.
**वर्षांग**, पु० (गः) महिना.
**वर्षाभू**, पु० (भूः) बेडूक. २ लहान बेडकांची एक जाति.
**वर्षाभ्वी**, स्त्री० (भ्वी) क्षुद्रभेक जाति, बेडकी.
**वर्षांश**, पु० (शः) महिना.
**वर्षांशक**, पु० (कः) महिना.
**वर्षीयस्**, वि० (यान्- यसी- यः) अतिवृद्ध.
**वर्षोपल**, पु० (लः) दगडासारखें कठीण उदक विशेष, गार.
**वर्ष्मन्**, न० (र्ष्म) देह. २ इयत्ता, प्रमाण. ३ फार सुंदर जी आकृति ती.
**वलज**, न० (जं) क्षेत्र, शेत. २ शहरचा दरवाजा. ३ सस्य. ४ युद्ध.
**वलजा**, स्त्री० (जा) वरस्त्री, स्त्रीविशेष.
**वलभी**, स्त्री० (भी) कूटागार.
**वलय**, पु० न० (यः- यं) प्रकोष्ठा भरण, पोंची, काकण इत्यादि.
**वलयित**, वि० (तः ता- तं) वेष्टित, वेढलेला.
**वलक्ष**, वि० (क्षः क्षा- क्षं) शुक्लवर्ण.
**वलासमजितारि**, पु० (रिः) बौद्धावतार.
**वलाहक**, पु० (कः) मेघ. २ पर्वत. ३ दैत्यविशेष. ४ नागविशेष.
**वलि**, स्त्री० (लिः) वळी (तोंडास वगैरे पडते ती.)
**वलिमुख**, पु० (खः) वानर.
**वलिर**, पु० स्त्री० (रः रा) नेत्रवियुक्त ज्यास काणा, कैरा, तिरवा असें म्हणतात तो.
**वलीक**, न० (कं) वळचण, पडवी.
**वलीमुख**, पु० (खः) वानर.
**वल्क**, पु० न० (ल्कः ल्कं) त्वचा, साल. २ न० (ल्कं) शकल, खंड.
**वल्कल**, पु० न० (लः लं) त्वचा, साल.
**वल्गित**, न० (तं) घोड्याची एक प्रकारची चाल ज्यास वाजी चाल असें म्हणतात ती. २ वांकडें असून सुशोभित. जें तें.
**वल्गु**, वि० (ल्गुः ल्गुः ल्गु) सुंदर. २ पु० (ल्गुः) अज, बकरा.
**वल्मीक**, पु० न० (कः- कं) वाळूर, भोम. २ पु० (कः) वाल्मीक ऋषि. ३ किड्यांचें वगैरे वारूळ. ४ रोगविशेष.
**वल्य**, पु० (ल्यः) बौद्ध भिक्षुक.
**वल्या**, स्त्री० (ल्या) आंवळीचें झाड.
**वल्लकी**, स्त्री० (की) वीणा.
**वल्लभ**, वि० (भः भा- भं) अभीष्ट, प्रिय. २ अध्यक्ष. ३ पु० (भः) जातिवंत घोडा. ४ नवरा, भ्रतार.
**वल्लभपालक**, पु० (कः) घोड्याचा पालक, मोतद्दार.
**वल्लरि**, स्त्री० (रिः) तुळशीचें वगैरे केसर, मंजरी.

**वल्लरी**, स्त्री० (री) तुळशीचें वगैरे केसर, मंजरी.
**वल्लि**, स्त्री० (ल्लिः) वेल, लता.
**वल्ली**, स्त्री० (ल्ली) वेल, लता. २ वनौषधि अजमोदा.
**वल्लुर**, पु० न० (रः रं) शुष्कमांस. २ न० (रं) गहन, अरण्य. ३ औषध. ४ डुकराचें मांस.
**वल्लूर**, पु० न० (रः रं) शुष्कमांस.
**वल्लूरा**, स्त्री० (रा) शुष्कमांस.
**वल्वज**, पु० (जः) मोळ, लव्हाळें.
**वश**, पु० (शः) इच्छा. २ वि० (शः शा-शं) अधीन. ३ अधीनत्व. ४ प्रभुत्व.
**वंश**, पु० (शः) वेणु, वेळु. २ वंश, कुल. ३ संघ, समूह. ४ पाठीचा कणा.
**वंशक**, न० (कं) कृष्णागरु चंदन.
**वशक्रिया**, स्त्री० (या) मणिमंत्रादिकें करून वश करणें.
**वंशरोचना**, स्त्री० (ना) वेणुजन्य औषधिविशेष ज्यास वंशलोचन असें म्हणतात तें.
**वंशलोचना**, स्त्री० (ना) औषधिविशेष, वंशलोचन.
**वशा**, स्त्री० (शा) हत्तीण. २ वांझगाय. ३ स्त्री, बायको. ४ कन्या. ५ गाय.
**वशारोह**, पु० (हः) गोमय छत्रिका.
**वशिक**, वि० (कःका-कं) रिक्त, रिकामें.
**वंशिक**, न० (कं) कृष्णागरु चंदन.
**वशिर**, पु० (रः) वनौषधि ज्यास गजपिंपळी असें म्हणतात ती. २ न० (रं) सामुद्रलवण, समुद्रापासून झालेलें मीठ. ३ पु० (रः) आघाड्याचें झाड.
**वश्य**, वि० (श्यःश्या-श्यं) वशगत, स्वाधीन. २ न० (श्यं) वेश्येचें घर.
**वंश्य**, पु० (श्यः) वंशामध्यें उत्पन्न झालेला.
**वश्या**, स्त्री (श्या) कळावंतीण, वेश्या.
**वषट्**, अ० यज्ञामध्यें देवतोद्देशें करून जें हविर्दान तदर्थी.
**वषट्कृत**, वि० (तःता-तं) अग्नीमध्यें हवन केलेलें (आज्यादिक.)
**वसंत**, पु० (तः) वसंतऋतु.
**वसंतदूत**, पु० (तः) चैत्रमास. २ कोकिलपक्षि. ३ पंचमराग.
**वसंतदूती**, स्त्री० (ती) पाडळीची वेल. २ अभियुक्त.
**वसंतद्रु**, पु० (द्रुः) आंब्याचें झाड.
**वसंतद्रुम**, पु० (मः) आंब्याचें झाड.
**वसति**, स्त्री० (तिः) वास, राहणें. २ घर. ३ रात्र.
**वसन**, न० (नं) वस्त्र. २ आच्छादणें.
**वसा**, स्त्री० (सा) मांसजन्य स्नेह, चरबी, मेदें.
**वसिर**, न० (रं) समुद्रापासून झालेलें मीठ.
**वसिष्ठाद्या**, पु० (द्याः) ब्रम्हर्षयः
**वसु**, न० (सु) धन. २ रत्न. ३ अग्नि. ४ किरण. ५ जुंपर्णा. ६ औषध. ७ वृद्धि. ८ पु० (सुः) राजा. ९ घोडा. १० देवगणविशेष. ११ थोर बकुळी, रुईमंदार. १२ बकपक्षि. १३ कांति. १४ श्याल, पत्नीचा बंधु. १५ मधूर.
**वसुक**, पु० (कः) वनौ० रुईचें झाड. २ रुईमंदार किंवा थोर बकुळीचें झाड. ३ न० (कं) शांभरलवण, सांभरलोण.
**वसुकीट**, पु० (टः) याचना करणारा.
**वसुदेव**, पु० (वः) कृष्णाचा बाप.
**वसुंधरा**, स्त्री० (रा) पृथ्वी.
**वसुधा**, स्त्री० (धा) पृथ्वी.

**वसुधारा**, स्त्री० (रा) लक्ष्मी.

**वसुनंदक**, पु० (कः) व्याजावर उपजीविका करणारा.

**वसुमती**, स्त्री (ती) पृथ्वी.

**वसुल**, पु० (लः) देव.

**वसुषेण**, पु० (णः) कर्ण.

**वसूक**, पु० (कः) वनौ० रुईचें झाड. २ रुईमंदार किंवा थोर बकुळीचें झाड. ३ न० (कं) शांभरलवण, सांभरलोण.

**वस्करटिका**, स्त्री० (का) विंचवीण.

**वस्तक**, न० (कं) सांभरलोण.

**वस्ति**, स्त्री० पु० (स्तिः स्तिः) नाभीच्या खालीं जो मुत्राचा कोठा तो. २ वस्त्राची दशी.

**वस्तु**, न० (स्तु) पदार्थ. २ द्रव्य.

**वस्त्य**, न० (स्त्यं) गृह, घर.

**वस्त्र**, न० (स्त्र) चिरगूट, वस्त्र. २ मंदीर. ३ चार रस्ते एके ठिकाणीं मिळालेले असतात तो मार्ग, चवाटा. ४ पु० (स्त्रः) दिवस.

**वस्त्रकुट्टिम**, न० (मं) छत्र (राजकीय.)

**वस्त्रगृह**, न० (हं) वस्त्रगृह.

**वस्त्रग्रंथि**, स्त्री० (थिः) निरी (वस्त्राची.)

**वस्न**, न० (स्नं) मूल्य, मोल. २ पु० (स्नः) अविक्रय.

**वस्नसा**, स्त्री० (सा) शरीरांतील शिरा प्रत्येक. २ मांदें.

**वह**, पु० (हः) बैलाचा खांद. २ वारा. ३ घोडा. ४ मार्ग.

**वहतु**, पु० (तुः) प्रवासी. २ बैल.

**वहन**, न० (नं) होडी.

**वहा**, स्त्री० (हा) नदी.

**वहिति**, स्त्री० (तिः) पृथ्वी. २ पु० (तिः) सचीव, मंत्री.

**वहित्र**, न० (त्रं) वल्हें.

**वंक्षण**, न० (णं) ऊरु आणि सक्थि ह्यांचा संधि.

**वक्षस्**, न० (क्षः) वक्षस्थळ.

**वक्षोरुह**, पु० (हः) स्तन, कुच.

**वा**, अ० उपमा, सादृश्य. २ विकल्प. ह्या अर्थी. उ० आशीविषोवासंक्रुद्धः २ शिवंवायादिवाविष्णु. ३ समुच्चय. ४ अवधारणा. ५ पादपूरण. ६ विश्रंभ. ७ नानार्थ. ८ अतीत ह्या अर्थी.

**वाक्**, स्त्री० (क्) वाचा, वाणी.

**वांक**, पु० (कः) समुद्र.

**वाक्पति**, वि० (तिः तिः ति) निर्दोष आणि उत्कृष्ट असें बोलणारा. २ बृहस्पति.

**वाक्य**, न० (क्यं) तिङंत सुबंत पदांचा समूह अथवा कारकाशीं संबद्ध जी क्रिया तें.

**वागर**, वि० (रः रा-रं) निर्भय. २ मुमुक्षु, ज्याला मुक्तीची इच्छा आहे तो. ३ कुशल. ४ पु० (रः) सुवर्णादिकांच्या परीक्षेची शिला जीस कसोटी असें म्हणतात ती. ५ निर्णय.

**वागीश**, पु० (शः) निर्दोष आणि उत्कृष्ट असें बोलणारा. २ बृहस्पति.

**वागीश्वर**, पु० (रः) पूर्वजिन.

**वागुजी**, स्त्री० (जी) वनौ० जीस बाकुची, बावची असें म्हणतात ती.

**वागुरा**, स्त्री० (रा) जालीकृत रज्जु, जाळें.

**वागुरिक**, पु० (कः) जाळ्यानें मृगादिकांस धरणारा पारधी.

**वागुलिक**, पु० (कः) विडा देणारा चाकर.

**वाग्गुदिक,** पु० (कः) विडा देणारा चाकर.

**वाग्दल,** न० (लं) ओंठ.

**वाग्देवी,** स्त्री० (वी) सरस्वती.

**वाग्मिन्,** पु० (ग्मी) नैय्यायिक. २ बृहस्पति. ३ वि० (ग्मी-ग्मीनी-ग्मि) पुष्कळ बोलणारा.

**वाङ्मुख,** न० (खं) बोलण्याचा प्रारंभ.

**वाचक,** पु० (कः) शब्द. २ निरोप सांगणें. ३ ध्वनि.

**वाचनक,** न० (कं) वास्तविक अर्थ गुप्त राहून अर्थांतर स्पष्ट दिसावे असें जें संशय पडण्याजोगें बोलणें तें.

**वाचंयम,** वि० (मः मा मं) मौन धारण करणारा. २ पु० (मः) मुनि, ऋषि.

**वाचस्पति,** पु० (तिः) बृहस्पति.

**वाचाट,** वि० (टः टा-टं) बहुत अवाच्य बोलणारा, वाचाळ.

**वाचाक,** वि० (लः ला-लं) बहुत अवाच्य भाषण करणारा, वाचाळ.

**वाचिल,** न० (कं) दूताने सांगितलेला निरोप.

**वाचिकहारक,** पु० (कः) पत्र. २ लेख.

**वाचोयुक्ति,** वि० (क्तिः क्तिः क्ति) नैय्यायिक. २ बहुत बोलका.

**वाचोयुक्तिपटु,** वि० (टुः टुः टु) नैय्यायिक. २ बहुत बोलका.

**वाच्य,** वि० (च्यः च्या-च्यं) कुत्सित. २ हीन. ३ बोलावयास योग्य.

**वांछा,** स्त्री० (छा) इच्छा.

**वांछिनी,** स्त्री० (नी) आस्तुटी स्त्री.

**वाज,** पु० (जः) बाणास उपयुक्त. पक्ष्यांचे पीस. २ वैश्वीसुरा. ३ शब्द. ४ वेग. ५ न० (जं) तूप. ६ यज्ञ. ७ अन्न. ८ उदक, पाणी.

**वाजपेय,** न० (यं) यागविशेष.

**वाजि,** पु० (जिः) अश्व, घोडा.

**वाजिदंतक,** पु० (कः) वनौषधि ज्यास अडुळसा असें म्हणतात तो.

**वाजिन्,** पु० (जी) घोडा. २ पक्षि. ३ बाण.

**वाजिशाला,** स्त्री० (ला) घोड्याची पागा.

**वाट,** पु० (टः) मार्ग. २ वेष्टन. ३ वरंड. ४ अंग. ५ अन्नविशेष. ६ घराची जागा.

**वाटी,** स्त्री० (टी) गृहभूमि, घराची जागा. २ घराजवळचा बागबगीच्या. ३ कटी, कमर.

**वाट्यालक,** पु० (कः) वनौषधि जीस तुपकडी, चिकणा असें म्हणतात ती.

**वाडव,** पु० (वः) वडवाग्नि. २ ब्राम्हण. ३ न० (वं) घोड्यांचा समूह. ४ पाताळ. ५ स्त्रियांचें नर्तन विशेष.

**वाडवहारक,** पु० (कः) मगर.

**वाडव्य,** न० (व्यं) ब्राम्हण समूह.

**वाण,** पु० (णः) काट्या कोरंटा.

**वाणा,** स्त्री० (णा) काट्याकोरंटा. २ बाणाचें मूळ.

**वाणि,** स्त्री० (णिः) तंतुवान, विणणें.

**वाणिज,** पु० (जः) वडवाग्नि. २ वाणी.

**वाणिजक,** पु० (कः) वडवाग्नि. २ वाणी.

**वाणिज्य,** न० (ज्यं) वाण्याचें कर्म. २ वाणीपणा.

**वाणिनी,** स्त्री० (नी) नर्तकी, नाचणारी स्त्री. २ दूती. ३ मत्ता. ४ विदग्धा. ५ वनिता, स्त्री.

**वाणी**, स्त्री० (णी) वाचा, सरस्वती.
**वाणीज**, पु० (जः) क्रयविक्रयोपजीवि, वाणी.
**वात**, पु० (तः) वायु, वारा.
**वातक**, पु० (कः) वनौषधि जीस शणपर्णी, गोकर्णी असे म्हणतात ती. २ डोरलीवांगी.
**वातकिन्**, वि० (की- किनी- कि) वातरोगी, ज्यास वातरोग आहे तो.
**वातकेतु**, पु० (तुः) धुरळा.
**वातकेलि**, स्त्री० (लिः) दंतक्षत.
**वातगुल्म**, पु० (ल्मः) गुल्मवायु.
**वातद**, पु० (दः) कुत्रा.
**वातपुत्र**, पु० (त्रः) भीमसेन. २ हनुमान, मारुती. ३ महाधूर्त.
**वातपोथ**, पु० (थः) पळसाचें झाड.
**वातप्रमी**, पु० (मीः) वातमृग, वाघूट.
**वातमंडली**, स्त्री० (ली) वावटळ.
**वातमृग**, पु० (गः) वाघूट.
**वातरथ**, पु० (थः) मेघ.
**वातरायण**, पु० (णः) उन्मत्त. २ निरुपयोगी मनुष्य. ३ बाण. ४ पर्वताचें शिखर.
**वातरूष**, पु० (षः) वावटळ. २ मत्त, माजलेला. ३ इंद्र धनुष्य.
**वातरोगिन्**, पु० (गी) स्त्री० न० (गिनी- गि) वातरोग ज्यास झाला आहे तो.
**वातहुडा**, स्त्री० (डा) वावटळ. २ राजाचें रक्त. ३ स्त्री, बायको.
**वाताट**, पु० (टः) सूर्याचा घोडा.
**वातापिसूदन**, पु० (नः) अगस्ति ऋषि.
**वातायन**, न० (नं) झरोका, खिडकी. २ पु० (नः) घोडा.
**वातायु**, पु० (युः) हरिण.
**वाताली**, स्त्री० (ली) वावटळ.
**वाताश्व**, पु० (श्वः) चांगला घोडा.
**वाताश्वर**, पु० (रः) धूर.
**वाति**, पु० (तिः) वायु, वारा.
**वातिग**, पु० (गः) वनौषधि ज्यास रानवांगी, डोरलीवांगी असें म्हणतात ती.
**वातिगण**, पु० (णः) डोरलीवांगी.
**वातुल**, पु० (लः) वात्या, वावटळ. २ वि० (लः ला- लं) वातविकार सहन करणारा प्राणी.
**वातुलि**, पु० (लिः) पक्षिविशेष.
**वातूल**, पु० (लः) वात्या, वावटळ. २ गुल्म वायु. ३ वि० (लः ला- लं) वात विकार सहन करणारा प्राणी.
**वात्या**, स्त्री० (त्या) वावटळ.
**वात्सल्य**, न० (ल्यं) वत्सलता, कृपाळूपणा, ममता. २ पु० (ल्यः) करुणारस.
**वात्सीपुत्र**, पु० (त्रः) न्हावी.
**वादित्र**, न० (त्रं) वाद्य.
**वादिराट्**, पु० (ट्) पूर्वजिन.
**वाधुक्य**, न० (क्यं) विवाह,
**वान**, वि० (नः ना- नं) शुष्कफल, सुकलेलें फळ. २ शुष्क. ३ न० (नं) शिवणें ४ प्रेत. ५ गति.
**वानप्रस्थ**, पु० (स्थः) मोहाचा वृक्ष. २ एक व्रती आहे, अरण्यामध्यें इंद्रियनिग्रह करून सकुटुंब राहणारा पुरुष.
**वानर**, पु० (रः) वानर.
**वानस्पत्य**, पु० (त्यः) फुलापासून ज्यास फळ येतें तो वृक्ष. (आंबा वगैरे.)
**वानायु**, पु० (युः) हरिण.
**वानीर**, पु० (रः) वेत. २ एरंडाचें झाड.

**वानेय**, न० (यं) वनौषधि ज्यास केवडी, जलमुस्ता, क्षुद्रमोथा असें म्हणतात तो.

**वापि**, स्त्री० (पिः) दीर्घी, विहीर. २ तळी.

**वापी**, स्त्री० (पी) दीर्घी, विहीर. २ तळी.

**वापीह**, पु० (हः) चातक पक्षि.

**वाप्य**, न० (प्यं) वनौषधि ज्यास कडु कोष्ठ, गोडें कोष्ठ असें म्हणतात तें.

**वाम**, वि० (मः मा- मं) सुंदर. २ प्रतीप, विपरीत, प्रतिकूल. ३ पु० (मः) काम, मदन. ४ कुच, स्तन. ५ मेघ. ६ महादेव. ७ शत्रु. ८ वि० (मः मा- मं) सव्य. ९ न० (मं) धन.

**वामदेव**, पु० (वः) महादेव.

**वामन**, पु० (नः) दक्षिण दिशेचा हत्ती. २ वि० (नः ना- नं) खुजा, ठेंगणा. ३ ऱ्हस्व. ४ पु० (नः) विष्णु. ५ पिस्त्याचें झाड.

**वामलूर**, पु० (रः) वल्मीक, वारूळ, भोंम.

**वामलोचना**, स्त्री० (ना) सुंदर नेत्राची स्त्री.

**वामा**, स्त्री० (मा) स्त्री, बायको.

**वामिल**, पु० (लः) दांभिक. २ मदन, काम.

**वामी**, स्त्री० (मी) घोडी. २ कोल्ही. ३ गर्दभी. ४ हत्तीण.

**वायदंड**, पु० (डः) वस्त्रव्यूतिदंड, कोष्टयाचें धोटें.

**वायन**, न० (नं) वायन.

**वायस**, पु० (सः) काकपक्षि, कावळा. २ मोठा वृक्ष. ३ धूप.

**वायसाराति**, पु० (तिः) घूक, घुबड, पेंचा पक्षि.

**वायसी**, स्त्री० (सी) काकजंघा, कावळीची वेल. २ काळा उंबर, बोलाडा, खरवत, ह्या नांवांनीं प्रसिद्ध जो वृक्ष तो.

**वायसोली**, स्त्री० (ली) काकोली. लहान कावळीची वेल.

**वायु**, पु० (युः) वारा.

**वायुकेतु**, पु० (तुः) धूळ.

**वायुगंड**, पु० (डः) अजीर्ण.

**वायुगुल्म**, पु० (ल्मः) जलभोंवरा.

**वायुदारु**, पु० (रुः) मेघ.

**वायुफल**, न० (लं) कठिणोदक, गार. २ इंद्रधनुष्य.

**वायुसखि**, पु० (खा) अग्नि.

**वार्**, न० (वाः) उदक, पाणी.

**वार**, न० (रं) उदक, पाणी. २ पु० (रः) समूह. ३ अवसर, प्रस्ताव, प्रसंग. ४ रवि, सोम इत्यादि सात वार. ५ द्वार. ६ महादेव. ७ कुब्जवृक्ष. ८ क्षण.

**वारकिन्**, पु० (की) शत्रु. २ जीव. ३ समुद्र.

**वारकीर**, पु० (रः) मेहुणा. २ वडवाग्नि.

**वारट**, न० (टं) शेत.

**वारण**, पु० (णः) हत्ती. २ न० (णं) निवारण करणें.

**वारणबुषा**, स्त्री० (षा) कदली, केळ.

**वारणबुसा**, स्त्री० (सा) कदली, केळ.

**वारणवल्लभा**, स्त्री० (भा) कदली, केळ.

**वारबाण**, पु० न० (णः णं) कंचुक, चोलक, आंगरखा, चोळी इत्यादि.

**वारभट**, पु० (टः) जलचरविशेष जीस सुसर असें म्हणतात ती.

**वारमुख्या**, स्त्री० ( ख्या ) वेश्याविशेष.
**वारवट**, पु० (टः) वल्हे. २ नौका.
**वारवाणि**, पु० ( णिः ) अलगुजें वाजविणारा. २ स्त्री० ( णिः ) वेश्या, कळावंतीण.
**वारंवार**, अ० निरंतर ह्या अर्थी.
**वारस्त्री**, स्त्री० (स्त्री) वेश्या.
**वाराणसी**, स्त्री० (सी) काशी क्षेत्र.
**वारालिका**, स्त्री० (का) पार्वती.
**वारासन**, पु० (नः) पाण्यामध्यें ठेवलेला मंचक. २ न० (नं) साधारण जलपात्र.
**वाराही**, स्त्री० ( ही ) वनौषधि जीस वाराहीकंद, डुकरकंद असें म्हणतात ती. २ मातृकाविशेष.
**वारि**, न० (रि) उदक, पाणी. २ वालक. ३ स्त्री० (रिः) वाणी, वाचा. ४ हत्ती बांधण्याची जागा.
**वारिकंटक**, पु० ( कः) उदकांतील कांटा.
**वारिकुब्जक**, पु० (कः) वृक्षविशेष.
**वारिक्रिमि**, पु० (मिः) जलचरविशेष.
**वारिचत्वर**, पु० (रः) जलकुंभी.
**वारिचामर**, न० (रं) शेवाळ.
**वारिद**, पु० (दः) मेघ.
**वारिपर्णी**, स्त्री० ( र्णी ) वनौषधि, जलकुंभी.
**वारिप्रवाह**, पु० (हः) पाण्याचा झरा. २ पाण्याचा प्रवाह.
**वारिबदर**, पु० (रः) आंवळीचा भेद.
**वारिमसि**, पु० (सिः) मेघ.
**वारिमुली**, स्त्री० ( ली ) वनौषधि, जलकुंभी.
**वारिरथ**, पु० (थः) नौका, गलबत.
**वारिराशि**, पु० (शिः) समुद्र.
**वारिवालक**, पु० (कः) वनौ० ज्यास वाळा असें म्हणतात तो.
**वारिवाह**, पु० (हः) मेघ.
**वारिश**, पु० (शः) विष्णु.
**वारी**, स्त्री० (री) गजबंधन भूमि, हत्ती बांधण्याची जागा, हत्तीचा खांबारा. २ कळसी.
**वारु**, पु० (रुः) विजयाचा हत्ती. २ स्त्री० (रुः) कांकडी.
**वारुठ**, पु० (ठः) प्रेत नेण्याचा गाडा.
**वारुंड**, पु० (डः) सर्पांचा राजा.
**वारुंडी**, स्त्री० (डी) पिचकारी.
**वारुणि**, पु० (णिः) अगस्ति ऋषि.
**वारुणी**, स्त्री० (णी) सुरा, मद्य. २ पश्चिम दिशा. ३ गंडदूर्वा.
**वारूढ**, पु० (ढः) ज्याला मूत्रविकार आहे तो. २ मेघ.
**वार्त**, वि० ( र्तः र्ता- र्तं ) रोगरहित, निरोगी. २ कुशल. ३ निःसार. ४ न० (र्तं ) योग्य.
**वार्ता**, स्त्री० (र्ता) वृत्तांत, लोकवृत्त. २ वनौ० डोरलीवांगी. ३ जीविका, उपजीविका. ४ कृषिकर्म. ५ वर्तणें.
**वार्ताकी**, स्त्री० ( की ) रानवांगी, डोरलीवांगी.
**वार्ताकु**, पु० ( कुः ) रानवांगी डोरलीवांगी.
**वार्तायन**, पु० (नः) बातमीदार.
**वार्तावह**, पु० (हः) वार्तावाहक, कावड्या.
**वार्तिक**, पु० (कः) बातमीदार.
**वार्त्रघ्न**, पु० (घ्नः) अर्जुन.
**वात्सक**, न० (कं) वत्सांचा समूह.

**वार्दर**, न० (रं) गुंज. २ दक्षिणावर्त शंख. गुंजविशेष. ४ वीर. ५ सरस्वती.

**वार्दल**, न० (लं) बादळ.

**वार्धक**, न० (कं) वृद्धपणा. २ वृद्धांचा समूह. ३ वृद्धांचें कर्म.

**वार्धक्य**, न० (क्यं) वृद्धपणा.

**वार्धि**, पु० (र्धिः) समुद्र.

**वार्धुषि**, पु० (षिः) लोकांस कर्ज देऊन त्याच्या व्याजावर उपजीविका चालविणारा.

**वार्धुषिक**, पु० (कः) लोकांस कर्ज देऊन त्याच्या व्याजावर उपजीविका चालविणारा.

**वार्धुष्य**, न० (ष्यं) व्याज.

**वार्भट**, पु० (टः) जलचरविशेष ज्यास सुसर असें म्हणतात ती.

**वार्मण**, न० (णं) वर्मांचा समूह.

**वार्षिक**, न० (कं) वनौषधि जीस त्रायमाणा असें म्हणतात ती. २ वि० (कः का- कं) वर्षाचा.

**वार्क्ष**, न० (र्क्षं) अरण्य.

**वालक**, पु० न० (कः कं) प्रकोष्ठाभरण ज्यास पोंची, कांकण इ० म्हणतात तें. २ वि० अंगुली भूषण, आंगठी.

**वालिन्**, पु० (ली) वानरविशेष.

**वालुक**, न० (कं) वाळुक, कांकडी.

**वालुका**, स्त्री० (का) वाळू. २ कर्ण भूषण.

**वालुकी**, स्त्री० (की) कांकडी.

**वालेय**, पु० (यः) गर्दभ.

**वाल्मिकी**, स्त्री० (की) गुळाची दारू.

**वाल्मीक**, पु० (कः) वाल्मिक ऋषि.

**वाल्हीक**, न० (कं) कुंकुम. २ हिंग. ३ पु० (कः) अश्वविशेष. ४ देशविशेष.

**वावदूक**, वि० (कः का- कं) बहुभाषी.

**वावृत्त**, वि० (तःता तं) कृतवरण, वरलेला.

**वाशिका**, स्त्री० (का) वनौ० ज्यास अटरूष, अडुळसा असें म्हणतात ती.

**वाशित**, न० (तं) पक्ष्यांचा शब्द.

**वाष्प**, न० (ष्पं) उष्मा. २ लोह, लोखंड.

**वास**, पु० (सः) गृह किंवा वसतिस्थान. २ निवास.

**वासक**, पु० (कः) वनौषधि ज्यास अडुळसा असें म्ह० ती.

**वासगृह**, न० (हं) घराचा मध्यभाग, माजघर. २ राहण्याचें घर.

**वासंत**, पु० (तः) मृग. २ उंट. ३ मलय पर्वतावरील वायु.

**वासंती**, स्त्री० (ती) वनौषधि जीस कुसरी, कस्तुरमोगरा, मधुमाधवी असें म्हणतात ती. २ एक फुलझाड आहे ज्यास जुई असें म्हणतात ती. ३ चैत्रीपूर्णिमा.

**वासतेयी**, स्त्री० (यी) रात्र.

**वासदन**, न० (नं) साधारण जलपात्र.

**वासन**, न० (नं) सुवासिक द्रव्यानें सुगंधि. २ वस्त्र.

**वासना**, स्त्री० (ना) पूर्वी जें अनुभूत त्याचें अविस्मरण. २ आशा, इच्छा. ३ ज्ञान.

**वासयोग**, पु० (गः) सुवासिक चूर्णविशेष.

**वासर**, पु० (रः) दिवस, वार. २ नागवि०.

**वासव**, पु० (वः) इंद्र.

**वासस्**, न० (सः) वस्त्र.

**वासागार**, न० (रं) राहण्याचें घर.

**वासित**, वि० (तःता-तं) सुवासयुक्त केलेला. २ न० (तं) धान्य. ३ पक्ष्यांचा शब्द.

**वासिता**, स्त्री० (ता) स्त्री, बायको. २ हत्तीण.

**वासु**, पु० (सुः) विष्णु.

**वासुकि**, पु० (किः) सर्पांचा राजा.

**वासुदेव**, पु० (वः) विष्णु.

**वासुरा**, स्त्री० (रा) हत्तीण.

**वासू**, स्त्री० (सूः) कुमारी, कन्या.

**वास्तवोषा**, स्त्री० (षा) रात्र.

**वास्तु**, पु० न० (स्तुः-स्तु) घराची जागा.

**वास्तुक**, न० (कं) वनौषधि ज्यास बथुवा, चंदनबटुवा असें म्हणतात तो.

**वास्तूक**, न० (कं) वनौ० बथुवा, चंदनबटुवा असें म्ह० तो.

**वास्तोष्पति**, पु० (तिः) इंद्र.

**वास्त्र**, वि० (स्त्रः स्त्रा- स्त्रं) वस्त्रानें वेष्टित (रथादि.)

**वास्त्र**, पु० (स्त्रः) दिवस.

**वास्सदन**, पु० (नः) पाण्यामध्यें ठेवलेला मंचक.

**वाह**, पु० (हः) बाहु. २ अश्व, घोडा. ३ एकशें अठ्ठावीस पायल्या म्हणजे एक वाह प्रमाण. ४ बारामण. ५ वायु. ६ बैल.

**वाहद्विषत्**, पु० (त्] महिष. गवा.

**वाहन**, न० (नं) बैल, घोडा इत्यादि (वाहन.)

**वाहस**, पु० (सः) सर्पविशेष ज्यास आर असें म्हणतात तो. २ शाकाविशेष जीस कुरडूची भाजी असें म्हणतात ती. ३ जलनिर्याण.

**वाहा**, स्त्री० (हा) भुज, बाहु.

**वाहित्थ**, न० (त्थं) हत्तीच्या गंडस्थळाचा अधोभाग.

**वाहिनी**, स्त्री० (नी) सैन्य. २ तीन गणरूप जी सेना ती एक वाहिनी म्हटली आहे. ३ नदी.

**वाहिनीपति**, पु० (तिः) सेनापति. २ समुद्र.

**वि**, पु० (विः) पक्षि. २ अ० निग्रह. ३ नियोग. ४ पादपूरण. ५ निश्चय. ६ सहन. ७ हेतु. ८ व्याप्ति. ९ विनियोग. १० किंचित. ११ परिभव. १२ शुद्ध. १३ अवलंबन. १४ विज्ञान ह्या अर्थी.

**विकंकत**, पु० (तः) वृक्षविशेष ज्यास ह्या देशीं वेहकळी आणि कर्णाटकांत हलुमाणिका असें म्हणतात तो.

**विकच**, वि० (चः चा- चं) प्रफुल्लित (वृक्ष.) २ ज्याला केंस नाहीं तो. ३ पु० (चः) ग्रहोत्पात. ४ केतुग्रह.

**विकट**, न० (टं) विकारयुक्त. २ वि० (टः टा- टं) महत, मोठा. ३ भयंकर.

**विकटा**, स्त्री० (टा) ईश्वरी माया. २ वनौषधिविशेष.

**विकर्तन**, पु० (नः) सूर्य.

**विकर्ष**, पु० (र्षः) बाण.

**विकलांग**, वि० (गः गा- गं) ज्यास स्वभावतः कांहीं अवयव कमी असतो तो.

**विकस्वर**, वि० (रः रा- रं) विकासशील.

**विकषा**, स्त्री० (षा) वनौ० जीस मंजिष्ठा असें म्हणतात ती.

**विकस**, पु० (सः) सूर्य.

**विकसा**, स्त्री० (सा) वनौषधि जीस मंजिष्ठा असें म्हणतात ती.

**विकसित**, वि० (तः ता- तं) विकासयुक्त, प्रफुल्लित.

**विकस्वर**, वि० ( रः रा- रं ) विकासशील. २ पु० (रः) प्रफुल्लित वृक्ष.

**विकार**, पु० (रः) प्रकृतीचा अन्यथा भाव. २ रोग.

**विकाल**, पु० (लः) प्रभातकाळ.

**विकालिका**, स्त्री० (का) वाद्यविशेष.

**विकाश**, पु० (शः) प्रकाश, व्यक्त, प्रसिद्ध. २ विजन, एकांतस्थळ. ३ विकास.

**विकाशिन्**, वि० ( शी- शिनी- शि ) विकासशील.

**विकाषिन्**, वि० ( षी- षिनी- षि ) विकासशील.

**विकासिन्**, वि० ( सी- सिनी- सि ) विकासशील.

**विकिर**, पु० (रः) पक्षि. २ विहीर. ३ काकबली ( श्राद्ध कर्मांत. )

**विकीरण**, पु० (णः) वनौ० रुईचें झाड.

**विकुर्वाण**, वि० ( णः णा- णं ) हृष्टचित्त, ज्याचे अंतःकरणांत आनंद झाला तो.

**विकृत**, वि० ( तः ता- तं ) रोगी. २ पु० (तः) बीभत्स रस. ३ न० (तं) संस्कार केलेलें.

**विकृति**, स्त्री० (तिः) विकार.

**विक्क**, पु० (क्कः) हत्तीचा बच्चा.

**विक्रम**, पु० (मः) अति पराक्रम. २ क्रांति, विक्रमण. ३ विक्रम राजा.

**विक्रय**, पु० (यः) विकणें.

**विक्रयिक**, पु० (कः) विकणारा, वाणी.

**विक्रांत**, पु० (तः) शूर.

**विक्रांति**, स्त्री० (तिः) अश्वगति.

**विक्रिया**, स्त्री० (या ) प्रकृतीचा अन्यथाभाव.

**विक्रेतृ**, पु० (ता) विकणारा, वाणी.

**विक्रेय**, वि० ( यः या- यं ) विकावयाचा ( पदार्थ वगैरे. )

**विक्लव**, वि० ( वः वा- वं ) शोकादिकेंकरून गात्रभंग पावलेला, विव्हळ.

**विक्लिन्न**, वि० ( न्नः न्ना- न्नं ) ओला. २ जीर्ण. ३ पु० ( न्नः ) वार्धक्यानें जीर्ण होणें.

**विखव**, पु० (वः) अश्वखुर.

**विखुर**, पु० (रः) यमदूत.

**विगणन**, न० (नं) कर्जमुक्त होणें, कर्जाची फेड. ३ अमान्य करणें.

**विगत**, वि० ( तः ता- तं ) तेजोहीन. २ गेलेला.

**विगतार्तवा**, स्त्री० (वा) जी विटाळशी बहुत दिवस होत नाहीं अशी झाली ती स्त्री.

**विगूढ**, पु० (ढः) निंदलेला. २ वि० (ढः ढा- ढं ) गुप्त.

**विग्र**, वि० ( ग्रः ग्रा- ग्रं ) गतनासिक, नकटा.

**विग्रह**, पु० (हः) देह, शरीर. २ विस्मृति, विस्तीर्णता. ३ युद्ध. ४ शत्रुमंडळास आग घालणें, लुटणें इत्यादि कृत्य करणें. ५ विभाग. ६ तारण.

**विघस**, पु० (सः) देव, पितर, इत्यादिकांनीं खाऊन अवशेष राहिलेले, भोजनशेष. २ भोजन.

**विघ्न**, पु० (घ्नः) अंतराय विघ्न.

**विघ्नकारिन्**, पु० (री) विघ्नकरणारा. २ घोर दर्शन.

**विघ्नराज**, पु० (जः) गणपति.

**विघ्नहारिन्**, पु० (री) गणपति.

**विचकिल**, पु० (लः) मोगरीचा एक भेद. २ काम, मदन.

**विचयन**, न० (नं) शोधणें.
**विचर्चिका**, स्त्री० (का) ओली खरूज.
**विचक्षण**, पु० (णः) पंडित, विद्वान.
**विचक्षु**, पु० (क्षुः) व्याकुळ.
**विचारणा**, स्त्री० (णा) प्रमाणांहीं करून अर्थाचा विचार करणारा.
**विचारित**, वि० ( तः ता- तं ) विचारी. २ ज्याचा विचार केला तो.
**विचिकित्सा**, स्त्री० (त्सा) संशय.
**विछंदक**, पु० (कः) विस्तीर्ण व सुंदर असा जो राजवाडा तो.
**विछर्दक**, पु० (कः) विस्तीर्ण व सुंदर असा जो राजवाडा तो.
**विछाय**, न० (यं) पक्ष्यांची छाया.
**विछित्ति**, स्त्री० (त्तिः) स्त्रियांचा एक प्रकारचा हाव आहे. २ ज्ञान. ३ हारविशेष. ४ अंगराग. ५ छेद. ६ विनाश. ७ सुगंधिविशेष. ८ रंग.
**विछिन्न**, वि० ( न्नः न्ना- न्नं ) मिळालेला. २ विभक्त.
**विजन**, वि० ( नः ना- नं ) एकांतस्थळ.
**विजय**, पु० (यः) जय. २ पार्थ, अर्जुन.
**विजयकुंजर**, पु० (रः) विजयाचा हत्ती.
**विजयमर्दल**, पु० (लः) वाद्यविशेष ज्यास पटह असें म्हणतात तें. २ युद्धांतील डंका.
**विजया**, स्त्री० (या) पार्वतीची सखी. २ तिथिविशेष.
**विजिल**, न० (लं) मंडयुक्त दध्यादि, साईसुद्धां दहीं, मठ्ठा इ०.
**विजृंभित**, न० (तं) विकासास पावलेलें. २ चेष्टा.
**विंजोली**, स्त्री० (ली) ओळ, रंघ.
**विज्जल**, न० (लं) सायक, बाणविशेष.
**विट**, पु० (टः) धूर्त. २ उंदीर. ३ खादेरवृक्ष. ४ पाहिजे तसें बोलणारा. ५ पर्वत. ६ लवण, मीठ. ७ जार पुरुष.
**विटक**, पु० (कः) फोड.
**विटंक**, पु० न० ( कः-कं ) राजादिकांचे घरीं पक्ष्यांकरितां केलेलें गृह.
**विटधर**, पु० (रः) महान धूर्त.
**विटप**, पु० न० (पः-पं) वृक्षाचा विस्तार. ( शाखा, फांदी, पल्लव इत्यादि. ) २ तृणादिकांचा गुच्छ. ३ पु० (पः) ज्या वृक्षांस लांब कांडें नाहीं मुळासच फांद्या फुटलेल्या असतात तो वृक्ष, खुरटें झाड. ४ जारांचा स्वामी.
**विटपिन्**, पु० (पी) वृक्ष, झाड.
**विट्खदिर**, पु० (रः) दुर्गंधि खदिरवृक्ष.
**विट्चर**, पु० (रः) ग्राम्यसूकर, गांवांतील डुकर.
**विट्सारिका**, स्त्री० (का) पक्षिविशेष.
**विडंग**, पु० (गः) वनौ० वावडिंग. २ वि० ( गः गा- गं ) जाणणारा.
**विडाल**, पु० (लः) मार्जार, मांजर. २नेत्रपिंड.
**वितंडा**, स्त्री० (डा) वादविशेष. २ शाकविशेष. ३ कण्हेरीचें झाड. ४ सैपाकाचे वगैरे कामाची पळी.
**वितथ**, पु० (थः) स्त्री० न० ( था- थं ) असत्य, खोटा.
**वितरण**, न० (णं) दान, देणें.
**वितर्क**, पु० (र्कः) तर्क. २ संशय.
**वितर्दि**, स्त्री० (र्दिः) अंगणामध्यें केलेलें उपवेशस्थान, वेदि, बहुलें इत्यादि.
**वितंस**, पु० (सः) मृग, पक्षि इत्यादिकांस धरावयाचे फांसे. २ मृग, पक्षि

इत्यादिकांस धरण्याला विश्वासार्थ कारण-भूत वस्त्र.

**वितस्ति**, स्त्री० (स्तिः) कनिष्ठिकासहीत अंगुष्ठ विस्तार, वीत. २ बारा अंगुळें.

**वितान**, न० (नं) ऊन न लागण्यासाठीं बांधलेलें वस्त्र ज्यास चांदवा असें म्हणतात तें. २ पु० न० (नः-नं) यज्ञ. ३ विस्तार. ४ वृत्तविशेष. ५ वि० (नः ना- नं) उन्मत्त, माजलेला. ६ तुच्छक, शून्य. ७ मंद.

**वितुन्न**, न० (न्नं) शाकविशेष जीस करडूची भाजी असें म्हणतात ती. २ शेवाळ.

**वितुन्नक**, पु० (कः) भुई आंवळी. २ न० (कं) कोथिंबीर. ३ मोरचूद.

**वित्त**, न० (त्तं) धन, द्रव्य, २ वि० (त्तः त्ता- त्तं) प्रख्यात, प्रसिद्ध. ३ ज्यास विचार आहे तो.

**वित्ति**, स्त्री० (त्तिः) विचार. २ लाभ.

**विदग्ध**, पु० (ग्धः) त्रासलेला.

**विदथ**, पु० (थः) पंडित, विद्वान. २ योगी.

**विदर**, पु० (रः) द्विधाभाव, द्वैध.

**विदर्भजा**, स्त्री० (जा) अगस्त्य ऋषीची पत्नी. २ रुक्मिणी, कृष्ण पत्नी.

**विदल**, न० (लं) वेळूच्या कांबींनीं केलेलें पात्र, कणंग, रोवळी इत्यादि. २ डाळिंबीचा दाणा.

**विदा**, स्त्री० (दा) ज्ञान. २ बुद्धि.

**विदारक**, पु० (कः) सुकलेल्या नदीमध्यें पाण्यासाठीं केलेला खळगा.

**विदारण**, न० (णं) विदारण करणें. २ पु० न० (णः-णं) रण.

**विदारी**, स्त्री० (री) पांढरा भुई कोहळा. रोगविशेष. २ वनौषधि जीस डाव, डवला, सालवण असें म्हणतात ती.

**विदारीगंधा**, स्त्री० (धा) वनौषधि जीस सालपर्णी, डाव, डवला, सालवण असें म्हणतात ती.

**विदिक्**, स्त्री० (क्) दोन दिशांचा मध्यभाग.

**विदित**, वि० (तः ता- तं) अवगत, जाणलेला. २ अंगीकृत, स्वीकारलेला. ३ याचना केलेला.

**विदु**, पु० (दुः) हत्तीच्या गंडस्थळांच्यामध्यें जें अवकाशस्थान तें. २ थेंब. ३ दंतक्षतविशेष. ४ भोंवयांचा मध्यभाग. ५ जाणणारा.

**विंदु**, वि० (दुः दुः दु) ज्ञाता.

**विदुर**, वि० (रः रा- रं) ज्ञाता.

**विदुल**, पु० (लः) वेत.

**विदूषक**, पु० (कः) पाहिजे तसें बोलणारा. २ निंदा करणारा.

**विदेह**, पु० (हः) विदेह नगर. २ ज्याला देह नाहीं तो. ३ जनकाच्या वंशांतील राजा.

**विदेहा**, स्त्री० (हा) मिथिला नगरी.

**विद्ध**, वि० (द्धः द्धा- द्धं) वेध पाडलेला. प्रेरित, पाठविलेला, सोडलेला. ३ सदृश, सारखा.

**विद्धकर्णी**, स्त्री० (र्णी) वनौषधि जीस पहाडमूळ, पाडवळी असें म्हणतात ती.

**विद्धपर्कटी**, स्त्री० (टी) करंजवृक्ष.

**विद्या**, स्त्री० (द्या) विद्या.

**विद्याधर**, पु० (रः) देवविशेष.

**विद्युत्**, स्त्री० (त्) विद्युल्लता, वीज. २

संध्याकाळ. ३ वि० तेजोहीन, कांतिहीन.

**विद्रधि**, स्त्री० (धि:) उदर, गाल, कान इत्यादिकांवर जो फोड होतो तो रोग.

**विद्रधिनाशन**, पु० (नः) शेकटाचें झाड, शेवग्याचें झाड.

**विद्रव**, पु० (वः) पलायन, पळणें. २ भिऊन पळणें. ३ बुद्धि.

**विद्रुत**, वि० (तः ता- तं ) द्रवीभूत, पातळ. २ पळालेला.

**विद्रुम**, पु० (मः) रत्नविशेष, पोंवळें. २ पोंवळ्याचें झाड.

**विद्रुमलता**, स्त्री० (ता) सुवासिक द्रव्यविशेष ज्यास पवाळी असें म्हणतात तें.

**विद्वस्** , वि० ( द्वान् - दुषी- द्वत् ) आत्मज्ञ. २ पंडित. ३ ज्ञाता.

**विद्वेष**, पु० (षः) वैर.

**विधवा**, स्त्री० (वा) जीचा नवरा मेला ती रंडा.

**विधा**, स्त्री० (धा) प्रकार. २ समृद्धि. ३ विधान. ४ वेतन. ५ गजासन.

**विधाकृति**, स्त्री० (तिः) कर्म.

**विधातृ**, पु० (ता) ब्रम्हदेव. २ काम, मदन.

**विधातृभू**, पु० (भूः) नारद.

**विधान**, न० (नं) कर्तव्य.

**विधि**, पु० (धिः) ब्रम्हदेव. २ दैव. ३ शास्त्रोक्त. ४ नियोग शास्त्र, विधि. ५ विधान, कर्तव्य. ६ काळ. ७ कर्म.

**विधु**, पु० (धुः) चंद्र. २ विष्णु. ३ कापूर. ४ राक्षस.

**विधुत**, वि० (तः ता -तं) त्यक्त, टाकलेला.

**विधुंतुद**, पु० (दः) राहुनामग्रह.

**विधुनन**, न० (नं) कंपन, कांपणें.

**विधुर**, न० (रं) अत्यंतवियोग. २ विकल. ३ ज्याची स्त्री मरण पावली तो.

**विधुवन**, न० (नं) कंपन, कांपणें.

**विधनन**, न० (नं) कंपन, कांपणें.

**विधेय**, वि० (यःया-यं) वचनग्राही, वचनांत वागणारा.

**विंध्य**, पु० (ध्यः) पर्वतविशेष, विंध्याद्रि. २ व्याध, पारधी.

**विंध्यकूट**, पु० (टः) अगस्तिऋषी.

**विंध्यस्थ**, पु० (स्थः) व्याडऋषि.

**विंध्या** स्त्री० (ध्या) वनौ० लवली.

**विंध्यावलीपुत्र**, पु० (त्रः) बाणासूर.

**विनत**, वि० (तःता-तं) प्रणत, नम्र. २ वक्र, वांकडा. ३ शिक्षित.

**विनता**, स्त्री० (ता) गरुडाची आई. २ फोड, पुळी.

**विनय**, पु० (यः) शिक्षा. २ नमस्कार.

**विनयग्राहिन्** , वि० (ही. हिणी. हि.) वचनग्राही, वचनांत वागणारा.

**विनया**, स्त्री० (या) कला.

**विनशन**, न० (नं) कुरुक्षेत्र.

**विना**, अ० वर्जनार्थी. उ० क्षणमप्युत्सहते नमांविना.

**विनाकृत**, न० (तं) व्यतिरिक्त, निराळा. २ पु० (तः) शिवाय, वांचून.

**विनामुख**, पु० (खः) यज्ञस्थान विशेष.

**विनायक**, पु० (कः) गणपती. २ वृद्ध. ३ गरुडपक्षि. ४ गुरु. ५ अनाथ. ६ विघ्न.

**विनाश**, पु० (शः) नाश. २ अदर्शन.

**विनिपात**, पु० (तः) निपात.

**विनियम**, पु० (मः) मोबदला.

**विनीत**, वि० (तःता-तं) नम्र. २ इंद्रियें

ज्याणें जिंकिलीं आहेत तो. ३ पु० (तः) गरीब घोडा.
**विनेतृ**, पु० (ता) राजा.
**विन्न**, वि० (न्नः न्ना-न्नं) विचारी. २ प्राप्त, मिळालेला. ३ राहिलेला.
**विपंचा**, स्त्री० (चा) क्रीडा.
**विपंची**, स्त्री० (ची) वीणा.
**विपण**, पु० (णः) विक्रय, विकणें.
**विपणि**, स्त्री० (णिः) पण्यवीथी, विक्रीचा बाजार. २ पण्य, विक्रयाची (वस्तु)
**विपणी**, स्त्री० (णी) पण्यवीथी, विक्रीचा बाजार. २ पण्य, विक्रयाची (वस्तु.)
**विपत्ति**, स्त्री० (त्तिः) आपत्ति, यातना.
**विपथ**, पु० (थः) दुर्मार्ग, वाईट मार्ग.
**विपद्**, स्त्री० (त्) विपत्ति, आपत्ति.
**विपन्न**, पु० (न्नः) सर्प. २ वि० (न्नः न्ना-न्नं) विपत्तियुक्त.
**विपर्यय**, पु० (यः) व्यत्यास, व्यतिक्रम.
**विपर्याय**, पु० (यः) व्यत्यास, व्यतिक्रम.
**विपर्यास**, पु० (सः) विपर्याय, व्यतिक्रम.
**विपश्चित्**, पु० (त्) पंडित, विद्वान.
**विपक्ष**, पु० (क्षः) शत्रु.
**विपाक**, पु० (कः) पचन. २ स्वाद. ३ कर्मानुसार फळ. ४ परिणाम.
**विपाट**, पु० (टः) बाण.
**विपादिका**, स्त्री० (का) पायांच्या खोटा फुटण्याचा रोग विशेष.
**विपाश्**, स्त्री० (ट्) विपाशा नदी.
**विपाशा**, स्त्री०(शा) नदीविशेष.
**विपिन**, न० (नं) अरण्य.
**विपुल**, वि० (लः ला-लं) विस्तीर्ण. २ ज्याच्या तळाचा थांग लागत नाहीं तो, फार खोल. ३ पु० (लः) पर्वतविशेष.
**विपुला**, स्त्री० (ला) पृथ्वी.
**विप्र**, पु० (प्रः) ब्राह्मण. २ बाप.
**विप्रकार**, पु० (रः) अपकार.
**विप्रकृत**, वि० (तः ता-तं) तिरस्कृत, पापीकृत, हलका केलेला.
**विप्रकृष्टक**, वि० (कः का-कं) दूर, व्यवहित.
**विप्रतीकार**, पु० (रः) पश्चात्ताप.
**विप्रतीसार**, पु० (रः) पश्चात्ताप. २ रोष. ३ कुत्सितकर्म.
**विप्रयोग**, पु० (गः) प्रीतियुक्तांचा वियोग.
**विप्रलब्ध**, वि० (ब्धः ब्धा-ब्धं) वंचना पावलेला, ठकलेला, फसलेला.
**विप्रलंभ**, पु० (भः) वंचनायुक्त भाषण. २ शृंगार भेद.
**विप्रलाप**, पु० (पः) विरुद्ध भाषण.
**विप्रश्निका**, स्त्री० (का) शुभाशुभ जाणणारी स्त्री.
**विप्रा**, स्त्री० (प्रा) क्षेत्र. २ समुदाय. ३ भूळ. ४ तीर.
**विप्रुष्**, स्त्री० (ट्) पाण्याचा बिंदु.
**विप्लव**, पु० (वः) उपद्रवविशेष. २ प्रलय.
**विबंध**, पु० (धः) मलमूत्रनिरोध, मलबद्धरोग.
**विबुध**, पु० (धः) ज्ञानी, पंडित. २ देव.
**विब्बोक**, पु० (कः) स्त्रियांचा एक हाव आहे (गर्वानें पतीचा अनादर करणें.)
**विभव**, पु० (वः) धन, द्रव्य. २ संवत्सरविशेष. ३ ऐश्वर्य. ४ मोक्ष.
**विभाकर**, पु० (रः) सूर्य. २ अग्नि.
**विभात**, न० (तं) प्रातःकाळ.
**विभाव**, पु० (वः) परिचय.

**विभावरी**, स्त्री० (री) रात्र. २ कुंटण स्त्री ३ चक्रवाकपक्ष्याची स्त्री.

**विभावसु**, पु० (सुः) अग्नि. २ सूर्य. ३ हारविशेष.

**विभीतक**, पु० (कः) घाटिंगवृक्ष, बेहेड्याचें झाड.

**विभीतकी**, स्त्री० (की) घाटिंगवृक्ष, बेहेड्याचें झाड.

**विभु**, पु० (भुः) प्रभु. २ स्वामी. ३ सेवक. ४ महादेव. ५ ब्रम्हदेव. ६ व्यापक.

**विभूति**, स्त्री० (तिः) ऐश्वर्य, संपत्ति.

**विभूषण**, न० (णं) अलंकार. २ पु० (णः) पूर्वीजिन.

**विभ्रम**, पु० (मः) स्त्रियांचा एक हाव आहे (शृंगारें करून चित्तवृत्तीचें अनवस्थान.) २ शोभा. ३ भ्रांति, भ्रम.

**विभ्राज्**, वि० (ड्- ट्) अतिशयें करून शोभणारा.

**विमनस्**, वि० (नाः-नाः नः) चित्त व्याकुळ, विरस झालेला.

**विमय**, पु० (यः) मोबदला.

**विमर्दन**, न० (नं) मर्दन.

**विमर्श**, पु० (र्शः) पूर्वी जें अनुभविलें त्याचें स्मरण न होणें.

**विमल**, वि० (लः ला- लं) निर्मल.

**विमला**, स्त्री० (ला) वनौषधि जीस शिकेकाई असें म्हणतात ती. २ भूमिविशेष.

**विमातृज**, पु० (जः) सावत्रबंधु.

**विमान**, न० (नं) आकाश मार्गें जावयाचें देवांचें यानविशेष. २ पु० न० (नःनं) सार्वभौमराजाचें घर. ३ पु० (नः) घोडा.

**वियद्**, न० (त्) आकाश.

**वियद्गंगा**, स्त्री० (गा) स्वर्गंगा, भागीरथी नदी.

**वियद्भुति**, स्त्री० (तिः) अंधकार.

**वियन्मणि**, पु० (णिः) सूर्य.

**वियम**, पु० (मः) योग साधनास अंगभूत जो समय तो.

**वियात**, वि० (तः-ता- तं) अविनीत, दांडगा.

**वियाम**, पु० (मः) योग साधनास अंगभूत जो समय तो.

**विरक्ता**, स्त्री० (क्ता) दुर्दैवी स्त्री.

**विरजस्तमस्**, वि० (माः-माः-मं) सत्वैकनिष्ठ, सत्वगुणी (व्यासादिक.)

**विरजा**, स्त्री० (जा) दुर्वा.

**विरति**, स्त्री० (तिः) उपराम, उपरति.

**विरल**, वि० (लः ला- लं) विरळ, विस्कळ.

**विरहित**, पु० (तः) व्यतिरिक्त, निराळा. २ शिवाय, वांचून.

**विराज्**, पु० (ट्) क्षत्रिय.

**विराटज**, पु० (जः) मणिविशेष.

**विराम**, पु० (मः) समाप्ति. २ चिन्हविशेष.

**विराव**, पु० (वः) शब्द.

**विरिंगिनी**, स्त्री० (नी) पडदा.

**विरिंच**, पु० (चः) ब्रम्हदेव. २ विष्णु.

**विरिंचि**, पु० (चिः) ब्रम्हदेव. २ विष्णु.

**विरूढ**, पु० (ढः) ज्याला अंकुर फुटलेला आहे तो. २ उत्पन्न.

**विरूप**, पु० (पः) महादेव.

**विरूपाक्ष**, पु० (क्षः) महादेव.

**विरोक**, पु० न० (कः-कं) छिद्र.

**विरोचन**, पु० (नः) सूर्य. २ चंद्र. ३ अग्नि. ४ प्रल्हादाचा पुत्र.

**विरोचनसुत**, पु० (तः) बलिदैत्य.

**विरोध**, पु० (धः) वैर.

**विरोधन**, न० (नं) विरोध.

**विरोधोक्ति**, स्त्री० (क्तिः) विरुद्ध भाषण.

**विलग्न**, न० (ग्नं) स्त्रियांची कमर.

**विलंबित**, न० (तं) सावकाश.

**विलंभ**, पु० (भः) अतिदान, फार देणें.

**विलक्ष**, वि० ( क्षः क्षा- क्षं ) आश्चर्ययुक्त.

**विलक्षण**, न० (णं) कारणरहित स्थिति. २ वि० ( णः णा- णं ) भिन्न.

**विलाप**, पु० (पः) रोदनयुक्त भाषण.

**विलास**, पु० (सः) स्त्रियांच्या चेष्टा.

**विलासिन्**, पु० (सी) विलास करणारा. २ सर्प. ३ विष्णु. ४ अग्नि. ५ चंद्र.

**विलीन**, वि० ( नः ना- नं ) द्रवीभूत, पातळ झालेला.

**विलेपन**, न० (नं) शरीरास उटी लावण्यायोग्य सुवासिक द्रव्यविशेष ज्यास उटणें असें म्हणतात तें. २ केशरादिकांची उटी.

**विलेपनी**, स्त्री० (नी) चांगल्या वेषाची स्त्री. २ द्रवोदन, पातळ भात, कण्हेरी.

**विलेपी**, स्त्री० (पी) द्रवोदन, पातळ भात, कण्हेरी.

**विलोम**, पु० (मः) प्रतीप. २ भुजंग. ३ वरुण. ४ कुत्रा.

**विलोमजिह्व**, पु० (ह्वः) कुत्रा. २ हत्ती.

**विलोमी**, स्त्री० (मी) आंवळ्याचें झाड.

**विल्ल**, न० (ल्लं) झाडास वगैरे तळी करितात ती.

**विवध**, पु० (धः) धान्यादि पर्याहार. २ मार्ग.

**विवधिक**, पु० ( कः ) वार्तावाहक, कावडा.

**विवर**, न० (रं) छिद्र.

**विवरनालिका**, स्त्री० (का) अलगुजें.

**विवर्ण**, वि० ( र्णः र्णा- र्णं ) नीच, पामर.

**विवर्त**, पु० (र्तः) समुदाय. २ नृत्य. ३ परतणें.

**विवश**, वि० ( शः शा- शं ) मरण जवळ आल्यामुळें जो बुद्धि विचळ म्हणजे ज्याच्या बुद्धीला भ्रम झाला तो. २ विव्हळ. ३ पु० ( शः ) वश. ४ अरिष्ट.

**विवस्वत्**, पु० ( स्वान् ) सूर्य. २ देव.

**विवस्वती**, स्त्री० (ती) देवांची नगरी.

**विवाद**, पु० (दः) देण्या घेण्याबाबद वगैरे वाद.

**विवाह**, पु० (हः) लग्न.

**विविक्त**, वि० ( क्तः क्ता- क्तं ) विजय, एकांत. २ पूत, पवित्र. ३ विवेकी, विचारशील. ४ असंपृक्त, वेगळा.

**विविध**, वि० ( धः धा- धं ) बहुविध, नाना प्रकारचा.

**विवृताक्ष**, पु० (क्षः) कोंबडा.

**विवेक**, पु० (कः) विचार. २ पृथकरूपता, पृथक्त्पणा. ३ पाण्याची दोण, डोण.

**विव्हल**, वि० ( लः ला- लं ) शोकादिकें करून गात्रभंग पावलेला.

**विश्**, स्त्री० (ट्) वैश्य. २ मनुष्य. ३ विष्ठा.

**विशंकट**, वि० ( टः टा- टं ) विस्तीर्ण, विस्तृत.

**विशाम**, पु० (मः) शिरसाचें झाड.

**विशल्या**, स्त्री० (ल्या) वनौ० गुळवेल. २ वनौषधि जीस तेडू, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती.

**विंशति**, स्त्री० (तिः) वीस संख्या. (मनुष्यादि.)

**विशद**, वि० (दः दा- दं) स्वच्छ. २ पु० (दः) व्यक्त, स्पष्ट.

**विशर**, पु० (रः) वध, ठार मारणें.

**विशल्या**, स्त्री० (ल्या) वनौ० गुळवेल. २ वनौषधि जीस अग्निशिखा, कळलावी असें म्हणतात ती. ३ वनौषधि जीस दांती असें म्हणतात ती. ४ त्रिपुटा नामक वनौषधि.

**विशसन**, न० (नं) वध, ठार मारणें. २ तलवार, आयुध.

**विशाख**, पु० (खः) कार्तिकस्वामी.

**विशाखा**, स्त्री० (खा) विशाखा नक्षत्र. २ शाकविशेष जीस कारली, कारेती असें म्ह० ती.

**विशाय**, पु० (यः) पाहरेकरी.

**विशारण**, न० (णं) वध, ठार मारणें.

**विशारद**, पु० (दः) पंडित, विद्वान. २ धृष्ट, दांडगा. ३ प्रख्यात.

**विशाल**, वि० (लः ला- लं) विस्तृत, विस्तीर्ण. २ पु० (लः) मृगविशेष. ३ पक्षिविशेष.

**विशालता**, स्त्री० (ता) रुंदी, विस्तार.

**विशालत्वच्**, पु० (क्) सातवणाचें झाड.

**विशाला**, स्त्री० (ला) वनौषधि ज्यास मोठी कंवडळ असें म्हणतात ती. २ उज्जनी नगर.

**विशालाक्ष**, पु० (क्षः) महादेव. २ गरूड. ३ वि० (क्षः क्षा- क्षं) ज्याचे डोळे मोठे आहेत तो.

**विशिख**, पु० (खः) बाण. २ शस्त्रविशेष ज्यास गुरगुज असें म्ह० तें. (हें घुसळण्याच्या रवीसारखें असतें.)

**विशिखा**, स्त्री० (खा) गांवांतील लहान मार्ग. २ कुदळ. ३ नळी.

**विशेष**, पु० (षः) कस्तुरीचा वगैरे कपाळीं लावलेला टिळा. २ विशेष, भेद.

**विशेषक**, पु० न० (कः कं) कस्तुरीचा वगैरे कपाळीं लावलेला टिळा.

**विशेषित**, न० (तं) व्यतिरिक्त, निराळा.

**विश्रब्ध**, वि० (ब्धः ब्धा- ब्धं) विश्वास ठेवलेला. २ न० (ब्धं) अत्यंत.

**विश्रंभ**, पु० (भः) विश्वास. २ प्रणयशृंगाराविषयीं स्त्रियांची प्रार्थना. ३ केलिकलह. ४ नम्रता. ५ वध, ठार मारणें.

**विश्रम**, पु० (मः) श्रांती. २ हावविशेष.

**विश्राणन**, न० (नं) दान, देणें.

**विश्राव**, पु० (वः) अत्यंत प्रसिद्धि.

**विश्रुत**, वि० (तः ता- तं) विख्यात, प्रख्यात.

**विश्लेष**, पु० (षः) विकल. २ अत्यंत वियोग.

**विश्व**, पु० (श्वः) देवांचे गणविशेष. २ न० (श्वं) सर्व. ३ सुंठ. ४ जग.

**विश्वकद्रु**, पु० (द्रुः) शिकारीचा कुत्रा. २ खळ. ३ शब्द. ४ शिकारीविषयीं कुशल कुत्रा.

**विश्वकर्मन्**, पु० (र्मा) देवांचा शिल्पिवि० देवांचा सुतार. २ सूर्य. ३ मुनिविशेष.

**विश्वका**, स्त्री० (का) पक्षिविशेष.

**विश्वकेतु**, पु० (तु:) मदन, काम.

**विश्वद्रयच्**, वि० (ङ्. द्रीची. क्) 

**विश्वप्स**, पु० (प्सः) अग्नि.

**विश्वबोध**, पु० (धः) बौद्धावतार.

**विश्वंभर**, पु० (रः) विष्णु. २ इंद्र.

**विश्वंभरा**, स्त्री० (रा) पृथ्वी.

**विश्वभेषज**, न० (जं) सुंट.

**विश्वरूप**, पु० (पः) विष्णु.

**विश्वरेतस्**, पु० (ताः) ब्रम्हदेव.

**विश्वरोचन**, पु० (नः) सुंठ.

**विश्वसृज्**, पु० (ट्) ब्रम्हदेव.

**विश्वस्त**, पु० (स्तः) विश्वासु.

**विश्वस्ता**, स्त्री० (स्ता) विधवा.

**विश्वा**, स्त्री० (श्वा) वनौषधि ज्यास अतिविषा, अतिविख असें म्ह० ती.

**विश्वास**, पु० (सः) भरवसा.

**विष**, पु० न० (षः-षं) विष (सोमल वगैरे.) २ न० (षं) उदक, पाणी.

**विषघ्नी**, स्त्री० (घ्नि) वनौ० कटुकी..

**विषधर**, पु० (रः) सर्प.

**विषनाशन**, पु० (नः) शिरसाचें झाड.

**विषम**, पु० (मः) विषम. २ महादेव.

**विषमच्छद**, पु० (दः) सातविणाचें झाड.

**विषमनयन**, पु० (नः) महादेव.

**विषमनेत्र**, पु० (त्रः) महादेव.

**विषय**, पु० (यः) देश. २ गोचर, इंद्रिय ग्राह्य. ३ रूप, रस, गंध, स्पर्श, शब्द हे पांच इंद्रियांचे पांच विषय. ४ आश्रय. ५ ज्याचा जो नित्य सेवन करावयाचा तो त्याचा विषय.

**विषयायिन्**, पु० (यी) राजा. २ विषयासक्त. ३ काम, मदन. ४ न० (यि) इंद्रिय.

**विषयिन्**, न० (यि) इंद्रिय. २ वि (यी. यिनि. यि) विषयासक्त जन. ३ पु० (यी) मदन.

**विषवैद्य**, पु० (द्यः) विषहारक वैद्य, मंत्री.

**विषा**, स्त्री० (षा) वनौषधि ज्यास अतिविख, अतिविषा असें म्ह० ती.

**विषांकुर**, पु० (रः) भाला.

**विषाण**, न० (णं) पु० (णः) पशूचें शृंग, शिंग. २ हस्तिदंत.

**विषाणी**, स्त्री० (णी) वनौषधि जीस मेढशिंगी असें म्हणतात ती. २ पशूचें शृंग, शिंग. ३ हस्तिदंत. ४ कोळकाळिंजन.

**विषायुध**, पु० (धः) सर्प.

**विषास्य**, पु० (स्यः) सर्प.

**विषुव**, पु० न० (वः-वं) तुला आणि मेष ह्या संक्रांतीच्या काळीं दिवस रात्रीचें मान समान होतें तो काल.

**विषुवत्**, न० (त्) तुला आणि मेष ह्या संक्रांतीच्या काळीं दिवस आणि रात्र ह्यांचें मान समान होतें तो काल.

**विष्किर**, पु० (रः) पक्षि.

**विष्टप**, पु० न० (पः-पं) भूतल.

**विष्टंभ**, पु० (भः) प्रतिबंध. २ रोग विशेष.

**विष्टर**, पु० (रः) आसन. २ वृक्ष. ३ दर्भमुष्टि. (पन्नास दर्भांचा एक ब्रम्हा व त्याचें अर्धें तो एक विष्टर म्हटला आहे.)

**विष्टरश्रवस्**, पु० (वाः) विष्णु.

**विष्टि**, स्त्री० (ष्टिः) नरकामध्यें बलात्कारानें टाकणें. २ वर्तन. ३ वि० (ष्टिः ष्टिः ष्टि) मजूर, वेतन घेऊन काम करणारा.

**विष्वद्र्यच्**, वि० (ङ्. द्रीची) आसमंतात भागीं गमन करणारा.

**विष्ठा**, स्त्री० (ष्ठा) पोटांतील मळ.

**विष्णु**, पु० (ष्णुः) नारायण.

**विष्णुक्रांता**, स्त्री० (ता) वनौषधिविशेष.

**विष्णुगुप्त**, पु० (प्तः) कौंडिण्य ऋषि.

**विष्णुपद**, पु० न० (दः-दं) आकाश. २ क्षीरसमुद्र.

**विष्णुपदी**, स्त्री० (दी) भागीरथी नदी. २ संक्रांतिविशेष.

**विष्णुरथ**, पु० (थः) गरुडपक्षि.

**विष्णुलिंगी**, स्त्री० (गी) रानचिमणी, वटई.

**विष्य**, वि० (ष्यः ष्या-ष्यं) विष घालून मारण्यास योग्य.

**विष्वक्**, अ० सर्वतः, समंततः ह्या अर्थी. उ० विष्वक्पतंतिकिरणाः

**विष्वक्सेन**, पु० (नः) विष्णु.

**विष्वक्सेनप्रिया**, स्त्री० (या) लक्ष्मी. २ वनौषधि जीस वाराहीकंद, डुकरकंद असें म्ह० ती.

**विष्वक्सेना**, स्त्री० (ना) वनौ० प्रियंगु वृक्ष ज्यास वाघांटी असें म्हणतात ती.

**विसर**, पु० (रः) समूह. २ व्रणादिकांचें प्रसरण.

**विसर्ग**, पु० (र्गः) त्याग. २ दान. ३ गुदद्वार. ४ अयनभेद. ५ सूर्य. ६ विसर्ग (कोणत्याही अक्षरापुढें जे दोन बिंदु देतात ते.)

**विसर्जन**, न० (नं) दान, देणें. २ परित्याग. ३ पाठविणें.

**विसर्पण**, न० (णं) व्रणादिकांचें प्रसरण.

**विसल**, न० (लं) वृक्षपालवी.

**विसंवाद**, पु० (दः) वंचनायुक्त जें भाषण तें.

**विसार**, पु० (रः) मत्स्य.

**विसारिन्**, वि० (री. रिणी- रि) प्रसरणशील, पसरट.

**विसृत**, वि० (तः ता- तं) पसरलेला.

**विसृत्वर**, वि० (रः रा- रं) प्रसरणशील, पसरट.

**विसृमर**, वि० (रः रा- रं) प्रसरणशील, पसरट.

**विस्तर**, पु० (रः) शब्दविस्तार. २ प्रपंच. ३ विश्वास.

**विस्तार**, पु० (रः) विस्तृति, विस्तार. २ ज्या वृक्षास लांब कांडें नाहीं मुळासच फांद्या फुटलेल्या असतात तो वृक्ष, खुरटें झाड.

**विस्तृत**, वि० (तः ता- तं) विस्तीर्ण.

**विस्पष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) स्पष्ट उच्चारलेलें (वाक्य वगैरे)

**विस्फार**, पु० (रः) धनुष्याच्या दोरीचा टणत्कार.

**विस्फोट**, पु० (टः) फोड.

**विस्मय**, पु० (यः) आश्चर्य. २ अद्भुतनामा रस (नाटक प्रकरणामध्यें) ३ गर्व.

**विस्मयान्वित**, वि० (तः ता- तं) आश्चर्ययुक्त.

**विस्मापन**, पु० (नः) कपटी. २ काम, मदन. ३ गंधर्व नगर.

**विस्मृत**, वि० (तः ता- तं) विसरलेला. २ पु० (तः) भवभूति कवी.

**विस्र**, वि० (स्रः स्रा- स्रं) ज्यास अपक्व मांसाच्या गंधासारखा गंध येतो तो. (पदार्थ.)

**विस्रंभ**, पु० (भः) विश्वास. २ प्रणय, शृंगार प्रार्थना.

**विस्रसा**, स्त्री० (सा) जरा, म्हातारपणा.

**विस्राव**, पु० (वः) भाताची पेज.

**विहग**, पु० (गः) पक्षि.

**विहंग**, पु० (गः) पक्षि. २ वायु.

**विहंगम**, पु० (मः) पक्षि.

**विहंगमा**, स्त्री० (मा) शिंकें वगैरे लावण्यास भिंतीस मारलेली लांकडाची खुंटी.

**विहंगिका**, स्त्री० (का) शिंकें वगैरे लावण्यास भिंतीस मारलेली लांकडाची खुंटी. २ शिंकें.

**विहनन**, न० (नं) विघ्न. २ हिंसा. ३ कापूस पिंजण्याचें यंत्र.

**विहसित**, न० (तं) मध्यमहास्य.

**विहस्त**, वि० (स्तः स्ता- स्तं) व्याकुल, शोकानें कर्तव्याकर्तव्य विचार शून्य. २ पंडित.

**विहापित**, न० (तं) दान, देणें.

**विहाय**, न० (यं) आकाश (हा शब्द कोठें कोठें पुल्लिंगीही धरलेला आहे.)

**विहायस्**, पु० न० (याः यः) आकाश २ पु० (याः) पक्षि.

**विहायस**, पु० (सः) आकाश.

**विहार**, पु० (रः) पादगति, पायांनीं जाणें. २ खांदा. ३ लीला. ४ नास्तिकाचें घर.

**विहृत**, न० (तं) स्त्रियांचा एक हाव आहे. (भाषणाचे मिषानें इंगित दाखविणें.)

**विहेठन**, न० (नं) हिंसा. २ मर्दन. ३ विटंबना.

**विह्लाव**, पु० (वः) शोक, शिक.

**विक्ष्य**, न० (क्ष्यं) विस्मय. २ दृश्य. ३ पु० (क्ष्यः) नट. ४ घोडा.

**विज्ञ**, वि० (ज्ञः ज्ञा- ज्ञं) प्रवीण, निपूण. २ कुशल.

**विज्ञात**, वि० (तः ता- तं) विख्यात, प्रसिद्ध. २ जाणलेला. ३ विद्यमान ज्ञाता.

**विज्ञान**, न० (नं) शिल्पशास्त्रादि विषयक ज्ञान. २ कर्म.

**विज्ञानिक**, वि० (कः का- कं) प्रवीण, निपूण.

**वीकाश**, वि० (शः शा- शं) निर्जन, एकांत. २ प्रकाश, व्यक्त, प्रसिद्ध.

**वीचि**, स्त्री० (चिः) लहरि, लाट. २ सुख. ३ तरंग. ४ स्त्री० पु० (चिः चिः) अवकाश. ५ सुख.

**वीणा**, स्त्री० (णा) वाद्यविशेष. २ विद्युल्लता, वीज.

**वीणादंड**, पु० (डः) वीणेचा दांडा.

**वीणावाद**, पु० (दः) वीणकरी, वीणा वाजविणारा.

**वीत**, न० (तं) युद्धादिकांचे ठायीं अनुपयुक्त जो हत्ती, घोडा इत्यादि तो. २ अंकुश कर्म.

**वीतराग**, पु० (गः) बौद्धवनार.

**वीतंस**, पु० (सः) मृग, पक्षि इत्यादिकांस बंदींत ठेवण्याचें साधन, फांस, जाळें इत्यादि.

**वीति**, पु० (तिः) घोडा. २ स्त्री० (तिः) गति. ३ दीप्ति. ४ गर्भधारण (गाईचा वगैरे.) ५ भक्षण.

**वीतिहोत्र**, पु० (त्रः) अग्नि. २ सूर्य.

**वीथि**, स्त्री० (थिः) पंक्ति, ओळ.

**वीथी**, स्त्री० (थी) पंक्ति. २ मार्ग. ३ घराचें अंग, घराचा भाग. ४ रूपकांतर.

**वीध्र**, वि० (ध्रः ध्रा- ध्रं) स्वभावतः जें निर्मळ तें.

**वीनाह**, पु० (हः) दगडांनीं बांधलेलें विहिरीचें तोंड ज्यास नंदीपट असें म्हणतात तो.

**वीनाहि**, स्त्री० (हीः) विहीर.

**वीर**, पु० (रः) शूर. २ नाटकांतील एक रस ज्यास वीर रस असें म्हणतात तो. ३ विराटाचा पुत्र उत्तर. ४ अर्जुन.

**वीरण**, न० (णं) तृणविशेष ज्यास काळा वाळा असें म्हणतात तो.

**वीरतर**, न० (रं) तृणविशेष ज्यास काळा वाळा असें म्हणतात तो. २ पु० (रः) वीरांमध्यें जो श्रेष्ट तो. ३ बाण. ४ न० (रं) शव.

**वीरतरु**, पु० (रुः) अर्जुनवृक्ष ज्यास अर्जुनसादडा असें म्हणतात तो.

**वीरपत्नी**, स्त्री० (त्नीं) वीराची भार्या.

**वीरपाण**, न० (णं) युद्ध झालें किंवा होणें असतां श्रम शांत्यर्थ जें शूर लोक मद्यपान करितात तें, वीरपान.

**वीरपान**, न० (नं) युद्ध झालें किंवा होणें असतां श्रमशात्यर्थ किंवा उत्साहार्थ जें शूर लोक मद्यपान करितात तें.

**वीरभद्र**, पु० (द्रः) अश्वमेधाचा घोडा. २ वीरामध्यें जो श्रेष्ठ तो. ३ तृणविशेष ज्यास काळा वाळा असें म्हणतात तो. ४ वीरभद्र.

**वीरभार्या**, स्त्री० (र्या) वीराची स्त्री.

**वीरमातृ**, स्त्री० (ता) वीराची माता.

**वीररेणु**, पु० (णुः) भीमसेन.

**वीरवलिभुक्**, पु० (क्) बकपक्षि.

**वीरवृक्ष**, पु० (क्षः) वनी० बिबव्याचें झाड. २ अर्जुनवृक्ष ज्यास अर्जुनसादडा असें म्हणतात तो.

**वीरसू** स्त्री० (सूः) वीराची आई, माता.

**वीरहन्**, पु० (हा) ज्याचा गृह्याग्नि नष्ट झाला तो.

**वीरा**, (रा) स्त्री० पतिपुत्रादिवती बायको. २ दारू, मद्य.

**वीराशंसन**, न० (नं) अत्यंत भयप्रद जी युद्ध भूमि ती.

**वीरुध्**, स्त्री० (ध) विस्तृत जी वल्ली ती. २ वृक्षाचा विस्तार (शाखा, फांद्या, पल्लव इत्यादि.)

**वीर्य**, न० (र्यं) सामर्थ्य असोन जो उत्साह तो, पराक्रम. २ रेत. ३ तेजोविशेष. ४ सामर्थ्य.

**वीवध**, पु० (धः) धान्यादिक पर्याहार. २ मार्ग. ३ भाव.

**वीक्षापन्न**, पु० (न्नः) विस्मय पावलेला.

**वृक**, पु० (कः) लांडगा. २ कोल्हा. ३ उंदीर.

**वृकधूप**, पु० (पः) अनेक पदार्थ कृतधूप. २ धूप.

**वृकोदर**, पु० (रः) भीमसेन.

**वृक्ण**, वि० (क्णः क्णा- क्णं) खंडित, तोडलेला.

**वृजिन**, न० (नं) पातक. २ वि० (नः ना- नं) वक्र, वांकडा. ३ पु० (नः) क्लेश. ४ भुग्न. ५ रक्त. ६ चर्म.

**वृत**, वि० (तः ता- तं) वरलेला. २ अभीप्सित, इष्ट.

**वृंत**, न० (तं) देंट, डेंख. २ कुचाग्र, स्तनाचें अग्र.

**वृति**, स्त्री० (तिः) वेष्टन. २ रोग.

**वृत्त**, वि० (त्तः त्ता- त्तं) वर्तुळ, वांटोळा. २ वरलेला. ३ अतीत, भूत. ४ दृढ,

शेष त्याची स्त्री. २ वनौषधि जीस अतिविषा, अतिविख असें म्हणतात ती. ३ सोन्याचा अलंकार.

**शृंगीकनक**, न० (कं) अलंकाररूप सुवर्ण, सोन्याचा अलंकार.

**शृणि**, स्त्री० (णिः) अंकुश.

**शृत**, वि० (तः ता- तं) पक्क तूप, दध, चरु इत्यादि.

**शेखर**, पु० (रः) शिखेंत (शेंडींत किंवा वेणींत) घातलेली पुष्पमाळ.

**शेट**, पु० (टः) रोगवि०.

**शेपस्**, न० (पः) शिश्न.

**शेफस्**, न० (फः) शिश्न.

**शेफालिका**, स्त्री० (का) एक फुलझाड आहे जीस निर्गुंडी असें म्हणतात ती. २ राननिर्गुंडी.

**शेफाली**, स्त्री० (ली) निर्गुंडीचें झाड.

**शेमुषी**, स्त्री० (षी) बुद्धि.

**शेलु**, पु० (लुः) भोंकरीचें झाड.

**शेवधि**, पु० (धिः) निधि, ठेवा.

**शेवाल**, न० (लं) शेवाळ, शेवाळी. (इतर कोशीं पुल्लिंगत्वही आहे.)

**शेष**, पु० (षः) शेषनामा सर्पविशेष. २ बळराम. ३ वध. ४ प्रसाद. ५ स्वनिर्माल्यार्पण. ६ क्षयरोग. ७ शोषण. ८ निरुपयोगी. ९ बाकी.

**शैखरिक**, पु० (कः) वनौषधि आघाड्याचें झाड.

**शैनेय**, पु० (यः) सात्यकी.

**शैब्य**, पु० (ब्यः) विष्णूचा घोडा.

**शैल**, पु० (लः) पर्वत. २ न० (लं) दगडफूल. ३ दार्विकेच्या काढ्यापासून केलेलें अंजनविशेष.

**शैलधन्वन्**, पु० (न्वा) महादेव.

**शैलशिबिर**, पु० न० (रः रं) समुद्र.

**शैलाट**, पु० (टः) सिंह. २ गुरव. ३ पांढरी कांच. ४ अरण्यचर चांडालविशेष ज्यास भिल्ल असें म्हणतात तो.

**शैलालिन्**, पु० (ली) स्त्रीवेष धारण करून नाच तमाशानें उपजीविका करणारा पुरुष, नट.

**शैली**, स्त्री० (ली) ग्रंथांतील साधारण संज्ञिक शब्द.

**शैलूष**, पु० (षः) बिल्ववृक्ष, बेलाचें झाड. २ स्त्रीवेष धारण करून नाच तमाशानें उपजीविका करणारा पुरुष, नट.

**शैलेय**, न० (यं) दगडफूल ज्यास शिलाजित असें म्हणतात तें. २ वनौषधि जीस मुरा, तालीसपत्र, मोरमांशी असें म्हणतात ती. ३ सैंधव. ४ पु० (यः) भ्रमर. ५ शिलातुल्य. ६ वि० (यः या- यं) पर्वतापासून झालेला.

**शैलेयी**, स्त्री० (यी) गौरी, पार्वती.

**शैवल**, पु० (लः) शेवाळ, शेवाळी. २ न० (लं) पद्मकाष्ठ.

**शैवलिनी**, स्त्री० (नी) नदी.

**शैवाल**, पु० (लः) शेवाळ, शेवाळी.

**शैशव**, न० (वं) बाल्य, बालत्व.

**शैक्ष**, पु० (क्षः) ज्याणें अध्ययनास प्रारंभ केलेला असा बटु (मुंज झालेला.)

**शोक**, पु० (कः) खेदात्मक जी अंतःकरण वृत्ति ती.

**शोचिष्केश**, पु० (शः) अग्नि.

**शोचिस्**, न० (चिः) कांति.

**शोण,** वि० ( णः णा- णं ) रक्तवर्ण, तांबडा. २ पु० (णः) शोणा नदी. ३ अग्नि. ४ तांबडा घोडा.

**शोणक,** पु० (कः) टिंडयाचें झाड.

**शोणरत्न,** न० (त्नं) रत्नविशेष, माणिक.

**शोणित,** न० (तं) रक्त.

**शोणितपुर,** न० (रं) शोणितपुर.

**शोथ,** पु० (थः) सूज.

**शोतघ्नी,** स्त्री० (घ्नी) वनौषधि जीस पुनर्नवा, घेंटुळी असें म्हणतात ती.

**शोथजित्,** स्त्री० (त्) वनौषधि जीस पुनर्नवा, घेंटुळी असें म्हणतात ती.

**शोधनी,** स्त्री० (नी) केरसुणी, झाडणी.

**शोधित,** वि० ( तः ता- तं ) शोधलेला, शुद्ध केलेला.

**शोधितक्षीरपिंड,** पु० (डः) खवा.

**शोफ,** पु० (फः) सूज.

**शोभन,** वि० ( नः ना- नं ) सुंदर. २ पु० (नः) योगविशेष.

**शोभा,** स्त्री० (भा) कांति. २ इच्छा.

**शोभांजन,** पु० (नः) शेवग्याचें झाड.

**शोष,** पु० (षः) क्षयरोग. २ शोषण.

**शोषण,** पु० (णः) मदनबाण. २ शोषण.

**शौक,** न० (कं) शुकांचा समूह. २ स्त्रियांचें नृत्य.

**शौक्लिकेय,** पु० (यः) विषविशेष ज्यास सोमल असें म्हणतात तो.

**शौंड,** वि० ( डः डा- डं ) मत्त, उन्मत्त.

**शौंडिक,** पु० (कः) सुराजीवि, कलाल.

**शौंडी,** स्त्री० (डी) वनौषधि जीस पिंपळी असें म्हणतात ती.

**शौद्धोदनि,** पु० (निः) बुद्धाचा आवांतर भेद.

**शौभ,** पु० ब० (भाः) देव.

**शौभमुद्र,** न० (द्रं) नगराविशेष.

**शौरि,** पु०(रिः) विष्णु.

**शौर्य,** न० (र्यं) पराक्रम.

**शौल्बिक,** पु० (कः) शिल्पिविशेष ज्यास तांबट असें म्हणतात तो.

**शौष्कल,** वि० (लः ली- लं) मत्स्यमांस भक्षक. २ मांस विक्रय करणारा.

**श्च्योत,** पु० (तः) प्राघार, घृतादिकांचें क्षरण.

**श्मशान,** न० (नं) प्रेतभूमि, मसनवट.

**श्मश्रुन्,** न० (श्रु) पुरुषाचे तोंडावरचे केस, दाढी.

**श्याम,** वि० (मः मा- मं) नीलवर्ण, निळा. २ हरिद्वर्ण, हिरवा. ३ कृष्णवर्ण, काळा. ४ पु० (मः)प्रयागातील वटवृक्ष. ५ मेघ. ६ वृद्धदारक वनौषधि. ७ कोकिलपक्षि. ८ न० (मं) मिरीं. ९ सिंधुलवण.

**श्यामक,** पु० (कः) तृण धान्य विशेष, सांवा.

**श्यामल,** वि० (लः ला- लं) कृष्णवर्ण, काळा. १ पु० (लः) पिंपळाचें झाड.

**श्यामा,** स्त्री० (मा) वनौषधि प्रियंगु वृक्ष जीस वाघांटी असें म्हणतात ती. २ काळा तेंडु, [illegible]गडी. ३ वनौषधि जीस उपरसाल, उपलसरी असें म्हणतात ती. ४ यमुना नदी. ५ रात्र. ६ अप्रसूत स्त्री. ७ नीळ, ८ पक्षिविशेष ज्यास कोकिळा असें म्हणतात तो.

**श्यामांग,** पु० (गः) बुधनामा ग्रह.

**श्याल,** पु० (लः) पत्नीचा बंधु, मेहुणा.

**श्यालिका**, स्त्री० (का) मेहुणी.
**श्याव**, वि० (वः वा- वं) धूसर, आरक्त वर्ण,
**श्येत**, वि० (तः ता- तं) शुक्लवर्ण, पांडरा.
**श्येन**, वि० (नः ना- नं) शुक्ल, पांढरा.
**श्योनाक**, पु० (कः) टिंड्याचें झाड.
**श्रद्धा**, स्त्री० (द्धा) संप्रत्यय, अतिविश्वास, भक्ति. २ स्पृहा, इच्छा. ३ आदर.
**श्रद्धालु**, वि० (लुः लुः लु) आस्तिक. २ जी स्त्री गरोदर असतां पदार्थ विशेषाची इच्छा करिते ती, डोहाळेकरीण.
**श्रन्थ**, पु० (न्थः) विष्णु.
**श्रमण**, पु० (णः) बौद्धभिक्षुक. २ संन्याशाचा भेद. ३ वि० (णः णा- णं) निंद्यकर्म करून उपजीविका करणारा.
**श्रयण**, न० (णं) सेवा, चाकरी. २ पु० (णः) कर्ण, कान.
**श्रवण**, पु० (णं) कर्ण, कान. २ श्रवण नक्षत्र. ३ न० (णं) ऐकणें.
**श्रवस्**, न० (वः) कर्ण, कान.
**श्रविष्ठा**, स्त्री० (ष्ठा) धनिष्ठा नक्षत्र.
**श्रविष्ठाज**, पु० (जः) बुधनामा ग्रह.
**श्राण**, न० (णं) पक्व.
**श्राणा**, स्त्री० (णा) द्रवोदन, पातळभात, कण्हेरी.
**श्राद्ध**, न० (द्धं) यथाविधि जें पितृसंबंधी कर्म तें. २ वि० (द्धः द्धा- द्धं) भक्तियुक्त.
**श्राद्धदेव**, पु० (वः) यम.
**श्राम**, पु० (मः) महिना. २ मंडप. ३ काळ.
**श्रामणेर**, पु० (रः) बौद्धभिक्षुशिष्य.
**श्राय**, पु० (यः) सेवा, चाकरी.
**श्रावक**, पु० (कः) शाक्यमुनि शिष्य. २ कावळा.
**श्रावण**, पु० (णः) श्रावण महिना. २ नास्तिक विशेष.
**श्रावणिक**, पु० (कः) श्रावण महिना.
**श्रावंती**, स्त्री० (ती) धर्मपूर.
**श्राव्य**, वि० (व्यः व्या- व्यं) स्पष्ट भाषण. २ ऐकण्यास योग्य.
**श्री**, स्त्री० (श्रीः) लक्ष्मी. २ शोभा. ३ लवंग. ४ संपत्ति. ५ कळावंतिणीचा बाजार अथवा त्यांचें घर. ६ सरस्वती. ७ देवदारूचा एक भेद.
**श्रीकंठ**, पु० (ठः) महादेव. २ देशभेद.
**श्रीकर**, पु० (रः) विष्णु. २ न० (रं) कुमुदपुष्प.
**श्रीकृष्ण**, पु० (ष्णः) विष्णु. २ न० (ष्णं) सुवर्ण. ३ कल्पवृक्षवि०
**श्रीखंड**, पु० (डः) मैलागिरि चंदन.
**श्रीगर्भ**, पु० (र्भः) विष्णु.
**श्रीगृह**, पु० (हः) पक्ष्यांस पाणी घालण्याकरितां केलेली जागा. २ न० (हं) कमळ
**श्रीग्रह**, पु० (हः) पक्ष्यांस पाणी घालण्याकरितां केलेली जागा.
**श्रीघन**, पु० (नः) बुद्धावतार.
**श्रीद**, पु० (दः) कुबेर.
**श्रीनिवास**, पु० (सः) विष्णु.
**श्रीपति**, पु० (तिः) विष्णु. २ राजा.
**श्रीपर्ण**, न० (र्णं) नरवेलाचें झाड. २ कमळ.
**श्रीपर्णिका**, स्त्री० (का) कायफळ, कुंभ्याचें झाड.
**श्रीपर्णी**, स्त्री० (र्णी) शिवणीचें झाड. २ कायफळ, कुंभ्याचें झाड.
**श्रीपला**, स्त्री० (ला) आंवळीचें झाड. २ काळेफुलाची निर्गुंडी.

**श्रीपिष्ट**, पु० (ष्टः) धूप.

**श्रीपुत्र**, पु० (त्रः) घोडा.

**श्रीफल**, पु० (लः) बिल्व वृक्ष, बेलाचें झाड.

**श्रीफली**, स्त्री० (ली) वनौषधि जीस नी-ली, नीळ असें म्ह० ती.

**श्रीमत्**, पु० (मान्) वनौषधि ज्यास ति-ळपुष्प, तिळवा असें म्हणतात तो. २ वि० (मान्-मती-मत्) लक्ष्मीवान. ३ सुंदर.

**श्रील**, वि० (लः-ला-लं) लक्ष्मीवान. २ पु० (लः) आयुधविशेष ज्यास शूळ असें म्ह० तो.

**श्रीवत्स**, पु० (त्सः) विष्णूच्या वक्षस्थळाचें एक चिन्ह.

**श्रीवत्सलांछन**, पु० (नः) विष्णु.

**श्रीवराह**, पु० (हः) विष्णु.

**श्रीवास**, पु० (सः) धूप. २ विष्णु. ३ कमळ.

**श्रीवृक्षक**, पु० (कः) घोड्याच्या वक्षस्थ-ळावरील भोंवरा.

**श्रीवेष्ट**, पु० (ष्टः) धूप.

**श्रीसंज्ञ**, न० (ज्ञं) लवंग.

**श्रीहस्तिनी**, स्त्री० (नी) शाकविशेष जीस थोर करडूची भाजी असें म्ह० ती.

**श्रुत**, न० (तं) शास्त्र. २ वि० (तः-ता-तं) आकर्णित, ऐकलेला.

**श्रुतश्रवोनुज**, पु० (जः) शनी नामा ग्रह.

**श्रुतादान**, पु० (नः) वेदशास्त्र वाद.

**श्रुति**, स्त्री० (तिः) वेद. २ कर्ण, कान. ३ श्रवण, ऐकणें, ४ वार्ता.

**श्रुतिकटक**, पु० (कः) सर्प. २ पापाचें शोधन करणें, प्रायश्चित.

**श्रेणि**, स्त्री० (णिः) पंक्ति. २ पु० (णिः) सजातीय जे शिल्पि त्यांचा समूह. ३ स्त्री० (णिः) पाणी शिंपण्याचें चर्मपात्र विशेष ज्यास डोल, बालडी असें म्हण-तात ती.

**श्रेणी**, स्त्री० (णी) पंक्ति.

**श्रेयस्**, न० (यः) पुण्य. २ मुक्ति, मोक्ष. ३ शुभ. ४ वि० (यान्-यसी-यः) अ-त्यंत शोभन, फार चांगला.

**श्रेयसी**, स्त्री० (सी) वनौ० हिरड्याचें झाड. २ वनौषधि जीस पहाडमूळ, पाडव-ळी असें म्हणतात ती. ३ वनौ० गज-पिंपळी.

**श्रेष्ठ**, वि० (ष्ठः-ष्ठा-ष्ठं) अत्यंत शोभणारा. २ श्रेष्ठ. ३ पु० (ष्ठः) कुबेर. ४ न० (ष्ठं) गाईचें दूध वगैरे.

**श्रोण**, पु० (णः) जंघाविकल, पंगु, पांगळा.

**श्रोणि**, स्त्री० (णिः) कटि, कमर.

**श्रोणिफलक**, न० (कं) कटिफलक, क मरेचें फळ.

**श्रोणी**, स्त्री० (णी) कटि, कमर.

**श्रोतस्**, न० (तः) कर्ण, कान.

**श्रोत्र**, न० (त्रं) कर्ण, कान.

**श्रोत्रिय**, पु० (यः) वेदाध्यायी, वेदाध्यायन करणारा.

**श्रोत्रियता**, स्त्री० (ता) वेदाध्ययन सांगणें.

**श्रौत्र**, न० (त्रं) वेदाध्ययन सांगणें.

**श्रौषट्**, अ० देवां कारणें जें एक हविर्दान तदर्थी.

**श्लथ**, पु० (थः) शिथिल.

**श्लक्ष्ण**, वि० (क्ष्णः-क्ष्णा-क्ष्णं) सूक्ष्म, बारीक.

**श्लाघा**, स्त्री० (घा) प्रीतीनें जें मिथ्या बोलणें तें. २ स्तुति. ३ उपासना. ४ अभिलाष.

**श्लिषा**, स्त्री० (षा) प्रेमानें कवटाळणें.

**श्लिष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) अनेक अर्थ असल्यामुळें ज्या वचनाचा एकही वास्तविक अर्थ समजत नाहीं तें वचन.

**श्लीपद**, न० (दं) रोगविशेष, वारूळ. २ पादचिन्ह.

**श्लील**, वि० (लः ला- लं) लक्ष्मीवान.

**श्लेष**, पु० (षः) संधि, संधान.

**श्लेष्मघना**, स्त्री० (ना) मोगरी. २ केतकी.

**श्लेष्मघ्ना**, स्त्री० (घ्ना) श्लेष्मा हरण करणारी.

**श्लेष्मघ्नी**, स्त्री० (घ्नी) मोगरी. २ वनौषधि जीस मालकांगोणी असें म्हणतात ती.

**श्लेष्मण**, वि० (णः णा- णं) ज्यास कफ झाला आहे तो.

**श्लेष्मन्**, पु० (ष्मा) कफ, श्लेष्मा.

**श्लेष्मल**, वि० (लः ला- लं) ज्यास कफ झाला आहे तो.

**श्लेष्मातक**, पु० (कः) भोकरीचें झाड.

**श्लोक**, पु० (कः) यश, कीर्ति. २ अनुष्टुपछंद. ३ श्लोक, पद्य.

**श्वः**, अ० आगामि दिवस, उद्यां ह्या अर्थी. उ० श्वःसर्वं कर्म भविष्यति.

**श्वदंष्ट्रा**, स्त्री० (ष्ट्रा) वनौषधि ज्यास गोक्षुरक, सरांटा असें म्हणतात तो.

**श्वन्**, पु० (श्वः) कुत्रा.

**श्वपच**, पु० (चः) चांडाळ.

**श्वपाक**, पु० (कः) चांडाळ.

**श्वभ्र**, न० (भ्रं) छिद्र. २ खांच.

**श्वयथु**, पु० (थुः) सूज.

**श्ववृत्ति**, स्त्री० (त्तिः) सेवा, दुसऱ्याच्या चित्तानुकूल वर्तणें. (भागवतांत श्ववृत्ति-नीचसेवनं असें आहे.)

**श्वशुर**, पु० (रः) सासरा.

**श्वशुरा**, स्त्री० (रा) सात मातृदेवतांतील एक देवताविशेष.

**श्वशुरौ**, पु० द्वि० (रौ) सासू आणि सासरा.

**श्वशुर्य**, पु० (र्यः) नवऱ्याचा बंधु, दीर. २ बायकोचा भाऊ, मेहुणा.

**श्वश्रू**, स्त्री० (श्रूः) सासू.

**श्वश्रूश्वशुरौ**, पु० (रौ) सासू आणि सासरा.

**श्वःश्रेयस**, न० (सं) कल्याण. २ सुख. ३ पु० (सः) परमात्मा.

**श्वसन**, पु० (नः) वायु, वारा. २ गेळ्याचें झाड.

**श्वसनाशन**, पु० (नः) सर्प.

**श्वापद**, पु० (दः) श्वापद. २ वाघादिक.

**श्वाविध्**, पु० (त्) मृगविशेष ज्यास साळी, साळई, शल्य असें म्हणतात तो.

**श्वित्र**, न० (त्रं) कुष्टरोग. २ (श्वेतकुष्ट, शिबें असेंही कोणी म्हणतात.)

**श्वेत**, वि० (तः ता- तं) शुक्ल, पांढरा. २ न० (तं) रजत, रुपें. ३ द्वीपविशेष. ४ पर्वतविशेष.

**श्वेतकाल**, पु० (लः) मत्स्यविशेष.

**श्वेतकालक**, पु० (कः) मत्स्यविशेष ज्यास सहरी असें म्ह० तो.

**श्वेतकेतु**, पु० (तुः) बुद्धावतार.

**श्वेतगरुत्**, पु० (त्) हंसपक्षि.

**श्वेतद्वीप**, पु० (पः) इंद्राचा हत्ती.

**श्वेतधामन्**, पु० (मा) चंद्र. २ कापूर. ३ समुद्रफेस.

**श्वेतपिंगल**, पु० (लः) सिंह.

**श्वेतमरिच**, न० (चं) सौभांजन बीज, शेवग्याची बी.

**श्वेतरक्त**, वि० (क्तः क्ता क्तं) पाटलवर्ण, कांहीं पांढरा व तांबडा,

**श्वेतवाहन**, पु० (नः) पार्थ, अर्जुन. २ इंद्र.

**श्वेतसुरसा**, स्त्री० (सा) पांढऱ्या निर्गुंडीचें झाड, कातरी निर्गुंडी.

**श्वेतहय**, पु० (यः) इंद्राचा घोडा.

**श्वेता**, स्त्री० (ता) वनौषधि जीस चोर, शंखाहुळी, सालवेल असें म्हणतात ती. २ कवडी. ३ वनौषधि पाडळीची वेल.

**श्वेतोदर**, पु० (रः) कुबेर.

## ष.

**ष**, पु० (षः) केंस. २ वि० (षः षा षं) जाणणारा. ३ श्रेष्ठ.

**षट्कर्मन्**, पु० (र्मा) षट्*कर्मयुक्त ब्राम्हण.

**षट्गुण**, पु० (णः) संधि, विग्रह, यान्, आसन, द्वैध, आणि आश्रय हे सहा गुण.

**षट्पद**, पु० (दः) भ्रमर, भुंगा.

**षट्पदातिथि**, पु० (थिः) आंब्याचें झाड.

**षट्प्रज्ञ**, पु० (ज्ञः) धर्म, अर्थ, काम, मोक्ष, व्यवहार, आणि तत्वविचार, यामध्यें जो बुद्धिवान तो. २ पाहिजे तसें बोलणारा, विदूषक. ३ भ्रमरवि०

**षंड**, पु० (डः) स्वेच्छाचारी वृषभ, पोळ. २ पु० न० (डः डं) कमलांचा समूह. ३ पु० (डः) नपुंसक.

**षडंघ्रि**, पु० (घ्रिः) भ्रमर, भुंगा.

**षडभिज्ञ**, पु० (ज्ञः) बुद्धावतार.

**षडानन**, पु० (नः) कार्तिकस्वामी.

**षंडाली**, स्त्री० (ली) तडाग, तळें. २ कामुक स्त्री.

**षड्ग्रंथ**, पु० (थः) करंज वृक्षांतील एक भेद.

**षड्ग्रंथा**, स्त्री० (था) वनौषधि वचा, वेखंड.

**षड्ग्रंथिका**, स्त्री० (का) कापुर कचरी, आंबेहळद.

**षड्ज**, पु० (जः) सप्त स्वरांतील एक स्वर.

**षड्बिंदु**, पु० (दुः) विष्णु. २ कीटकवि०.

**षंढ**, पु० (ढः) नपुंसक. २ भालदार, चोपदार. ३ स्वेच्छेनें फिरणारा बैल, पोळ. ४ खोजा, जो प्रथम अल्प वळ असून पुढें नपुंसक झालेला व स्वभावानें स्त्रियांसारखा आणि कोणतेंही कार्याविषयीं जो जात्या दुष्ट नव्हे तो. ५ खची केलेला.

**षष्टिक्य**, वि० (क्यः क्या क्यं) षष्टिक* उत्पन्न होण्याचें (शेत.)

**षष्टिहायन**, पु० (नः) हत्ती. २ धान्यविशेष.

**षष्ठ**, पु० (ठः) सहावा.

**षष्ठालुकालुक**, न० (कं) दोन किंवा तीन दिवसांनीं जेवणें.

* इज्या, अध्ययन, दान, याजन, आध्यापन, प्रतिग्रह, हीं सहा कर्मे होत.

* षष्टिक म्हणजे साठ रात्रीनीं पिकणारें धान्य.

**षष्ठी**, स्त्री० (ष्ठी) कात्यायनी देवी. २ तिथिविशेष. ३ गौरी, पार्वती.
**षाडव**, पु० (वः) गाणें. २ रसविशेष.
**षाण्मातुर**, पु० (रः) कार्तिकस्वामी.
**षिड्ग**, पु० (ड्गः) पाहिजे तसें बोलणारा.
**षोडशार्चि**, पु० (र्चिः) शुक्रनामा ग्रह.
**षोढृ**, पु० (ढा) स्त्री० (ढ्री) न० (ढृ) शांतियुक्त. २ शक्त.

---

## स.

**स**, पु० (सः) कार्तिकस्वामी. २ वायु.
**सं**, अ० शोभन. २ समर्थ. ३ संग. ४ संतुष्ट ह्या अर्थी.
**संकट**, वि० (टः टा- टं) कठीण, बिकट (मार्ग वगैरे.)
**सकटाक्ष**, पु० (क्षः क्षा- क्षं) नेत्रप्रांत भागानें पाहणारा. २ पु० (क्षः) वराक्ष.
**संकर**, पु० (रः) केर. २ अग्नीचाचटत्कार.
**संकर्षण**, पु० (णः) बलराम.
**सकल**, वि० (लः ला- लं) सर्व, संपूर्ण.
**संकलित**, वि० (तः ता- तं) योजित, मिळविलेला, संयुक्त केलेला.
**संकल्प**, पु० (ल्पः) मानस व्यापारविशेष.
**संकल्पभव**, पु० (वः) मदन.
**संकसुक**, वि० (कः का- कं) अस्थिर, चंचळ प्रकृतीचा,
**संकाश**, वि० (शः शा- शं) सदृश, सारखा.
**संकिल**, पु० (लः) अग्नीची ठिणगी.
**संकीर्ण**, पु० (र्णः) सजातीय विजातीपासून झालेली अंबष्ट करणादि मनुष्य जातिः २ वि० (र्णः र्णा- र्णं) मिश्र, मिसळ. ३ व्याप्त. ४ संकट. ५ अमित्र, शत्रु.
**संकुल**, वि० (लः ला- लं) पूर्वापर विरुद्ध (भाषण.) २ स्पष्ट बोलणारा. ३ व्याप्त.
**सकृत्**, पु० (त्) काकपक्षि, कावळा. २ अ० सह, बरोबर. ३ एकवार ह्या अर्थी. उ० सकृद्याचति. २ सकृदपिगयाश्राद्धं कुर्यात्.
**संकेत**, पु० (तः) ग्रंथांतील साधारण संज्ञिक शब्द. २ वेत.
**संकेश**, पु० (शः) रतिबंधविशेष.
**संकोच**, पु० (चः) कुंकु. २ मत्स्यविशेष. ३ संकोच. ४ वध.
**सक्तु**, पु० (क्तुः) भाजलेल्या यवांचें पीठ.
**सक्तुफला**, स्त्री० (ला) शमीवृक्ष, शमीचें झाड.
**सक्तुफली**, स्त्री० (ली) शमीवृक्ष, शमीचें झाड.
**सक्थि**, न० (क्थि) मांडी. (ऊरु आणि सक्थि ह्यांत भेद इतकाच कीं, ऊरुचा वरचा भाग सक्थि आणि खालचा भाग ऊरु.)
**संक्रंदन**, पु० (नः) इंद्र.
**संक्रम**, पु० (मः) दुर्गम किंवा दुर्मार्गी संचार. २ क्रमण.
**सखि**, पु० (खा) मित्र. २ सहाय्य करणारा.
**सखी**, स्त्री० (खी) मैत्रीण, सेहाण.
**सख्य**, न० (ख्यं) मैत्री.
**संख्य**, न० (ख्यं) युद्ध.
**संख्या**, स्त्री० (ख्या) एकत्वादि संख्या. २ प्रमाणांनीं वस्तूचा जो खरे खोटेपणाचा विचार करितात तो.

**संख्यात**, वि० (तः ता- तं) गणना केलेला, मोजलेला.

**संख्यान**, न० (नं) आच्छादन करावयाचें वस्त्र. २ उत्तरीयवस्त्र.

**संख्यावत्**, पु० (वान्) पंडित. २ वि० (वान्- वती- वत्) संख्यायुक्त.

**संग**, पु० (गः) संगम. २ वि० (गः गा- गं) शंका घेणारा.

**संगत** वि० (तः ता- तं) पूर्वापर संबंधयुक्त (भाषण.)

**संगति**, स्त्री० (तिः) संगम. २ ज्ञान.

**सगंध**, पु० (धः) भाऊबंद.

**संगम**, पु० (मः) संग. २ पु० न० (मः मं) नद्यादिकांचें परस्पर मेलन (जसा कृष्णा वेणीचा माहुलीस संगम आहे.)

**संगर**, पु० (रः) युद्ध. २ प्रतिज्ञा. ३ आपत्ति. ४ विष. ५ स्वीकार. ६ न० (रं) शमीवृक्षाचें फळ.

**सगर्भ्य**, वि० (र्भ्यः र्भ्या- र्भ्यं) सख्खे बंधु.

**संगीर्ण**, वि० (र्णः र्णा- र्णं) अंगीकृत, स्वीकारलेला.

**संगुप्त**, पु० (प्तः) बुद्धावतार.

**संगूढ**, वि० (ढः ढा- ढं) योजित, युक्त केलेला.

**सगोत्र**, वि० (त्रः त्रा- त्रं) एक वंशांतील.

**सग्धि**, स्त्री० (ग्धिः) लग्नांतील वगैरे सह भोजन.

**संग्रह**, पु० (हः) संक्षेप. २ स्वीकार करणें. ३ काव्यपुराण नाटक भाग.

**संग्राम**, पु० (मः) युद्ध.

**संग्रामपटह**, पु० (हः) रणवाद्यविशेष.

**संग्राह**, पु० (हः) मुष्टिबंध, मुठींत घट्ट घेणें. २ ढालीची मूठ.

**संघ**, पु० (घः) समूह.

**संघर्ष**, पु० (र्षः) घर्षण. २ स्पर्धा. ३ वारा.

**संघाटिका**, स्त्री० (का) कुंटण स्त्री. २ युग्म. ३ जलकंटक.

**संघात**, पु० (तः) नरकविशेष. २ समूह. ३ घात.

**संचय**, पु० (यः) समूह.

**संचर**, पु० (रः) सेतु, पूल.

**संचारिका**, स्त्री० (का) युग्म. २ कुंटण स्त्री. ३ नाक. ४ दूती, निरोप वगैरे पोंचविणारी स्त्री.

**सचिव**, पु० (वः) प्रधान, मंत्री. २ सखा. ३ सहाय.

**सचीव**, पु० (वः) चाकर.

**संजवन**, न० (नं) चौमोणी, चौक.

**संज्ञा**, स्त्री० (ज्ञा) शेळी.

**सज्ज**, वि० (ज्जः ज्जा- ज्जं) कवच धारण केलेला. २ सज्ज, सिद्ध.

**सज्जन**, पु० (नः) सज्जन, साधु. २ कुलीन. ३ कल्पना. ४ घांट. ५ न० (नं) पाहारा, गस्त.

**सज्जना**, स्त्री० (ना) नायकास बसण्याकरितां हत्ती सज्ज करणें.

**संज्वर**, पु० (रः) अग्नीचा संताप.

**सटा**, स्त्री० (टा) जटा. २ केसर.

**संडीन**, न० (नं) पक्ष्यांची गतिविशेष,

**सत्**, पु० (न्) पंडित, विद्वान. २ न० (न्) सत्य. ३ पु० (न्) साधु. ४ वि० (न्- ती- न्) विद्यमान. ५ प्रशस्त. ६ पूज्य.

**सतत**, न० (तं) नित्य. २ वि० (तः ता- तं) वीणादि वाद्य सहित (गायनादि.)

**संतत**, न० (तं) निरंतर.
**संतति**, स्त्री० (तिः) वंश, कुल. २ पंक्ति. ३ पुत्रपौत्राची परंपरा.
**संतमस**, न० (सं) गाढ जो अंधकार तो.
**संतान**, पु० (नः) कल्पवृक्षविशेष. २ वंश, कुल. ३ गोत्र. ४ अपत्य, मूल.
**संतानिका**, स्त्री० (का) फेंस. २ माकडाचें जाळें.
**संताप**, पु० (पः) अग्नीपासून जो त्रास तो.
**संतापन**, न० (नः) मदनबाण.
**संतापित**, वि० (त- ता- तं) तप्त केलेला.
**सती**, स्त्री० (ती) पतीव्रता बायको. २ पार्वती, ३ कात्यायनी देवी.
**सतीनक**, पु० (कः) वाटाणा (धान्य विशेष.)
**सतीर्थ्य**, पु० (र्थ्यः) एका गुरूचे शिष्य.
**सतलि**, पु० (लः) वेळू .
**सतीलक**, पु० (कः) धान्यविशेष, वाटाणा.
**सतृट्**, पु० (ट्) तृषा लागलेला.
**सत्क्रिया**, स्त्री० (या) मृतक्रिया.
**सत्तम**, वि० ( मः मा- मं ) श्रेष्ठ. २ पूज्य. ३ अतिशय. ४ साधु.
**सत्पथ**, पु० ( थः ) चांगला मार्ग. २ पूज्य मार्ग.
**सत्य**, न० (त्यं) खरेपणा. २ वास्तविक. ३ शपथ. ४ कृतयुग.
**सत्यं**, अ० प्रश्न. २ अभ्युपगम ह्या अर्थी.
**सत्यक**, पु० (कः) ब्रम्हदेव.
**सत्यंकार**, पु० (रः) मी हें खचित स्वीकारलें असें सांगणें किंवा सचकार देणें किंवा सई करणें.
**सत्यभारत**, पु० (तः) व्यास ऋषि.
**सत्यम** , अ० प्रश्न. २ अभ्युपगम ह्या अर्थी.
**सत्यवचस्** , पु० ( चाः ) ऋषि. २ सत्य बोलणारा.
**सत्यव्रत** , पु० ( वान् ) राजविशेष.
**सत्यवती**, स्त्री० (ती) व्यासमाता. २ नारदाची स्त्री. ३ ऋचीक ऋषीची स्त्री.
**सत्यवतीसुत**, पु० (तः) सत्यवतीचा पुत्र जो व्यास ऋषि तो.
**सत्यवाक्**, पु० ( क् ) कावळा.
**सत्यसंगर**, पु० (रः) कुबेर.
**सत्याकृति**, स्त्री० (तिः) मी हें खचित स्वीकारलें असें सांगणें किंवा सचकार देणें किंवा सई करणें.
**सत्याग्नि**, पु० (ग्निः) अगस्त्य ऋषि.
**सत्यानृत**, न० (तं) वाण्याचें कर्म ( क्रयविक्रयादि.)
**सत्यापन**, न० (नं) मी हें खचित स्वीकारलें असें सांगणें किंवा सचकार देणें किंवा सई करणें.
**सत्यापना**, स्त्री० (ना) मी हें खचित स्वीकारलें असें सांगणें किंवा सचकार देणें किंवा सई करणें.
**सत्र**, न० (त्रं) वस्त्र. २ नित्यदान. ३ यज्ञ. ४ अरण्य. ५ कपट.
**सत्रा**, अ० सह, बरोबर ह्या अर्थी. उ० सत्राकलत्रेणसुखं समश्नुते.
**सत्रिन्** , पु० (त्री) गृहपति, घरचा यजमान.
**सत्व**, न० (त्वं) सत्वगुण. २ पु० न० ( त्वः त्वं ) प्राणी. ३ न० (त्वं) स्वभाव. ४ पिशाचादिकांचे ठायीं जो आत्मभाव तो. ५ बल. ६ जंतु. ७ वस्तु, धर्म, पदार्थ. ८ द्रव्य. ९ प्राण. १० चित्त. ११ व्यवसाय १२ वीर्यातिशय.

**सत्वर**, न० (रं) शीघ्र.

**सदन**, न० (नं) गृह, घर. २ मंदीर. ३ पाणी, उदक.

**संदर्भ**, पु० (र्भः) पूर्वापर संबंध.

**संदंशिका**, स्त्री० (का) लोहयंत्रविशेष.

**सदस्**, न० स्त्री० (दः दा) सभा.

**सदस्य**, पु० (स्यं) यज्ञकर्माचा विधि पाहणारे ऋत्विग्विशेष.

**सदा**, अ० सर्वकाल ह्या अर्थी. उ० याचकःसदायाचते.

**सदागति**, पु० (तिः) वायु, वारा. २ मुनि, ऋषि. ३ आकाश. ४ ईश्वर.

**सदातन**, पु० (नः) स्त्री० न० (नः नं) नित्य, अविनाशी. २ पु० (नः) महादेव. ३ ब्रम्हदेव.

**सदादान**, पु० (नः) ऐरावत. २ गजानन. ३ मस्त हत्ती.

**संदान**, न० (नं) गोबंधन, रज्जु, दांवें. २ दानोदक.

**सदानंद**, पु० (दः) ब्रम्हदेव.

**संदानित**, वि० (तः ता- तं) बद्ध, बांधलेला.

**सदानीरा**, स्त्री० (रा) नदीविशेष.

**सदाफल**, पु० (लः) नारळाचें झाड, माड. २ उंबराचें झाड.

**सदायोगिन्**, पु० (गी) विष्णु.

**संदाव**, पु० (वः) पलायन, पळणें.

**संदित**, वि० (तः ता- तं) बद्ध, बांधलेला.

**संदी**, स्त्री० (दी) खाट.

**सदृश्**, वि० (क् - क् - क्) सदृश, सारखा.

**सदृश**, वि० (शः शा- शं) सदृश, सारखा. २ न० (शं) उचित

**सदृक्ष**, वि० (क्षः क्षा- क्षं) सदृश, सारखा.

**सदेश**, वि० (शः शा- शं) समीपचा, जवळचा.

**संदेश**, पु० (शः) आज्ञा.

**संदेशवाच्**, स्त्री० (क्) दूतमुखानें ऐकिलेला निरोप.

**संदेशहर**, पु० (रः) निरोप सांगणारा, दूत.

**संदेशोक्ति**, स्त्री० (क्तिः) निरोप सांगणें.

**संदेह**, पु० (हः) संशय.

**संदोह**, पु० (हः) समूह.

**सद्मन्**, न० (द्म) गृह, घर. २ उदक, पाणी.

**सद्यः**, अ० तत्क्षणीं, तत्कालीं ह्या अर्थी. उ० सद्योहतः समुत्तस्थौ.

**सद्यःकृत**, न० (तं) संज्ञा, नांव.

**संद्राव**, पु० (वः) पलायन, पळणें.

**संधा**, स्त्री० (धा) प्रतिज्ञा. २ मर्यादा. ३ सायंकाळ. ४ स्थिति.

**संधान**, न० (नं) मद्यसंधान. २ संधि. ३ संघटण.

**संधि**, पु० (धिः) द्रव्य देऊन शत्रूशीं स्नेह करणें. २ सांधे. ३ संधान. ४ सुरंगा. ५ भग. ६ संघटण. ७ सावकाश.

**संधिजीवक**, पु० (कः) प्रसंगोपात बोलणारा. २ दुर्जन.

**संधिनी**, स्त्री० (नी) बैलानें मैथुनार्थ जी गाय आक्रमिली ती. २ अस्त्रविशेष.

**संधिला**, स्त्री० (ला) नदी. २ मंदीर.

**संध्या**, स्त्री० (ध्या) दिनांत, सायंकाळ. २ नदीविशेष. ३ युगसंधि.

**संध्यानाटिन्**, पु० (टी) महादेव.

**संध्यावल**, पु० (लः) यमाचा दूत.

**सध्र्यच्**, वि० (ङ्- ध्रीची- क्) दुसऱ्याब-रोबर जाणारा.

**सनत्**, पु० (त्) ब्रम्हदेव.

**सनत्कुमार**, पु० (रः) योगिविशेष, ब्रम्हदे-वाचा एक पुत्र.

**सनपर्णी**, स्त्री० (र्णी) गोकर्णीचें झाड.

**सना**, अ० नित्य ह्या अर्थी. उ० सनातनः

**सनातन**, वि० (नः ना- नं) नित्य. २ पु० (नः) योगिविशेष. ३ विष्णु. ४ महादेव.

**सनाभि**, पु० (भिः) सात पिढ्यापर्यंत जे पुरुष ते प्रत्येक. २ सारखा.

**सनि**, स्त्री० (निः) कांहींएक अर्थी प्रार्थना करून गुरूस योजणें.

**सनीड**, वि० (डः डा- डं) समीपचा, ज-वळचा.

**सन्नकद्रु**, पु० (द्रुः) चारवृक्ष, चाराचें झाड.

**सन्नति**, स्त्री० (तिः) नमस्कार. २ मार्ग.

**सन्नद्ध**, वि० (द्धः द्धा- द्धं) कवच धा-रण केलेला. २ सिद्ध. ३ एके ठिका-णीं मिळविलेला.

**सन्नय**, पु० (यः) समूह. २ सैन्याच्या पा-ठीमागें जें सैन्य असतें तें.

**सन्निकर्षण**, न० (णं) नैकटय, सान्निध्य.

**सन्निकृष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) समीप, संन्निध.

**सन्निध**, पु० (धः) समीप.

**सन्निधि**, पु० (धिः) नैकटय, सान्निध्य. २ इंद्रिय गोचर.

**सन्निवेश**, पु० (शः) शहरामध्यें केलेली एक बसावयाची जागा. २ अवयव विभाग.

**सन्मुख**, पु० (खः) सन्मुख.

**सन्महाबाहु**, पु० (हुः) इंद्र.

**संपत्ति**, स्त्री० (त्तिः) संपत्ति.

**सपत्न**, पु० (त्नः) शत्रु.

**संपद्**, स्त्री० (त्) संपत्ति. २ समुच्चय.

**सपदि**, अ० शीघ्र. २ तत्क्षणीं. ह्या अर्थी.

**संपन्न**, न० (न्नं) साधलेले. २ वि० (न्नः न्ना- न्नं) संपत्तियुक्त.

**संपराय**, पु० (यः) युद्ध. २ आपत्ति. ३ उत्तरकाल.

**संपरायक**, न० (कं) युद्ध.

**संपर्क**, पु० (र्कः) संगम.

**सपर्या**, स्त्री० (र्या) पूजा.

**संपाक**, पु० (कः) दांडगा, निर्लज्ज. २ चार अंगुलांचें प्रमाण.

**सपिंड**, वि० (डः डा- डं) सात पिढ्यांतील.

**सपीति**, स्त्री० (तिः) सहपान, दुसऱ्या ब-रोबर प्राशन करणें.

**संपुटक**, पु० (कः) डबा, चौफुला इत्यादि.

**सप्तकी**, स्त्री० (की) स्त्रियांचें कटिभूषण ज्यास दाब, कमरपट्टा असें म्हणतात तो.

**सप्तजिव्ह**, पु० (व्हः) अग्नि.

**सप्ततंतु**, पु० (तुः) यज्ञ.

**सप्तपर्ण**, पु० (र्णः) सातवणाचें झाड.

**सप्तपुत्रसू**, स्त्री० (सूः) सातपुत्रवती (स्त्री.)

**सप्तला**, स्त्री० (ला) जीस नेवाळी, वेल-मोगरा असें म्हणतात तें फुलझाड. २ शिकेकाई. ३ गुंज. ४ पाडळीची वेल.

**सप्तसप्ति**, पु० (प्तिः) सूर्य.

**सप्तार्चिष्**, पु० (र्चीः) अग्नि. (काली. २ कराली. ३ मनोजवा. ४ सुलोहिता.

५ सुधूम्रवर्णा. ६ स्फुलिंगिनी. ७ विश्वदासा. याप्रमाणें अग्नीच्या सात ज्वाला आहेत म्हणून सप्तार्चि अग्नि असें नांव पडलें आहे.) २ शनीनामा ग्रह.

**सप्तार्चिस्**, पु० (र्चिः) अग्नि. २ शनीनामा ग्रह. ३ वि० (र्चिः र्चिः र्चि) ज्याचे क्रूर डोळे आहेत तो.

**सप्ताश्व**, पु० (श्वः) सूर्य.

**सप्ति**, पु० (प्तिः) अश्व, घोडा.

**संप्रति**, अ० सांप्रतकाळीं ह्या अर्थी. उ० संप्रत्यसौगृहंयाति.

**संप्रदाय**, पु० (यः) गुरुपरंपरागत उपदेश.

**संप्रधारणा**, स्त्री० (णा) युक्तायुक्त परीक्षा.

**संप्रयोग**, पु० (गः) मैथून. २ मूलभूत जें कर्म तें.

**संप्रयोगिन्**, पु० (गी) कामुक. २ कारणयुक्त.

**संप्रहार**, पु० (रः) युद्ध. २ गति.

**संफुल्ल**, वि० (ल्लः ल्ला- ल्लं) प्रफुल्लित, फुल्लेला.

**संब**, पु० (बः) वज्र. २ मुसळाच्या शेवटास जी शेंबी बसवितात ती. ३ शुभान्वित.

**संबर**, न० (रं) उदक, पाणी. २ बौद्धव्रत विशेष. ३ पु० (रः) दैत्यविशेष. ४ हरिणविशेष. ५ मत्स्यविशेष. ६ पर्वत विशेष.

**संबरारि**, पु० (रिः) काम, मदन.

**संबल**, पु० न० (लः- लं) पाथेय, फराळाचें.

**संबाकृत**, वि० (तः ता- तं) दोन वेळ नांगरलेलें (शेत.)

**संबाध**, पु० न० (धः धं) गुह्य. २ संकट. ३ फार दाटी.

**संबाधन**, न० (नं) दरवाज्यावरचा बंगला. २ शूळाचें अग्र. ३ द्वारपाळ.

**संबुद्ध**, पु० (द्धः) बुद्धावतार.

**संबोध**, पु० (धः) बोध करणें.

**सब्रम्हचारिन्**, पु० (री) एक शाखेचे जे स्वाध्यायी ब्रम्हचारी ते प्रत्येक.

**सभर्तृका**, स्त्री० (का) जिचा नवरा जिवंत आहे ती स्त्री.

**संभली**, स्त्री० (ली) कुंटण स्त्री, परस्त्री पुरुषांचा योग करून देणारी स्त्री.

**संभव**, पु० (वः) संगम. २ हेतु. ३ उत्पत्ति.

**सभा**, स्त्री० (भा) गृह, घर. २ सभा. ३ सभ्य. ४ द्यूत.

**सभाजन**, न० (नं) स्वागत विषयक प्रश्न.

**संभार**, पु० (रः) समुदाय. २ संभृति. ३ साहित्य.

**सभासद्**, पु० (त्- द्) सभ्य, सभासद.

**सभास्तार**, पु० (रः) सभ्य, सभासद.

**सभिक**, वि० (कः का- कं) द्यूत करविणारा. २ पु० (कः) देव सभेचा सभासद.

**संभेद**, पु० (दः) नदीचा संगम.

**संभोग**, पु० (गः) शृंगार भेद. २ भोग. ३ मैथून, सुरत. ४ जैनाची आज्ञा.

**सभ्य**, पु० (भ्यः) सभासद. २ सज्जन.

**संभ्रम**, पु० (मः) हर्षानें जी त्वरा ती. २ भय. ३ आदर. ४ त्वरा.

**सम्**, अ० शोभन. २ समर्थ. ३ संग. ४ संतुष्ट ह्या अर्थी.

**सम**, न० (मं) पुष्प, फूल. २ पु० (मः) वर्ष. ३ वि० (मः मा- मं) समान. ४ सर्व. ५ साधु.

**समं**, अ० सहार्थी.

**समकोल**, पु० (लः) साधारण सर्प.

**समंगा**, स्त्री० (गा) वनौषधि जीस मंजिष्ठा असें म्हणतात ती. २ वनौषधि जीस लाजाळू असें म्ह० ती.

**समग्र**, वि० (ग्रः ग्रा ग्रं) संपूर्ण.

**समज**, न० (जं) अरण्य. २ पु० (जः) पशूंचा समूह.

**समंजस**, न० (सं) नीति. २ वि० (सः सा- सं) नीतियुक्त.

**समज्या**, स्त्री० (ज्या) सभा.

**समंततः**, अ० सर्वतः

**समंतदुग्धा**, स्त्री० (ग्धा) वनौषधि ज्यास शेर, निवडुंग असें म्ह० तें.

**समंतभद्र**, पु० (द्रः) बुद्धावतार.

**समंतभुज्**, पु० (जू) अग्नि.

**समंति**, स्त्री० (तिः) इच्छा. २ आज्ञा.

**संमद**; पु० (दः) हर्ष.

**समदु**, स्त्री० (दुः) कन्या.

**समधिक**, वि० (कः का- कं) अधिक झालेला.

**समपद**, न० (दं) धनुर्धरादिकांचा स्थितिविशेष (म्हणजे सर्वांनीं बरोबर पाय ठेवणें.)

**समय**, पु० (यः) शपथ. २ आचार. ३ काल. ४ सिद्धांत. ५ क्रियाकर. ६ संभाषण. ७ संपत्ति. ८ नियम. ९ अवसर. १० प्रसंग.

**समयकार**, पु० (रः) ग्रंथांतील साधारण संज्ञिक शब्द.

**समया**, अ० सामीप्य. २ मध्य ह्या अर्थी. उ० समयापत्तनंनदी. २ समयाशैलयोग्रामः

**समयोनि**, पु० (निः) कुंजर. २ ब्रम्ह.

**समर**, पु० न० (रः रं) युद्ध.

**समर्थ**, वि० (र्थः र्था- र्थं) शक्तिमान. २ संबंध. ३ हित, अनुकूल.

**समर्थन**, न० (नं) युक्तायुक्त परीक्षा.

**समर्द्धक**, वि० (कः का- कं) वरद, वरदेणारा.

**समर्मवित्**, पु० (त्) बुद्धिवान छात्र, हुशार शिष्य.

**समर्याद**, वि० (दः दा- दं) समीप. २ मर्यादयुक्त. ३ स्थीर.

**समवर्तिन्**, पु० (र्ती) यम, प्रेतांचा राजा.

**समवाय**, पु० (यः) समूह.

**समविहार**, पु० (रः) अत्यंत. २ वारंवार.

**समष्ठिला**, स्त्री० (ला) वनौषधि कडू सुरण.

**समसन**, न० (नं) संक्षेप, अविस्तार.

**समस्त**, वि० (स्तः स्ता- स्तं) सर्व, संपूर्ण.

**समस्या**, स्त्री० (स्या) ज्या वाक्यांत अर्थ समजण्यासाठीं वाक्यांतराचें पूरण करावें लागतें तें वाक्य. उ० शतचंद्रंनभस्तलं. येथें, दामोदर करा घात विव्हलीकृतचेतसा॥ दृष्टंचाणूर मल्लेनं" इतकें पूरण करावें लागतें.

**समक्ष**, वि० (क्षः क्षा- क्षं) इंद्रिय ग्राह्य.

**समाज्ञा**, स्त्री० (ज्ञा) कीर्ति.

**समा**, स्त्री० (माः) वर्ष. (हा शब्द अमर कोशांत बहु वचनीं सांगितला आहे परंतु अन्यत्र एक वचनीं प्रयोग दृष्ट आहे. उ० समांसमांविजायते इत्यादि.

**समाकर्षिन्**, पु० (र्षी) स्त्री० (र्षिणी) न० (र्षि) अति सुगंधि.

**समाघात**, पु० (तः) युद्ध. २ वध.

**समाज**, पु० (जः) पश्वातिरिक्तांचा समूह.

**समादान**, न० (नं) घेणें. २ बुद्धाचें अन्हिक, बुद्धाचें नित्य कर्म.

**समाधि**, पु० (धिः) स्वीकार. २ अद्भुत प्रश्न, परिहार, समाधान. ३ नियम. ४ काव्याचा गुणविशेष. ५ युक्तायुक्त परीक्षा. ६ सिद्धांत.

**समान**, पु० (नः) नाभिमंडलाचे ठायीं असणारा वायु. २ वि० (नः ना- नं) सदृश, सारखा. ३ पंडित. ४ एक.

**समानोदर्य**, पु० (र्यः) एका उदरीं उत्पन्न जे बंधु ते परस्पर.

**समापन**, न० (नं) समाप्ति. २ वध. ३ परिछेद.

**समापन्न**, न० (न्नं) समाप्त. २ प्राप्त. ३ क्लिष्ट. ४ वध.

**समाप्ति**, स्त्री० (प्तिः) शेवट. २ युक्तायुक्त परिक्षा.

**समायोग**, पु० (गः) संयोग. २ समुदाय. ३ प्रयोजन.

**संमार्जनी**, स्त्री० (नी) केरसुणी, झाडणी.

**समालंभ**, पु० (भः) केशरादिकांचा आंगास उटी काढणें, लेप लावणें.

**समालंभन**, न० ( नं ) सुगंधिविशेष. २ रंग.

**समावृत्त**, वि० (त्तः त्ता- त्तं) गुरूनें आश्रमांतर स्वीकारावयास आज्ञा दिलेला. (अनूचान.)

**समाह्वय**, पु० (यः) प्राण्यांकडून करविलेली क्रीडा, खेळ. (मेंढ्यांची टक्कर, कोंबड्यांची लढाई.)

**समास**, पु० (सः) संक्षेप. २ समर्थन.

**समांसमीना**, स्त्री० (ना) जी गाय प्रतिवर्षी प्रसूत होते ती.

**समासाद्य**, वि० (द्यः द्या- द्यं) प्राप्त होण्यास योग्य.

**समासार्था**, स्त्री० (र्था) समस्या, ज्या वाक्यांत अर्थ समजण्यासाठीं वाक्यांतराचें पूरण करावें लागतें तें वाक्य.

**समाहार**, पु० (रः) राशीकरण, एक रास करणें.

**समाहित**, वि० (तः ता- तं) अंगीकृत, स्वीकारलेलें. २ समाधिस्थ. ३ वाद रहित.

**समाहृति**, स्त्री० (तिः) संक्षेप ग्रंथ, संग्रह ग्रंथ.

**समित्**, स्त्री० (त्) सभा.

**समिति**, स्त्री० (तिः) सभा. २ युद्ध. ३ संग, संगम.

**समिध्**, स्त्री० (त्) सुकलेलें तृणकाष्ठ इत्यादि (यागामध्यें हवन करावयाचीं जीं काष्ठें तीं असेंही कोणाचें मत आहे.)

**समिध**, पु० (धः) अग्नि.

**समीक**, न० (कं) युद्ध.

**समीची**, स्त्री० (ची) वंदन करणें.

**समीचीन**, वि० (नः ना- नं) नीतियुद्ध.

**समीप**, वि० (पः पा- पं) सन्निकृष्ट, जवळ.

**समीर**, पु० (रः) वायु, वारा.

**समीरण**, पु० (णः) वायु, वारा. २ वनौ० ज्यास पांढरा मरवा असें म्हणतात तो. ३ प्रवासी.

**समीक्ष**, न० (क्षं) सांख्यशास्त्र, मिमांसा.

**समीक्षा**, स्त्री० (क्षा) तत्व. २ बुद्धि.

**समुच्चय**, पु० (यः) राशीकरण, रास करणें.

**समुछ्रय**, पु० (यः) विरोध. २ उच्चत्व. ३ समूह.

**समुज्झित**, वि० (तः ता- तं) त्यक्त, टाकलेला.

**समुत्थान**, न० (नं) चांगला उद्योग. २ व्याधीची परीक्षा.

**समुत्थितश्मश्रु**, स्त्री० (श्रुः) पुरुष चिन्ह युक्त स्त्री.

**समुत्पिंज**, पु० (जः) स्त्री० (जा) न० (जं) अत्यंत व्याकूल (सेनादि.)

**समुदक्त**, वि० (क्तः क्ता- क्तं) उन्नीत, वर आणलेला.

**समुंदन**, न० (नं) आर्द्रीभाव, आर्द्रपणा.

**समुदय**, पु० (यः) समूह.

**समुदाचार** पु० (रः) अभिप्राय.

**समुदाय**, पु० (यः) समूह. २ युद्ध. ३ उद्गम.

**समुद्ग**, पु० (द्गः) संपुटक, डबा, चौफुला.

**समुद्गक**, पु० (कः) डबा, चौफुला इत्यादि.

**समुद्गीरण**, न० (णं) वमन झालेलें. २ ऊर्ध्वनयन, वर नेणें.

**समुद्धत**, वि० ( तः ता- तं ) दुर्विनीत, उद्धट.

**समुद्र**, पु० (द्रः) समुद्र.

**समुद्रकफ**, पु० (फः) समुद्रफेणी.

**समुद्रगा**, स्त्री० (गा) नदी.

**समुद्रगृह**, न० (हं) जलयंत्र गृह.

**समुद्रचुलक**, पु० (कः) अगस्ति ऋषि.

**समुद्रनवनीत**, न० (तं) अमृत. २ चंद्र.

**समुद्रांता**, स्त्री० (ता) वनौषधि ज्यास धमासा असें म्हणतात तो. २ कापासिणीचें झाड. ३ पिंडिका नामक लता.

**समुद्रांबरमेखला**, स्त्री० (ला) पृथ्वी.

**समुद्रारु**, पु० ( रुः ) सुसर. २ मत्स्य, मासा.

**समुधुत**, न० (तं) वर ओढणें.

**समुन्नद्ध**, वि० (द्धः द्धा- द्धं) पंडितमन्य, मी पंडित, मी शहाणा असें मानणारा, गर्विष्ट. २ उद्धुत.

**समुपजोषं**, अ० अनंदार्थी उ० समुपजोषंभूयात्.

**समुह्य**, पु० (ह्यः) अग्निविशेष.

**समूढ**, न० (ढं) शोधलेलें. २ वि० (ढः ढा- ढं) वक्र, वांकडा. ३ धान्यादिकांची केलेली रास. ४ नूतन. ५ तत्काळ झालेला. ६ अनुपप्लुत.

**समूरु**, पु० (रुः) हरिणविशेष.

**संमूर्छन**, न० (नं) अभिव्याप्ति, सर्वत्रव्याप्ति. २ वृक्ष, देवालय, इत्यादिकांची उंची. ३ मोह.

**समूह**, पु० (हः) समुदाय.

**समृद्ध**, वि० (द्धः द्धा- द्धं) सुसंपन्न.

**समृद्धि**, स्त्री० (द्धिः) वृद्धि. २ संपत्ति.

**संमृष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) शोधित, शुद्ध केलेला.

**सम्यक्**, अ० (चांगलें.)

**सम्यच्**, न० (क्) सत्य.

**सम्राज्**, पु० (ट्) ज्याणें राजसूय यज्ञ केला व जो द्वादश मंडलांचा स्वामी असोन सर्व राजांस आपले आज्ञेंत ठेवितो तो राजा.

**संयत्**, स्त्री० (त्) युद्ध.

**संयत**, वि० (तः ता- तं) बद्ध, बांधलेला.

**संयम**, पु० (मः) योग साधनविशेष.

**संयमनी**, स्त्री० (नी) यमपुरी. २ संयमन. ३ बंधन. ४ व्रत.

**संयाम**, पु० (मः) योग साधनविशेष.

**संयुग**, पु० (गः) युद्ध.

**संयोगित**, वि० (तः ता- तं) संयुक्त.

**संयोजन**, न० (नं) मैथून.
**संयोजित**, वि० (तः ता- तं) संयुक्त.
**सर**, पु० (रः) बाण.
**सरक**, पु० न० (कः कं) मद्यपान. २ मद्यपानाचें भांडें. ३ उंसांच्या रसाचें मद्य. ४ प्रवास करणारांची रांग, समुदाय.
**सरःकाक**, पु० (कः) हंसपक्षि.
**सरघा**, स्त्री० (घा) मधमाशी. २ करंज वृक्ष.
**सरज**, न० (जं) लोणी.
**सरजस्**, स्त्री० (जाः) मलीन स्त्री.
**सरट**, पु० (टः) सरडा.
**सरणा**, स्त्री० (णा) वनौषधि जीस तेंडू, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती. २ जीस चांदवेल, कुब्जप्रसारिणी असें म्हणतात ती वनौषधि.
**सरणि**, स्त्री० (णिः) मार्ग. २ पंक्ति.
**सरणी**, स्त्री० (णी) वनौषधि जीस चांदवेल, कुब्जप्रसारिणी असें म्हणतात ती.
**सरत्नि**, पु० (त्निः) मुंडाहात.
**संरंभ**, पु० (भः) धांदल, घाई.
**सरमा**, स्त्री० (मा) कुत्री. २ बिभीषणाची स्त्री.
**सरयु**, पु० (युः) वायु, वारा.
**सरल**, पु० (लः) देवदारू वृक्षाचा एक भेद. २ पद्मकाष्ठ. ३ वि० (लः ला- लं) सरळ, समोर. ४ उदार.
**सरलद्रव**, पु० (वः) धूप.
**सरला**, स्त्री० (ला) वनौषधि जीस तेंडू, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती.
**सरस्**, न० (रः) तडाग, तळें. २ उदक, पाणी.
**सरसी**, स्त्री० (सी) तडाग, तळें. २ विश्व.
**सरसीरुह**, पु० न० (हः हं) कमळ.
**सरस्वत्**, पु० (स्वान्) समुद्र. २ नदविशेष. ३ वि० (स्वान्-स्वती-स्वत्) रसिक.
**सरस्वती**, स्त्री० (ती) वाग्देवता, वाणी. २ नदी. ३ रत्न. ४ देवी. ५ नदीविशेष. ६ गाय. ७ मनूची पत्नी. ८ ब्रम्हकुमारी.
**सराव**, पु० न० (वः वं) पात्रविशेष जीस मालटी असें म्हणतात ती.
**संराव**, पु० (वः) शब्द.
**सरित्**, स्त्री० (त्) नदी.
**सरित्पति**, पु० (तिः) समुद्र.
**सरिण्यु**, पु० (ण्युः) मेघ. २ वारा.
**सरिल**, न० (लं) उदक, पाणी.
**सरिषप**, पु० (पः) धान्यविशेष, मोहोरी.
**सरीसृप**, पु० (पः) सर्प.
**संरूढ**, पु० (ढः) प्रौढ. २ वि० (ढः ढा- ढं) ज्याला अंकुर फुटले आहेत तो (वृक्षादि.)
**सरोजिन्**, पु० (जी) बौद्धभेद.
**सरोजिनी**, स्त्री० (नी) तळें. २ कमळ.
**सर्ग**, पु० (र्गः) स्वभाव. २ त्याग. ३ निश्चय. ४ अध्याय, काव्यादि ग्रंथांतलें विश्रामस्थान. ५ सृष्टि. ६ काव्यपुराण नाटक भाग. ७ मोह. ८ उत्साह.
**सर्गबंध**, पु० (धः) महाकाव्य.
**सर्ज**, पु० (र्जः) सायल्याचें झाड.
**सर्जक**, पु० (कः) असणाचें झाड.
**सर्जरस**, पु० (सः) राळधूप.
**सर्जिकाक्षार**, पु० (रः) क्षारविशेष ज्यास सर्जीखार असें म्हणतात तो.
**सर्जु**, स्त्री० (र्जुः) वाणी, वाचा. २ विद्युल्लता, वीज.

**सर्प**, पु० (र्पः) साप.

**सर्पराज**, पु० (जः) वासुकी नामा सर्प.

**सर्पि**, पु० (र्पिः) समुद्रविशेष.

**सर्पिस्**, न० (र्पिः) तूप, घृत.

**सर्व**, पु० (र्वः) महादेव. २ वि० (र्वः र्वा- र्वं) सकल, संपूर्ण.

**सर्वग**, न० (गं) उदक, पाणी. २ पु० (गः) महादेव. ३ वि० (गः गा- गं) व्यापक.

**सर्वतः**, अ० आसमंतात.

**सर्वतोभद्र**, पु० (द्रः) मजल्यावर मजले ज्या वाड्यांत असतात तो राजवाडा. २ निंबाचें झाड. ३ गृहविशेष ४ काव्य चित्र.

**सर्वतोभद्रा**, स्त्री० (द्रा) शिवणीचें झाड. २ नटाची स्त्री.

**सर्वतोमुख**, न० (खं) उदक, पाणी. २ आकाश. ३ पु० (खः) ब्रम्हदेव. ४ उग्र. ५ आत्मा.

**सर्वथा**, अ० हेतु. २ स्वीकार ह्या अर्थी.

**सर्वदमन**, पु० (नः) भरतराजा (दुष्यंताचा पुत्र.)

**सर्वदर्शिन्**, पु० (र्शी) बुद्धावतार.

**सर्वदा**, अ० सर्वकाल ह्या अर्थी.

**सर्वधुरावह**, वि० (हः हा- हं) सर्व कार्याचा भार वाहणारा, सर्व कार्यास उपयोगी पडणारा (बैल, घोडा इत्यादि.)

**सर्वधुरीण**, वि० (णः णा णं) सर्व कार्याचा भार वाहणारा, सर्व कार्यास उपयोगी पडणारा (बैल, घोडा इत्यादि)

**सर्वपूर्णत्व**, न० (त्वं) साहित्य.

**सर्वमंगला**, स्त्री० (ला) पार्वती.

**सर्वमूल्य**, न० (ल्यं) कवडी.

**सर्वरस**, पु० (सः) राळ, धूप.

**सर्वला**, स्त्री० (ला) शस्त्रविशेष ज्यास गुरगूज असें म्हणतात तें (हें घुसळण्याच्या रवी सारखें असतें.)

**सर्वलिंगिन्**, पु० (गी) दुःशास्त्रवर्ती जे बौद्धक्षपणक इत्यादि तें प्रत्येक.

**सर्ववेदस्**, पु० (दाः) ज्यानें सर्वस्व दक्षिणा देऊन विश्वजिन्नामा यज्ञ केला तो.

**सर्ववेशिन्**, पु० (शी) नट.

**सर्वसन्नहन**, न० (नं) चतुरंग सैन्याचा जमाव.

**सर्वंसहा**, स्त्री० (हा) पृथ्वी.

**सर्वज्ञ**, पु० (ज्ञः) बुद्धावतार. २ महादेव;

**सर्वानुभूति**, स्त्री० (तिः) वनौषधि जीस तेड, श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती.

**सर्वान्नभोजिन्**, वि० (जी- जिनी- जि) ब्राम्हणक्षत्रियादि सर्व जातीकडचें जो अन्न खातो तो.

**सर्वान्नीन**, वि० (नः ना- नं) ब्राम्हणाक्षत्रियादि सर्व जातीकडचें जो अन्न खातो तो.

**सर्वाभिसंधि**, पु० (धिः) कपटी तपस्वी.

**सर्वाभिसार**, पु० (रः) चतुरंग सैन्याचा जमाव.

**सर्वार्थसिद्ध**, पु० (द्धः) बौद्धाचा एक आवांतर भेद. २ शाक्य मुनि.

**सर्वावसर**, पु० (रः) अर्धरात्र.

**सर्वौघ**, पु० (घः) चतुरंग सैन्याचा जमाव. २ गुरुविशेष.

**सर्वौघ**, पु० (घः) चतुरंग सैन्याचा जमाव.

**सर्षप**, पु० (पः) धान्यविशेष ज्यास सांसव, शिरस असें म्हणतात तें. २ मोहोरी, मोहरी.

**संलाप**, पु० (पः) परस्पर प्रश्नोत्तर रूप जें भाषण तें.

**सलिल**, न० (लं) उदक, पाणी.

**सलिलकुंतल**, पु० (लः) शेवाळ.

**सलिलेंधन**, पु० (नः) वडवाग्नि.

**सल्लकी**, स्त्री० (की) वनौषधि जीस साल्ई असें म्हणतात ती.

**सव**, पु० (वः) यज्ञ. २ संधान.

**संवत्**, अ० वर्ष, संवत्सर ह्या अर्थी.

**संवत्सर**, न० (रं) वर्ष.

**संवदन**, न० (नं) मणिमंत्रादिकांनीं वश करणें.

**सवन**, न० (नं) सोमाभिषव. २ स्नान. ३ पु० (नः) यज्ञ.

**संवनन**, न० (नं) मणिमंत्रादिकांनीं वश करणें.

**सवयस्**, वि० (याः याः यः) समान वयस्क (मित्र.)

**संवर्त**, पु० (र्तः) प्रलयकाळ. २ मुनिविशेष. ३ वनौषधि धाटिंग वृक्ष ज्यास बेहेडा असें म्हणतात तो.

**संवर्तक**, पु० (कः) बलराम.

**संवर्तिका**, स्त्री० (का) कमळाचीं नूतन पानें.

**संवसथ**, पु० (थः) ग्राम, गांव.

**संवाहक**, पु० (कः) आंग रगडणारा.

**संवाहन**, न० (नं) अंग मर्दन. २ भार वाहणें.

**संवित्**, स्त्री० (त् -) बुद्धि. २ प्रतिज्ञा, स्वीकार. ३ आचार. ४ ज्ञान. ५ युद्ध. ६ संभाषण. ७ संकेत. ८ नांव, संज्ञा. ९ संतोष.

**सवितृ**, पु० (ता) सूर्य.

**संवित्ति**. स्त्री० (त्तिः) जैनांचा वाद नसणे. २ प्रतिपत्ति.

**संविद्**, स्त्री० (त्) संभाषण. २ कर्मनियम. ३ युद्ध. ४ संज्ञा, नांव. ५ संकेत. ६ आचार. ७ संतोष.

**सविध**. वि० (धः धा- धं) समीप.

**सविस्मय**. पु० (यः) विस्मय पावलेला.

**संवीत**. वि० (तः ता- तं) वेष्टित, वेढलेला.

**संवीक्षण**. न० (णं) गवेषण, शोधणें.

**संवेग** पु० (गः) हर्षानें त्वरा करणें.

**संवेद**, पु० (दः) अनुभव.

**सवेश**, वि० (शः शा- शं) सन्निध, समीप.

**संवेश**. पु० (शः) निद्रा.

**संवेशन**, न० (नं) मैथुनकर्म.

**सव्य**. वि० (व्यः व्या- व्यं) वामशरीर, डावें आंग.

**सव्यसाचिन्**, पु० (ची) अर्जुन.

**सव्येष्ट**. पु० (ष्टः) सारथी.

**सव्येष्ठृ**, पु० (ष्टा) सारथी.

**संशय**. पु० (यः) संदेह.

**संशयापन्नमानस**. वि० (सः सा- सं) संशयखोर.

**सश्मश्रु**, स्त्री० (श्रुः) सकेश स्त्री.

**संश्रव**, पु० (वः) स्वीकार.

**संश्रुत**, वि० (तः ता- तं) स्वीकारलेला.

**संश्लेष**, पु० (षः) आलिंगन.

**संसक्त**, वि० (क्तः क्ता- क्तं) संलग्न, अव्यवहित.

**संसद्**, स्त्री० (त्) सभा.

**समन**, न० (नं) यज्ञसंबंधी जें पशुहनन तें.

**संसप्तक**, पु० (कः) प्रथम शपथ केल्यामुळें जो युद्धास परांगमुख होत नाहीं तो.

**संसरण**, न० (णं) राजमार्ग. २ प्राणिमात्राची उत्पत्ति. ३ निर्बाध जें सैन्याचें गमन तें. ४ संसार. ५ युद्धाचा आरंभ.

**संसार**, पु० (रः) संसार.

**संसारगुरु**, पु० (रुः) मदन, काम.

**संसारमार्ग**, पु० (र्गः) योनि.

**संसिद्धि**, स्त्री० (द्धिः) स्वभाव. २ सिद्धि. ३ मद्यें करून जी उग्र ती.

**संसृति**, स्त्री० (तिः) प्रवाह.

**संसृष्ट**, पु० (ष्टः) संसर्ग. २ सुवासिक द्रव्यमिश्रित उदकादिक.

**संस्कार**, पु० (रः) प्रयत्न. २ अनुभव. ३ अंतःकरणाचें कर्म.

**संस्कृत**, वि० ( तः ता- तं ) कृत्रिम, क्रियेनें संपादलेलें ( जसें मातीचा घट. ) २ लक्षणयुक्त. ३ संसारयुक्त. ४ भूषित. ५ स्तवलेला.

**संस्तर**, पु० (रः) यज्ञ. २ दर्भमुष्टि.

**संस्तव**, पु० (वः) परिचय.

**संस्ताव**, पु० (वः) ब्राम्हणाची वेद पठण करण्याची जागा.

**संस्त्याय**, पु० (यः) सन्निवेश, नगरांतील एक बसावयाचें स्थान. २ समूह. ३ विस्तृति.

**संस्थ**, पु० (स्थः) उभा राहिलेला. २ जंगम, चर. ३ स्थिति. ४ विनाश.

**संस्था**, स्त्री० (स्था) न्याय्यमार्ग स्थिति. २ आधार. ३ मरण. ४ सादृश्य. ५ यज्ञाची समाप्ति.

**संस्थान**, न० (नं) चतुष्पथ, चवाठा. २ सन्निवेश, नगरांतील एक बसावयाचें स्थान. ३ आकृति. ४ मृत्यु, मरण. ५ अवयव विभाग.

**संस्थित**, वि० ( तः ता- तं ) मृत, मेलेला.

**संस्पर्शा**, स्त्री० (र्शा) शाकविशेष ज्यास चाकवताची भाजी असें म्हणतात ती.

**संस्फाल**, पु० (लः) मेंढा.

**संस्फेट**, पु० (टः) युद्ध.

**संस्फोट**, पु० (टः) युद्ध.

**सस्य**, न० (स्यं) वृक्षादिकांचें. फळ.

**सस्यक**, पु० (कः) रत्नविशेष. २ खड्ग. ३ मणी.

**सस्यसंवर**, पु० (रः) सावल्याचें झाड.

**सस्वेदा**, स्त्री० (दा) तरुणी स्त्री. २ घर्मयुक्त स्त्री.

**सह**, अ० सहवर्तमान, बरोबर ह्या अर्थी. २ पु० (हः) पराक्रम.

**सहकार**, पु० (रः) अति मधुर जो आंबा त्याचें झाड.

**सहचर**, वि० (रः रा- रं) सेवक.

**सहचरा**, स्त्री० (रा) पिवळे कोरांटीचें झाड.

**सहचरी**, स्त्री० (री) पिवळे कोरांटीचें झाड. २ सखी.

**सहज**, पु० (जः) एकोदरोत्पन्न, सख्खा बंधु. २ स्वभाव. ३ वि० (जः जा- जं) बरोबर उठलेला.

**संहत**, वि० (तः ता- तं) दृढसंधानयुक्त, सांधलेला. २ एकवट झालेला. ३ दृढ.

**संहतजानुक**, वि० (कः का- कं) संलग्नजानुक, ज्याचे गुढगे स्वभावतः परस्पर फार जवळ असतात तो.

**संहतल**, पु० (लः) पसरलेले जे दोन हात एके ठिकाणीं जोडले ते.

**संहति**, स्त्री० (तिः) समूह.

**सहदेव**, पु० (वः) सहदेव नामा पांडव.

**सहदेवा**, स्त्री० (वा) उपरसाळ, उपलसरी असें म्ह० ती वनौषधि.

**सहदेवी**, स्त्री० (वी) वनौषधि जीस मुंगशी मुंगुसवेल असें म्ह० ती.

**सहधर्मिणी**, स्त्री० (णी) विवाहित स्त्री.

**सहन**, वि० (नः ना- नं) सहिष्णु, सोशिक.

**संहनन**, न० (नं) देह, शरीर.

**सहपांशुकिल**, पु० (लः) सोबती.

**सहभाविन**, पु० (नः) सहाय्य करणारा.

**सहभोजन**, न० (नं) बरोबर जेवणें.

**संहर्ष**, पु० (र्षः) स्पर्धा.

**सहस्**, न० (हः) पराक्रम. २ बल. ३ ज्योति, तेज. ४ पु० (हाः) मार्गशीर्ष महिना. ५ हेमंतऋतु.

**सहसा**, अ० अकस्मात ह्या अर्थी.

**सहस्य**, पु० (स्यः) पौषमहिना.

**सहस्रदंष्ट्र**, पु० (ष्ट्रः) मत्स्यविशेष.

**सहस्रपत्र**, न० (त्रं) कमळ.

**सहस्रपाद**, पु० (दः) सूर्य. २ उद्योगी.

**सहस्रवीर्या**, स्त्री० (र्या) दुर्वा.

**सहस्रवेधि**, पु० (धिः) हिंग.

**सहस्रवेधिन्**, पु० (धी) वनौषधि ज्यास अम्लवेतस असें म्हणतात ती. २ न० (धि) हिंग,

**सहस्रांशु**, पु० (शुः) सूर्य.

**सहस्राक्ष**, पु० (क्षः) इंद्र.

**सहस्रिन्**, वि० (स्त्री- स्त्रिणी- स्त्रि) सहस्र सैन्यानें युक्त.

**सहा**, स्त्री० (हा) वनौषधि जीस कांटेशेवती, शेवतीगुलाब असें म्हणतात ती. २ काकमूग, रानमूग. ३ पृथ्वी. ४ सुवासिक द्रव्यविशेष ज्यास नखला असें म्हणतात तें. ५ कुमारी.

**सहाय**, वि० (यः या- यं) अनुचर, सेवक, मागून जाणारा. २ सखा, मित्र.

**सहायता**, स्त्री० (ता) सेवकांचा किंवा त्यांचा समूह.

**सहिष्णु**, वि० (ष्णुः ष्णुः ष्णु) सहनशील, सोशिक.

**संहूति**, स्त्री० (तिः) बहुतांचें बोलावणें.

**सहृदय**, वि० (यः या- यं) प्रशस्त चित्ताचा.

**सहोटज**, पु० (जः) पर्णकुटी.

**सहोदर**, पु० (रः) स्त्री० न० (रा रं) सोदर, सख्खा बंधु.

**सह्य**, पु० (ह्यः) पर्वतविशेष. २ न० (ह्यं) आरोग्य. ३ वि० (ह्यः ह्या- ह्यं) सहन करावयास योग्य.

**संक्षेपण**, न० (णं) अविस्तार, संक्षेप.

**संज्ञ**, पु० (ज्ञः) संलग्नजानुक, ज्याचे गुडघे स्वभावतः परस्पर फार जवळ असतात तो.

**संज्ञपन**, न० (नं) वध, ठार मारणें.

**संज्ञा**, स्त्री० (ज्ञा) डोळ्यानें खुणावणें. २ गायत्री मंत्र. ३ सूर्याची स्त्री. ४ चेतना, बुद्धि. ५ नाम, नांव. ६ यममाता.

**संज्ञु**, वि० (ज्ञुः ज्ञुः ज्ञु) संलग्नजानुक, ज्याचे गुडघे स्वभावतः परस्पर फार जवळ असतात तो.

**सा**, स्त्री० (सा) लक्ष्मी.

**साकं**, अ० साहार्थी.

**साकेत**, न० (तं) अयोध्या नगरी.

**साक्तुक**, न० (कं) सक्तूंचा समूह.

**सागर**, पु० (रः) समुद्र.

**सागरगामिनी**, स्त्री० (नी) नदी.

**सागरांबरा**, स्त्री० (रा) पृथ्वी.

**सांघाटिका**, स्त्री० (का) युग्म.

**साचि**, अ० तिर्यक्, वांकडें ह्या अर्थी. उ० कृतं साचिधनुस्तेन.

**सातला**, स्त्री० (ला) वनौषधि शिकेकाई.

**साति**, स्त्री० (तिः) दान, देणें. २ अंत, समाप्ति.

**सातिसार**, वि० (रः रा रं) ज्यास अतिसाराचा रोग झाला आहे तो.

**सातीनक**, पु०(कः) धान्यविशेष, वाटाणा.

**सात्यकि**, पु० (किः) सात्यकी.

**सात्यवत**, पु० (तः) व्यास ऋषि.

**सांत्व**, न० (त्वं) फार गोड बोलणें. २ सरळपणा.

**सात्वत**, पु० (तः) विष्णु. २ देशविशेष.

**सात्विक**, वि० (कः का- कं) अंतःकरणापासून निष्पन्न (स्वरभंग- रोमांच- कांपरा इत्यादि.)

**सादन**, न० (नं) गृह, घर.

**सादिन्**, पु० (दी) स्वार. २ सारथी. ३ महात, माहुत.

**सादृश्य**, न० (श्यं) सारखेपणा.

**सांदृष्टिक**, न० (कं) सद्यःफल, तात्कालिक फळ.

**सांद्र**, वि० (द्रः द्रा- द्रं) निबिड. २ वन. ३ मृदु. ४ कुंभ, माठ.

**साधन**, न० (नं) मारणें. २ मृतसंस्कार, अग्निदाह. ३ गमन. ४ द्रव्य. ५ द्रव्यादि देणें. ६ अर्थनिष्पादन. ७ उपकरण, परिकर किंवा उपाय. ८ अनुगमन, मागून जाणें. ९ शिश्न. १० सैन्य. ११ अनुसरणें. १२ सिद्धि. १३ औषध.

**साधारण**, वि० (णः णा- णं) सदृश, सारखा. २ अनेक संबंधी सर्व साधारण.

**साधित**, वि० (तः ता- तं) देवविलेलें, साधन केलेलें.

**साधिष्ठ**, वि० (ष्ठः ष्ठा- ष्ठं) अतिशयें करून स्वीकारलेला. २ अति दृढ. ३ कुलीन.

**साधीयस्**, वि० (यान्- यसी- यस्) अतिशय साधु. २ अतिशय स्वीकार.

**साधु**, पु० (धुः) सज्जन. २ वि० (धुः ध्वी. धु) सुंदर. ३ लोकांस कर्ज देऊन त्याच्या व्याजावर उपजीविका चालविणारा. ४ धनवान.

**साधुधी**, स्त्री० (धीः) सासू.

**साध्य**, पु० (ध्यः) देवयोनीविशेष. २ योगविशेष. ३ काम, मदन. ४ न० (ध्यं) फल. ५ वि० (ध्यः ध्या- ध्यं) साधावयाचा.

**साध्वस**, न० (सं) भय.

**साध्वी**, स्त्री० (ध्वी) पतिव्रता स्त्री.

**सानु**, पु० न० (नुः नु) पर्वताचें शिखर. २ वन. ३ मार्ग दाखविणारा.

**सानुमत्**, पु० (मान्) पर्वत.

**सान्नाय्य**, न० (य्यं) हविर्द्रव्य.

**सांपरायिक**, न० (कं) युद्ध.

**साप्तपदीन**, न० (नं) सख्य, मैत्री.

**सांप्रतं**, अ० युक्त, योग्य. २ सांप्रतकाल ह्या अर्थी उ० तत्रास्ते सांप्रतंमुनिः २ साधनार्थी.

**सामज**, पु० (जः) हत्ती.

**सामधेनी**, स्त्री० (नी) अग्नींत समिधा टाकून अग्नि पेटण्याकरितां जी वेदाची ऋचा म्हणतात ती.

**सामन्**, न० (म) सान्त्वन, प्रिय बोलणें वगैरे. २ वेदविशेष, सामवेद.

**सामर्थ्य,** न० (र्थ्यं) शक्ति. २ योग्यता.

**सामाजिक,** वि० (कः का- कं) सभ्य.

**सामान्य,** न० (न्यं) घटत्वादि जाति. २ वि० (न्यः न्या- न्यं) साधारण.

**सामि,** अ० अर्ध. २ जुगुप्सित, निंदित ह्या अर्थी. उ० सामि समितार्थी. २ सामिकृतमकल्याणकारी.

**सामिधेनी,** स्त्री० (नी) अग्नीत समिधा टाकून अग्नी पेटण्याकरितां जी वेदाची ऋचा म्हणतात ती.

**सामीची,** स्त्री० (ची) स्तुति.

**सामुद्र,** वि० (द्रः द्रा- द्रं) समुद्रापासून झालेला. २ देहलक्षण,

**सामुद्रिक,** वि० (कः का- कं) स्त्री पुरुष लक्षण पाहणारा.

**साय,** पु० (यः) सायंकाल. २ कांड.

**सायं,** अ० सायंकाल ह्या अर्थी. उ० सायंसंध्यामुपासिष्य.

**सायक,** पु० (कः) बाण. २ खड्ग.

**सायांत्रिक,** वि० (कः का- कं) गलबतानें व्यापार करणारा.

**सांयात्रिक,** वि० (कः का- कं) गलबतानें व्यापार करणारा.

**सायुगीन,** वि० (नः ना- नं) युद्धाविषयीं कुशल.

**सायोंस्तव,** पु० (वः) प्रभातकाल.

**सार,** पु० (रः) वृक्षादिकांचा स्थिरांश, गाभा, नर, गर. २ बळ, सामर्थ्य. ३ न० (रं) न्याय्य. ४ पु० (रः) स्नान करणारा पुरुष. ५ न० (रं) जल, पाणी. ६ धन, द्रव्य. ७ वि० (रः रा- रं) श्रेष्ठ.

**सारंग,** पु० (गः) चातकपक्षि, २ हरिण. ३ हत्ती. ४ वि० (गः गा-गं) चित्र वर्ण.

**सारण,** पु० (णः) रोगविशेष. २ राक्षसविशेष.

**सारणी,** स्त्री० (णी) वनौषधि जीस चांदवेल, कुब्जप्रसारिणी असें म्हणतात ती. २ लहान नदी.

**सारथि,** पु० (थिः) सारथि, रथ कुटुंबी.

**सारमेय,** पु० (यः) कुत्रा.

**सारव,** वि० (वः वा- वं) सरयू नदीचे ठायीं झालेला.

**सारस,** पु० न० (सः सं) कमळ. २ सारस नामा पक्षि. ३ पु० (सः) चंद्र.

**सारसन,** न० (नं) स्त्रियांचे कटिभूषण, दाब, कमरपट्टा. २ पुरुषानें आंगरखा घालून त्याजवर सजवुतीकारितां बांधलेले वस्त्र ज्यास पचांगी असें म्हणतात तें.

**सारिका,** स्त्री० (का) पक्षिविशेष जीस साळुंकी असें म्ह० ती.

**सारिणी,** स्त्री० (णी) पऱ्हळ.

**सारिवा,** स्त्री० (वा) वनौषधि जीस उपरसाळ, उपळसरी असें म्हणतात ती.

**सार्थ,** पु० (र्थः) प्राण्यांचा समुदाय.

**सार्थवाह,** पु० (हः) क्रयविक्रय करून उपजीविका करणारा, वाणी.

**सार्द्धं,** अ० सह, बरोबर ह्या अर्थी.

**सार्द्र,** वि० (द्रः द्रा- द्रं) आर्द्र, ओलें.

**सार्वभौम,** पु० (मः) उत्तर दिशेचा हत्ती. २ सर्व पृथ्वीचा राजा.

**साल,** पु० (लः) मत्स्यविशेष. २ वई, कुंपण. ३ वृक्ष. ४ सायला, सागवानाचें झाड.

**सालपर्णी,** स्त्री० (र्णी) वनौषधि जीस डवला, पिटवण, सालवण असें म्ह० ती.

**सालूर,** पु० (रः) भेक, बेडूक.

**सांवत्सर** पु० (रः) ज्योतिषी, जोशी.
**सावन,** पु० (नः) यज्ञ कर्माची समाप्ति. २ यजमान. ३ वरुण.
**सावर,** पु० (रः) लोध्रवृक्ष.
**सावित्र,** पु० (त्रः) महादेव. २ रुईमंदार, थोर बकुळी.
**सावित्री,** स्त्री० (त्री) सत्यवानाची २ स्त्री. ब्रह्मदेवाची स्त्री. ३ पार्वती. ४ महामंत्र.
**सांशयिक,** पु० (कः) स्त्री० (का) न० (कं) संशयखोर.
**साशूक,** न० (कं) कांवळें.
**सांश्रुधी,** स्त्री० (धी) सासू.
**सास्थि,** न० (स्थि) कासे.
**सास्ना,** स्त्री० (स्ना) वनौषधि जीस मुगशी, मुगुसवेल असें म्हणतात ती. २ गोजातीच्या मानेस लोंबणारें चामडें ज्यास गांकळी, कांबळ असें म्ह० ती.
**साहस,** न० (सं) दंड, मारणें इत्यादि साहस कर्म. २ जबरदस्तीनें केलेलें कार्य.
**साहस्र,** वि० (स्रः स्रा- स्रं) सहस्र फौजेचा मालक. २ न० (स्रं) सहस्राचा समूह.
**साक्षात्** , अ० प्रत्यक्ष. २ तुल्य ह्या अर्थी. उ० साक्षाद्दृष्टोमयाहरिः २ साक्षाल्लक्ष्मीरियंवधूः
**सिकता,** स्त्री० ब० (ताः) वालुका, वाळू, रेती, २ वालुकामय देश. ३ साखर.
**सिकतामय,** वि० (यः या- यं) वालुकामय देश.
**सिकतावत्** , वि० (वान् -वती तू ) वालुकामय (देश.)
**सिक्थ,** न० (क्थं) मधूच्छिष्ट, मेण. २ भाताचें शीत.
**सिक्थक,** न० (कं) मधूच्छिष्ट, मेण.
**सिंघाण,** न० (णं) नाकांतील मळ. २ लोहमळ, लोखंडाचा मळ, कीट्ट. ३ रोगविशेष. ४ कांचेचें भांडें.
**सिचय,** पु० (यः) वस्त्रविशेष.
**सित,** वि० (तः ता- तं) शुक्लवर्ण, पांढरा. २ बद्ध, बांधलेला. ३ समाप्त.
**सितछत्रा,** स्त्री० (त्रा) शाकविशेष ज्यास शेपेची भाजी असें म्ह० ती.
**सितमाष,** पु० (षः) उडदाचा एक भेद.
**सितसिव,** न० (वं) शेंदेलोण.
**सिता,** स्त्री० (ता) साखर. २ पांढरा.
**सितापांग,** पु० (गः) मयूर, मोर.
**सितांभोज,** न० (जं) पांढरें कमळ.
**सिताभ्र,** पु० (भ्रः) कापूर.
**सितालिका,** स्त्री० (का) जळूसारखा एक जलचरविशेष.
**सितोत्पल,** पु० (लः) शिलाधातु. २ न० (लं) पांढरें कमळ.
**सिंदुक,** पु० (कः) वृक्षविशेष ज्यास निगडी, निर्गुंडी, सिंधुआरी असें म्हणतात तो.
**सिंदुवार,** पु० (रः) निर्गुंडी. निगडी, सिंधुआरी असें म्ह० तो वृक्ष.
**सिंदूर,** न० (रं) शेंदूर. २ पु० (रः) वृक्षविशेष.
**सिंदूरातिलक,** पु० (कः) हत्ती. २ शेंदुराचा टिळा.
**सिंदूरातिलका,** स्त्री० (का) स्त्री, कामिनी,
**सिंदूरी,** स्त्री० (री) वनौषधि जीस तेंडू. श्वेतनिशोत्तर असें म्हणतात ती. २ वृक्षविशेष ज्यास धायटी, धायफूल असें म्हणतात तो.

अर्थी. उ० हुंजलंमृगतृष्णा हुं. २ हुंदे- वदतोयं. ३ स्याञ्चेत्किहुंप्रपद्ये.

**हुडु**, पु० (डुः) मेंढा.

**हुडुक**, पु० (कः) वाद्य विशेष. २ पक्षि विशेष ज्यास जलकाक, अंधकाक असें म्हणतात तो.

**हुतभुक्**, पु० (क्) अग्नि.

**हुतभुक्प्रिया**, स्त्री० (या) अग्नीची स्त्री.

**हुम्**, अ० प्रश्न. २ अनुज्ञा. ३ स्मृति. ४ अपाकृति ह्या अर्थी.

**हुलहुली**, स्त्री० (ली) मुख वाद्य.

**हूं**, अ० लज्या. २ निवारण ह्या अर्थी उ० हूंनगामिष्याम्यंतः २ हूं कुरुष्व.

**हूति**, स्त्री० (तिः) आमंत्रण, बोलावणें.

**हूम्**, अ० प्रश्न. २ वितर्क. ह्या अर्थी.

**हूहू**, पु० (हूः) देवांचा गायकविशेष.

**हृणिया**, स्त्री० (या) निंदा. २ (क- रुणा रस असेंही कोणाचें मत आहे.)

**हृणीया**, स्त्री० (या) निंदा. २ (करुणारस असेंही कोणी म्हणतात.)

**हृत्**, न० (त्- द्) हृदय, अंतःकरण. २ हृदयाख्य जो शरीराचा खोल भाग तो.

**हृदय**, न० (यं) हृदय, अंतःकरण. २ हृ- दयाख्य जो शरीराचा खोल भाग तो. ३ हृदयांतील कमलाकार मांस भाग ज्यास काळीज असें म्हणतात तें.

**हृदयंगम**, वि० (मः मा- मं) पूर्वापर संबंध युक्त जें (भाषण) तें.

**हृदयालु**, वि० (लुः लुः लु) प्रशस्त चित्ताचा.

**हृदयिक**, वि० (कः का- कं) प्रशस्त चित्ताचा.

**हृदयिन्**, वि० (यी- यिनी- यि) हृदयिक, प्रशस्त चित्ताचा.

**हृदयेश**, पु० (शः) नवरा.

**हृद्य**, वि० (द्यः द्या- द्यं) स्पष्ट जें (भाषण) तें. २ अभीष्ट. ३ अंतःकरणापासून झा- लेला. ४ पु० (द्यः) वेदमंत्र.

**हृद्या**, स्त्री० (द्या) औषधि विशेष.

**हृल्लेख**, पु० (खः) तर्क.

**हृषित**, वि० (तः ता- तं) विस्मित. २ संतु- ष्ट. ३ न० (तं) संतोषें करून आंगावर रोमांच उभे राहणें.

**हृषीक**, न० (कं) इंद्रिय.

**हृषीकेश**, पु० (शः) विष्णु.

**हृष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) हर्षयुक्त, ज्याला हर्ष झाला आहे तो. २ रोमांचित. ३ पु० (ष्टः) हंसलेला मनुष्य. ४ वि० ज्याला विस्मय झाला आहे तो. ५ मनो- भंग झालेला.

**हृष्टमानस**, वि० (सः सा- सं) ज्याचें अंत- करण हर्षयुक्त झालें आहे तो.

**हृष्टरोमन्**, पु० (मा) रोमांचयुक्त.

**हे**, अ० संबोधन. २ आव्हान, बोलावणें. ३ असूया. ह्या अर्थी.

**हेठ**, पु० (ठः) बाधा.

**हेति**, स्त्री० (तिः) अग्नीची ज्वाला. २ शस्त्र. ३ सूर्याची प्रभा.

**हेतु**, पु० (तुः) कारण.

**हेमकूट**, पु० (टः) पर्वतविशेष.

**हेमंत**, पु० (तः हेमंतऋतु.

**हेमदुग्धक**, पु० (कः) उदुंबर, उंबराचें झाड.

**हेमन्**, न० (म) सुवर्ण, सोनें. २ पु० (मा) बुधनामा ग्रह.

**हेमपुष्प**, न० (ष्पं) जास्वंदीचें फूल. २ अशोकाचें झाड.

**हेमपुष्पक**, पु० (कः) सोनचाफा.

**हेमपुष्पिका**, स्त्री० (का) पिंवळ्या फुलाची जुई.

**हेमरागिणी**, स्त्री० (णी) हरिद्रा, हळद.

**हेमल**, पु० (लः) सोनार. २ शिलाविशेष. ३ सरडा.

**हेमशंख**, पु० (खः) विष्णु.

**हेमांग**, पु० (गः) विष्णु. २ गरूड. ३ ब्रम्हदेव.

**हेमाद्रि**, पु० (द्रिः) मेरुनामा पर्वत, सुवर्णाचल.

**हेरंब**, पु० (बः) गणपती. २ शौर्यें करून गर्विष्ठ. ३ रेडा. ४ वज्रटीक देवविशेष.

**हेरुक**, पु० (कः) वज्रटीक देव. २ बुद्धभेद. ३ महाकालाचा गण.

**हेला**, स्त्री० (ला) स्त्रियांचा हाव भाव विशेष. (मैथुनेच्छेनें अवगणना करून जें हस्तादिकांनीं खुणावणें तें.) २ अवज्ञा.

**हेलावुक**, पु० (कः) घोडे विकणारा.

**हेलि**, पु० (लिः) सूर्य.

**हेषा**, स्त्री० (षा) घोड्याचा शब्द.

**हेषिन्**, पु० (षी) घोडा.

**है**, अ० संबोधन. २ बोलावणें ह्या अर्थी.

**हैमवत**, न० (तं) भरतखंड.

**हैमवती**, स्त्री० (ती) पार्वती. २ हिरड्याचें झाड. ३ पांढरें वेखंड. ४ वनौषधि जीस स्वर्णक्षीरी, पिसोळ्या असें म्हणतात ती. ५ गंगानदी.

**हैयंगवीन**, न० (नं) पूर्व दिवशीं काढलेल्या दुधाचें जें दुसरे दिवशीं तूप तें.

**हैहय**, पु० (यः) कार्तवीर्य.

**हो**, अ० संबोधन. २ आव्हान, बोलावणें ह्या अर्थी.

**होड**, पु० (डः) होडी.

**होतृ**, पु० (ता) ऋत्विज विशेष.

**होत्र**, न० (त्रं) हविर्द्रव्य.

**होम**, पु० (मः) देवयज्ञ, वैश्वदेवांग होमादि.

**होमकुंड**, न० (डं) होमकुंड.

**होमधूम**, पु० (मः) यज्ञांतील धूर.

**होमभस्मन्**, न० (स्म) यज्ञसंबंधी भस्म.

**होमि**, पु० (मिः) अग्नि. २ घृत, तूप.

**होरा**, स्त्री० (रा) मेषादि राशींचें अर्ध, लग्नार्ध. २ शास्त्रविशेष. ३ रेखाविशेष. ४ मुंगी.

**हौ**, अ० संबोधन. २ आव्हान, बोलावणें ह्या अर्थी.

---

## क्ष.

**क्ष**, पु० (क्षः) प्रलय. २ राक्षस. ३ नरसिंह. ४ विद्युल्लता, वीज. ५ क्षेत्र. ६ नाश. ७ क्षेत्रफळ.

**क्षण**, पु० (णः) तीस कलारूप जो काळ तो. २ पुत्र जन्मादिकांचा जो उत्साह तो. ३ पु० न० (णः णं) निर्व्यापार स्थिति, उगीच असणें.

**क्षणदा**, स्त्री० (दा) रात्र.

**क्षणन**, न० (नं) वध, ठार मारणें.

**क्षणप्रभा**, स्त्री० (भा) विद्युल्लता, वीज.

**क्षणक्षणं**, अ० क्षणमात्र ह्या अर्थी.

**क्षतज**, न० (जं) रक्त.

**क्षतव्रत**, वि० (तः ता तं) ज्याचें ब्रम्हचर्यादि व्रत नष्ट झालें तो.

**क्षंतृ**, वि० (ता त्री तृ) सहनशील, सोसिक.

**क्षत्तृ**, पु० (त्ता) सारथी. २ क्षत्रिय जाती-

च्या स्त्रीचे ठायीं शूद्रापासून झालेला पुत्र. (याची वृत्ति शिकार करणें.) ३ द्वारपाळ.

**क्षत्र**, पु० (त्रः) क्षत्रिय.

**क्षत्रिय**, पु० (यः) क्षत्रिय जातीचा पुरुष.

**क्षत्रिया**, स्त्री० (या- याणी) क्षत्रिय जातीची स्त्री.

**क्षत्रियी**, स्त्री० (यी) क्षत्रियाची बायको.

**क्षपण**, पु० (णः) बौद्ध. २ नास्तिक.

**क्षपा**, स्त्री० (पा) रात्र.

**क्षपाकर**, पु० (रः) चंद्र.

**क्षपाट**, पु० (टः) यमदूत.

**क्षम**, वि० (मः मा- मं) योग्य. २ शक्त, समर्थ. ३ हित, मित्र.

**क्षमा**, स्त्री० (मा) पृथ्वी. २ क्षांति, सहनता.

**क्षमितृ**, वि० (ता- त्री- तृ) सहनशील, सोसिक.

**क्षमिन्**, वि० (मी- मिनी- मि) सहनशील, सोसिक.

**क्षय**, पु० (यः) अपचय, नाश. २ प्रलय. ३ क्षयरोग. ४ गृह, घर.

**क्षव**, पु० (वः) शिंक. २ कृष्ण सर्षप, काळी मोहरी, राई.

**क्षवथु**, पु० (थुः) कासरोग, खोकला.

**क्षांत**, वि० (तः ता- तं) शांत केलेला.

**क्षांति**, स्त्री० (तिः) सहन करणें, क्षमा.

**क्षाम**, पु० (मः) बलवान पुरुष.

**क्षार**, पु० (रः) भस्म. २ कांच, बांगडखार. ३ जवखार. ४ क्षाररस, खारट. ५ मीठ. ६ धूर्त.

**क्षारक**, पु० (कः) फुलाची कळी. २ (कळ्यांचा समूह असेंही कोणी म्हणतात.)

**क्षारमृत्तिका**, स्त्री० (का) खारी माती.

**क्षाराछ**, न० (छं) शेंदेलोण.

**क्षारिका**, स्त्री० (का) क्षुधा.

**क्षारित**, वि० (तः ता- तं) लोकापवादानें दूषित.

**क्षि**, स्त्री (क्षिः) निवास. २ गति. ३ क्षय, नाश.

**क्षिति**, स्त्री० (तिः) पृथ्वी. २ निवास, वसतिस्थान. ३ क्षय, नाश. ४ कालविशेष.

**क्षितिकण**, पु० (णः) धुरळा.

**क्षितिवर्धन**, पु० (नः) प्रेत.

**क्षिपणु**, पु० (णुः) वायु, वारा.

**क्षिपा**, स्त्री० (पा) क्षेपण, प्रेरणा, सोडणें, फेंकणें.

**क्षिप्णु**, वि० (ष्णुः ष्णुः ष्णु) निराकरण करणारा.

**क्षिप्त**, वि० (प्तः प्ता- प्तं) प्रेरित, सोडलेला, फेंकलेला.

**क्षिप्नु**, वि० (प्नुः प्नुः प्नु) प्रेरित, सोडलेला, फेंकलेला.

**क्षिप्रं**, अ० शीघ्र, लौकर ह्या अर्थी.

**क्षिया**, स्त्री० (या) अपचय, नाश.

**क्षीब**, वि० (बः बा- बं) मत्त, माजलेला.

**क्षीर**, न० (रं) दूध, दुग्ध. २ उदक, पाणी.

**क्षीरकंटक**, पु० (कः) बालक. २ जलकंटक.

**क्षीरकीट**, पु० (टः) कीटकवि०

**क्षीरदार**, पु० (रः) मध. २ गूळ.

**क्षीरविदारी**, स्त्री० (री) काळा भुई कोंहळा.

**क्षीरशुक्ला**, स्त्री० (क्ला) पांढरा भुई कोंहळा.

**क्षीराब्धिज**, न० (जं) समुद्रापासून झाले-

लें मीठ. २ मोतीं. ३ पु० (जः) तुषार.

**क्षीराब्धिजा**, स्त्री० (जा) लक्ष्मी.

**क्षीराब्धितनया**, स्त्री० (या) लक्ष्मी.

**क्षीरावी**, स्त्री० (वी) वनौषधि जीस दुधी असें म्ह० ती.

**क्षीरिका**, स्त्री० (का) खिरणीचें झाड.

**क्षीरोद**, पु० (दः) क्षीरसमुद्र.

**क्षीरोदतनया**, स्त्री० (या) लक्ष्मी.

**क्षुत्**, स्त्री० (त्) शिंक.

**क्षुत**, न० (तं) शिंक.

**क्षुताभिजनन**, पु० (नः) कृष्णसर्षप, काळी मोहरी, राई.

**क्षुद्र**, वि० (द्रः द्रा-द्रं) कृपण. २ क्रूर. ३ अधम, निकृष्ट. ४ अल्प. ५ दरिद्र.

**क्षुद्रघंटिका**, स्त्री० (का) घागरी, घुंगुर.

**क्षुद्रपत्रा**, स्त्री० (त्रा) वनौ० जीस चुका असें म्ह० ती.

**क्षुद्ररसा**, स्त्री० (सा) करंजवृक्ष.

**क्षुद्रशंख**, पु० (खः) लहान शंख.

**क्षुद्रा**, स्त्री० (द्रा) वनौषधि जीस रिंगणी असें म्ह० ती. २ कांहीं अवयवानें जी हीन ती. ३ नटी, नाचणारी स्त्री. ४ मधमाशी. ५ वेश्या, कलावंतीण. ६ वनौषधि जीस चांगेरी असें म्ह० ती. ७ वनौ० जीस चुका असें म्ह० ती. ८ हिंसा. ९ माशी.

**क्षुद्रांबुपनस**, पु० (सः) ओंटीचें झाड.

**क्षुद्राम्ला**, स्त्री० (म्ला) वनौषधि जीस चुका असें म्ह० ती.

**क्षुध्**, स्त्री० (धू) क्षुधा, भूक.

**क्षुधा**, स्त्री० (धा) क्षुधा, भूक.

**क्षुधाभिजनन**, पु० (नः) कृष्णसर्षप, काळी मोहरी; राई.

**क्षुधित**, वि० (तः ता-तं) बुभुक्षित, भुकेलेला.

**क्षुप**, पु० (पः) ज्याच्या फांद्या व मूळ लहान आहे असा जो वृक्ष तो.

**क्षुमा**, स्त्री० (मा) धान्यविशेष ज्यास अतसी, जवस असें म्ह० तें.

**क्षुर**, पु० (रः) वपन शस्त्र, वस्तारा. २ वनौ० ज्यास कोळसुंदा, कोलिस्ता असें म्ह० तो. ३ वनौ ज्यास सरांटा असें म्ह० तो.

**क्षुरक**, पु० (कः) वृक्षविशेष ज्यास तिळवा, तिलकपुष्प असें म्ह० तो.

**क्षुरप्र**, पु० (प्रः) बाणवि०.

**क्षुरिन्**, पु० (री) नापित, न्हावी.

**क्षुल्लक**, वि० (कः का-कं) नीच, हलका. २ अल्प.

**क्षेत्र**, न० (त्रं) शेत. २ पत्नी, बायको. ३ शरीर. ४ सिद्धांचें स्थान.

**क्षेत्रज्ञ**, पु० (ज्ञः) शरीराधि दैवत आत्मा, जीवात्मा. २ वि० (ज्ञः ज्ञा- ज्ञं) प्रवीण.

**क्षेत्राजीव**, वि० (वः वा- वं) कृषि कर्मानें उपजीविका करणारा.

**क्षेप**, पु० (पः) फुलांचा घोंस.

**क्षेपण**, पु० (णः) प्रेरणा, सोडणें, फेंकणें.

**क्षेपणी**, स्त्री० (णी) नौकावाहक दंड ज्यास वल्हें असें म्ह० तें.

**क्षेपिष्ठ**, वि० (ष्ठः ष्ठा- ष्ठं) फार जें लौकर तें.

**क्षेम**, पु० न० (मः मं) कल्याण. २ पु० (मः) वनौ० ज्यास चोर ओंवा, किरमाणी ओंवा असें म्ह० तो. ३ मिळाले-

ण्या वस्तूंचें रक्षण. ४ वि० (मः मा-मं) लुब्ध.

**क्षेमंकर**, पु० (रः) कल्याण करणारा.

**क्षेमा**, स्त्री० (मा) गौरी, पार्वती.

**क्षैत्र**, न० (त्रं) शेतांचा समूह,

**क्षोणी**, स्त्री० (णी) पृथ्वी.

**क्षोद**, पु० (दः) चूर्ण, पीठ, धूळ, चूर.

**क्षोदिष्ठ**, वि० (ष्ठः ष्ठा-ष्ठं) अति क्षुद्र, फार लहान.

**क्षोम**, पु० न० (मः मं) उपरीगृह, माडी.

**क्षौद्र**, न० (द्रं) मधु, मद, मध.

**क्षौम**, पु० न० (मः मं) उपरीगृह, माडी. २ अतसीपासून झालेलें वस्त्र ज्यास शाण, पटाव, पट्टवस्त्र असें म्ह० तें. ३ न० (मं) वल्कलाचें वस्त्र. ४ सशाच्या लोकरीचें वस्त्र. ५ साधारण वस्त्र.

**क्षौर**, न० (रं) मुंडन, हजामत.

**क्ष्णुत**, वि० (तः ता-तं) तीक्ष्णीकृत, धार काढलेलें (शस्त्रादिक.)

**क्ष्मा**, स्त्री० (क्ष्मा) पृथ्वी.

**क्ष्माभुक्**, पु० (क्) राजा.

**क्ष्माभृत्**, पु० (त्) पर्वत. २ राजा.

**क्ष्वेड**, पु० (डः) विष. २ ध्वनी. ३ कानांतील रोग.

**क्ष्वेडा**, स्त्री० (डा) सिंहनाद. २ सिंव्हनाद तुल्य जो वीरांचा नाद तो. (हा नाद युद्धांत होतो.) ३ पिंजऱ्यासाठीं वगैरे केलेली वेणुशलाका.

**क्ष्वेडित**, पु० न० (तः तं) सिंहनाद, सिंहाचा शब्द.

---

## ज्ञ.

**ज्ञ**, पु० (ज्ञः) पंडित, विद्वान. २ चंद्राचा पुत्र जो बुध नामा तो. ३ ब्रम्ह. ४ ज्ञानी.

**ज्ञपित**, वि० (तः ता-तं) जाणविलेला.

**ज्ञप्त**, वि० (प्तः प्ता-प्तं) जाणविलेला.

**ज्ञप्ति**, स्त्री० (प्तिः) बुद्धि.

**ज्ञातसिद्धांत**, पु० (तः) शास्त्रवेत्ता.

**ज्ञाति**, स्त्री० (तिः) सगोत्र, भाऊबंद.

**ज्ञातृ**, पु० (ता) वेदनशील, जाणता.

**ज्ञातेय**, पु० (यः) ज्ञातिभाव, ज्ञातित्व.

**ज्ञान**, न० (नं) मोक्षास कारणीभूत जें शास्त्रादि विषयकज्ञान तें.

**ज्ञानदर्पण**, पु० (णः) पूर्वजिन. २ ज्ञानदर्पण.

**ज्ञानिन्**, पु० (नी) ज्योतिषी, जोशी. २ ज्ञानवान्, ज्ञाता.

**ज्ञी**, स्त्री० (ज्ञी) राजाची स्त्री, राणी. २ सूर्याची बायको.



# पुरवणी.

## संस्कृत व प्राकृत कोश.



**अंक**, पु० (कः) चंद्रकलंक.

**अकली**, पु० (ली) कलह न करणें.

**अकथयत्**, सांगितलें.

**अकरवं**, मीं केलें.

**अकर्णधारा**, स्त्री० (रा) नावाड्याशिवाय.

**अकस्मात्**, अ० एकाएकीं ह्या अर्थी.

**अकारण**, न० (णं) निष्कारण.

**अकार्य**, न० (र्यं) न करावयाचें तें.

**अकार्यतः**, अ० न करावयाचें तें केल्यानें ह्या अर्थी.

**अकाल**, पु० (लः) अकाळ.

**अकालकुसुम**, न० (मं) अकाळीं फूल.

**अकालसह**, वि० (हः हा हं) न टिकणारा.

**अकिंचन**, वि० ( नः ना- नं ) निर्धन, दरिद्री.

**अंकित**, स्वाधीन.

**अकीर्ति**, स्त्री० (र्तिः) अपयश.

**अकीर्तिकर**, पु० (रः) बदलौकिकाचें.

**अकुंठ**, वि० (ठः ठा- ठं) बळकट, दृढ.

**अकुत्स**, वि० (त्सः त्सा- त्सं) अनिंद्य.

**अकुत्सित**, वि० (तः ता- तं) निंदा रहित.

**अंकुरवती** स्त्री० (ती) मोडानें युक्त.

**अकुल**, वि० (लः ला- लं) नीच.

**अकुलीन**, वि० ( नः ना- नं ) नीच वंशांतला.

**अकुशल**, वि० (लः ला- लं) अकल्याण सूचक.

**अकृत्रिम**, वि० (मः मा- मं) स्वाभाविक.

**अकृपण**, वि० (णः णा- णं) उदार.

**अक्रिय**, वि० (यः या- यं) क्रियाशून्य.

**अक्रियामाण**, न० (णं) जें कांहीं न करावयाचें तें.

**अक्रुर**, पु० (रः) अक्रुर नामा यादव. २ वि० (रः रा- रं) क्रूर नव्हे तो.

**अगमत्**, गेला.

**अगर्व**, वि० (र्वः र्वा- र्वं) नम्र.

**अंगवाक्पाणिमत्**, वि० (मान- मती- मत्) आंग वाचा, आणि हात ज्याला आहेत तो.

**अंगसंग**, पु० (गः) अंगाला स्पर्श करणें.

**अंगस्पर्श**, पु० (र्शः) अंगाचा स्पर्श होणें.

**अंगीकरोति**, पत्करतो.

**अगुण**, पु० (णः) अवगुण.

**अगुणशील**, वि० (लः ला- लं) दुर्गुणाचा.

**अगुप्त**, वि० (प्तः प्ता- प्तं) उघडा.

**अंगुलिभंग**, पु० (गः) बोटें मोडणें.

**अंग**, स्वतां.

**अगोचर**, वि० (रः रा- रं) जें जाणलेलें नाहीं तें.

**अग्निसाक्षिकमर्याद**, पु० (दः) अग्नीला साक्ष ठेवून प्रतिज्ञा करणारा.

**अग्रतः**, अ० पुढें, समोर ह्या अर्थी.

**अग्रेसर**, वि० (रः रा- रं) अग्रसर हा शब्द पहा.

**अघटित**, न० (तं) न घडणारें.
**अघनिधि**, पु० (धिः) पातकाच्या राशी.
**अघवाही**, पु० (ही) पापी.
**अघसंहरण**, वि० (णः णा- णं) पातकाचा नाश कर्ता.
**अघात**, न० (तं) न मारणें.
**अघातयत्**, मारविलें.
**अघाली**, स्त्री० (ली) पातकाचा समुदाय.
**अंचल**, पु० (लः) कांठ, पदर.
**अचाट**, पु० (टः) मोठें.
**अचापल्य**, न० (ल्यं) सुस्ती.
**अचिंतयम्**, विचार केला.
**अचिंता**, स्त्री० (ता) दुर्लक्ष.
**अचिंतित**, न० (तं) विचार न केलेलें.
**अचिरेण**, अ० लौकर ह्या अर्थी.
**अचेतन**, वि० (नः ना- नं) जड पदार्थ.
**अंजनवत्**, अ० काजळाप्रमाणें.
**अजपाजप**, पु० (पः) एक प्रकारचा जप.
**अजब**, चमत्कारिक.
**अजरामर**, वि० (रः रा- रं) शाश्वत.
**अंजलिलकर्मन्**, पु० (र्मा) हात जोडणारा, न० (र्म) नम्रपणा.
**अजात**, वि० (तः ता- तं) उत्पन्न न झालेलें.
**अजाक्षीर**, न० (रं) शेळीचें दूध.
**अजि**, अहो.
**अजित**, वि० (तः ता तं) न जिंकलेला.
**अंजित**, वि० (तः ता- तं) ज्यांत अंजन घातलें तो.
**अजितनाम**, न० (नं) ईश्वराचें नाम.
**अजिताचार**, वि० (रः रा- रं) देवासारखा ज्याचा आचार आहे तो, जैनधर्म.
**अजितेंद्रिय**, पु० (यः) इंद्रियाधीन.
**अंजुली**, ओंजळ.
**अटकाव**, अडथळा.
**अटन**, न० (नं) फिरणें.
**अंडकटाह**, पु० (हः) ब्रम्हांड.
**अडका**, पैसा.
**अडणी**, पितळ इत्यादि धातूची केलेली तिवई.
**अतः**, अ० ह्यावरून इत्यादि.
**अतएव**, अ० म्हणूनच ह्या अर्थी.
**अतथ्य**, न० (थ्यं) खोटें.
**अतंद्रित**, पु० (तः) चपल, हुशार, सावध.
**अंतर**, अ० आंत, आंतील ह्या अर्थी.
**अंतरंग**, न० (गं) आंतील आंग.
**अंतरात्मन्**, पु० (त्मा) प्राण, जीव.
**अंतरीं**, अ० आंत ह्या अर्थी.
**अतर्क्य**, पु० (र्क्यः) अवर्णनीय.
**अंतर्दुष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) मनाचा दुष्ट.
**अंतर्बाह्य**, अ० आंत बाहेर ह्या अर्थी.
**अंतर्याम**, पु० (मः) अंतःकरण.
**अताडयत्**, मारिलें.
**अतिकाल**, पु० (लः) बहुकाळ.
**अतिक्रांत**, पु० (तः) वेळेस न होणें.
**अतिजीर्णता**, स्त्री० (ता) पराकाष्ठेचें म्हातारपण.
**अतिपात**, पु० (तः) भंग, नाश.
**अतिभार**, पु० (रः) मोठें ओझें.
**अंतिम**, पु० (मः) शेवटचा.
**अतिमार**, वि० (रः रा- रं) शेवटचा.
**अतिमात्र**, अ० अत्यंत, गाढ.
**अतिरिच्यते**, अधिक होतें.
**अतिवर्तते**, आहे.
**अतिव्यय**, पु० (यः) उधळेपणा.
**अतिसाक्तिमत्**, अत्यासक्त.
**अतिसंचय**, पु० (यः) मोठा सांठा. फार संचय.

**अतीत**, पु० (तः) याचक, गेलेला.
**अतीत्य**, अ० मागें टाकून ह्या अर्थी.
**अंतुरी**, स्त्री० (री) स्त्री.
**अतुर्बली**, अति बलिष्ट.
**अतुल**, वि० (लः ला- लं) तुलना करावया-सारखें नसणें.
**अतुल्य**, बरोबरीचा नसणें
**अतुष्टि**, स्त्री० (ष्टि) असंतोष.
**अत्ति**, खातो.
**अंत्यज**, पु० (जः) अतिशूद्र.
**अत्यंत**, अ० फार ह्या अर्थी.
**अत्यल्प**, पु० (ल्पः) फार थोडें.
**अत्याग**, पु० (गः) मोठा अपराध.
**अत्युत्कट**, न० (टं) फारच मोठें.
**अत्र**, अ० येथें ह्या अर्थी.
**अंत्रपाट**, पु० (टः) अंतःपट.
**अत्रांतरें**, अ० इतक्यांत ह्या अर्थी.
**अत्रैव**, अ० येथेंच ह्या अर्थी.
**अथवा**, अ० किंवा ह्या अर्थी.
**अदत्त**, वि० (त्तः त्ता- त्तं) न दिलेला.
**अदांभित्व**, न० (त्वं) दांभिकपण नव्हे तें.
**अदर्शयत्**, दाखविलें.
**अदीर्घसूत्र**, न० (त्रं) जलदी.
**अदीर्घसूत्रता**, स्त्री० (ता) जलदी.
**अदुर्ग**, पु० (र्गः) किल्ल्याशिवाय.
**अदुर्गविषय**, पु० (यः) ज्या देशांत किल्ला नाहीं तो देश.
**अदृश्य**, वि० (श्यः श्या- श्यं) लपलेला.
**अदृष्ट**, पु० (ष्टः) न पाहिलेला.
**अदृष्टकर्मन्**, पु० (र्मा) ज्याचें कृत्य उघाडीस येत नाहीं तो.
**अदृष्टपरसामर्थ्य**, पु० (र्थ्यः) शत्रु शक्ती न जाणणारा.
**अदृष्टपुरुष**, पु० (षः) अदृष्ट पुरुष.
**अदृष्टविरहव्यथ**, वि० (थः था- थं) ज्यानें कधीं विरहव्यथा अनुभविली नाहीं तो.
**अदेशस्थ**, वि० (स्थः स्था- स्थं) दुसऱ्या देशाचा.
**अद्ययावत्**, अ० आजपर्यंत ह्या अर्थी.
**अद्यारभ्य**, अ० आजपासून ह्या अर्थी.
**अद्रव्य**, वि० (व्यः व्या- व्यं) धनरहित.
**अद्वय**, न० (यं) एकटा.
**अद्वयभजन**, न० (नं) एकाचेंच सेवन,
**अद्वैत**, न० (तं) ऐक्यभाव.
**अधःकृत**, वि० (तः ता- तं) खालीं केलेलें.
**अधन**, वि० (नः ना- नं) गरीब.
**अधरपुट**, पु० (टः) दोनी ओंठ.
**अधरप्रवाल**, न० (लं) ओंठरूपी पोवळें.
**अधमर्तः**, अ० अधर्मानें ह्या अर्थी.
**अंधवत्**, अ० अंधळ्यासारिखा ह्या अर्थी.
**अधस्**, अ० खालीं ह्या अर्थी.
**अधःस्थल**, न० (लं) खालचें स्थळ.
**अधस्त्री**, स्त्री० (स्त्री) दासी.
**अधार**, आश्रय.
**अधिकाराद्य**, पु० (द्यः) हुद्देदार.
**अधिकारिन्**, पु० (री) हुद्देदार.
**अधिगच्छति**, संपादितो. २ जातो.
**अधितिष्ठति**, उभा राहतो.
**अधिपति**, पु० (तिः) स्वामी.
**अधिशयान**, पु० (नः) निजत असणारा.
**अधिष्ठी**, आक्रमी.
**अधिष्ठित**, वि० (तः ता- तं) उभा राहिलेला.
**अधिष्ठिली**, आक्रमिली.
**अधिक्षिपसि**, निंदितोस.
**अधीत**, वि० (तः ता- तं) पढीक.

**अधीत्य,** अ० शिकून ह्या अर्थी.
**अधो,** अ० खालीं. २ खोल ह्या अर्थी.
**अधोगती,** स्त्री० (ती) नरकवास.
**अधोवदन,** वि० (नः ना- नं) खालीं तोंड ज्यानें केलें आहे तो.
**अध्ययन,** न० (नं) शिकणें.
**अध्यवसाय,** पु० (यः) श्रम.
**अध्यवसायिन्,** पु० (यी) श्रम करणारा.
**अध्यात्म,** पु० (त्मः) आत्मसंबंधी.
**अध्यापन,** न० (नं) शिकविणें.
**अध्यास,** पु० (सः) खरेपणाचा निश्चय.
**अध्रुव,** न० (वं) अनिश्चित.
**अन्,** अ० निषेध, नाहीं ह्या अर्थी.
**अनंतरं,** अ० नंतर, पश्चात ह्या अर्थी.
**अनतिक्रमणीय,** वि० (यः या- यं) अतिक्रम करावयास योग्य नाहीं तो.
**अनधिगतशास्त्र,** पु० (स्त्रः) न० (स्त्रं) अविद्वान.
**अनधिष्ठान,** वि० (नः ना- नं) आधारावांचून.
**अननुभूत,** पु० (तः) अनुभवाचा नव्हे.
**अननुष्ठान,** न० (नं) न करणें.
**अनन्य,** वि० (न्यः न्या- न्यं) अगतिक, ज्यास दुसरी गती नाहीं तो.
**अनन्यगतिक,** वि० (कः का- कं) ईश्वरावर भरंवसा ठेवणारा.
**अनन्यप्रतिक्रिय,** पु० (यः) असाध्य.
**अनपाय,** पु० (यः) अपाय न करणारा.
**अनपेक्षा,** स्त्री० (क्षा) उपेक्षा.
**अनभिमत,** न० (तं) अनिष्ट.
**अनभिज्ञ,** वि० (ज्ञः ज्ञा- ज्ञं) मूर्ख.
**अनभ्यास,** पु० (सः) अभ्यास न करणें.
**अनयन,** वि० (नः ना- नं) आंधळा.
**अनया,** हिणें.
**अनर्घ्य,** वि० (र्घ्यः र्घ्या- र्घ्यं) अमौल्य.
**अनर्घ्यत्व,** न० (त्वं) अयोग्य असणें, मोल नसणें.
**अनर्थ,** पु० (र्थः) नाश, दुर्दैव, अनर्थ.
**अनर्थकर,** पु० (रः) अनर्थकारक.
**अनव,** वि० (वः वा- वं) जीर्ण. २ वृद्ध.
**अनवद्य,** वि० (द्यः द्या- द्यं) अनिंद्य.
**अनवधान,** न० (नं) अलक्ष्य.
**अनवनपथ,** पु० (थः) न पाळण करण्याचा मार्ग.
**अनवसर,** पु० (रः) अकाल.
**अनवस्थितचित्तत्व,** न० (त्वं) गैदीपणा.
**अनशनी,** पु० (नीः) जो कांहीं खात नाहीं तो.
**अनश्वर,** पु० (रः) अमर.
**अनसत्व,** न० (त्वं) चापल्य.
**अनाक्रोश,** न० (शं) बोलल्यावांचून.
**अनागत,** वि० (तः ता- तं) न आलेला.
**अनागतविधातृ,** पु० (ता) दैववादी. २ मत्स्यविशेष.
**अनाठायीं,** व्यर्थ.
**अनाथ,** पु० (थः) गरीब.
**अनादि,** वि० (दिः दि- दि) अर्वाचीन. २ प्राचीन.
**अनायत्त,** न० (त्तं) स्वतंत्र.
**अनारंभ,** पु० (भः) आरंभाभाव.
**अनारुह्य,** अ० न बसून ह्या अर्थी.
**अनार्य,** वि० (र्यः र्या- र्यं) हलका, दुष्ट.
**अनार्यता,** स्त्री० (ता) नीचपणा.
**अनालोच्य,** अ० न पहातां ह्या अर्थी.
**अनाश्रय,** वि० (यः या- यं) आधाररहित.
**अनासादित,** पु० (तः) न मिळालेला.
**अनासादितविग्रह,** पु० (हः) लढाईंत न गेलेला.

**अनाहार**, पु० (रः) कांहीं न खाणें.
**अनाहूत**, वि० (तः ता- तं) आगांतुक.
**अनित्य**, वि० (त्यः त्या- त्यं) अशाश्वत.
**अनित्यता**, स्त्री० (ता) खचीतपणा नाहीं.
**अनियतात्मन्**, पु० (त्मा) स्वछंदी.
**अनियम**, पु० (मः) कायदा नाहीं.
**अनिर्देश्य**, न० (श्यं) अमुक म्हणून सांगतां येत नाहीं तें.
**अनिवार**, पु० (रः) पुष्कळ. २ वारण करण्यास कठीण.
**अनिवृत्त**, वि० (त्तः त्ता- त्तं) दुःखी.
**अनिवेद्य**, अ० न कळून द्या अर्थी.
**अनिश्चित्य**, अ० खचीत न करून द्या अर्थी.
**अनिष्ट**, पु० (ष्टः) शत्रु. २ अनिच्छित.
**अनिष्ठुर**, वि० (रः रा- रं) कोमल.
**अनीति**, स्त्री० (ति) गैर चाल.
**अनीतिज्ञ**, वि० (ज्ञः ज्ञा- ज्ञं) मूर्ख.
**अनुकंप्य**, वि० (प्यः प्या- प्यं) दया करावयास योग्य.
**अनुकीर्तन**, न० (नं) जाहिर करणें.
**अनुक्त**, न० (क्तं) न बोललेलें.
**अनुगछति**, बरोबर जातो.
**अनुगत**, वि० (तः ता- तं) मिळाला गेला.
**अनुगतिक**, वि० (कः का- कं) दुसऱ्याप्रमाणें करणारा.
**अनुगृहीत**, वि० (तः ता-तं) आवडता, प्रीतीचा.
**अनुचित**, न० (तं) अयोग्य.
**अनुजगाम**, बरोबर गेला.
**अनुजनि**, पु० (निः) भ्राता, भाऊ.
**अनुजानीहि**, परवानगी दे.
**अनुजीवक**, वि० (कः का- कं) पाठीमागून जाणारा.
**अनुजीविन्**, पु० (वी) परतंत्र, पराधीन.
**अनुदित**, न० (तं) न उगवलेलें.
**अनुद्योग**, पु० (गः) आळस.
**अनुद्वेग**, न० (गं) पु० (गः) उद्वेगाभाव.
**अनुधावन्**, पु० (न्) पाठीमागें धावणारा.
**अनुनय**, पु० (यः) नम्रता.
**अनुपकारि**, पु० (रिः) उपयोगी न पडणारा.
**अनुपकुर्वाण**, पु० (णः) उपयोगी न पडणारा.
**अनुपपन्न**, न० (न्नं) असिद्ध.
**अनुपभुज्यमान**, वि० (नः ना- नं) न भोगलेला.
**अनुपम्य**, वि० (म्यः म्या- म्यं) ज्यास उपमा नाहीं तें.
**अनुपयुक्त**, वि० (क्तः क्ता- क्तं) निरुपयोगी.
**अनुपालयन्**, पु० (न्) पोसणारा.
**अनुप्रविश्य**, अ० आंत जाऊन द्या अर्थी.
**अनुप्राप्त**, वि० (प्तः प्ता- प्तं) आलेला.
**अनुबध्नाति**, बांधतात.
**अनुबिंब**, पु० (बः) प्रतिबिंब.
**अनुभव**, पु० (वः) उपभोग घेणें.
**अनुभविन्**, पु० (वी) अनुभव घेणारा.
**अनुभूत**, वि० (तःता- तं) भोगलेलें.
**अनुभूयते**, भोगलें जातें.
**अनुमत**, न० (तं) रुकार, अनुमत.
**अनुमरण**, न० (णं) सतीमरण, सहगमन.
**अनुमान** न० (नं) तर्क.
**अनुमेय**, वि० (यः या- यं) तर्क करण्याजोगें.
**अनुमोदन**, न० (नं) अनुमत.
**अनुयाति**, बरोबर जातो.

**अनुरक्त**, वि० (क्तः क्ता- क्तं) आसक्त.

**अनुरक्ति**, स्त्री० (क्ति) प्रीति.

**अनुराग**, पु० (गः) प्रीति.

**अनुरागवत्**, पु० (वान्) प्रीति करणारा.

**अनुरूप**, न० (पं) सारखें. २ योग्य.

**अनुरोध**, पु० (धः) पक्षपात.

**अनुरोधन**, न० (नं) मान्य करणें, रुकार.

**अनुलिप्त**, न० (प्तं) माखणें.

**अनुवर्तन**, न० (नं) मान्यता, मानणें.

**अनुवर्तिन्**, पु० (र्ती) मानणारा.

**अनुवाद**, पु० (दः) सांगणें.

**अनुविधायिन्**, पु० (यी) सांगितल्याप्रमाणें करणारा.

**अनुवृत्त**, न० (त्तं) पुढें आणलेलें.

**अनुवृत्ति** स्त्री० (त्तिः) पुढें जाणें—येणें.

**अनुष्ठातव्य**, न० (व्यं) करावयाचें तें.

**अनुष्ठान**, न० (नं) करणें. २ अनुष्ठान.

**अनुष्ठित**, न० (तं) केलेलें.

**अनुष्ठीयताम्**, करावें.

**अनुष्ठेय**, वि० (यः या- यं) करावयास योग्य.

**अनुसंधातव्य**, वि० (व्यः व्या- व्यं) चित्त देण्यास योग्य.

**अनुसंधान**, न० (नं) चित्त लावणें.

**अनुसंधयिताम्**, चित्त द्यावें.

**अनुसंधेहि**, चित्त दे.

**अनुसरण**, न० (णं) मागून जाणें.

**अनुसारतः**, अ० प्रमाणें, धोरणानें, ह्या अर्थी.

**अनुसारिन्**, वि० (री-रिणी-रि) धोरणानें चालणारा.

**अनुसूयासुत**, पु० (तः) दत्तात्रेय.

**अनुहुंकुरुते**, हूं करतो.

**अनेक**, पु० (कः) पुष्कळ.

**अनेकचित्तमंत्र**, पु० (त्रः) अनेक मसलती करणारा.

**अनेकधा**, अ० पुष्कळ तऱ्हेनें ह्या अर्थी.

**अनेकयुद्धविजयिन्**, पु० (यी) अनेक युद्धामध्यें ज्याचा जय झाला तो.

**अनेकरूप**, पु० (पः) पुष्कळ प्रकारचें.

**अनेकशः**, अ० पुष्कळ ह्या अर्थी.

**अनेकसंशयोच्छेदि**, पु० (दिः) पुष्कळ संशय दूर करणारा.

**अनेकोपवासक्लिष्ट**, पु० (ष्टः) अनेक उपासांच्या योगानें कृश झालेला.

**अन्नदान**, न० (नं) जेवण देणें.

**अन्यच्च**, अ० पुनः दुसरें ह्या अर्थी.

**अन्यत्**, न० (त्) दुसरें.

**अन्यतः**, अ० दुसऱ्याकडून, दुसरेकडे. ह्या अर्थी.

**अन्यतम**, पु० (मः) बहुतांतून एक.

**अन्यत्र**, अ० आणखी कोठें ह्या अर्थी.

**अन्यथा**, अ० नाहीं तर. २ वेगळ्या रीतीनें. ३ खोटें ह्या अर्थी.

**अन्यदा**, अ० दुसऱ्या वेळीं ह्या अर्थी

**अन्यमनस्**, पु० (नाः) चंचल मनाचा.

**अन्येनकेनचित्**, अ० दुसरा कोणी ह्या अर्थी.

**अन्योन्य**, पु० (न्यः) परस्पर.

**अन्योन्यं**, अ० परस्पर, एकमेकाबरोबर ह्या अर्थी.

**अन्योपकार**, पु० (रः) परोपकार.

**अन्वय**, पु० (यः) संबंध, अन्वय.

**अन्ववेक्षा**, स्त्री० (क्षा) मान, लक्ष.

**अन्विच्छेत्**, इच्छावें.

**अन्वित**, पु० (तः) युक्त.

**अन्विष्यति**, साधितो, पहातो.

**अन्विष्यन्**, पु० (न्) शोधणारा.

**अन्वेषिन्**, पु० (षी) शोधणारा.

**अन्वेष्टुम्**, अ० शोधण्यास ह्या अर्थी.

**अपकर्तृ**, पु० (र्ता) शत्रु.

**अपकर्ष**, पु० (र्षः) नीचपणा.

**अपकार**, पु० (रः) व्यथा, इजा, उपद्रव.

**अपकारी**, पु० (री) शत्रु, वैरी.

**अपकृत**, न० (तं) अपकार केला.

**अपगत**, वि० (तः ता- तं) गेला.

**अपगम**, पु० (मः) मृत्यु.

**अपंडित**, पु० (तः) मूर्ख.

**अपथप्रसन्ना**, स्त्री० (ना) वाईट मार्गास लागलेली.

**अपथ्यभुज्**, पु० (क्) अपकारी अन्न खाणारा.

**अपनीत**, वि० (तः ता- तं) घालविला तो.

**अपमान**, न० (नं) बेअदबी, अपमान.

**अपयाति**, गमन करितो.

**अपरंच**, अ० आणखीही ह्या अर्थी.

**अपरमित**, वि० (तः ता- तं) ज्याची पत्ता नाहीं ते.

**अपराद्ध**, पु० (द्धः) गुन्हेगार.

**अपराधवृक्ष**, पु० (क्षः) गुन्हा हाच वृक्ष.

**अपराधिन्**, पु० (धी) गुन्हेगार. अपराधी.

**अपरिछेद**, पु० (दः) अनिश्चय.

**अपरूप**, पु० (पः) अपूर्व, अदृष्ट पूर्व.

**अपर्णापति**, पु० (तिः) महादेव.

**अपश्यन्**, पु० (न्) न पाहात.

**अपश्यम्**, मी पाहिलें.

**अपसर**, दूर हो.

**अपसव्य**, न० (व्यं) डावा- वें.

**अपसार**, पु० (रः) द्वार.

**अपसारित**, वि० (तः ता- तं) दूर केलेला.

**अपह**, वि० (हः हा- हं) नाशक.

**अपहरण**, न० (णं) दूर करणें.

**अपहर्तव्य**, वि० (व्यः व्या- व्यं) घालविण्याजोगा.

**अपहार**, पु० (रः) चोरणें, बुडविणें.

**अपहारक**, पु० (कः) चोर.

**अपात्र**, वि० (त्रः त्रा- त्रं) अयोग्य.

**अपात्रभृत्**, पु० (त्) अयोग्य धरणारा.

**अपाय**, पु० (यः) नाश, उपद्रव, अपराध.

**अपार**, पु० (रः) अतिशय.

**अपास्य** अ० टाकून ह्या अर्थी.

**अपि**, अ० जरी, ही ह्या अर्थी

**अपीड्यन्**, पु० (न्) निरुपद्रवी.

**अपीत्वा**, अ० न पिऊन ह्या अर्थी

**अपुत्र**, पु० (त्रः) ज्याला मुलगा नाहीं तो.

**अपूर्व**, न० (र्वं) चमत्कारिक. २ चांगला. ३ कधीं न घडलेला.

**अपूर्वता**, स्त्री० (ता) चमत्कार.

**अपृछत्**, विचारता झाला.

**अपृष्ट**, पु० (ष्टः) ज्यास विचारिलें नाहीं तो.

**अपेक्षते**, वाट पाहतो, इच्छा करितो.

**अपेक्षा**, स्त्री० (क्षा) इच्छा.

**अपैति**, निघून जातो.

**अप्रगल्भ**, पु० (ल्भः) मूर्ख. २ लाजरा.

**अप्रतिहत**, वि० (तः ता- तं) ज्यास धक्का बसला नाहीं तो.

**अप्रतीकार**, न० (रं) असाध्य.

**अप्रधानता**, स्त्री० (ता) लहानपणा.

**अप्रमाद**, पु० (दः) पूर्वापर विचार करणें.

**अप्रमेय**, पु० (यः) जें जाणायास कठीण तें.

**अप्रवर्तन**, न० (नं) प्रवृत्ती न होणें.

**अप्रसाद**, पु० (दः) अवकृपा.

**अप्राप्त**, न० (प्तं) न मिळालेलें.

**अप्राप्तकाल,** वि० (लः ला- लं) ज्याची वेळ आली नाहीं तें.
**अप्राप्तावसर,** वि० (रः रा- रं) ज्याचा प्रसंग आला नाहीं तें.
**अप्राप्य,** अ० न मिळण्यासारखें ह्या अर्थी.
**अप्राप्य,** वि० (प्यः प्या- प्यं) न मिळणारें.
**अप्रिय,** वि० (यः या- यं) नावडता,
**अंबरपट,** न० (टं) आकाशरूप वस्त्र.
**अबाधित,** वि० (तः ता- तं) बिनहरकत. २ दोष रहित.
**अबालिश,** पु० (शः) प्रौढ, जाणता.
**अंबुजधर,** पु० (रः) कमळ धरणारा. २ विष्णु.
**अबुद्धिमत्,** वि० (मान् -मति- मत्) बुद्धिहीन.
**अबुध,** वि० (धः धा- धं) मूर्ख.
**अब्जिनी,** स्त्री० (नी) कमलिनी.
**अब्रवीत,** बोलला.
**अभज्यमान,** पु० (नः) संबंध.
**अभद्र,** न० (द्रं) अशुभ अकल्याण.
**अभयप्रदान,** न० (नं) खात्री देणें.
**अभयवाच्,** स्त्री० (क्) अभयवचन.
**अभवत्,** झाला.
**अभस्थ,** पु० (स्थः) पाण्यांत उभा राहिलेला.
**अभाग्य,** न० (ग्यं) दुर्दैव.
**अभाव,** पु० (वः) नसणें.
**अभाविन्,** पु० (वी) पुढील नव्हतें.
**अभि,** अ० पुढें ह्या अर्थी.
**अभिगमन,** न० (नं) जवळ येणें.
**अभिघातयेत्,** मारावें.
**अभिजातता,** स्त्री० (ता) कुलीनता.
**अभिधा,** स्त्री० (धा) नांव, नाम.
**अभिधाय,** अ० बोलून, म्हणून ह्या अर्थी.
**अभिनंदति,** मान्य करितो, चाहातो.
**अभिनवयौवन,** वि० (नः ना- नं) तरुण.
**अभिनिवेश,** पु० (शः) आग्रह.
**अभिन्नव,** अभिनव हा शब्द पहा.
**अभिप्रेत,** पु० (तः) इष्ट.
**अभिप्लुत,** वि० (तः ता- तं) तरलेला.
**अभिभव,** पु० (वः) पराजय.
**अभिमत,** पु० (तः) इष्ट.
**अभिमान,** पु० (नः) मीपणा.
**अभिमुख,** पु० (खः) समोरचा. २ हजर.
**अभिमुखम्,** अ० कडे. २ नवळ ह्या अर्थी.
**अभियुक्त,** पु० (क्तः) जुळलेला.
**अभियोक्तृ,** पु० (क्ता) फिर्यादी.
**अभियोज्य,** न० (ज्यं) जुळवून.
**अभिराम,** वि० (मः मा- मं) सुंदर.
**अभिरुचि,** स्त्री० (चिः) संतोष, रुचि.
**अभिलषति,** इच्छितो.
**अभिलषित,** न० (तं) इच्छित.
**अभिलाषु,** अभिलाष.
**अभिवंदे,** नमस्कार करितो.
**अभिवांछति,** इच्छितो.
**अभिवादयामि,** नमितों, नमस्कार करितों.
**अभिव्यक्ति,** स्त्री० (क्तिः) स्वरूप.
**अभिषिक्त,** वि० (क्तः क्ता- क्तं) शिंपलेला.
**अभिषेक,** पु० (कः) मंगल स्नान. २ अभिषेक.
**अभिषेक्तुम्,** अ० शिंपण्यासाठीं या अर्थी.
**अभिषेणयेत्,** स्वारी करो.
**अभिष्ट,** पु० (ष्टः) इच्छित.
**अभिहित,** न० (तं) सांगितलेलें.
**अभीतवत्,** अ० भिटासारखें ह्या अर्थी.
**अभीष्ट,** पु० (ष्टः) प्रीतीचा.
**अभूयिष्ठ,** न० (ष्ठं) थोडें

अयो. | अर्थो.

**अभृतगर्व**, वि० (र्वः र्वा- र्वं) ज्याणें गर्व धारण नाहीं केला तो.
**अभेद** पु० (दः) ऐक्य.
**अंभोज**, न० (जं) कमळ.
**अंभोद**, पु० (दः) मेघ.
**अंभोदर**, पु० (रः) मेघ.
**अभ्यंजन**, न० (नं) काजळ लावणें.
**अभ्यंतर**, न० (रं) आंतील भाग. २ हृदय.
**अभ्यर्च्यंते**, पूजा झालेला.
**अभ्यागत**, पु० (तः) पाहुणा.
**अभ्युदय**, पु० (यः) ऊर्जितकाल.
**अभ्युपैति**, जवळ जातो.
**अमरतरु** पु० (रुः) कल्पतरु.
**अमलध्वज**, पु० (जः) स्वच्छ निशाण.
**अमानन**, न० (नं) अपमान.
**अमानित्व**, न० (त्वं) अहंपणा नसणें.
**अमाया**, स्त्री० (या) खरें.
**अमार्ग**, पु० (र्गः) आड रस्ता.
**अमूप**, पु० (पः) पुष्कळ.
**अमृत**, न० (तं) अमृत.
**अमृतकर**, पु० (रः) चंद्र.
**अमृतांशु**, पु० (शुः) चंद्र.
**अमोघ**, पु० (घः) सफल.
**अमोलिक**, पु० (कः) अमोलिक.
**अमोल्य**, वि० (ल्यः ल्या- ल्यं) ज्याची किंमत करवत नाहीं तें.
**अयत**, पु० (तः) स्वच्छंद.
**अयत्नेन**, पु० (नः) श्रमावांचून.
**अयम्**, पु० (म्) हा.
**अयुक्त**, न० (क्तं) वाईट.
**अयुत**, पु० (तः) दहा हजार.
**अयुद्ध**, न० (द्धं) तह, सल्ला.
**अयोग्य**, पु० (ग्यः) वाईट.
**अयोध्या**, स्त्री० (ध्या) अयोध्या.
**अरण्यराज्य**, न० (ज्यं) रानचें राज्य.
**अरण्यवत्**, अ० वनासारखें ह्या अर्थी.
**अरण्यवासिन्**, पु० (सी) अरण्यांत राहणारा.
**अरण्यानी**, स्त्री० (नी) मोठें रान.
**अरक्षित**, वि० (तःता-तं) रक्षण न केलेला.
**अरिनंदन**, वि० (नः ना- नं) शत्रूस आनंद देणारा. २ पु० (नः) शत्रूचा पुत्र.
**अरुंधती**, स्त्री० (ती) वसिष्ठ स्त्री.
**अरुष**, वि० (षः षा- षं) आर्ष.
**अरे**, अ० अरे ह्या अर्थी.
**अरोग**, पु० (गः) निरोग.
**अरोगिता**, स्त्री० (ता) आरोग्य.
**अरोगिन्**, पु० (गी) निरोगी.
**अर्क**, पु० (र्कः) रुईचें झाड.
**अर्कसुमन**, न० (नं) रुईचें फूल.
**अर्घ्यदान**, न० (नं) पूजादान.
**अर्च**, पूजनकर.
**अर्चयति**, मान सन्मान देतो.
**अर्जन**, न० (नं) मिळविणें.
**अर्जित**, वि० (तः ता- तं) मिळविलेलें.
**अर्थकरी**, स्त्री० (री) लाभदायक.
**अर्थतः**, अ० खरेपणानें ह्या अर्थी.
**अर्थतत्त्व**, न० (त्वं) खरी गोष्ट.
**अर्थनाश** पु० (शः) द्रव्याचें नुकसान.
**अर्थपर**, वि० (रः रा- रं) धनलोभी, कृपण.
**अर्थलाभ**, पु० (भः) धनप्राप्ती.
**अर्थवत्**, पु० (वान्) मातबर.
**अर्थवृद्धि**, स्त्री० (द्धिः) द्रव्यवृद्धी.
**अर्थसार**, पु० (रः) पैका.
**अर्थागम**, पु० (मः) पैसा मिळणें.
**अर्थिता**, स्त्री० (ता) याचना. २ मागणें.
**अर्थोष्मण**, पु० (णः) पैशाची ऊब.

**अर्दित**, वि० (तः ता- तं) दुःखित.
**अर्धकोटी**, स्त्री० (टी) पन्नास लक्ष.
**अर्धकोष**, पु० (षः) अर्धा खजीना.
**अर्धमात्रा**, स्त्री० (त्रा) मकारात्मक.
**अर्पित**, वि० (तः ता- तं) पुढें ठेविलेलें.
**अर्हसि**,—योग्य होतोस.
**अलब्ध**, पु० (ब्धः) न मिळालेले.
**अलब्धत्व**, न० (त्वं) निस्पृहता.
**अलभमान**, वि० (नःना-नं) न मिळण्याचें.
**अलभ्य**, वि० (भ्यःभ्या-भ्यं) न मिळण्याजोगें.
**अलसलुलित**, वि० (तःता-तं) आळसयुक्त.
**अलक्ष**, पु० (क्षः) अतर्क्य.
**अलक्षित**, वि० (तः ता- तं) न पाहिलेले.
**अलक्षितोपस्थित**, वि० (तः ता तं) एकाएकी पुढें आलेला.
**अलक्ष्य**, पु० (क्ष्यः) अतर्क्य.
**अलिक**, न० (कः) कपाळ.
**अलिप्त**, वि० (प्तः प्ता- प्तं) ज्यास लेप नाहीं तो. २ अलिप्त.
**अलोट**,—विशाळ.
**अलोभ**, पु० (भः) ज्याला लोभ नाहीं तो.
**अलोल**, वि० (लः ला- लं) हालणारा नव्हे तो. २ सतृष्ण नव्हे तो.
**अल्पता**, स्त्री० (ता) थोडेपणा.
**अल्पधी**, पु० (धीः) मूर्ख.
**अल्पप्रभाव**, पु० (वः) हलका.
**अल्पप्रभावत्व**, न० (त्वं) हलकेपणा.
**अल्पबल**, न० (लं) थोडकें बल.
**अल्पमेधस**, पु० (सः) मूर्ख.
**अल्पशक्ति**, पु० (क्तिः) ज्याला थोडी शक्ति आहे.
**अल्पस्नायु**, पु० (युः) ज्याला स्नायु असतात तो.
**अल्पीयस**, पु० (सः) फार लहान.
**अल्पेच्छु**, पु० (च्छुः) थोडें इच्छिणारा.
**अल्पोपाय**, पु० (यः) थोडा उपाय.
**अव**, अ० खालचे कडे ह्या अर्थी.
**अवकळा**, स्त्री० (ळा) दुःश्चिन्ह. २ दुःख रहित.
**अवगम**, पु० (मः) ज्ञान.
**अवगम्यते**,—जाणिले जाते.
**अवगाहिला**,—जाणले.
**अवचनकर**, वि० (रःरा-रं) उद्धट, दांडगा.
**अवचिन्ह**, न० (न्हं) दुष्ट चिन्ह.
**अवतरण**, न० (णं) अवतार. २ उतरणें.
**अवतार**, पु० (रः) अवतार.
**अवतारित**, वि० (तः ता- तं) उतरलेला.
**अवतिष्ठते**, उभा राहतो.
**अवथिलें**, योजिलें.
**अवदत्**, बोलला.
**अवधारण**, न० (णं) ऐकणें.
**अवधारा**, ऐका.
**अवधीयताम्**, लक्ष लावा.
**अवधीरित**, वि० (तः ता- तं) नाकारलेला, टाकलेला.
**अवध्य**, वि० (ध्यःध्या ध्यं) न मारावयाचा.
**अवंध्य**, पु० (ध्यः) कुटुंबवत्सल.
**अवध्यभाव**, पु० (वः) न मारावयाचा धर्म.
**अवनतकाय**, वि० (यः या- यं) लवून.
**अवपात**, पु० (तः) पडणें.
**अवमंतृ**, पु० (ता.) तुच्छ मानणारा.
**अवमंन्यते**, तुच्छ मानितो.
**अवर**, न० (रः) कमी, उणें.
**अवरोध**, पु० (धः) गुंता.
**अवरोधन**, पु० (नः) अडथळा.
**अवर्धमान**, पु० (नः) न वाढणारा.

**अवलंबणें**, धरून राहणें.
**अवलंबन**, न० (नं) आश्रय घेणें, अनुसरणें.
**अवलंबित**, वि० (तः ता- तं) आश्रित.
**अवभृत**, न० (तं) कर्म वि०
**अभिभूत**, पु० (तः) व्याप्त.
**अलिनी**, स्त्री० (नी) भ्रमरी.
**अवलोकने**, पाहतो.
**अवलोकन**, न० (नं) पाहणें.
**अवलोकयतु**, पाहूं दे, पाहा.
**अवलोकयामास**, पाहता झाला.
**अवलोकित**, वि० (तः ता- तं) पाहिलेला.
**अवयंत**, पु० (तः) अवमान करणारा.
**अवश**, पु० (शः) कह्याबाहेर.
**अवशिष्ट**, पु० (ष्टः) बाकी राहिलेला.
**अवशेंद्रियचित्त**, वि० (त्तः त्ता- त्तं) ज्याचीं इंद्रियें आणि मन स्वाधीन नाहीं तो.
**अवशेष**, पु० (षः) राहिलेला.
**अवश्य**, पु० (श्यः) अजिंक. २ न०(श्यं) अवश्य, जरूर.
**अवश्यकर्ता**, स्त्री० (ता) जरूरी.
**अवश्यम्**,अ० जरूरीनें ह्या अर्थी.
**अवसत्**, राहिला.
**अवसथ**, पु० (थः) पाठशाळा.
**अवसन्ना**, स्त्री० (न्ना) संपली.
**अवसीदती**, नाश पावतो.
**अवस्कंद**, पु० (दः) हल्ला, छापा.
**अवस्थातुम्**, अ० बसावयासाठीं.
**अवस्थान**, न० (नं) ठिकाण. २ राहणें.
**अवस्थाप्य**, अ० ठेवून ह्या अर्थी.
**अवस्थाय**, अ० थांबून ह्या अर्थी.
**अवस्थित**, वि० (तः ता- तं) राहिलेला.
**अवज्ञातुं**, अ० तिरस्कार करणें.
**अवज्ञात**, न० (नं) तुच्छ.
**अवाप्ति**, स्त्री० (प्तिः) फायदा, प्राप्ति.
**अवाप्तुम्**,अ० मिळविणें.
**अवाही**, योजी.
**अविकत्थन**, वि० (नः ना- नं) बढाई न करणारा.
**अविकृत्न**, वि० (त्नः त्ना- त्नं) पूर्ण, सगळा.
**अविघ्न**, वि० (घ्नः घ्ना- घ्नं) ज्यास विघ्न नाहीं तो.
**अविचारित**, न० (तं) न पुसतां.
**अविट**, पु० (टः) ज्यास वीट येत नाहीं तो.
**अवितथ**, पु० (थः) खरें.
**अविदित**, न० (तं) जें ठाऊक नाहीं तें.
**अविद्वस्**, पु० (द्वान्) न पढलेला.
**अविनय**, पु० (यः) उद्धटपणा.
**अविप्राहित**, वि० (तः ता- तं) ब्राम्हण द्वेषी.
**अविरक्त**, वि० (क्तः क्ता- क्तं) संसारी.
**अविवेक**, पु० (कः) विचार नसणें.
**अविवेकता**, स्त्री० (ता) साहस.
**अविवेकाधिपपुर**, न० (रं) अविचारी राजाचें नगर.
**अविशुद्ध**, पु० (द्धः) अपवित्र, पापी.
**अविशेषज्ञ**, वि० (ज्ञः ज्ञा- ज्ञं) ज्यास मर्म कळत नाहीं तो.
**अविश्वास**, पु० (सः) गैर विश्वास.
**अविषय**, पु० (यः) अभाव.
**अविज्ञता**, स्त्री० (ता) मूर्खपणा.
**अविज्ञाय**, अ० न जाणून ह्या अर्थी.
**अवेक्षण**, न० (णं) पाहणें.
**अव्यवसायिन्**, पु० (यी) मंद, घुम्या.
**अव्यवसनिन**, पु० (नः) ज्यास व्यसन नाहीं तो.

अव्यापार, पु० (र:) अयोग्य काम.

अव्हेरी, टाकी, अपेक्षा करी.

अशंक, पु० (क:) निर्भय.

अशक्य, न० (क्यं) न व्हावयाजोगतें.

अशक्यार्थ, पु० (र्थः) न व्हावयासारखी गोष्ट.

अशमशर, पु० (र:) मदन.

अशरीरवाणी, स्त्री० (णी) आकाश वाणी.

अशरीरिणी, स्त्री० (णी) आकाश वाणी.

अशाश्वत, वि० (तः ता- तं) शाश्वत नाहीं तें. २ न० (तं) असत्य.

अशिव, न० (वं) अकल्याण.

अशुचि, स्त्री० (चि:) अपवित्र.

अशुद्ध, वि० (द्धः द्धा- द्धं) जें शुद्ध नाहीं तें २ न० (द्धं) रक्त.

अशेष, पु० (ष:) संपूर्ण.

अशौचत्व, न० (त्वं) अपवित्रपणा.

अश्नाति, खातो, उपभोगितो.

अश्नुते, खातो.

अश्नावि, ऐकलें.

अश्वतरी, स्त्री० (री) खेचरी.

अश्वमेध, पु० (ध:) घोड्याचा यज्ञ.

अश्वाधिक, पु० (क:) घोडे ज्यापाशीं पुष्कळ तो.

अष्टगुण, पु० (ण:) आठ पट.

अष्टन्, आठ.

अष्टविध, वि० (धः धा- धं) आठ प्रकारचा.

अष्टांग, न० (गं) आठ विभाग.

अष्टांगपात, पु० (त:) साष्टांग नमस्कार.

अष्टायुध, पु० (ध:) आठ शस्त्रांचा.

असक्त, पु० (क्त:) जो लागून नाहीं तो.

असंगत, पु० (त:) जें संबंधवार नाहीं तें.

असज्जन, पु० (न:) दुष्ट माणूस.

असत्, खोटें. २ दुष्ट.

असंतुष्ट, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) नाखुष.

असत्य, पु० (त्यः) खोटा. २ न० (त्यं) खोटें.

असत्यसंध, वि० (धः धा- धं) ज्याचें वचन खोटें तो.

असदशान्यवहारिन्, पु० (री) अयोग्य रीतीनें वागणारा.

असंधेय, वि० (यः या- यं) ज्याशीं तह करणें योग्य नाहीं तो.

असन्मद, पु० (द:) दुष्टांचा गर्व.

असंभव, न० (वं) घडण्यासारखें नव्हे तें.

असंभाविनी, स्त्री० (नी) संभव नाहीं अशी किंवा अतर्क्य.

असंभोग, पु० (गः) उपभोग नसणें.

असमर्थ वि० (र्थः र्था- र्थं) असमर्थ.

असमीक्ष्य, अ० बरावर विचार न करून.

असमीक्ष्यकारिण, पु० (ण:) अविचारी.

असंशयम्, अ० निश्चित ह्या अ०.

असंयम, पु० (म:) आकळा नसणें.

असंस्थित, वि० (तः ता- तं) एके ठिकाणीं न राहणारा.

असह, पु० (ह:) असह्य. २ उतावळ.

असहिष्णु, पु० (ष्णु:) ज्यास साहत नाहीं तो.

असाधन, पु० (न:) ज्यापाशीं साधन नाहीं तो.

असाधारण, पु० (ण:) विशेष.

असाधुत्व, न० (त्वं) दुष्टपणा.

असाधुवाद, पु० (द:) दुर्भाषण, निंदा.

असाध्य, पु० (ध्य:) न होण्याजोगें, न मिळण्याजोगें.

**असाध्वस**, पु० (सः) निर्भय.
**असाप्रतम्**, अ० प्रसंग सोडून ह्या अ०.
**असार**, पु० (रः) क्षणिक.
**असि**, आहेस.
**असितपथ**, पु० (थः) अग्नि, कृष्णवर्त्मा.
**असिधार**, पु० (रः) खड्गधर पदाती.
**असुख**, न० (खं) दुःख.
**असुंदर**, पु० (रः) कुरूप.
**असुलभ**, न० (भं) कठीण.
**असूड**, चाबूक.
**असेवितेश्वरद्वार**, वि० (रः रा- रं) ज्याणें ईश्वराचें सेवन केलें नाहीं तो.
**असो**, तो, ती.
**अस्खलितप्रयाण**, पु० (णः) अप्रतिबंधगति.
**अस्तंगत**, पु० (तः) मावळलेला.
**अस्तब्धत्व**, न० (त्वं) चंचलपणा.
**अस्तमित**, पु० (तः) अस्तास गेला तो, मावळलेला तो.
**अस्ताचल**, पु० (लः) ज्या पर्वतावर सूर्य मावळतो तो.
**अस्त्रतति**, स्त्री० (तिः) शस्त्रांचा समूह.
**अस्त्रज्ञ**, वि० (ज्ञः ज्ञा- ज्ञं) युद्धाचें काम जाणता.
**अस्त्वेवम्**, असें असू दे.
**अस्थि**, न० (स्थि) हाड.
**अस्थिक**, न० (कं) हाड.
**अस्थिर**, पु० (रः) चंचळ
**अस्पर्शन**, न० (नं) न शिवणें.
**अस्पृशन्**, पु० (न्) स्पर्श न करणारा.
**अस्मत्पुत्र**, पु० (त्रः) माझा पुत्र.
**अस्मद्**, मी.
**अस्मदीय**, वि० (दः या- यं) माझें.
**अस्मन्मित्र**, पु० (त्रः) माझा मित्र.
**अस्मात्**, यापासून.
**अस्मि**, आहे.
**अस्मिन्**, यावर.
**अहं**, पु० स्त्री० न० मी.
**अहंता**, स्त्री० (ता) मीपणा.
**अहंब्रम्हन्**, न० (म्ह) मीच ब्रम्ह.
**अहंभाव**, मीपणा.
**अहरहर्**, अ० नेहेमी ह्या अर्थी.
**अहर्निशम्**, अ० रात्रंदिवस.
**अहर्निशी**, रात्रंदिवस.
**अहल्या**, स्त्री० (ल्या) गौतम जाया.
**अहार्यत्वात्**, न चोरण्या जोगतें.
**अहित**, न० (तं) तोटयाचें.
**अहितहितविचारशून्यबुद्ध**, पु० (द्धः) मूर्ख.
**अहिदार**, सर्परूपी दोर.
**अहिमन्**, पु० (मा) तेजस्वी.
**अहिवर**, पु० (रः) सर्पामध्यें श्रेष्ट काळिया.
**अहिंसा**, स्त्री० (सा) न मारणें.
**अहेवतंतु**, मंगळसूत्र.
**अहेवपणा**, सौभाग्य.
**अहो**, अ० अहाहा ह्या अर्थी.
**अहोरात्रं**, अ० रात्रंदिवस.
**अळुमाळ**, थोडासा, किंचित.
**अक्षत**, न० (तं) निरुपद्रव.
**अक्षम**, वि० (मः मा- मं) असमर्थ.
**अक्षय**, पु० (यः) शाश्वत.
**अक्षयत्वात्**, नित्यत्वानें.
**अक्षयलोक**, पु० (कः) स्वर्ग.
**अक्षर**, न० (रं) वर्ष, अक्षर. २ अविनाशी.
**अज्ञातकुलशील**, वि० (लः ला- लं) ज्याचें कुल व चाल माहित नाहीं तो.

**अज्ञतशील**, पु० (लः) ज्याचा स्वभाव मा हित नाहीं तो.
**अज्ञात्वा**, अ० न समजून ह्या अर्थी.
**अज्ञनतः**, अ० मूर्खत्वानें.

---

## आ.

**आ**, अ० पर्यंत ह्या अर्थी. २ तोंड वासून.
**आकर्णन**, न० (नं) श्रवण.
**आकर्ण्य**, अ० ऐकून ह्या अर्थी.
**आकर्षण**, न० (णं) ओढणें.
**आकलिला**, अकळला.
**आकाशवर्त्मन्**, न० (र्त्म) वातावरण, हवा.
**आकांक्षा**, स्त्री० (क्षा) इच्छा.
**आकिर्ण**, वि० (र्णः र्णा- र्णं) पसरला.
**आकुल**, पु० (लः) व्याप्त, भरलेला.
**आकुलित**, पु० (तः) गोंधळलेला.
**आकृति**, स्त्री० (तिः) आकार.
**आकृष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) ओढलेला.
**आकृष्टि**, स्त्री० (ष्टिः) ओढणें.
**आकृष्य**, अ० ओढून ह्या अर्थी.
**आक्रंदती**, ओरडती.
**आक्रमति**, चढून जातो.
**आक्रमितसे**, फिरतसे.
**आक्रम्य**, अ० हल्ला करून.
**आक्रांत**, न० (तं) घेरणें, वेढणें.
**आक्रोशित**, वि० (तः ता- तं) शापलेला.
**आख्यातुम्**, अ० सांगावयास.
**आख्यान**, पु० (नः) गोष्ट, कथा.
**आगच्छामि**, येतों.
**आंगठसा**, शरीराची घडण.
**आगत**, वि० (तः ता- तं) आला, पोंचला.
**आगंतु**, पु० (तुः) नवीन येणारा, अगांतुक.
**आगंतुक**, पु० (कः) आगंतु हा शब्द पहा.
**आगम**, पु० (मः) येणें.
**आगमन**, पु० (नः) येणें.
**आगमिष्यसि**, येशील.
**आगळा**, अधिक, श्रेष्ट.
**आघात**, पु० (तः) घाव, धक्का.
**आचरतु**, आचरण करो.
**आछन्न**, पु० (नः) झांकलेला.
**आजय**, जय होई तोंपर्यंत.
**आजानुबाहु**, पु० (हुः) गुडघ्यापर्यंत ज्याचे बाहु लांब असतात तो. २ अर्जुन. ३ अभिमन्यु.
**आटणी**, आटिवणें.
**आटविक**, वि० (कः का- कं) रानकरी.
**आटोप**, पु० (पः) गर्व.
**आणिक**, दुसरा- री- रें.
**आतिथ्यम्**, पु० (म्) पाहुणचार.
**आतिथ्यसत्कार**, पु० (रः) पाहुणचार व मानमान्यता.
**आती**, अतिशय.
**आत्मकर्मन्**, न० (र्म) आपलें काम.
**आत्मकृत**, पु० (तः) आपण केलेलें.
**आत्मचर्चा**, स्त्री० (र्चा) आत्म्याविषयीं भाषण.
**आत्मत्व**, न० (त्वं) आत्म्याचा धर्म.
**आत्मद्रोही**, पु० (हीः) आपणास उपद्रव देणारा.
**आत्मपरित्याग**, पु० (गः) आपला घात.
**आत्मंभरि**, पु० (रिः) आपलपोट्या.
**आत्मवत्**, अ० आपणाप्रमाणें.

**आत्मविद्या**, स्त्री० (द्या) आत्मज्ञान.
**आत्मविवृद्धि**, स्त्री० (द्धिः) आपलें वाढविणें.
**आत्मवृत्तांत**, पु० (तः) आपली गोष्ट.
**आत्मशक्ति**, स्त्री० (क्तिः) आपलें सामर्थ्य.
**आत्मसंदेह**, पु० (हः) आपला संशय.
**आत्मसात्**, अ० आपलासा.
**आत्मज्ञान**, पु० (नः) आत्मविद्या.
**आत्मादिष्ट**, पु० (ष्टः) आपण स्वतः सांगितलेलें.
**आत्मापराध**, पु० (धः) आपला अपराध.
**आत्मार्थम्**, अ० आपणासाठीं.
**आत्मार्थे**, अ० आपणासाठीं.
**आत्मीय**, वि० (यः या यं) आपला.
**आत्मोदय**, पु० (यः) आपला उन्नित काळ.
**आत्मौपम्य**, न० (म्यं) आपल्याप्रमाणें.
**आदर**, पु० (रः) मान, सन्मान, स्वीकार.
**आदाय**, अ० घेऊन.
**आदित्यचंद्रौ**. पु० (द्रौ) सूर्य, चंद्र.
**आदित्सु**, पु० (त्सुः) घेण्यास इच्छिणारा.
**आदिराज**, पु० (जः) सार्वभौमराजा.
**आदिशक्ति**, स्त्री० (क्तिः) मूळशक्ति.
**आदिशति**, आज्ञा देतो.
**आदेय**, वि० (यः या- यं) घ्यावयाचें.
**आदेश**, पु० (शः) आज्ञा.
**आंदोलति**, हालतो.
**आंदोललः**, हालला.
**आद्य**, पु० (द्यः) खावयास योग्य.
**आद्रियते**, मानलें जातें.
**आधत्ते**, धरितो.
**आधिकरण्य**, न० (ण्यं) बसावयाचें स्थान.
**आधिक्य**, न० (क्यं) अधिकपण, वर्चस्वा.
**आधिपत्य**, न० (त्यं) अधिकार, राज्य.
**आधीन**, स्वाधीन.
**आध्मात**, वि० (तः ता- तं) फुगलेला.
**आन**, अन्य, निराळें.
**आनंदतम**, पु० (मः) संतोषकारक.
**आनंदित**, पु० (तः) संतोषित.
**आनीत**, वि० (तः ता- तं) आणलेला.
**आनृण्य**, न० (ण्यं) निकर्जीपणा.
**आपंगिता**, पालनकर्ता.
**आपत्**, स्त्री० (त्) विपत्ति, संकट.
**आपतंती**, स्त्री० (ती) पडणारी, येणारी.
**आपत्काल**, पु० (लः) संकटकाल.
**आपदर्थे**, अ० संकटाकरितां.
**आपद्यते**, मिळवितो.
**आपन्न**, वि० (न्नः न्ना- न्नं) प्राप्त झालेला.
**आपपर**, पु० (रः) स्वकीय परकीय.
**आपात**, पु० (तः) क्षण, पळ.
**आपूर्यते**, भरिला जातो.
**आपृच्छे**, मी विचारितों.
**आप्तुम्**, अ० मिळण्यासाठीं.
**आप्नोति**, मिळवितो, युक्त करितो.
**आप्यायित**, पु० (तः) तृप्त झालेला. २ वाढलेला.
**आबाळ**, हाल, लहान.
**आभास**, पु० (सः) कांहींसा भास.
**आम**, पु० (मः) हिरवें, कच्चें.
**आमंद**, पु० (दः) थोडा मंद, पुष्कळ मंद.
**आमरणांत**, पु० (तः) मरेपर्यंत टिकणारा.
**आय**, पु० (यः) मिळकत.
**आयस**, पु० (सः) लोखंड.
**आयाति**, येतो.
**आयुधधर**, वि० (रः रा- रं) हत्यारबंद.
**आयुःशेष**, पु० (षः) बाकीची उमर.

**आयुर्दाय**, पु० (यः) आयुष्याची गणना.
**आरण्य**, पु० (ण्यः) न० (ण्यं) जंगल, वन.
**आरब्ध**, वि० (ब्धः ब्धा ब्धं) सुरू झालेला.
**आरंभते**, सुरू करतो.
**आराति**, पु० (तिः) शत्रू.
**आराधित**, पु० (तः) पूजित.
**आरामवाटी**, स्त्री० (टी) बाग.
**आरि**, स्त्री० (रिः) चक्र, चाक.
**आरुह्य**, अ० चढून.
**आरोध**, पु० (धः) वेढा, अडकाव.
**आरोपयति**, ठेवतो, मांडतो, लावतो.
**आर्जव**, न० (वं) सरळपणा.
**आर्त्त**, पु० (र्त्तः) दुःखित.
**आर्त्तनाद**, पु० (दः) दुःखिताची आरड.
**आर्ती**, आवड.
**आर्द्रनयन**, पु० (नः) स्त्री० (ना) न० (नं) ज्याचे डोळे आले आहेत तो.
**आलस्यनिबंध**, न० (नं) आळसापासून होणारे.
**आलस्य**, न० (स्यं) आळस.
**आलाप**, पु० (पः) गाणे.
**आलिंगन**, न० (नं) वेंगाटणे, आलिंगन.
**आलिंगवती**, स्त्री० (ती) आलिंगन करणारी.
**आलोकते**, पहातो.
**आलोकयामास**, पहाता झाला.
**आलोचित**, न० (तं) पाहिलें.
**आवरण**, कुंपण.
**आवाति**, वारा वाहणें.
**आवास**, पु० (सः) राहण्याचें ठिकाण.
**आविर्भूत**, वि० (तःता-तं) प्रकट झालेला.
**आविशति**, आंत जातो.
**आवृत्ति**, स्त्री० (त्तिः) परतणें.
**आवेदित**, वि० (तः ता- तं) जाणलेलें.
**आवेश**, ईर्षा.
**आऽह्वयताम्**, बोलवावें.
**आशंक्य**, अ० संशय धरून.
**आशावत्**, पु० (वान्) आशायुक्त,
**आशाविभिन्न**, वि० (न्नः न्ना- न्नं) निराश झालेला.
**आशीर्वचन**, न० (नं) आशीर्वाद.
**आश्रम**, पु० (मः) स्थान, पर्णकुटी.
**आश्रयण**, न० (णं) रक्षण.
**आश्रयणीय**, वि० (यः या- यं) आश्रय करावयास योग्य.
**आश्रयते**, आश्रयकर.
**अश्रयभक्त**, वि० (तः ता- तं) दुसऱ्याच्या आश्रयानें राहणारें
**आश्रयाश**, पु० (शः) विस्तव.
**आश्रित**, वि० (तः ता- तं) आसरा करून राहिलेला.
**आश्रित्य**, अ० आश्रय करून.
**आश्वासयन्**, पु० (न्) धीर देणारा.
**आस**, आशा.
**आसक्ति**, स्त्री० (क्तिः) प्रीति.
**असदुनी**, हिसडून.
**असन्नतर**, अ० अगदीं जवळ.
**असन्नतरता**, स्त्री० (ता) फार जवळपणा.
**आसन्नप्रसवा**, स्त्री० (वा) विण्यास झालेली.
**आसम्**, होतो.
**आसाद्य**, अ० पोंचून, पावून.
**आसीत**, असावें.
**आसीत्**, होता.
**आस्यताम्**, बसावें.
**आस्ताम्**, असो.
**आस्था**, स्त्री० (स्था) काळजी.
**आस्थाय**, अ० आश्रय करून.

**आस्थित**, वि० (तः ता- तं) राहिला.
**आस्वाद**, पु० (दः) रुचि.
**आस्वादन**, न० (नं) चाखणें, अनुभवणें.
**आस्वाद्यतोय**,
**आह**, बोलतो.
**आहत**, वि० (तः ता- तं) मारलेला.
**आहर्तुं**, अ० घेण्यासाठीं
**आहारविरह**, ० (हः) उपास.
**आहारार्थम्**, अ० अन्नासाठीं.
**आहारार्थिन्**, पु० (र्थी.) खाणें, पाहणारा.
**आहळली**, करून गेली.
**आन्हृत**, वि० (तः ता- तं) आणिलेला.
**आळ**, आरोप. २ हट्ट. ३ लळा.
**आळवी**, घाबरा करी.
**आज्ञापयति**, हुकूम करतो.

---

## इ.

**इंगित**, न० (तं) मनोगत.
**इच्छामि**, इच्छितो.
**इच्छन्**, पु० (न्) इच्छिणारा.
**इच्छासंपत्**, स्त्री० (त्) इच्छेप्रमाणें होणें.
**इच्छु**, वि० (च्छुः च्छु- च्छुं) इच्छिणारा.
**इज्या**, स्त्री० (ज्या) होम.
**इतः**, अ० इथून ह्या अर्थी.
**इतर**, पु० (रः) दुसरा.
**इतश्चेतश्च**, अ० इकडे तिकडे.
**इतस्ततः**, अ० इकडून तिकडे.
**इतिकर्तव्यता**, स्त्री० (ता) करावयाची रीत.
**इतिकर्तव्यतामूढ**, वि० (ढः ढा- ढं) कर्तव्यकर्म न जाणता.
**इत्थम्**, अ० या रीतीनें.
**इत्यादि**, अ० याप्रमाणें.
**इदम्**, हें.
**इंदिरावेष**, पु० (षः) लक्ष्मी वेष.
**इंद्रियग्राम**, पु० (मः) इंद्रियसमुदाय.
**इभी**, स्त्री० (भी.) हत्तीण.
**इयन्**, इतकें.
**इयं**, ही.
**इष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) इच्छित.
**इष्टका**, स्त्री० (का.) ईट, वीट.
**इष्टकागृह**, न० (हं) इटांचें घर.
**इष्यते**, इच्छिलें जातें.
**इह**, अ० येथें, या जगांत.
**इहलोक**, पु० (कः) मृत्युलोक.
**इहसमय**, पु० (यः) अशावेळीं.

---

## ई.

**ईदृश्**, असें.
**ईद्रिश**, वि० (शः शा- शं) असें
**ईर्षित**, वि० (तः ता- तं) हेवा केलेलें.
**ईर्ष्यिन्**, पु० (र्ष्यी.) मत्सरी.
**ईशपद** पु० (दः) ईश्वराचा पाय.

---

## उ.

**उग्र** वि० (ग्रः ग्रा- ग्रं) भयंकर, रागीट.
**उग्रदंड**, वि० (डः डा- डं) निर्दय.
**उच्चार**, पु० (रः) उच्चार करणें.
**उच्चैः**, अ० उंच मोठ्यानें.
**उच्यते**, सांगितलें जातें.
**उच्छिद्यंते**, तोडले जातात. २ नष्ट होतात.

**उच्छिन्न,** वि० (न्नः न्ना- न्नं) उद्ध्वस्त. २ फस्त.

**उच्छिखळ,** न० (लं) आडदांड.

**उच्छ्रितपाणि,** पु० (णिः) ज्यानें वरती हात केला आहे तो.

**उछेद,** पु० (दः) पीडा करणें.

**उज्जयिनी,** स्त्री० (नी) उज्जनी शहर.

**उड्डीयताम्,** उडावें.

**उत्,** अ० वर वरती.

**उत्कट,** पु० (टः) फारच.

**उत्कर,** पु० (रः) आधिक्य.

**उत्कर्ष,** पु० (र्षः) उदय, वढती.

**उत्कृत्यमान,** पु० (नः) कापलेला.

**उत्कृष्ट,** पु० (ष्टः) फारच चांगलें.

**उत्तम,** वि० (मः मा- मं) उत्कृष्ट.

**उत्तमाधम,** पु० (मः) चांगला, वाईट.

**उत्तर,** पु० (रः) पुढला.

**उत्तरदान,** पु० (नः) उत्तर देणें. २ उत्तरदान.

**उत्तरदायक,** वि० (कः का- कं) उत्तर देणारा.

**उत्तराख्य,** पु० (ख्यः) उत्तर ज्याला नांव आहे तो.

**उत्तरापति,** पु० (तिः) अभिमन्यु.

**उत्तरापथ,** न० (थं) उत्तरेकडील मार्ग.

**उत्तरावर,** पु० (रः) अभिमन्यु.

**उत्तराशेला,** उत्तर दिशेला.

**उत्तरीय** पु० (यः) शेला.

**उत्तरोत्तर,** न० (रं) उत्तराला उत्तर.

**उत्तरोत्तरम्,** अ० (अधिक अधीक.

**उत्तानचरण,** पु० (णः) राजविं०.

**उत्ताप,** पु० (पः) उष्णता.

**उत्तिष्ठ,** ऊठ.

**उत्तीर्ण,** पु० (र्णः) ऋणमुक्त.

**उत्थ,** वि० (त्थः त्था- त्थं) उठलेला.

**उत्थातुम्,** उठण्याकरितां.

**उत्थापयामि,** उठवितो.

**उत्थाय,** अ० उठून.

**उत्थायोत्थाय,** अ० उठून उठून.

**उत्पतति,** चढतो, उडतो.

**उत्पन्न,** वि० (न्नः न्ना- न्नं) उत्पन्न.

**उत्पाटिन्,** पु० (टी.) उपटणारा.

**उत्पात,** पु० (तः) चढणें, उडणें. वाईट चिन्ह, दुश्चिन्ह.

**उत्पादक,** वि० (कः का- कं) उत्पन्न करणारा.

**उत्पादन,** न० (नं) उत्पत्ति.

**उत्पादयामि,** उत्पन्न करितो.

**उत्पादिन,** वि० (नःना-नं) उत्पन्न करणार.

**उत्प्लुत्य,** अ० उडून.

**उत्सर्ग,** पु० (र्गः) सोडणें, देणें.

**उत्सृजेत्,** टाको, सोडावें.

**उदकार्थिन्,** पु० (र्थी) पाणी इच्छिणारा.

**उदंड,** पुष्कळ.

**उदयाद्रि,** पु० (द्रिः) उदयाचल पर्वत.

**उदयिन्,** पु० (यी) दैववान.

**उदरंभर,** पु० (रः) पोट भरणारा.

**उदरभरणमात्रकेवलेच्छ,** वि० (च्छः च्छा- च्छं) पोट भरण्याचीमात्र चिंता करणारा.

**उदश्रु,** वि० (श्रुः श्रु- श्रुं) रडणारा. २ उत्साह रहित.

**उदारचरित,** वि० (तः ता- तं) ज्याची बुद्धी किंवा मन थोर आहे तो.

**उदास,** आसक्त नव्हे तो. २ खिन्न.

**उदासीन,** पु० (नः) अस्वस्थ. २ उद्विग्न.

**उदाहृत,** न० (तं) बोललेलें, सांगितलेलें.

**उदीयमान,** वि० (नःना-नं) उदय पावणारा.

**उदीरित**, वि० (तः ता- तं) बोललेला.
**उदेति**, उदय पावतो.
**उद्गम**, पु० (मः) वर जाणें. २ उत्पत्ति.
**उद्गार**, पु० (रः) उद्गार.
**उद्घाटन**, न० (नं) उघडणें २ किल्ली.
**उद्दिश्य**, अ० दाखवून. २ लक्षून ह्या अ०.
**उद्देश**, पु० (शः) हेतु. २ भाग.
**उद्धट**, वि० (टः टा- टं) दांडगा.
**उद्धरण**, न० (णं) वर काढणें.
**उद्धरतो**, वर काढतो.
**उद्धृत**, वि० (तः ता- तं) कांपलेला.
**उद्भट**, वि० (टः टा- टं) मोठा.
**उद्भूत**, वि० (तः ता- तं) उत्पन्न झालेला.
**उद्भ्रांत**, वि० (तः ता- तं) भटकलेला.
**उद्यत**, पु० (तः) तयार.
**उद्यम**, पु० (मः) उद्योग.
**उद्योगसमर्थ**, वि० (र्थःर्था-र्थं) कामालायक.
**उद्योग**, पु० (गी) तत्पर, उद्योगी.
**उद्विग्न**, वि० (ग्नः ग्ना- ग्नं) त्रासलेला.
**उद्विग्नमन**, वि० (नः ना- नं) ज्याचें मन उद्विग्न आहे तो.
**उद्वोढुम्**, अ० वरती आणण्यास.
**उन्नत**, वि० (तः ता- तं) उचलला.
**उन्नतचरण**, पु० (णः) उचलले पायाचा.
**उन्नतशिर**, वि० (रः रा- रं) उचलले डोक्याचा.
**उन्नति**, स्त्री० (तिः) मोठेपणा. २ उंची.
**उन्मनी**, स्त्री० (नी) अवस्थावि०
**उन्मार्ग**, पु० (र्गः) खराब रस्ता. २ वाईट चालीचा.
**उन्मार्गगामिन**, न० (नं) वाईट रस्त्यानें जाणें.
**उन्मार्गगमन्**, पु० (मी) वाईट रस्त्यानें जाणारा.
**उन्मार्गा**, स्त्री० (र्गा) वाईट चालीचा.
**उन्मीलित**, वि० (तः ता- तं) उघडलेले.
**उन्मूलयामि**, उपटतो.
**उन्मेख**, पु० (खः) ज्ञान.
**उन्मेषलोचन**, वि० (नः ना- नं) ज्याला ज्ञानचक्षु आहेत तो.
**उपकरण**, न० (णं) साहित्य.
**उपकर्ण**, वि० (र्णः र्णा- र्णं) जवळ.
**उपकर्तृ**, पु० (र्ता) उपयोगी पडणारा.
**उपकल्पित**, वि० (तः ता- तं) केलेले.
**उपकार**, पु० (रः) उपकार.
**उपकारक**, वि० (कः का- कं) उपकार करणारा.
**उपकारापकारौ**, पु० (रौ) उपकार आणि अनुपकार.
**उपकारिणि**, पु० (णी) हितकर्ता.
**उपकृत**, वि० (तः ता-तं) उपकार केलेला.
**उपकृति**, स्त्री० (तिः) उपकार.
**उपक्रम**, पु० (मः) उद्योग.
**उपक्रीय**, अ० विकत घेऊन.
**उपक्रुश्य**, अ० रागानें ओरडून.
**उपगच्छामि**, जवळ जातो.
**उपगम**, पु० (मः) ओळख.
**उपगूहित**, न० (तं) वेंगाटणें.
**उपचय**, पु० (यः) अधिक्य.
**उपचयापचयौ**, पु० (यौ) आधिक उणें.
**उपचार**, पु० (रः) आदर. २ उपाय.
**उपचारपरिभ्रष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) आडाणी.
**उपचीयते**, वाढतें.
**उपजात**, वि० (तः ता- तं) झालेलें.
**उपजातकोप**, पु० (पः) राग आलेला.
**उपजातविश्वास**, वि० (सः सा- सं) ज्याला विश्वास उत्पन्न झाला आहे तो.

**उपजायते**, उत्पन्न होतो.
**उपजे**, उत्पन्न होई.
**उपढौकयामः**, नजर देऊं.
**उपतिष्ठते**, ताबेदारींत उभा रहातो.
**उपत्यका**, स्त्री० (का) खिंड, खोरें.
**उपदेशसि**, मसलत देतोस.
**उपदेश**, पु० (शः) शिकवणी.
**उपदेशिन्**, पु० (शी) उपदेश करणारा.
**उपनिषद**, वेदभाग.
**उपनेतव्य**, वि० (व्यः व्या- व्यं) नेण्याला योग्य.
**उपन्यस्त**, वि० (स्तः स्ता- स्तं) ठेवलेलें.
**उपन्यास**, न० (सं) गहाण.
**उपपत्ति**, स्त्री० (त्तिः) निर्वाह.
**उपपादित**, न० (तं) बोललेलें.
**उपपीडयेत**, पीडावें.
**उपभुज्यताम्**, खाल्लें जावो, खावो.
**उपभोग्य**, वि० (ग्यः ग्या- ग्यं) भोगावयास योग्य.
**उपमन्यु**, पु० (न्युः) वि० नांव.
**उपयामि**, समोर जाणें.
**उपयुक्त**, वि० (क्तः क्ता- क्तं) उपयोगाचा, उपयोगी.
**उपरति**, स्त्री० (तिः) वैराग्य.
**उपरती**, स्त्री० (ती) वैराग्य.
**उपरम**, पु० (मः) शांती.
**उपरुध्य**, अ० अडवून.
**उपर्युपरि** अ० वरवर ह्या अर्थी.
**उपल** पु० (लः) पाषाण.
**उपलक्षित**, वि० (तः ता- तं) जाणलेलें.
**उपवर्णन**, न० (नं) कथन करणें.
**उपविश्यताम्**, बसावें.
**उपविष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) बसलेला.
**उपवेश्य**, अ० बसवून ह्या अर्थी.
**उपशम**, पु० (मः) शांती.
**उपशांति**, स्त्री० (तिः) शांती.
**उपष्टंभ**, पु० (भः) आधार.
**उपसर्पति**, जवळ जातो.
**उपसंहरते**, आवरतो.
**उपसुंद**, पु० (दः) दैत्यविशेष.
**उपसृत्य**, अ० जवळ जाऊन.
**उपसेवा**, स्त्री० (वा) चाकरी.
**उपस्तंभ**, पु० (भः) टेंका, आधार.
**उपस्थित**, वि० (तः ता- तं) आलेला.
**उपहत**, वि० (तः ता- तं) दुःखावलेला.
**उपहतक**, वि० (कः का-कं) वाईट दैवाचा.
**उपक्षय**, पु० (यः) नाश.
**उपाख्यान**, न० (नं) गोष्ट.
**उपागत**, पु० (तः) प्राप्त.
**उपागम्य**, अ० जवळ जाऊन.
**उपांत** पु० (तः) शेवट.
**उपाधि**, माया. २ मन. ३ विकार. ४ विघ्न.
**उपानहगूढ**, न० (ढं) जोडयानें आच्छादिलेलें.
**उपायचिंता**, स्त्री० (ता) युक्तिचिंतन.
**उपायज्ञ**, वि० (ज्ञःज्ञा-ज्ञं) उपाय जाणणारा.
**उपार्जित**, वि० (तः ता- तं) मिळविलेलें.
**उपालंभ**, पु० (भः) निंदा.
**उपाव**, उपाय.
**उपांशु**, अ० अगदीं हळू.
**उपांशुक्रीडित**, वि० (तः ता तं) हळू खेळलेला.
**उपासना**, स्त्री० (ना) भक्ति.
**उपास्ति**, स्त्री० (स्तिः) उपासना.
**उपास्यमान**, पु० (नः) ज्याची चाकरी केली तो.

**उपेत**, वि० (तः ता- तं) आलेला. २ युक्त.
**उपेक्षण**, न० (णं) कानडोळा करणें. २ सोसणें. ३ उपेक्षा.
**उपेक्षा**, स्त्री० (क्षा) दुर्लक्ष्य. २ त्याग.
**उपेक्षिलें**, सोशिलें.
**उपेक्ष्यते**, उपेक्षा करितो.
**उपैति**, जवळ येतो, पावतो.
**उपोढ**, पु० (ढः) लग्न झालेला.
**उपोढा**, स्त्री० (ढा) लग्न झालेली.
**उफराटि**, उलटी.
**उफाळलें**, उसळलें, उडालें.
**उबगशील**, कंटाळशील.
**उभय**, पु० (यः) दोन्ही.
**उभयगुण**, वि० (णः णा- णं) दोन्ही गुण ज्याच्या आंगीं आहेत तो.
**उभारी**, उभारणें.
**उमजाना**, समजाना.
**उभौ**, पु० (भौ) दोघे.
**उमाणे**, मोजवे.
**उमाठा**, उदय.
**उमाळा**, लोट, हुंदका. २ आकार.
**उमोप**, पुष्कळ.
**उरवी**, बाकी ठेवा.
**उरी**, बाकी, शेष.
**उरुगाय**, पु० (यः) ईश्वर. २मोठा कीर्तिमान.
**उरोज**, पु० (जः) स्तन.
**उर्ध्वरेतस्**, पु० (ता) ब्रम्हचारी.
**उलतें**, तडफडतें.
**उल्का**, स्त्री० (ल्का) कोलीत. २ जळकें लांकूड.
**उल्लसणें**, विकासास पावणें.
**उल्लसित**, वि० (तः ता- तं) शोभलेलें.
**उल्लासित**, पु० (तः) आनंदीत.
**उल्लिखित**, वि० (तः ता- तं) खरडलेलें.
**उवाच**, बोलला.
**उशनस**, पु० (सः) शुक्र.
**उषन**, पु० (नः) शुक्राचार्य.
**उषित**, वि० (तः ता- तं) राहिलेला.
**उष्णकाल**, पु० (लः) उन्हाळा.
**उह्यते**, ओढिला जातो.

---

## ऊ.

**ऊचतुः**, दोघे बोलले.
**ऊन**, उणें, न्युन. २ उष्ण.
**ऊरीकृत्य**, अ० कबूल करून.
**ऊर्जित**, पु० (तः) उत्तम.
**ऊर्द्ध्वम्**, अ० वर, वरती.
**ऊहति**, तर्क करितो.

---

## ऋ.

**ऋणकर्तृ**, पु० (र्ता) रिणकोनाम.
**ऋणदातृ**, पु० (ता) कर्ज फेडणारा.
**ऋतुदान**, पु० (नः) रति.
**ऋते**, अ० वांचून, खेरीज.

---

## ए.

**एकचित्त**, वि० (त्तः त्ता- त्तं) एक चित्ताचा.
**एकचित्तिभूय**, अ० एक चित्त होऊन.
**एकतर**, पु० (रः) दोहोंतून एक.
**एकत्र**, अ० एक जागीं.
**एकदेश**, पु० (शः) एक तुकडा, भाग.
**एकरसिक**, वि० (कः का- कं) अनन्य रसिक.
**एकवास**, पु० (सः) एका घरचा.

एकाकी, एकटा.
एकांत, पु० (तः) एकांत, निवांत.
एकांतकरुण, वि० (णः णा- णं) मोठा दयाळू.
एकांततः, अ० अतिशय, फार.
एकांतविहारिन्, पु० (री) एकटा फिरणारा.
एकांते, अ० निवांतीं.
एकार्थ, पु० (र्थः) एका अर्थाचा.
एकेपातीं, एके पंक्तीस.
एकैक, पु० (कः) एकेक.
एकैकशः, अ० एका मागून एक.
एणांक, पु० (कः) चंद्र.
एणी, स्त्री० (णी) हरिणी.
एतद्, हें.
एतादृश, वि० (शः शा-शं) असा.
एतावत्, अ० इतकें,
एतावान्, पु० (न्) इतका.
एति, जातो.
एधेते, दोघे वाढतात.
एनम्, याला,
एवंदुःसह, पु० (हः) इतका सोसण्याला कठिण.
एवंभूत, वि० (तः ता- तं) या सारिखें.
एवमेव, अ० असेंच.
एवंविध, वि० (धः धा-धं) या प्रकारचा.
एष, पु० (षः) हा.
एष्यति, जाईल.
एहि, ये.

ऐ.

ऐकते, ऐकणारे.
ऐकमत्य, न० (त्यं) एक जूट.
ऐरावती, हत्ती.
ऐश्वर्य, न० (र्यं) सत्ता, स्वामित्व.
ऐसा, असा.
ऐहिक, न० (कं) या लोकचें.

ओ.

ओपलि, दिलें.
ओषधि. स्त्री० (धिः) औषधि.
ओसरे, जाई.

औ.

औपम्य, न० (म्यं) सारखेपणा.

क.

कई, केव्हां.
कंचा, कोणता,
कंचित्, पु० (त्) कोणीएक.
कंटकभुज्, पु० (क्) कांटे खाणारा, उंट.
कटल, पु० (लः) सैन्य.
कटलबागुल, सैनारूप बागुल.
कटिमंडल, पु० (लः) कमरेचा घेर.
कटु, पु० (टुः) कडू.
कठिनी, स्त्री० (नी) खडू. २ करंगळी.
कंडूयनक, वि० (कः का- कं) कंडू खाजविणारा.

**कतम**, कोण.
**कति**, किती.
**कतिपय**, कांहींएक.
**कथंकथमपि**, अ० कसें तरी ह्या अर्थी.
**कथन**, न० (नं) सांगणें.
**कथयामि**, सांगतों.
**कथा**, स्त्री० (था) गोष्ट.
**कथाछल**, न० (लं) गोष्टीचें मिष.
**कथाप्रसंग**, पु० (गः) संभाषण.
**कथायोग**, पु० (गः) गोष्टीचा योग.
**कथारंभकाल**, पु० (लः) गोष्टी सुरु होण्याची वेळ.
**कथाराम**, पु० (मः) कल्पित कादंबरी.
**कथालाप**, पु० (पः) वर्णन.
**कथासंग्रह**, पु० (हः) गोष्टींचा जमाव.
**कथिका**, स्त्री० (का) कढी.
**कथित**, पु० (तः) स्त्री० न० (ता- तं) सांगितलेलें.
**कदन**, पु० (नः) युद्ध. २ नाश.
**कदम**, पाऊल.
**कदर्थ**, पु० (र्थः) अवमान.
**कदर्थित**, वि० (तः ता- तं) नाकारलेलें.
**कदर्यु**, वि० (र्युः र्युः र्यु.) कृपण.
**कदर्युचा डेरा**, कृपणाचा ठेवा.
**कदा**, अ० केव्हां ह्या अर्थी.
**कदाचन**, अ० कधींही ह्या अर्थी.
**कदापि**, अ० केव्हांही ह्या अर्थी..
**कनकबीज**, न० (जं) धोत्र्याचें बीं.
**कनकलतिका**, स्त्री० (का) सुवर्णाची वेल.
**कनकसूत्र**, न० (त्रं) सोन्याची दोरी.
**कनवाळपण**, दयाळूपण.
**कपटप्रबंध**, पु० (धः) ठकविण्याची मसलत.
**कपटवचन**, न० (नं) दग्याचें भाषण.
**कपर्दक**, पु० (कः). कवडी.
**कंपमान**, पु० (नः) कांपणारा.
**कपिल**, पु० (लः) कपिल मुनी.
**कपिला**, स्त्री० (ला) काळी गाय. २ एक रंगी गाय.
**कपिलास्य**, न० (स्यं) कपिल मुनीचें तोंड. २ पिंगटवर्ण तोंड. ३ वि० (स्यः स्या- स्यं) ज्याचें पिंगटवर्ण तोंड आहे तो.
**कपी** पु० (पी) वानर.
**कपोतराज**, पु० (जः) पारव्यांचा राजा.
**कपोल**, पु० (लः) गाल.
**कफनाशन**, वि० (नः ना- नं) कफ घालविणारें (औषध वगैरे.)
**कफावती**, कलावती.
**कबरीभार**, पु० (रः) वेणी.
**कमनीय**, पु० (यः) इच्छिण्यास योग्य.
**कमलतंतु**, पु० (तुः) कमलाचा देंठ.
**कमलनेत्र**, पु० (त्रः) कृष्ण. २ वि० (त्रः त्रा- त्रं) कमलाकार ज्याचे नेत्र आहेत तो.
**कमलाकांत**, पु० (तः) कृष्ण.
**कमलापति**, पु० (तिः) विष्णु.
**करगा**, हस्तगत.
**करटक**, पु० (कः) एका कोल्ह्याचें नांव.
**करटिन्**, पु० (टी) हत्ती.
**करणीय**, न० (यं) जें करावयाचें तें.
**करतल**, न० (लं) हाताचा तळवा.
**करतव्य**, करावा. २ करणें.
**करपंजक**, पु० (कः) हस्तकमल.
**करपुष्कर**, न० (रं) शुंडाग्र. २ पु० (रः) हस्तकमल.
**करपोट**, पु० (टः) मणगट.

करग्राम, पु० (मः) हातीं आलेलें.
करांबुज, न० (जं) हस्तकमल.
करालंब, पु० (बः) हाताचें सहाय्य.
कराला, स्त्री० (ला) स्त्रीचें नांव.
करिता, स्त्री० (ता) गजता, गजपणा.
करुणाब्धि, पु० (ब्धिः) दयासागर.
करुणार्णव, पु० (वः) दयासागर.
करोमि, करितों.
कर्ण, पु० (र्णः) सुकाणु.
कर्णाट, पु० (टः) देशविशेष.
कर्तन, न० (नं) कापणें.
कर्तरिका, स्त्री० (का) सुरी.
कर्तव्य, वि० (व्यः व्या व्यं) करावयाचें.
कर्तव्यता, स्त्री० (ता) करावयाचें तें.
कर्तृ, पु० (र्ता) करणारा.
कर्तुम्, अ० करावयास ह्या अर्थी.
कर्दम, पु० (मः) चिखल.
कर्पूरगौर, पु० (रः) शिव.
कर्पूरगौराख्य, न० (ख्यं) ज्याला कर्पूर गौर हें नांव आहे तो. २ शिव.
कर्म, न० (र्म) कृत्य. २ नशीब.
कर्मकार, पु० (रः) लोहार. २ काम करणारा.
कर्मदोष, पु० (षः) कामाचा वाईट परिणाम. २ कामाची चूक.
कर्मवशात्, अ० कर्माप्रमाणें ह्या अर्थी.
कर्मविपर्यय, पु० (यः) कामाची अदलाबदल.
कर्मानुसारतः, अ० कर्माप्रमाणें ह्या अर्थी.
कर्षित, ओढतो.
कर्षिला, ओढिला.
कलंकी, लांछनयुक्त.
कलंदर, पु० (रः) लुगडेंविशेष.
कलशजनित, पु० (तः) अगस्ति मुनि.
कलशसंभव, पु० (वः) अगस्ति मुनि.
कलशोद्भव, पु० (वः) अगस्ति मुनि.
कलह, पु० (हः) कजा.
कलहकार, पु० (रः) कजेखोर.
कलितासी, हातीं खड्ग घेतलेला.
कलिल, न० (लं) गढूळ.
कलुष, न० (षं) पातक.
कलुषित, पु० (तः) गढूळ.
कलेवर, पु० (रः) देह.
कलीं, कलीच्या ठिकाणीं.
कल्पतरु, पु० (रुः) कल्पवृक्ष.
कल्पयाति, करितो
कल्मषध्वंसकारिन्, पु० (री) पाप नाश करणारा.
कल्यता, स्त्री० (ता) प्रकृति.
कल्याणकटक, पु० (कः) शहरवि०
कल्याणवचन, न० (नं) हित भाषण.
कल्हार, पु० (रः) कमळ.
कवण, कोण.
कवळ, घांस.
कवळितो, भेटतो.
कविजा, स्त्री० (जा) शुक्राचार्याची कन्या, देवयानी.
कविहीर, पु० (रः) कविश्रेष्ठ.
कव्यूह, पु० (हः) कवीचा तर्क.
कश्यप, पु० (पः) ऋषिवि० कण्व.
कश्चित्, पु० (त्) कोणी एक.
कषायान्वित, वि० (तः ता तं) तुरट.
कसणी, नाणें वगैरे ठेवण्याकरितां केलेली थैली.
कंसारि, पु० (रिः) कृष्ण.
कसोनि, नेसून, बांधून.
कस्तुरी, स्त्री० (री) मृगमद, कस्तुरी.

**कस्मिंश्चित्**, कोणत्या एक.

**कळानिधि**, चंद्र.

**कलि**, कलह. २ कलियुग.

**काकतालीय**, पु० (यः) एकाएकीं.

**काकतालीयवत्**, अ० अकस्मात्, एकाएकीं ह्या अर्थी.

**काकवर्तकौ**, पु० (कौ) कावळा आणि लव्हा.

**काकी**, स्त्री० (की) कावळ्याची मादी.

**काख**, खांक.

**काग**, पु० (गः) कावळा.

**कांगा**, कशाकरितां.

**काचमणि**, पु० (णिः) कांचेचा मणी.

**कांचा**, कच्चा.

**कांचावला**, भ्यालां, कचरला.

**काचित्**, कोणीएक स्त्री.

**काजरा**, कुचल्याचें झाड.

**कांड**, पु० (डः) ब्रम्हांड. २ पेर.

**कांडपात**, पु० (तः) बाणपतन.

**कांडोकांडीं**, बोटोबोटीं.

**काण**, पु० (णः) आंधळा.

**कातिया**, बरची. २ कोयता.

**कांप**, भीति.

**कापि**, स्त्री० (पिः) कोणतीही.

**कापुरुष**, पु० (षः) वाईट मनुष्य.

**कामद**, वि० (दः दा- दं) इच्छा तृप्त करणारा.

**कामदेव**, पु० (वः) मदन.

**कामधेनु**, स्त्री० (नुः) इच्छिलें देणारी गाय.

**कामना**, स्त्री० (ना) इच्छा.

**कामम्** अ० सोपेपणानें ह्या अर्थी.

**कामयते**, इच्छितो.

**कामधुक्**, पु० (क्) इच्छित देणारा.

**कामाग्नि**, पु० (ग्निः) कामरूपि विस्तव.

**कामाग्निसंदीपन**, न० (नं) कामज्वर उत्पन्न होणें. २ पु० (नः) कामज्वर उत्पन्न करणारा.

**कामाचार**, पु० (रः) यथेष्टाचार. २ वि० (रः रा- रं) स्वच्छंद.

**कामारि**, पु० (रिः) मदन.

**कामासक्त**, पु० (क्तः) विषयी, विषय लंपट.

**कामिता**, स्त्री० (ता) कमीपणा. २ इच्छा.

**कामी**, उपयोगी. २ विषयी.

**कायक्लेश**, पु० (शः) शरीर दुःख.

**कारक**, वि० (कः का- कं) करणारा. २ बांधणारा.

**कारंटा**, कारटा.

**कारयामास**, करविलें.

**कारस्थान**, पु० (नः) बेत. २ कपट.

**कारागृह**, न० (हं) तुरुंग, बंदीशाळा.

**कारिन्** , पु० (री) कर्ता.

**कार्पण्य**, न० (ण्यं) चिकटपणा.

**कार्पासराशि**, स्त्री० (शिः) कापसाचा ढीग.

**कार्मुक**, पु० (कः) धनुष्य.

**कार्मुकी**, पु० (की) धनुष्य धरणारा.

**कार्यकारण**, न० (णं) जन्य जनक.

**कार्यकारणतः**, अ० विशेषेंकरून ह्या अर्थी.

**कार्यकाल**, पु० (लः) कामाची वेळ.

**कार्यतः**, अ० कामापासून ह्या अर्थी.

**कार्यवत्**, अ० कामासारखें ह्या अर्थी.

**कार्यसंदेह**, पु० (हः) कामाचा संशय,

**कार्यसागर**, पु० (रः) मोठें प्रचंड काम.

**कार्यसिद्ध**, स्त्री० (द्धिः) कार्य सिद्धी.

**कार्याकारण**, कारणपरत्वें.

**कार्याब्धि**, पु० (ब्धि:) मोठें प्रचंड काम.

**कार्याक्षम**, वि० (म: मा-मं) कोणतेंही कार्य करण्याविषयीं असमर्थ.

**काल**, पु० (ल:) वेळ. २ महादेव.

**कालक्रमण**, न० (णं) काळक्षेप.

**कालखंज**, पु० (जः) दैत्यवि०.

**कालत्रय**, पु० (य:) त्रिकाळ.

**कालदंड**, पु० (ड:) मृत्यु हाच काठी.

**कालपाश**, पु० (श:) मृत्यूचा पाश, यमपाश.

**कालयाप**, पु० (प:) वेळ जाणें.

**कालयापन**, न० (नं) वेळ घालविणें.

**कालयोधिन्**, पु० (धि:) वेळ जाणणारा.

**कालवे**, पाट. २ मिळे. ३ मन्द्रुर्वे.

**कालांतरें**, अंतरानें.

**कालाही**, काळसर्प.

**कालिमन्** काळेपणा.

**कालोद्भट**, पु० (ट:) यमाशिरचा (मोठा.)

**काष्ठघटित**, वि० (त:ता-तं) लांकडाचा केलेला.

**कास**, कासोटा. २ आश्रय. ३ कंबर.

**कासया**, कशाला.

**कांहींवांहीं**, थोडें थोडें.

**कालिमा**, कलंक. डाग.

**किंकरी**, स्त्री० (री) दासी.

**किंच**, अ० आणखी ह्या अर्थी.

**किंचित्काल**, पु० (ल:) थोडका वेळ.

**किंतु**, अ० परंतु. २ संशय, भ्रांति ह्या अर्थी.

**किन्नु**, अ० काय ह्या अर्थी.

**किंपुनर**, अ० आणखींही ह्या अर्थी.

**किमथ**, अ० खचित, निश्चित ह्या अर्थी.

**किमपि**, पु० (पि:) कांहींही. २ कधीं, कदापि.

**किमर्थम्**, अ० कशाकरितां ह्या अर्थी.

**किमिति**, अ० कशासाठीं ह्या अर्थी.

**किमु**, अ० किंवा अधिक ह्या अर्थी.

**किमुत**, अ० किंवा कधीं ह्या अर्थी.

**कियत्**, किती.

**कियद्दूर**, पु० (र:) कांहीं लांब.

**किरात**, पु० (त:) भिल्ल.

**किल**, अ० खचित ह्या अर्थी.

**किल्मिष**, न० (षं) पाप.

**किंवदंती**, स्त्री० (ती) गप्प.

**किंपराटक**, पु० (क:) हिशेब न पहाणारा.

**किंवा**, अ० अथवा ह्या अर्थी.

**किंशुक**, पु० (क:) पळस (वृक्ष.)

**किशोर**, पु० (र:) बालक.

**किष्किंधा** स्त्री० (धा) वालीची नगरी.

**किंक्षण**, पु० (ण: कोणता क्षण.

**कीज**, कणीक.

**कीटक**, किडा.

**कीदृग्व्यापारवत्**, पु० (वान्) कोणत्या कर्माचा.

**कीदृश**, पु० (श:) कोणता. २ कसा.

**कीनाश**, पु० (श:) यम.

**कीरवाणी**, स्त्री० (णी) शुकवाणी.

**कीर्तिकरी**, स्त्री० (री) कीर्ति करणारी.

**कीर्तित**, वि० (त: ता-तं) सांगितलेले.

**कीर्तिप्रतापबलसहित**, पु० (त:) कीर्ति प्रताप बल यांशीं युक्त.

**कीर्तियुत**, पु० (त:) स्त्री० न० (ता-तं) नामांकित.

**कुकृत्य**, न० (त्यं) वाईट काम.

**कुटुंबक**, न० (कं) मुलें माणसें.

**कुठार**, कुऱ्हाड.
**कुंडलि**, स्त्री० (लिः) अशुद्धाच्या ठिकाणीं वर्तुळाकृती जी खूण ती.
**कुडी**, शरीर.
**कुडें**, वाईट. २ कर्णभूषण.
**कुतः**, अ० कोठून ह्या अर्थी.
**कुतश्चित्**, अ० कोठूनही ह्या अर्थी.
**कुत्र**, अ० कोठें ह्या अर्थी.
**कुंद**, पु० (दः) वृक्षविशेष.
**कुदशा**, स्त्री० (शा) विपत्ति, हाल.
**कुन्हा**, वैमनस्य, डांच.
**कुपंक**, पु० (कः) उकीरडा.
**कुपित**, वि० (तः ता- तं) रागें भरलेला.
**कुंभिनीपाल**, पु० (लः) पृथ्वीपति. २राजा.
**कुमति**, स्त्री० (तिः) वाईट बुद्धि.
**कुमर**, पु० (रः) बालक. २ कार्तिक स्वामी.
**कुमुदाक्षी**, स्त्री० (क्षी) कमलासारखे जिचे नेत्र आहेत ती.
**कुमुदिनीनायक**, पु० (कः) कमळणीचा स्वामी.
**कुरवंडीन**, ओंवाळीन.
**कुरु**, पु० (रुः) कौरव.
**कुरु**, कर.
**कुरुकुलचंदनद्रुभुजग**, पु० (गः) दुर्योधन. २ कौरव कुलरूपचंदन वृक्षावरील जो सर्प तो.
**कुरुवृद्ध** पु० (द्धः) भीष्म.
**कुरुळीं**, कुरळ केशांस.
**कुरूप**, पु० (पः) ओंगळ. २ वि० (पः पा- पं) वाईट रूपाचा.
**कुर्मः**, करितों.
**कुर्यात्** , अ० करो.
**कुलंधम**, पु० (मः) कौरवांत नीच असा जो (दुर्योधन) तो.
**कुलनारी**, स्त्री० (री) कुलीन स्त्री.
**कुलपति**, पु० (तिः) कुलपुरुष, कुलांतील मुख्य.
**कुलमर्यादा**, स्त्री० (दा) कुलांतील रीत.
**कुलवधू**, स्त्री० (धूः) कुलीन स्त्री.
**कुलांगना**, स्त्री० (ना) प्रतिष्ठित स्त्री.
**कुलाचार**, पु० (रः) कुलांतील चाल.
**कुलालंबिन्**, पु० (बी) कुलाला अनुसरून वागणारा.
**कुलिशपाणि**, पु० (णिः) इंद्र.
**कुल्लाल**, पु० (लः) कुंभार.
**कुशब्द**, पु० (ब्दः) वाईट शब्द.
**कुशस्थळी**, पुण्यकारक स्थलवि०
**कुशहस्त**, पु० (स्तः) ज्याच्या हातांत दर्भ आहेत तो.
**कुशांगुलि**, स्त्री० (लिः) दर्भाचें पवित्रक.
**कुशाग्र**, पु० (ग्रः) दर्भाचा शेंडा.
**कुशूल**, पु० (लः) कोठार.
**कुसरित**, पु० (तः) ओढा.
**कुसुमचाप**, पु० (पः) मदन.
**कुसुमशर**, पु० (रः) मदन.
**कुसुमस्तबक** पु० (कः) माळ.
**कुहक**, पु० (कः) कपट.
**कुळपति**, कुलपति हा शब्द पहा.
**कूप**, पु० (पः) विहीर.
**कूपमंडूक**, पु० (कः) विहिरींतील बेडूक.
**कूपोदक**, न० (कं) विहिरीचें पाणी.
**कूर्पर**, पु० (रः) कोंपर.
**कृछ्रगत**, वि० (तः ता- तं) संकटांत किंवा पेचांत सांपडलेला.
**कृछ्र**, न० (छ्रं) कष्ट, दगदग. २ प्रायश्चित्त

कृतकृत्य, वि० (त्यः त्या- त्यं) धन्य.
कृतघ्न, पु० (घ्नः) दुष्ट.
कृतघ्नता; स्त्री० (ता) उपकार न जाणणें.
कृततनुत्राण, वि० (णः णा- णं) ज्याणें शरीराचें संरक्षण केलें तो.
कृतधी, पु० (धीः) बुद्धिवान्. २ ज्ञाता.
कृतनाशक, वि० (कः का- कं) कृतघ्न.
कृतनिश्चय, पु० (यः) ज्याणें निश्चय केला आहे तो.
कृतपूर्वनाशन, न० (नं) पूर्वी केल्याचें विस्मरण.
कृतप्रयत्न; पु० (त्नः) ज्याणें प्रयत्न केला तो.
कृतवत्, अ० केल्यासारखें ह्या अर्थी.
कृतश्रम, पु० (मः) ज्याणें श्रम केले तो.
कृतसंबंध, न० (धं) ज्याणें संबंध केला तो.
कृतस्वेछाहार, पु० (रः) इच्छेनुरूप ज्याणें भक्षण केलें तो.
कृतज्ञता, स्त्री० (ता) उपकार जाणणें.
कृतांतभगिनी, स्त्री० (नी) यमुना नदी.
कृताभ्यास, पु० (सः) ज्याणें अभ्यास केला तो.
कृतार्तनादा, स्त्री० (दा) दुःखाची आरोळी फोडणारी.
कृतावास, पु० (सः) ज्याणें वस्ती केली तो.
कृति, स्त्री० (तिः) काम. २ कारणें.
कृते, करितां, साठीं.
कृत्वा, अ० करून ह्या अर्थी.
कृयाः, कर.
कृप, पु० (पः) कृपाचार्य.
कृपा, स्त्री० (पा) दया.
कृपाकरे, कृपा करणारे.
कृपादृष्टि, स्त्री० (ष्टिः) दयेनें पहाणें.
कृमिहर, वि० (रः रा- रं) किड्यांचा नाश करणारा.
कृशोदरी, स्त्री० (री) सिंहकटी स्त्री.
कृष्णसर्प, पु० (र्पः) काळासर्प.
कृष्णा, स्त्री० (ष्णा) काळी. २ द्रौपदी. ३ यमुना नदी.
कृष्णायते, कृष्णाय.
केउती, कोणती.
केतन, पु० (नः) ध्वज.
केतु, पु० (तुः) ध्वज. २ केतुनामक ग्रह.
केन, कोणीं.
केनचित्, कोणीं तरी.
केनापि, कोणीहो.
केवळ, इतर. २ मात्र.
केंषि, कणा-श्री-में.
केशर, पु० (रः) आयाळ.
केशरिन्, पु० (री) सिंह.
केशी, पु० (शी) दैत्यविशेष.
केषांचित्, कोणाचाही.
केसरी सिंह.
कैः, कोणीं.
कैकेयात्मज, पु० (जः) भरत. २ भातमु.
कैंचं, कशाचें.
कैटभ, पु० (भः) दैत्यविशेष.
कैटभारी, पु० (री) कैटभासुर हंता विष्णु.
कैरविणी, स्त्री० (णी) चंद्र विकासित कमळिणी,
कैवारी, कैवार घेणारा.
कैसनी, कसें.
कोकशाळा, स्त्री० (ळा) पक्षी ठेवण्याची जागा. २ शिकारखाना. ३ स्त्रिया ठेवण्याची जागा.
कोकिळा, स्त्री० (ला) कोकिळा

**कोड**, कौतुक. २ कुष्टरोग.
**कोडी**, वीस. २ विशी. ३ ज्यास कोड आहे तो.
**कोपाकुल**, पु० (लः) रागावलेला.
**कोपि**, कोणीही.
**कोश**, पु० (शः) खजीना.
**कोषवत्**, पु० (वान्) मातबर.
**कौंडिन्य**, पु० (न्यः) ऋषिविशेष.
**कौंतेय**, पु० (यः) कुंतीचा पुत्र.
**कौमार**, न० (रं) पोरवय.
**कौर्म**, वि० (र्मः र्मी- र्मं) कासवासारिखें.
**कौलिक**, पु० (कः) मांत्रिक.
**कौशल्याधर**, पु० (रः) दशरथ.
**क्रमभंग**, पु० (गः) अनुक्रम मोडणें.
**क्रमशः**, अ० क्रमानें ह्या अर्थी.
**क्रमित**, चालवीत.
**क्रमितां**, चालतांना.
**क्रय**, पु० (यः) विक्री.
**क्रयक्रीत**, न० (तं) विकत घेतलेलें.
**क्रियते**, केलें जातें.
**क्रियाविधि**, पु० (धिः) करण्याची रीत.
**क्रियाविधिज्ञ**, पु० (ज्ञः) करण्याची रीत जाणणारा.
**क्रीडंति**, खेळतात.
**क्रीडन**, न० (नं) खेळ.
**क्रीडासरस्**, न० (रः) खेळण्याचें तळें.
**क्रीत**, पु० (तः) विकत घेतलेलें.
**क्रुद्ध**, वि० (द्धः द्धा- द्धं) संतापलेला, रागावलेला.
**क्रूरसर्पवत**, अ० रागीट सापाप्रमाणें.
**क्रोधिन**, रागीट.
**क्रोधोद्धत**, पु० (तः) क्रोधें करून उत्संखळ.
**क्रोशमात्रस्थित**, पु० (तः) कोसावरचा.
**क्रोष्टा**, कोल्हा.
**क्लिश्यंते**, दुःख पावतात.
**क्लैब्य**, न० (ब्यं) दैन. २ नपुंसकपण.
**क्व**, अ० कोठें ह्या अर्थी.
**क्वचित्**, अ० कोठें तरी. २ क्वचित्.
**क्वणन्**, पु० (नुः) स्त्री० न० (नुः नु) शब्द करणारा.
**क्वणित**, न० (तं) ध्वनि.
**क्वापि**, अ० कोठेंही ह्या अर्थी.
**क्वासि**, कोठें आहे.

---

## ख.

**खगगमन**, पु० (नः) गरुड वाहन विष्णु.
**खगेंद्र**, पु० (द्रः) गरुड.
**खचर**, पु० (रः) पक्षि. २ राक्षस.
**खचरी**, स्त्री० (री) राक्षसी.
**खचिला**, सिद्ध केला.
**खंजनाक्षी**, स्त्री० (क्षी) जिचे डोळे खंजन पक्षासारखे आहेत ती.
**खंड**, पु० (डः) तुकडा.
**खडतर**, पु० (रः) उग्र.
**खंडन**, न० (नं) तोडणें.
**खंडय**, तोड.
**खंडविखंड**, पु० (डः) तुकडे तुकडे केलेला.
**खंडज्ञान**, पु० (नः) अल्प ज्ञानी. २ न० (नं) अल्पज्ञान.
**खंडित**, पु० (तः) तोडलेलें.
**खडून**, खुटून.
**खड्गपाणि**, पु० (णिः) ज्याच्या हातीं तरवार आहे तो.

**खनि**, स्त्री० (निः) खाण.
**खनित्वा**, अ० खणून ह्या अर्थी.
**खंबाइत**, एक प्रकारचें वस्त्र. २ ग्रामविशेष.
**खलप्रीति**, स्त्री० (तिः) दुष्ट प्रीति.
**खलबल**, पु० (लः) दुष्टाचें सैन्य.
**खलसंसर्ग**, पु० (र्गः) दुष्टसंबंध.
**खलु**, अ० खचित. २ निश्चयें करून ह्या अर्थी.
**खवळला**, रागावला.
**खळ**, दुष्ट.
**खळबळी**, हालवी.
**खाजें**, खाणे, भक्ष्य.
**खांडावया** तोडावया.
**खात**, न० (तं) खांच, खळी.
**खादामि**, खातों.
**खालवी**, नाश करणारा.
**खालवोनि**, खालीं करून.
**खासदार**, मोतद्दार.
**खिद्यते**, दुःखित होतो.
**खिळिलें**, व्यापिलें.
**खेद**, दुःख.
**खेदकारी**, दुःखदायक.
**खेदहेतु**, पु० (तुः) दुःखाचें कारण.
**ख्याति**, स्त्री० (तिः) लौकिक.

## ग.

**ग**, जाणें.
**गगनग**, पु० (गः) आकाश चारी देव.
**गगनंगडगडी**, आकाशांत गाजणारी.
**गगनविहारिन्**, पु० (री) आकाशांत फिरणारा.
**गंगातरंगसम**, भागीरथीचे तरंगासारिख, (शुभ्र.)
**गछले**, गेले.
**गजगति**, स्त्री० (तिः) मंदगति (हत्तीसम.)
**गजपुंगव**, पु० (वः) हत्तींचा राजा.
**गजपूर**, पु० (रः) हस्तनापूर.
**गजभुजंगमौ**, पु० (मौ) हत्ती आणि साप.
**गजवदन**, पु० (नः) गणपती.
**गजसंघ**, पु० (घः) हत्तींचा समुदाय.
**गजारूढ**, वि० (ढः ढा ढं) हत्तीवर बसलेला.
**गजेंद्र**, पु० (द्रः) हत्तींचा राजा.
**गंड**, गाल.
**गणगोत्र**, पु० (त्रः) आप्तजन.
**गणतील**, मोजतील.
**गणन**, न० (नं) हिशेब.
**गणना**, स्त्री० (ना) संख्या. २ मोजणें.
**गणप**, पु० (पः) गणपती. २ महादेव.
**गणयति**, हिशेब करतो, मोजतो.
**गणी**, मोजी.
**गणेश**, पु० (शः) गणपती. २ शिव.
**गतप्राण**, पु० (णः) मेलेला.
**गतवयस्क**, म्हातारा.
**गतविभव**, पु० (वः) गरीब.
**गतवीर्य**, पु० (र्यः) बळहीन.
**गतानुगतिक**, पु० (कः) दुसऱ्या प्रमाणे करणारा.
**गतायुष**, ज्याचें आयुष्य संपलें तो.
**गंतुम्**, अ० जावयास ह्या अर्थी.
**गत्वा**, अ० जाऊन ह्या अर्थी.
**गदीन**, पु० (नः) गदा युद्धांत निष्णात.
**गदीश**, पु० (शः) गदा युद्धांत निष्णात.
**गंधर्वविवाह**, पु० (हः) परस्परांच्या खुषीनें झालेलें लग्न. (गंधर्वविवाह.) २ पाट.

**गंधोद्दाम**, पु० (मः) वासें करून उद्दाम.
**गमजा**, दांडगाई.
**गमिष्यामि**, जाईन.
**गम्य**, पु० (म्यः) जावयास योग्य.
**गम्यते**, जातो.
**गर**, पु० (रः) विष.
**गरगल**, पु० (लः) विषकंठ शिव.
**गरिमा**, स्त्री० (मा) मोठेपणा.
**गरीयसी**, स्त्री० (सी) मोठी, जड.
**गरुद्रथ**, पु० (थः) गरुड पक्षि.
**गर्क**, तल्लीन.
**गर्जन**, न० (नं) आरडणें.
**गर्जना**, स्त्री० (ना) आरडा ओरड. २ मोठा शब्द.
**गर्भकठोर**, पूर्ण गर्भ.
**गर्भच्युति**, स्त्री० (तिः) गर्भपतन.
**गर्भवती**, स्त्री० (ती) गरोदर, गरभार.
**गर्भस्थ**, पु० (स्थः) गर्भातला.
**गर्वित**, वि० (तः ता- तं) फुशारखोर.
**गर्वोक्ति**, स्त्री० (क्तिः) गर्वयुक्त भाषण.
**गर्हितम्**, निंदिलेलें.
**गर्ह्यते**, निंदिला जातो.
**गलहस्तयति**, हातानें गळा दाबतो.
**गलितनखदंत**, पु० (तः) ज्याचे दंत आणि नखें गलित झालीं तो.
**गलितनखनयन**, पु० (नः) ज्याचे डोळे आणि नखें गलित झालीं तो.
**गल्ल**, पु० (लः) गाल.
**गवसला**, सांपडला.
**गवाकृति**, पु० (तिः) गाईसारखा.
**गवांपति**, पु० (तिः) सांड. २ गुराखी.
**गांग**, न० (गं) गंगाजळ.
**गाजी**, शूर, प्रतापी.
**गांठुनि**, पकडून, भेटून.
**गाढशोकप्रहरण**, पु० (णः) मोठ्या शोकाला दूर करणारा.
**गाढा**, पक्का.
**गांधार**, पु० (रः) शकुनी. २ सप्तसुरांतील तिसरा सुर.
**गानाख्या**, स्त्री० (ख्या) गायन विद्या.
**गानादिक**, गाणें इत्यादि.
**गामी**, जाणारा.
**गार**, गारगोटी. २ थंड.
**गावरी**, माशाचा कल्ला.
**गाहते**, शिरतो.
**गाहिनी**, बुडणारी.
**गिध**, गिधाड पक्षि.
**गिरिनदी**, स्त्री० (दी) पर्वतापासून झालेली नदी.
**गीत**, गाणें.
**गीर्वाण**, पु० (णः) संस्कृत भाषा.
**गीर्वाणी**, स्त्री० (णी) संस्कृत भाषा.
**गीशर**, पु० (रः) वाग्बाण. २ कठोर भाषण.
**गुज**, गुह्य.
**गुढिया**, गुज्या.
**गुणग्राम**, पु० (मः) गुणाचें स्थान. २ समूह.
**गुणग्राहिन्**, पु० (ही) गुण घेणारा.
**गुणघातिन्**, पु० (तिः) हेवेखोर.
**गुणत्व**, न० (त्वं) गुणाचा धर्म.
**गुणदोषौ**, पु० (षौ) गुण आणि दोष.
**गुणलुब्ध**, पु० (ब्धः) गुणाचा भुकेलेला.
**गुणवत्**, पु० (वान्) गुणी.
**गुणविस्तर**, पु० (रः) गुणाचा विस्तार.
**गुणवृत्ति**, स्त्री० (त्तिः) चांगली चाल.
**गुणशत**, न० (तं) १०० गुण.

**गुणसंग्रह**, पु० (हः) गुण मानणें.

**गुणस्तुति**, स्त्री० (तिः) गुण वाखाणणें.

**गुणज्ञ**, वि० (ज्ञः ज्ञा. ज्ञं) गुण जाणणारा.

**गुणागार**, पु० (रः) गुणगृह.

**गुणागुणज्ञ**, पु० (ज्ञः) गुणदोष जाणणारा.

**गुणान्वित**, वि० (तः ता. तं) गुणी.

**गुणाश्रय**, पु० (यः) गुणी.

**गुणिगण**, पु० (णः) गुणी लोकांचा समुदाय.

**गुणिता**, स्त्री० (ता) गुण.

**गुणी**, गुणवान.

**गुण्यागोविंदानी**, आनंदानी.

**गुंतवार्वे**, पांववार्वे.

**गुप्तम्**, अ० गुप्तपणें ह्या अर्थी.

**गुरुजन**, पु० (नः) गुरु मंडळी.

**गुरुत्व**, न० (त्वं) प्रतिष्टितपणा.

**गुरुनंदन**, पु० (नः) अश्वत्थामा.

**गुर्वी**, स्त्री० (र्वी) मोटी.

**गुह**, पु० (हः) कार्तिक स्वामी.

**[illegible]**, घेतो.

**[illegible]**, पु० (कौ) गृध आणि चक्रवाक [illegible]

**गृहा[illegible]**, न० (द्रं) घरांतील उणें.

**गृहनरक**, पु० (कः) घर हाच नरक.

**गृहरक्षा**, स्त्री० (क्षा) घराचें रक्षण.

**गृहस्थ**, पु० (स्थः) गृहस्थ.

**गृहाण**, [illegible]

**गृहिणी**, स्त्री० (णी) बायको.

**गृहीत**, पु० (तः) धरलेला, घेतलेला,

**गेह**, न० (हं) घर.

**गोघ्न**, वि० (घ्नः घ्ना. घ्नं) गाय मारणारा.

**गोत्र**, न० (त्रं) कुल.

**गोपद**, न० (दं) गाईचें पाऊल.

**गोपसख्या**, गाई. २ हे कृष्णा.

**गोपाध्यक्ष**, पु० (क्षः) मुख्य गोवारी.

**गोपायिता**, रक्षण कर्ता.

**गोप्ता**, पालन करणारा.

**गोप्यानि**, गुप्त.

**गोप्रदान**, न० (नं) गाय देणें.

**गोमटें**, सुंदर.

**गोमयायते**, शेणासारखें दिसतें.

**गोरक्षक**, पु० (कः) गोवारी.

**गोरोचन**, पु० (नः) गाईच्या डोक्यांतील पीत द्रव्य.

**गोवळ**, गवळी.

**गोविशी**, गुंतविशी.

**गौर**, पांढरें.

**गौरनास्ति**, गाय नसतां.

**गौरवर्णी**, स्त्री० (र्णी) शुभ्र वर्णाची.

**गौरविलें**, अलंकृत केलें. २ सन्मानिलें.

**ग्रंथ**, पु० (थः) पुस्तक.

**ग्रसते**, ग्रासतो, गिळतो.

**ग्रहनिग्रहौ**, पु० (हौ) दया आणि शिक्षा.

**ग्रहपीडन**, न० (नं) ग्रहाची पीडा.

**ग्रहीष्यति**, घेईल.

**ग्रामहर्गी**, पु० (र्गी) कुत्रा,

**ग्रामांतर**, न० (रं) दुसरा गांव.

**ग्राम्य**, गांवांतील.

**ग्रासील**, पीईल, व्यापील, गिळील.

**ग्राहयितुम्**, अ० घेण्यास ह्या अर्थी.

**ग्राहीक**, पु० (कः) ग्रहण करणारा.

**ग्राह्य**, न० (ह्यं) घ्यावयाजोगें.

**ग्रीष्म**, पु० (ष्मः) उन्हाळा.

**ग्रीष्मतरणि**, पु० (णिः) ग्रीष्मऋतूंतील कडक सूर्य.

## घ.

**घटकर्ण**, पु० (र्णः) कुंभकर्ण.

**घटा**, स्त्री० (टा) जाड घट्ट कांतडें. २ समुदाय.

**घंटा**, स्त्री० (टा) घांट.

**घंटाकर्ण**, पु० (र्णः) राक्षसविशेष.

**घटित**, पु० (तः) घडलेला.

**घनगर्जित**, न० (तं) घडघडाट. २ मेघ गर्जना.

**घनघटा**, स्त्री० (टा) मेघ समुदाय.

**घनश्याम**, पु० (मः) विष्णु. २ मेघ वर्णाचा.

**घनसार**, पु० (रः) चंदन. २ कापूर.

**घनांबु**, न० (बु) मेघोदक.

**घरघेणा**, बुडविणारा.

**घर्मात**, वि० (तःता-तं) उन्हानें पीडलेला.

**घवघवीत**, भव्य.

**घसरा**, पदच्युत व्हा. २ रगडा.

**घातकें**, घातक्यानें, दुष्टानें.

**घाय**, घाव. वृक्षवि०.

**घायाळ**, दुःखी, श्रमी. २ जखमी झालेलों. ३ घायपात.

**घाला**, हल्ला, छापा.

**घूर्णिका**, स्त्री० (का) दासी.

**घूर्णी**, खोडी काढणारा.

**घे**, घेतला. २ घेतो.

**घोटू**, घोट. २ घोट घेण्यास, पिण्यास.

**घोराकृति**, पु० (तिः) भयंकर.

**घोष**, पु० (षः) शब्द. २ गोठा.

**घोषयति**, जाहिर करतो.

**घोंस** घड.

**घ्न**, पु० (घ्नः) मारणारा.

---

## च.

**च**, अ० आणखी ह्या अर्थी.

**चकार**, केलें.

**चकित**, वि० (तः ता- तं) बुजलेला, आश्चर्य पावलेला.

**चक्रधर**, पु० (रः) चक्र धरणारा. २ कुंभार. ३ विष्णु.

**चक्रवत्**, अ० चाकाप्रमाणें ह्या अर्थी.

**चक्रव्यूह**, चक्राकार सैन्याची रचना.

**चक्रे**, केलें.

**चटक**, चिमणी. २ सवई.

**चडकणा**, चपाटा. २ चपाटी.

**चंडवात**, पु० (तः) मोठा वारा.

**चतुर**, पु० (रः) चार. २ कुशळ.

**चतुर्गुण**, चौपट.

**चतुर्थी**, स्त्री० (र्थी) तिथिवि०. दमयंती.

**चतुर्दशी**, स्त्री० (शी) तिथिवि०.

**चतुर्भद्र**, न० (द्र) चार कल्याणें.

**चतुर्विध**, न० (धं) चार प्रकारचें.

**चतुर्विधवाचा**, स्त्री० (चा) परा, पश्यंती, मध्यमा, वैखरी.

**चतुष्टय**, न० (यं) चौघांचा समुदाय. २ चार.

**चंद्रकांत**, पु० (तः) चंद्र किरणानें स्रवणारा मणी.

**चंद्रवंशैकशालिन्**, पु० (ली) चंद्र वंशास शोभविणारा.

**चंद्रार्कौ**, पु० (र्कौ) चंद्र आणि सूर्य.

**चंद्रार्धचुडामणि**, पु० (णिः) शिव.

**चपलता**, स्त्री० (ता) चपलपणा.

**चपेटा**, हेलपटा.

**चमूयात्रा**, स्त्री० (त्रा) सेनासमुदाय.

**चरणपद्म**, पु० न० (द्मः द्मं) पादकमल.

**चरणांबुज**, पु० (जः) चरणकमल.

**चरणाभरण**, न० (णं) पायांतील दागिना.
**चरन**, फिरणारा, चरणारा.
**चरसि**, फिरतोस.
**चरित**, न० (तं) चरित्र.
**चर्चा**, स्त्री० (र्चा) विचार, वाटाघाट.
**चर्चुनी**, लावून.
**चर्मबंध**, पु० (धः) वादी (चामड्याची)
**चर्मावृत**, वि० (तः ता- तं) कातड्यानें मढविलेलें.
**चर्मावृता**, स्त्री० (ता) कातड्यानें मढविलेली.
**चलचित्तता**, स्त्री० (ता) चांचल्य.
**चलति**, हालतो, जातो. २ उत्कर्ष.
**चक्षुर्विषय**, वि० (यः या- यं) डोळ्याला दिसणारा.
**चाखे**, घेई. २ चव घेई.
**चांचपडे**, चांचपावयास लागे.
**चाटु**, पु० न० (टुः टु) खुशामत, आर्जव- २ लांकडाची पळी.
**चाड**, गरज.२ प्रतिष्टा.
**चाणक्य** पु० (क्यः) एका ब्राम्हणाचें नांव.
**चापल्य**, त्वरा, घाई.
**चापेल**, दाबील.
**चारुदत्त**, पु० (त्तः) एका मनुष्याचें नांव.
**चारुमती**, स्त्री० (ती) चांगल्या बुद्धीची.
**चारोळ्या**, चंदनाचें बीज.
**चालन**, न० (नं) हालवणें, चालनें.
**चिकित्सा**, स्त्री० (त्सा) रोगाचा प्रतिकार, रोगाची परीक्षा.
**चिकीर्षित**, न० (तं) मनांतील उद्देश.
**चिछेद**, तोडिलें.
**चिंत**, इच्छाकर.
**चिंतन**, स्मरण.
**चिंतयामि**, विचार करतों.
**चिंता**, स्त्री० (ता) काळजी.
**चित्तचतुष्टय**, न० (यं) मन, बुद्धी, चित्त आणि अहंकार.
**चित्तविकारिन्**, पु० (री) ज्याचें मन चंचल तो.
**चित्रकथालापसुख**, न० (खं) नाना प्रकारच्या कथेंपासून जो आनंद तो.
**चित्रकर्ण**, पु० (र्णः) उंटाचें नांव.
**चित्रकर्मन्**, न० (र्म) चितार्‍याचें कसब.
**चित्रगत**, पु० (तः) चित्रांतील.
**चित्रचित्र**, न० (त्रं) अजब, अपूर्व.
**चित्रपदक्रम**, पु० (मः) नाना प्रकारच्या गती चालणारा.
**चित्रबर्ह**, पु० (र्हः) सुंदर रंगीत पक्ष आहेत ज्यास तो.
**चित्रलिखित**, पु० (तः) चित्रांत काढलेला.
**चित्रांग**, वि० (गः गा- गं) चित्रविचित्र अंगाचा.
**चित्रित**, पु० (तः) रंगविलेला.
**चिदात्मक**, पु० (कः) चैतन्याकडे मन लावणारा.
**चिदाभास**, पु० (सः) चैतन्याचा आभास.
**चिदाभ्यास**, पु० (सः) तत्ववस्तूचा अभ्यास करणें.
**चिन्मय**, पु० (यः) मोक्ष.
**चिन्मयखाणी**, स्त्री० (णी) चैतन्याचा ठेवा.
**चिरकाल**, सर्वकाळ, सदोदित.
**चिरकालोपार्जित**, पु० (तः) फार दिवसांनीं मिळविलेला.
**चिरकाळ**, चिरकाळ शब्द पहा.
**चिरप्रवासी**, पुष्कळ काळपर्यंत ज्याणें प्रवास केला तो.

**चिरमित्र**, पु० (त्रः) जुना मित्र.
**चिरसमय**, पु० (यः) सर्वकाळ, सदोदित.
**चिरसेवक** पु० (कः) जुना चाकर.
**चिररोध**, पु० (धः) फार दिवसांचा अटकाव.
**चिराश्रित**, पु० (तः) फार दिवस आश्रयलेला.
**चुनडी**, वस्त्रविशेष.
**चुबति**, मुका घेतो.
**चुंबन**, न० (नं) मुका.
**चूर्णित**, वि० (तः ता- तं) चुरा केलेला.
**चेत**, अ० जर ह्या अर्थी.
**चेतसा**, अंतःकरणानें ह्या अर्थी.
**चेता**, जागा, निजलेला नव्हे तो.
**चेंदा** चुराडा.
**चेदिभुभृत्**, पु० (त्) चेदी देशाचा राजा (शिशुपाळ.)
**चेवविता**, जागा करणारा.
**चेष्टा**, स्त्री० (ष्टा) हालणें. २ क्रिया. ३ थट्टा.
**चेष्टानिरूपण**, न० (णं) कामाचें वर्णन.
**चेष्टेत**, यत्न करो.
**चैतन्य**, जीवित्व, जीवकळा.
**चोज**, कौतुक, नवल.
**चोरु**, चोर, तस्कर,
**चौगुण**, चौपट.
**चौरतः**, चोरांपासून ह्या अर्थी.
**च्युति**, स्त्री० (तिः) पडणें.

## छ.

**छंद**, पु० (दः) वृत्त.
**छंदानुवृत्त**, न० (त्तं) मनास वाटेल तसें करणें.
**छायानायक**, पु० (कः) सूर्य.
**छायापुरुषौ**, पु० (षौ) छाया व पुरुष.
**छावा**, हत्तीचा बच्चा.
**छिनत्ति**, तोडतो, कापतो.
**छिन्नद्रुम**, पु० (मः) कापलेलें झाड.
**छिन्नबधन**, पु० (नः) ज्याचें बंधन तुटलें तो.
**छेत्ता**, तोडणारा.
**छेत्तुं**, अ० तोडण्यासाठीं.
**छेत्तुः**, तोडणाऱ्याचा.
**छेत्स्यामि**, तोडीन.
**छेद्य**, वि० (द्यः द्या- द्यं) तोडण्यास योग्य.

## ज.

**जग**, विश्व.
**जगतीपति**, पु० (तिः) पृथ्वीचा धनी, राजा. २ विष्णु
**जगतीपाल**, पु० (लः) ईश्वर. २ राजा.
**जगत्पाल**, पु० (लः) ईश्वर.
**जगदाभरण**, पु० (णः) जगत्पालक.
**जगदीश**, पु० (शः) ईश्वर.
**जगद्गुरु**, पु० (रुः) विश्वामित्र. २ ईश्वर.
**जगद्घातिन्**, पु० (ती) जगाचा नाश करणारा शंकर.
**जगन्नायक**, पु० (कः) ईश्वर.
**जगाम**, गेला.
**जघान**, मारिलें.
**जंघाल**, पु० (लः) उंच.
**जंघी**, जंघावान, ज्याला मांड्या आहेत तो.
**जंजाळ**, उच्छाद, त्रास.
**जठराग्नि**, पु० (ग्निः) पोटांतील अग्नि.
**जणो**, जाणो.

**जन**, लोक.

**जनकजा**, स्त्री० (जा) सीता.

**जनकतनया**, स्त्री० (या) जनक राजाची कन्या (सीता)

**जनकात्मजा**, स्त्री० (जा) सीता.

**जनप्रवाद**, पु० (दः) बाजारगप्प.

**जनयति**, जन्म देतो, उत्पन्न करतो.

**जनाचार**, पु० (रः) लोकाचार.

**जनितृ**, पु० (ता) बाप.

**जन्मप्रभृति**, जन्मापासून.

**जन्मभूमि**, स्त्री० (मिः) उत्पत्तिस्थान, जन्मभूमि.

**जन्मांतर**, न० (रं) दुसरा जन्म.

**जन्हुकन्या**, स्त्री० (न्या) भागीरथी नदी.

**जंबुद्वीप**, जंबुद्वीप.

**जंबू**, पु० (बूः) जांबाचें झाड.

**जमदग्नि**, पु० (ग्निः) मुनिवि०.

**जयंती**, स्त्री० (ती) जिंकणारी.

**जयशब्द**, पु० (ब्दः) जयजयकार.

**जयाचे**, ज्याचे.

**जयातें**, ज्याला.

**जयिन्**, पु० (यी) जय पावणारा.

**जरंगव**, पु० (वः) एका गिधड्याचें नांव.

**जरिन्**, पु० (री) म्हातारा.

**जर्जर**, वि० (रः रा- रं) पीडित, जर्जर.

**जर्जरीकृत**, वि० (तः ता- तं) जखमी झालेला, जर्जर केलेला.

**जलकेली**, स्त्री० (ली) जलक्रीडा.

**जलचर**, पु० (रः) मत्स्य. २ जलजंतु.

**जलजनाभ**, पु० (भः) पद्मनाभ. विष्णु.

**जलदजाल**, पु० (लः) मेघ मंडळ.

**जलदागम**, पु० (मः) पावसाळा.

**जलधि**, पु० (धिः) समुद्र.

**जलपरित**, जलमय. २ जलपरिघ.

**जलबिंदु**, पु० (दुः) पाण्याचा थेंब.

**जलविहार**, पु० (रः) जलक्रीडा.

**जलाशय**, पाणथळ.

**जल्पक**, पु० (कः) बडबड करणारा.

**जल्पति**, बोलतो.

**जंव**, जो, जोपर्यंत.

**जसातसा**, वाईट बरा. २ सामान्य.

**जहाति**, सोडतो.

**जळकेळी**, जलक्रीडा.

**जागर्ति**, जागतो.

**जागवाचा**, राखावा.

**जाणता**, शहाणा.

**जातप्रत्यय**, पु० (यः) विश्वासलेला.

**जातविश्वास**, पु० (सः) विश्वासु.

**जातामर्ष**, पु० (र्षः) रागावले.

**जातिमात्रेण**, केवळ जीतानेंचला.

**जानामी**, जाणतो.

**जानियात**, जाणो.

**जानुमूल**, पु० (लः) मांडी.

**जानुमूळ**, मांडी.

**जान्हवी**, स्त्री० (वी) भागीरथी नदी.

**जान्हवीफेनलेखा**, स्त्री० (खा) गंगेच्या फेसाची ओळ—रेघ.

**जायते**, उत्पन्न होतो.

**जार**, फेस (समुद्राचा अगर दुधाचा.)

**जारद्वय**, पु० (यः) दोन जार.

**जालपाद**, पु० (दः) एका बेडकाचें नांव.

**जालबद्ध**, वि० (द्धः द्धा- द्धं) जाळ्यांत गुंतलेला.

**जास्वन**, जासवंद (फुलझाड.)

**जिगीषुषु**, पु० (षुः) जय इच्छिणारा.

**जिघांसु**, पु० (सुः) मारण्यास इच्छिणारा.

**जिघ्रति**, वास घेता, हुंगतो.
**जिणें**, वांचणें.
**जित**, वि० (तः ता- तं) जिंकलेला.
**जितश्रम**, पु० (मः) न दमणारा.
**जितेंद्रिय**, पु० (यः) ज्याणें इंद्रियें जिंकलीं आहेत तो.
**जिज्ञासा**, स्त्री० (सा) शोध, चौकशी. २ जाणण्याची इच्छा.
**जी**, महाराज.
**जीत**, जिवंत.
**जीमुकेतु**, पु० (तुः) लंकेतील राजा.
**जीर्णोद्यान**, पु० (नः) जुनी बाग.
**जीवखाणी**, स्त्री० (णी) जीवयोनी.
**जीवत्**, जिवंत.
**जीवति**, वांचतो.
**जीवय**, वांचीव.
**जीवलोक**, पु० (कः) मृत्यु लोक.
**जीवित**, न० (तं) वांचणें. २ आयुष्य. ३ प्राण.
**जीवितव्यय**, पु० (यः) प्राण देणें.
**जीवितसंशय**, पु० (यः) वांचण्याचा संशय.
**जीवितव्यम्**, वांचलें जावें.
**जीविताशा**, स्त्री० (शा) वांचण्याची आशा.
**जीवोत्सर्ग**, पु० (र्गः) जीव देणें, मरणें.
**जीव्यते**, वांचला जातो.
**जेठी**, मल्ल.
**जेधवां**, जेव्हां.
**जोड**, संपादित.
**जोडणें**, मिळवणें, जुळणें.
**जोडितोंची**, मिळवितों,
**जोडे**, मिळे.
**जोपा**, पालन, जतन.
**ज्यानि**, स्त्री० (निः) जीर्ण.
**ज्योतिर्वित्**, पु० (त्) जोतिषी.
**ज्योतीरवद**, पु० (दः) जोशी.
**ज्वाला**, स्त्री० (ला) ज्वाळा.

## झ.

**झगडा**, युद्ध. २ भांडण.
**झंप**, पु० (पः) उडी.
**झळकला**, चमकला.
**झळफळ**, स्वच्छता, लखलखी.
**झांजरा**, चटपट, चटका.
**झुंजार**, योद्धा.
**झुरे**, खेदकरी.

## ट.

**टांग**, तंगडी.
**टांच**, खोट.

## ठ.

**ठाकला**, उभा राहिला.
**ठाय**, जागा. २ निश्चय.
**ठाव**, जागा.
**ठिवा**, ठेवा.
**ठेला**, राहिला.

## ड.

**डगमगणें**, हालणें.
**डाग**, कलंक.
**डौर**, डमरू. २ भराड्याचें वाद्य.

## ढ.

**ढळ**, भंग.

**ढोल**, झाडामधील पोकळ भाग. २ वाद्य वि०

## त.

**तगटी**, पऱ्याचें.

**तगटे**, तगे, टिके.

**तज्जय**, पु० (यः) त्याचा जय.

**तज्जीवन**, न० (नं) त्याचें रक्षण.

**तटाटे**, ताठे. २ ताठलें.

**तडफ**, त्वरा, जलदी.

**ततः**, अ० तेथून ह्या अर्थी.

**ततस्ततम्**, आणली काय.

**तति**, पंक्ति, रांग.

**तत्कथौघ**, पु० (घः) त्याचे कथेचा प्रवाह.

**तत्पद**, पु० (दः) ब्रम्हज्ञापक शब्द.

**तत्पर**, पु० (रः) तत्पर, दक्ष.

**तत्र**, अ० तेथें ह्या अर्थी.

**तत्रत्य**, तेथील.

**तत्रस्थ**, वि० (स्थः स्था- स्थं) तेथील.

**तत्रैव**, अ० तेथेंच ह्या अर्थी.

**तत्वता**, खरें.

**तत्वनिषकग्रावन्**, पु० (वा) कसोटीचा दगड.

**तत्वज्ञ**, वि० (ज्ञः ज्ञा- ज्ञं) वास्तविक जाणता.

**तत्क्षणभंगुर**, पु० (रः) त्याचक्षणी नाश पावणारा.

**तत्क्षणम्**, अ० त्याचक्षणीं ह्या अर्थी.

**तथा**, अ० तसें, त्या प्रकारें ह्या अर्थी.

**तथापि**, अ० तसें असतांही ह्या अर्थी.

**तथाविध**, वि० (धः धा- धं) तशा प्रकारचा.

**तथैव**, अ० तसेंच ह्या अर्थी.

**तद्**, तें—तो—ती.

**तदंतम्**, अ० तों पर्यंत ह्या अर्थी.

**तदनंतरम्**, अ० मग ह्या अर्थी.

**तदनुसरणक्रम**, पु० (मः) त्याला अनुसरणें.

**तदन्यच**, अ० त्यापेक्षां दुसरा.

**तदर्ध**, वि० (र्धः र्धा- र्धं) त्याचा अर्धे.

**तदीय**, वि० (यः या- यं) त्याचा.

**तदुदर**, न० (रं) त्याचें पोट.

**तदेव**, न० (वं) तेंच.

**तद्भुजपराक्रम**, पु० (मः) त्याचे बाहु पराक्रम.

**तद्रस**, पु० (सः) त्याचा रस.

**तद्वचःप्रतीत**, पु० (तः) त्याच्या शब्दानें जागलेला.

**तद्वत्**, अ० त्या सारखें ह्या अर्थी.

**तद्विध**, वि० (धः धा- धं) त्या प्रकारचा.

**तनुजा**, स्त्री० (जा) मुलगी.

**तनुत्याग**, पु० (गः) शरीराचा त्याग करणें

**तनुत्राण**, न० (णं) चिलखत.

**तनूनपात्**, पु० (त्) विस्तव.

**तन्नाश**, पु० (शः) त्याचा नाश.

**तन्मध्य**, न० (ध्यं) त्याचा मध्य.

**तपते**, तापतो.

**तपन**, पु० (नः) सूर्य. २ न० (नं) तापणें.

**तपः**, प्रभाव, पु० (वः) तपाचें फळ.

**तपस्वि**, पु० (स्विः) तपस्वी.

**तपोवन**, न० (नं) ऋषीचा आश्रम. (आरण्य)

**तप्त**, तापलेला.

**तप्तभूमि**, स्त्री० (मिः) तापलेली भूमि.

**तप्यते**, दुःखित होतो.

**तमोगुण**, पु० (णः) तीन गुणांतील शेवटला.

**तमोहर**, पु० (रः) सूर्य.
**तरंग**, तवंग, कल्पना.
**तरंगती**, तरतात.
**तरंडक**, पु० (कः) नौका.
**तरण**, न० (णं) पार जाणें.
**तरंति**, पार जातात.
**तरुतल**, न० (लं) झाडाचा पायथा.
**तर्जन**, न० (नं) भीति दाखविणें.
**तर्पयंति**, संतोषवितात.
**तर्पितां**, तृप्तकरा.
**तर्हि**, अ० तर. २ नंतर ह्या अर्थी.
**तल्पक**, पु० (कः) शय्या. पलंग.
**तव**, तुझा.
**तंव**, तों. २ इतक्यांत.
**तवक**, पु० (कः) क्रोध. २ वेग. ३ उकळी.
**तस्मात्**, अ० त्यापासून ह्या अर्थी.
**तस्मिन्**, त्याचे ठायीं.
**तळपे**, शोभे.
**तज्ञ**, पु० (ज्ञः) तें जाणणारा.
**ताठा**, मगरूरी. २ ताठा.
**ताडयामास**, मारिलें.
**ताडितां**, मारितां.
**तातडी**, त्वरा, घाई.
**तांतडी**, त्वरा, घाई.
**तात्काल** लागलेंच.
**तात्काळ**, लागलेंच.
**ताथी**, ताजी.
**तादात्म्य**, ऐक्य.
**तादृशः**, तसा.
**तान्**, त्यांला.
**ताप**, संताप. २ उन्हाळा. ३ क्रोध.
**तापयंति**, दुःख देतात.
**तापयितुम्**, अ० तापविण्यासाठीं.
**तापहारिन्**, पु० (री) दुःख नाहींसें करणारा.
**तापिन्**, पु० (पी) पीडा देणारा.
**ताभिः**, त्यांहीं,
**तामरसायनपाय**, न० (यं) कमलांस पोसणारें उदक.
**तामरसाक्ष**, पु० (क्षः) कमलाक्ष, कमलनेत्र.
**तारण**, तारणें.
**ताराप**, पु० (पः) चंद्र.
**तार्तीय**, पु० (यः) तृतीयसवन (गाण्यासंबंधीं.) .
**तावत्**, अ० तोंपर्यंत ह्या अर्थी.
**तावत्कालम्**, अ० त्या वेळपर्यंत.
**तासाम्** , त्यांचा.
**तिजें**, तिसरें.
**तिरस्कार**, पु० (रः) कंटाळा. २ तिरस्कार ३. अव्हेर.
**तिरस्कुर्वंति**, तिरस्कार करतात.
**तिल**, पु० (लः) तीळ.
**तिवासी**, तृष्णा.
**तिष्ठत**, रहातो.
**तिष्ठामि**, राहातों.
**तिस्रः** तिघी.
**तीर्थाश्रमपूर**, न० (रं) ग्रामवि०.
**तीव्रपौरुष**, न० (षं) अत्यंत शौर्य.
**तीक्ष्ण**, प्रखर, कठीण.
**तुंगनारिंगें**, उंची नारिंगें.
**तुंबळ**, मोठें.
**तुभ्यम्** , तुज कारणें.
**तुर्या**, स्त्री० (र्या) अवस्थाविशेष.
**तुल्यवंश**, पु० (शः) सारख्या कुलाचा.
**तुल्यविक्रम**, पु० (मः) सारख्या पराक्रमाचा.
**तुल्यवीर्य**, पु० (र्यः) सारख्या बलाचा.

**तुवां**, तूं.
**तुष्टि**, स्त्री० (ष्टिः) संतोष.
**तुष्ट**, पु० (ष्टः) संतुष्ट.
**तुष्यति**, संतुष्ट होतो.
**तूष्णीम्**, अ० उगीच, हळूच ह्या अर्थी.
**तृणवत्**, अ० गवतासारखा ह्या अर्थी.
**तृणसदन**, न० (नं) गवताचें घर.
**तृणोल्का**, स्त्री० (ल्का) चूड.
**तृतीय**, पु० (यः) तिसरा.
**तृप्यति**, संतोष पावतो.
**तृषा**, ताहान.
**तृषार्त**, वि० (र्तः र्ता- र्तं) ताहानेनें पीडित.
**तेजस्तिमिरौ**, पु० (रौ) उजेड व काळोख.
**तेजस्विन्**, पु० (स्वी) पराक्रमी. २ तेजस्वी.
**तेजाल**, तेजस्वी.
**तेजोनिधि**, पु० (धिः) सूर्य.
**तेप**, मुगुट.
**तैं**, तेव्हां.
**तैल**, न० (लं) तेल.
**तैलपाक**, पु० (कः) तेलाचे पदार्थ.
**तोडर**, पु० (रः) तोरडी, पाद भूषण.
**तोरा**, डौल. २ नखरा.
**तोले**, आटपतो. २ जोखी, मानी.
**तोष**, पु० (षः) संतोष, आनंद.
**तोषदाई**, आनंदकारक.
**तोषविलें**, संतुष्टविलें—केलें.
**तौ**, ते दोघे.
**त्यक्तजीवित**, पु० (तः) मरण्यास तत्पर.
**त्यक्तप्राण** पु० (णः) जीव देणारा.
**त्यक्तव्य**, वि० (व्यः व्या- व्यं) टाकावयास योग्य.
**त्यक्तुम्**, अ० टाकण्यास ह्या अर्थी.
**त्यज**, सोडून दे, टाक.
**त्यजत्**, पु० (न्) टाकणारा.
**त्यजिली**, टाकिली.
**त्यागशीलता**, स्त्री० (ता) उदारपणा.
**त्यागिता**, स्त्री० (ता) उदारत्व.
**त्यागियेला**, टाकियेला.
**त्यागी**, टाकी.
**त्याजी**, खर्च करी. २ टाकी.
**त्याज्य**, वि० (ज्यः ज्या- ज्यं) टाकण्याला योग्य.
**त्रपाकंचुक**, पु० (कः) लज्जा कवच.
**त्रय**, न० (यं) तीन.
**त्रयोदश**, तेरा.
**त्राता**, रक्षिता.
**त्रातुम्**, अ० राखण्यासाठीं ह्या अर्थी.
**त्रायस्व**, तार,
**त्रासित**, वि० (तः ता- तं) त्रासलेला.
**त्राहेत्राहे**, संरक्षण कर.
**त्रि**, तीन.
**त्रिजगन्नाथ**, पु० (थः) ईश्वर.
**त्रिजटा**, स्त्री० (टा) एक राक्षसीण.
**त्रितय**, पु० (यः) तिसरा. २ तीन पदार्थांचा समुदाय.
**त्रिपदशोध**, पु० (धः) तें, त्वं आणि असि ह्या तीन पदांचा शोध.
**त्रिपाद**, पु० (दः) अग्नि.
**त्रिपुटी**, कर्ता, क्रिया आणि कर्म हे तीन.
**त्रिभुवन**, न० (नं) भुवनत्रय (स्वर्ग, मृत्यु आणि पाताळ.)
**त्रिवळी**, तीन वळया.
**त्रिविध**, वि० (धः धा- धं) तीन प्रकारचा.
**त्रिवेणी**, स्त्री० (णी) नदीवि०

**त्रिशत**, तीनशें.
**त्रिशुद्धि**, स्त्री० (द्धिः) त्रिवार शुद्धि.
**त्रुटयंति**, तुटतात.
**त्रैलोक्य**, न० (क्यं) त्रिभुवन.
**त्रैलोक्यपति**, पु० (तिः) ईश्वर.
**त्वदीय**, तुझा.
**त्वंपद**, पु० (दः) जीवज्ञापक शब्द.
**त्वम्**, तूं.
**त्वरायुक्त**, घाई किंवा त्वरा करणारा.
**त्वां**, तूं.

## थ.

**थकित**, थकलेला.
**थड**, तीर, कांठ. २ तड.
**थाट**, डौल.
**थाटला**, डामडौल केला.
**थाटी**, पात्रवि०.
**थार**, आधार, आश्रय.
**थारा**, आश्रय.
**थाली**, तपेली. २ पात्रवि०.
**थिजो**, स्तब्ध राहो.
**थोरवि**, मोठेपणा.
**थोरींव**, मोठेपणा.
**थिल्लरोदक**, न० (कं) जमलेलें पाणी.

## द.

**दग्धमंदिर**, न० (रं) जळकें घर.
**दग्धुम्**, जाळावयास ह्या अर्थी.
**दग्धोदर**, पु० (रः) जळक्या पोटाचा.
**दंड**, पु० (डः) लढाई.
**दंडका**, स्त्री० (का) नर्मदा आणि गोदावरी. ह्यांच्या मधील प्रदेश.
**दंडकारण्य**, न० (ण्यं) नर्मदा आणि गोदावरी ह्यांच्या मधील अरण्य.
**दंडग्रहण**, न० (णं) कर घेणें. २ काठी घेणें.
**दंडधर्त**, दंड करणारे.
**दंडनायक**, पु० (कः) मुख्य अधिकारी.
**दंडभीति**, स्त्री० (तिः) काठीचें भय. २ दंडाचें भय.
**दंडयोग**, पु० (गः) शिक्षा.
**दंडवत्**, अ० काठीप्रमाणें. २ साष्टांग नमस्कार.
**दंडित**, पु० (तः) शिक्षा झालेला.
**दत्तादर**, पु० (रः) सनमान देणारा.
**दत्तासन**, न० (नं) दिलेलें आसन.
**दत्वा**, अ० देऊन ह्या अर्थी.
**ददासि**, देतोस.
**दधिकर्ण**, पु० (र्णः) एका मांजराचें नांव.
**दंभार्थम्**, अ० ढोंगा करितां ह्या अर्थी.
**दमन**, पु० (नः) शिक्षा करणें.
**दमयंती**, स्त्री० (ती) नळाची स्त्री. २ गर्वहंत्री.
**दयाकुल**, पु० (लः) दयावंत, कृपाळू.
**दयानिधि**, पु० (धिः) ईश्वर.
**दयाब्द**, पु० (ब्दः) दयेचा मेघ.
**दयायुक्त**, पु० (क्तः) दयाळू.
**दयावत्**, पु० (वान्) दयाळू.
**दयोर्मि**, स्त्री० (र्मिः) दयेची लहरी.
**दर**, पु० (रः) शंख. २ ईषत, थोडें.
**दरिद्रता**, स्त्री० (ता) गरीबी.
**दरिद्रति**, गरीब होतात.
**दर्पयति**, गर्विष्ट करवितो.

**दर्शयामि**, दाखवितों.

**दर्शिन्**, पु० (र्शी) पाहाणारा.

**दल**, न० (लं) सैन्य. २ कवच.

**दव**, पु० (वः) दावानळ. २ दाहिवर.

**दशकंठ**, पु० (ठः) रावण.

**दशकंधर**, पु० (रः) रावण.

**दशति**, चावतो.

**दश**, दहा.

**दशम**, पु० (मः) दहावा.

**दशरथात्मज**, पु० (जः) राम. २ लक्ष्मण. ३ भरत. ४ शत्रुघ्न.

**दशवदन**, पु० (नः) रावण.

**दशशतकरधारिन्**, पु० (री) ज्याला हजार हात आहेत तो. २ सहस्रार्जुन.

**दशशतमुखांग**, पु० (गः) ज्याला सहस्र मुखें आहेत तो. २ शेष.

**दशशीर**, पु० (रः) रावण.

**दशस्यंदन**, पु० (नः) दशरथ.

**दशानन**, पु० (नः) रावण.

**दशांतर**, पु० (रः) दुसऱ्या अवस्था.

**दशाविशेष**, अवस्थाविशेष.

**दशास्य**, रावण.

**दष्ट**, चावलेला.

**दंष्ट्रा**, स्त्री० (ष्ट्रा) दाढ.

**दंष्ट्रानखलांगुलप्रहरण**, पु० (णः) दाढा, नख आणि शेपूट यांनीं प्रहार करणें-मारणें.

**दहति**, जाळतो.

**दळ**, सैन्य. २ कवच.

**दक्षकरें**, उजव्या हातें.

**दक्षिण**, पु० (णः) उजवा.

**दक्षिणापथ**, न० (थं) दक्षिणे कडील रस्ता.

**दक्षिणारण्य**, न० (ण्यं) दक्षिणे कडील वन, अरण्य.

**दातव्य**, वि० (व्यः व्या व्यं) द्यावयाजोगें.

**दातार**, देणारा.

**दातुम्**, अ० द्यावायस ह्या अर्थी.

**दानधर्म**, पु० (र्मः) दानधर्म.

**दानमानौ**, पु० व० (नौ) दान आणि मान.

**दानवारि**, उदक.

**दानहीन**, दानावांचून.

**दांभिक**, पु० (कः) दांभिक. २ न० (कं) वरकर्मी ढोंग.

**दाम**, पु० (मः) पुष्पमाला. २ पैका.

**दाय**, पु० (यः) पितृधन. २ वांटा.

**दारा**, स्त्री, बायको.

**दारिका**, स्त्री० (का) मुलगी.

**दारिकादान**, न० (नं) मुलगी देणें, कन्यादान.

**दारिद्र**, न० (द्रं) दरिद्रपणा.

**दारिद्र्य**, न० (द्र्यं) गरीबी.

**दारुणदृष्टी**, स्त्री० (ष्टी) प्रखर दृष्टी.

**दाव**, पु० (वः) अरण्य. २ दासव. ३ दावें.

**दासत्व**, न० (त्वं) गुलामपणा.

**दास्य**, न० (स्यं) गुलामपणा.

**दाह**, पु० (हः) जळजळ, आग. २ जळणें.

**दाहो**, दहन, जाळणें.

**दाक्षिण्य**, न० (ण्यं) भीड. २ चातुर्य.

**दिक्कंठ**, पु० (ठः) दशकंठ, रावण.

**दिग्गज**, पु० (जः) हत्ती (प्रत्येक दिशेचा एक.)

**दिग्देशौ**, पु० व० (शौ) दिशा आणि देश.

**दिग्वधू**, स्त्री० (धूः) पूर्व दिशारूप पत्नी.

**दिग्विजय**, पु० (यः) देश जिंकणें.

**दिंड**, मोठें बासन.
**दिनकर**, पु० (रः) सूर्य.
**दिनराज**, पु० (जः) सूर्य.
**दिवसेदिवस**, अ० रोज रोज ह्या अर्थी.
**दिवानिशम्**, अ० रात्रंदिवस.
**दिवासुप्त**, वि० (प्तः प्ता-प्तं) दिवसास निजलेला.
**दिव्य**, सुंदर, शोभायमान.
**दिव्यरस**, पु० (सः) अमृत.
**दिसंदीस**, दिवसेंदिवस.
**दीनबंधु**, पु० (धुः) ईश्वर. २ दिनाचा पालक.
**दीपकालिका**, स्त्री० (का) दिवा हीच कळी.
**दीपिकाय**, पु० (यः) सुंदर; चकचकीत.
**दीप्यते**, चमकतो, प्रकाशतो.
**दीयते**, दिला जातो.
**दीर्घ**, पु० (र्घः) मोठा. २ रुंद.
**दीर्घकर्णनाम**, पु० (मः) लांब कान या नांवाचा.
**दीर्घनिःश्वस्य**, अ० मोठा उसासा टाकून.
**दीर्घराव**, पु० (वः) मोठा गोंगाट.
**दीर्घरोगिन्**, पु० ( गी ) फार दिवसांचा रोगी.
**दीर्घसूत्रता**, स्त्री० (ता) चेंगटपणा.
**दीर्घामय**, वि० (यः या- यं) बहुदिवसांचा रोगी. २ पु० (यः) बहुदिवसांचा रोग.
**दीस**, दिवस.
**दीक्षा**, स्त्री० (क्षा) संस्कारविशेष.
**दुःखसिंधु**, पु० (धुः) शोकसागर.
**दुःखार्त**, वि० (र्तःर्ता-र्तं) दुःखानें पिडलेला.
**दुःखित**, पु० (तः) दुःखी, कष्टी.
**दुःखी**, दुःखी, कष्टी..
**दुःखीयति**, दुःख पावतो.
**दुग्धसार**, पु० (रः) तूप.
**दुजा**, दुसरा.
**दुणावलें**, अधिक झालें. २ दुप्पट झालें.
**दुणी**, दुप्पट.
**दुरंग्या**, दोन रंगाच्या.
**दुरतिक्रम**, वि० (मः मा- मं) उलंघन करण्यास कठीण.
**दुरात्मन्**, पु० (त्मा) दुष्ट.
**दुरावला**, दूर झाला, लांबला.
**दुरितचय**, पु० ( यः ) पातकाचा समुदाय.
**दुरी**, दूर.
**दुरुक्ति**, स्त्री० (क्तिः) दुर्भाषण.
**दुर्गनिवासिन्**, पु० (सी) किल्यांत राहणारा.
**दुर्घट**, पु० (टः) कठीण. २ भयंकर.
**दुर्जनत्व**, न० (त्वं) दुष्टपणा.
**दुर्जनदूषितमनस्**, पु० ( नाः ) दुर्जनानें ज्याचें मन दुखावलें तो
**दुर्जय**, वि० (यःया-यं) जिंकण्यास कठीण.
**दुर्णय**, पु० (यः) वाईट चाल.
**दुर्णीत**, न० (तं) वाईट चाल.
**दुर्णीति**, स्त्री० (तिः) वाईट रीति.
**दुर्दर्श**, पु० (र्शः) पाहण्यास कठीण.
**दुर्दांत**, वि० (तःता-तं) अनिवार्य.
**दुर्दैव**, न० (वं) कमनशीब.
**दुर्धर**, पु० (रः) कठीण.
**दुर्धर्ष**, वि० ( र्षःर्षा-र्षं) करावयास अशक्य.
**दुर्निवार**, पु० (रः) आवरण्याला अवघड.
**दुर्बुद्धि**, पु० (द्धिः) मूर्ख.
**दुर्भाग्य**, न० (ग्यं) कमनशीब.
**दुर्भिक्षव्यसन**, न० (नं) दुष्काळाचें संकट.
**दुर्भिक्षव्यसनिन**, पु० ( नः ) दुष्काळानें गांजलेला.
**दुर्भिक्षे**, दुष्काळीं.

**दुर्भेद्य**, वि० (द्यःद्या-द्यं) फोडण्याला कठीण.
**दुर्मति**, पु० (तिः) मूर्ख. २ दुष्ट.
**दुर्मंत्रिन्**, पु० (त्री) वाईट प्रधान.
**दुर्मदा**, स्त्री० (दा) उन्मत्त.
**दुर्हृद्**, वि० (दः दा- दं) दुष्ट.
**दुर्विदग्ध**, वि० (ग्धः ग्धा-ग्धं) फार मूर्ख, अगदीं मूर्ख.
**दुर्विपाक**, पु० (कः) वाईट परिणाम,
**दुर्वृत्त**, पु० (त्तः) स्त्री० न० (त्ता-त्तं) दुष्ट, वाईट चालीचा. २ न० (त्तं) दुष्टपणा.
**दुशाला**, शालजोडी. २ वस्त्रवि०
**दुश्चरित**, न० (तं) वाईट आचरण.
**दुश्चिन्ह**, न० (न्हं) कुलक्षण, अभद्र.
**दुष्कर**, वि० (रः रा- रं) करावयास कठीण.
**दुष्कर्म**, न० (र्मं) वाईट कर्म.
**दुष्ट**, पु० (ष्टः) दुष्ट.
**दुष्टव्रण**, पु० (णः) वाईट व्रण.
**दुष्प्रकृति**, वि० (तिः तिः ति) वाईट स्वभावाचा.
**दुस्तर**, वि० (रः रा- रं) तरण्यास कठीण.
**दुरांतर**, न० (रं) फार अंतरावरची जागा.
**दुरीकृत**, वि० (तः ता- तं) दूर केलेला.
**दूतमुख**, पु० (खः) वकिलाच्या द्वारें बोलणारा.
**दूतिका**, स्त्री (का) निरोप नेणारी.
**दूरतः**, अ० लांब ह्या अर्थी.
**दूरदृष्टी**, दूरवर पाहणारा.
**दूरसंस्थान**, न० (नं) फार अंतरावरचें राहण्याचें ठिकाण.
**दूरस्थित**, वि० (तः ता- तं) लांब राहिलेला.
**दूषण**, न० (णं) टपका.
**दूषयेत्**, दोष ठेवो.
**दृक्**, दृष्टी.
**दृग्भ्रम**, पु० (मः) दृष्टीचा भ्रम.
**दृढ**, न० (ढं) बळकट.
**दृढता**, स्त्री० (ता) मजबूदपणा, खचितपणा.
**दृढबंधनबद्ध**, वि० (द्धः द्धा- द्धं) घट्ट बांधण्यानें बांधलेला.
**दृढभक्ति**, वि० (क्तिः क्तिः क्ति) दृढ भजनाचा. २ स्त्री० (क्तिः) मजबूद भक्ति.
**दृढसौहृद**, पु० (दः) दृढ मैत्रीचा.
**दृती**, सुवास.
**दृप्यति**, गर्विष्ट होतो.
**दृश्य**, दिसणारा.
**दृश्यते**, पाहिला जातो.
**दृष्टदोष**, पु० (षः) स्त्री० न० (षा- षं) अपराधांत आढळलेला.
**दृष्टिप्रसाद**, पु० (दः) कृपादृष्टी.
**दृष्टिबाण**, पु० (णः) नजरेचा बाण.
**दृष्ट्वा**, पाहून.
**दे**, देतो. २ दिला.
**देखुनि**, पाहून.
**देय**, पु० (यः) द्यावयाचा.
**देवगर्भ**, पु० (र्भः) देवतुल्य.
**देवतटिनी**, स्त्री० (नी) भागीरथी नदी.
**देवब्राम्हणनिंदक**, वि० (कः का- कं) देवब्राम्हणाची निंदा करणारा.
**देवराज**, पु० (जः) इंद्र.
**देवव्रत**, पु० (तः) भीष्म.
**देवाद्य**, पु० (द्यः) महादेव.
**देवापगा**, स्त्री० (गा) गंगा नदी.
**देवेंद्र**, पु० (द्रः) इंद्र.
**देशकालविभाग**, पु० (गः) देश आणि काल यांचा विभाग.
**देशाटन**, न० (नं) प्रवास.

**देशांतर**, न० (रं) दुसरा देश.
**देह**, न० (हं) शरीर.
**देहज**, वि० ( जः जा-जं ) शरीरापासून झालेला.
**देहांतर**, न० (रं) अन्य देह.
**देही**, ज्यास शरीर आहे तो, प्राणी.
**देहुडी**, देवडी.
**देहो**, शरीर.
**दैदिप्यमान**, पु० (नः) तेजःपुंज.
**दैवचिंतक**, पु० (कः) दैवावर भरंवसा ठेवणारा.
**दैवदुर्विपाक**, पु० (कः) दैवाची प्रतीकूलता.
**दैवपर**, पु० (रः) दैववादी.
**दैवयोग**, पु० (गः) दैवाचा योग.
**दैवरक्षित**, वि० (तः ता-तं) दैवानें राखलेला.
**दैवहत**, वि० (तः ता-तं) दैवानें हांटलेला, कपाळ करंटा.
**दैवहतक**, पु० (कः) दैवानें हांटलेला, करंटा.
**दैवात्** , अ० दैवानें.
**दौर्जन्य**, न० (न्यं) दुष्टत्व.
**दो**, दोन.
**दोर्दंड**, पु० (डः) बाहु.
**दोल**, पु० (लः) झोपाळा.
**दोलायते**, झोके दातो. २ वचकतो.
**दोलायमानमति**, पु० (तिः) चंचल मनाचा.
**दोषभीति**, स्त्री० (तिः) गुन्ह्याचें भय.
**दौर्गंधि**, स्त्री० (धिः) घाण.
**द्युत**, पु० (तः) खेळ. २ पण.
**द्रवत्व**, न० (त्वं) पातळपणा.
**द्रव्यसंचय**, पु० (यः) पैसा जमावणें.
**द्रव्यकार्यसिद्धि**, स्त्री० (द्धिः) द्रव्याच्या योगानें कार्य साधणें.
**द्रष्टव्य**, वि० ( व्यः व्या-व्यं ) पाहावयास योग्य.
**द्रुपदसुता**, स्त्री० (ता) द्रौपदी.
**द्रुमायते**, वृक्ष होतो.
**द्रुमालय**, न० (यं) अरण्य.
**द्रुह्यति**, वैर करितो.
**द्रोणसुत**, पु० (तः) अश्वत्थामा.
**द्रोहोबुद्धि**, पु० (द्धिः) द्वेष करणारा.
**द्वय**, न० (यं) दोन. २ जोडी.
**द्वंद्व**, पु० (द्वः) सुख दुःखाचें युग्म.
**द्वात्रिंशत्**, बत्तीस.
**द्वात्रिंशल्लक्षणोपेत**, पु० (तः) स्त्री० न० (ता-तं) बत्तीस लक्षणी.
**द्वादश**, बारा.
**द्वारवर्त्मन्** , न० (र्म) दाराचा रस्ता.
**द्वारस्थ**, वि० (स्थः स्था-स्थं) दारीं राहणारा.
**द्वारावती**, स्त्री० (ती) द्वारका.
**द्विगुण** पु० (णः) दुप्पट.
**द्विजाती**, ब्राम्हण, क्षत्रिय, वैश्य, सर्प, मत्स्य, अंडज.
**द्वितीय**, पु० (यः) दुसरा.
**द्वितयित्व**, न० (त्वं) दुसरेपणा.
**द्विधा**, दोन प्रकारचा.
**द्विपारि**, पु० (रिः) सिंह.
**द्विपेंद्र**, पु० (द्रः) हत्तींचा राजा.
**द्विविध**, पु० (धः) दोन भाग करणारा.
**द्वे**, दोन.
**द्वेष**, पु० (षः) दावा.
**द्वेषिन्**, पु० (षी) द्वेष करणारा.
**द्वेष्य**, वि० (ष्यः ष्या-ष्यं) द्वेष करण्यास योग्य

**महाहि**, पु० (हि:) मोठा साप.
**महिमन्**, पु० (मा) मोठेपणा.
**महिमा**, स्त्री० (मा) कीर्ति.
**महीगोपायितृ**, पु० (ता) पृथ्वी रक्षण कर्ता.
**महीतल**, न० (लं) पाताळ.
**महीतळ**, पाताळ.
**महीधर**, पु० (र:) पहाड.
**महीपति**, पु० (ति:) राजा.
**महीपाल**, पु० (ल:) पृथ्वीचा पाळणारा.
**महीभर्तृ**, पु० (र्ता) राजा.
**महीभुज्**, पु० (क्) राजा.
**महीभृत्**, पु० (त्) राजा.
**महीलोक**, पु० (क:) मृत्यु लोक.
**महोदधि**, पु० (धि:) समुद्र.
**महोदय**, पु० (य:) मोठा उदय. पर्ववि०
**महोदार**, पु० (र:) स्त्री० न० (रा- रं) मोठा उदार.
**महौषध**, न० (धं) मोठा उपाय.
**मळी**, मळ.
**मा**, अ० निश्चय करून. २ मला.
**माकंद**, पु० (द:) आंबा.
**मागध**, पु० (ध:) जरासंध.
**मागधराजा**, जरासंध.
**मागुती**, फिरून, पुन:.
**माजि**, मध्यें.
**माझारी**, मध्यें.
**माणिकसे**, माणकासारखे.
**मात**, खबर, बातमी.
**मातृवत्**, अ० आईसारखें.
**मातृसेवा**, स्त्री० (वा) आईची चाकरी.
**मात्र**, च, २ केवळ.
**मात्सर्य**, न० (र्यं) हेवा.

**माथा**, मस्तक. २ शिखर.
**माद्रीतनय**, पु० (य:) नकुल. २ सहदेव.
**मांदी**, मंडळी.
**मानध्मात**, वि० (त: ता- तं) गर्वानें फुगलेला.
**मानवला**, आवडला.
**मानस**, पु० (स:) सरोवरवि०.
**मानुष्य**, न० (ष्यं) मनुष्यपणा.
**माम**, मला.
**माय**, आई. २ मावे.
**माया**, स्त्री० (या) अविद्या. २ ममता.
**मायाजाळ**, मायाबंध.
**मायापटल**, न० (लं) मायावरण.
**मायाशबल**, पु० (ल:) मायोपाधिक.
**मायिक**, मायेचें.
**मारकती**, पाचेची.
**मारात्मक**, पु० (क:) घातक.
**मार्गप्रतीक्षा**, वाट पहाणें.
**मार्जारवत्**, अ० मांजरासारखें.
**मार्तंडास्त्र**, न० (स्त्रं) सूर्यास्त्र.
**मार्दव**, न० (वं) मृदुपणा.
**मालवे**, अस्त पावे.
**मालिन्य**, न० (न्यं) मळीणपणा.
**माल्यवद्ग**, पु० (ग:) माल्यवान पर्वत.
**मासत्रय**, न० (यं) तीन महिने.
**मांसरुचि**, स्त्री० (चि:) जीस मांस आवडतें ती.
**मांसाहार**, पु० (र:) मांसाचें खाणें.
**मित**, थोडा.
**मिती**, संख्या. २ परिणाम. ३ मिती.
**मित्रत्व**, न० (त्वं) मित्रपणा.
**मित्रबंधुहीन**, पु० (न:) ज्यास मित्र व बंधु नाहीं तो.

मुद्रित. मृत.

**मित्रलाभ**, पु० (भः) मित्राची प्राप्ती.
**मिथिलापाळ**, जनक राजा.
**मिथिलेश**, पु० (शः) जनक राजा.
**मिथ्योपचार**, पु० (रः) सेवेचें मिष.
**मिलंति**, एक होतात, भेटतात.
**मिलिंद**, पु० (दः) भ्रमर.
**मिश्र**, पु० (श्रः) मिसळलेला.
**मिस**, निमित्त.
**मी**, अहंपणा. प्रथम पुरुष.
**मीपणा**, गर्व.
**मीमांसा**, शास्त्रवि०.
**मीळण**, नदी मिळण्याची जागा.
**मुकला**, मुक्त झाला.
**मुकियाचा**, मुक्याचा.
**मुक्त**, वि० (क्तः क्ता-क्तं) सुटलेला. २ मुक्त झालेला.
**मुक्तबंधन**, वि० (नः ना-नं) मोकळा.
**मुक्तलग्न**, वि० (गः गा-गं) मोत्यें लागलेला.
**मुक्तहस्त**, वि० (स्तः स्ता-स्तं) उदार.
**मुक्तापद**, वि० (दः दा-दं) संकटांतून पार झालेला.
**मुखर**, पु० (रः) मुख्य.
**मुखरिणी**, स्त्री० (णी) पुढारी स्त्री.
**मुंचति**, सोडतो.
**मुंडमथना**, स्त्री० (ना) मुंड नामक दैत्याला मारणारी (देवी.)
**मुद्या**, आंगठ्या.
**मुद्रा**, स्त्री० (द्रा) शिक्का, मोहोर. २ बंधन. ३ चिन्ह.
**मुद्रांकित**, पु० (तः) चिन्हयुक्त.
**मुद्रित**, वि० (तः ता-तं) मोहोर केलेला. २ बंद केलेला.
**मुद्धारा**, स्त्री० (रा) प्रीति रसाचा पारा.
**मुनिवर**, पु० (रः) नारद. २ मुनिश्रेष्ठ.
**मुमुक्षु**, वि० (क्षुः क्षुः क्षु) मुक्त होण्यास इच्छिणारा.
**मुमूर्षु**, वि० (र्षुः र्षुः र्षु) मरावयास गुंतलेला.
**मुरारि**, पु० (रिः) श्रीकृष्ण.
**मुराली**, स्त्री० (ली) मुरली.
**मुर्छा**, स्त्री० (र्छा) मोह.
**मुहुर्**, अ० वारंवार, पुनः पुनः.
**मुह्यंति**, गुंगतात. २ भुलतात.
**मूढता**, स्त्री० (ता) मूर्खपणा.
**मूत**, पु० (तः) पाश.
**मूर्खशत**, १०० मुर्ख.
**मूर्तु**, मूर्तिमंत.
**मूलभृत्य**, पु० (त्यः) जुना चाकर.
**मूषिकनिर्विशेष**, न० (षं) उंदरासारखें.
**मूळ**, बोलावणें. २ कारण.
**मृकंड**, पु० (डः) ऋषिवि०
**मृगकाकौ**, पु० द्वि० (कौ) हरिण व कावळा.
**मृगजंबुकौ**, पु० द्वि० (कौ) हरिण व कोल्हा.
**मृगजल**, न० (लं) मिथ्याजळ.
**मृगजळ**, मिथ्याजळ.
**मृगपक्षि**, पशु व पक्षि.
**मृगराज**, पु० (जः) सिंह.
**मृगव्याधसर्पशूकर**, हरिण, पारधि, साप, आणि डुकर.
**मृगशूकरौ**, पु० द्वि० (रौ) हरिण व डुकर.
**मृगांकानना**, स्त्री० (ना) चंद्रमुखी.
**मृगेंद्रता**, स्त्री० (ता) पशूचें स्वामित्व. २ सिंहपणा.
**मृगेंद्रवृषभौ**, सिंह व बैल.
**मृतवत्**, अ० मेल्याप्रमाणें.

**मृत्पिंडतः**, मातीच्या गोळ्यापासून.
**मृत्युद्वार**, न० (रं) मरणाचें दार.
**मृदंति**, नासतात.
**मृदुलत्व**, न० (त्वं) मऊपणा, नरमपणा.
**मेखला**, स्त्री० (ला) मुंज.
**मेघवर्ण**, पु० (र्णः) एका कावळ्याचें नांव.
**मेघावळी**, मेघपंक्ति.
**मेधाविन्**, पु० (वी) बुद्धिवान.
**मैत्रीपूर्व**, मित्रत्व.
**मैलागिरी**, चंदनविशेष.
**मैवम्**, अ० असें नाहीं.
**मोकलिलें**, टाकलें, सोडलें.
**मोचन**, सुटका.
**मोचयितुम्**, अ० सोडण्याकरितां.
**मोड**, काम.
**मोद**, हर्ष.
**मोदते**, आनंदतो.
**मोवाळ**, मृदु, मऊ.
**मोषण**, न० (णं) चोरी.
**मोह**, पु० (हः) अज्ञान. २ ममता. ३ भूल.
**मोहयति**, मोह पाडतो.
**मौनी**, मुके.
**मौल**, त्रि० (लः-ला-लं) अस्सल. २ न० (लं) मस्तक. ३ शिखर.
**मौली**, स्त्री० (ली) डोकें.
**मौळ**, मस्तक. २ शिखर.
**म्रियते**, मरतो.
**म्लानत्व**, न० (त्वं) खिन्नता.
**म्लेंछ**, पु० (छः) मुसलमान.
**म्हणिजेलें**, म्हटलें.

---

## य,

**यच्च**, अ० जें ही.
**यछति**, देतो. २ सोडतो.
**यत्**, अ० जें.
**यत्त**, पु० (त्तः) हुकुमांत ठेवलेला.
**यतिराज**, पु० (जः) स्वामीमध्यें मुख्य.
**यत्किंचित**, जें कांहीं.
**यत्न**, पु० (त्नः) इलाज.
**यत्नतः**, अ० यत्नानें,
**यत्र**, अ० जेथें.
**यत्रकुत्र**, अ० कोठेंही.
**यथा**, अ० जसें.
**यथाआज्ञापयतिदेव**, पु० (वः) हुकूम. महाराज.
**यथाकार्य**, न० (र्यं) कार्याप्रमाणें.
**यथाप्राप्त**, न० (प्तं) जसें मिळालें तसें.
**यथाभिप्रेत**, न० (तं) पाहिजे तसें.
**यथाभिमत**, न० (तं) इच्छेप्रमाणें.
**यथाभिहित**, न० (तं) बोलल्याप्रमाणें.
**यथामति**, बुद्धिप्रमाणें.
**यथायोग्य**, न० (ग्यं) योग्यतेप्रमाणें.
**यथार्ह**, न० (र्हं) जसें योग्य तसें.
**यथावकाश**, न० (शं) फुर्सतीप्रमाणें.
**यथावसर**, न० (रं) वेळ पाहून.
**यथाविधि**, पु० (धिः) शास्त्राप्रमाणें.
**यथाव्यवहार**, न० (रं) चालीप्रमाणें.
**यथाशक्ति**, स्त्री० (क्तिः) सामर्थ्यानुरूप.
**यथाश्रुत**, न० (तं) ऐकिल्याप्रमाणें.
**यथासुख**, न० (खं) सुखानें.
**यथेष्ट**, पु० (ष्टः) पाहिजे तितकें. २ न० (ष्टं) जितकें पाहिजे तितकें.

**यथोचित**, न० (तं) जसें योग्य तसें.
**यद्**, जें.
**यदभाव**, पु० (वः) जें नसतां.
**यदा**, अ० जेव्हां.
**यदाकदाचित्**, अ० कधीं तरी.
**यदुकुलवर**, पु० (रः) यादव कुळांत श्रेष्ठ (श्रीकृष्ण)
**यदुभट**, पु० (टः) यादववीर.
**यदुभूषण**, पु० (णः) श्रीकृष्ण.
**यदृच्छा**, स्वेच्छा.
**यद्भविष्य**, पु० (ष्यः) एका माशाचें नांव.
**यद्यपि**, अ० जरी.
**यद्वत्**, अ० ज्याप्रमाणें, जसें.
**यन्मूर्धि**,—ज्याच्या डोक्यावर.
**यम्**,—ज्याला.
**यमनंदन**, पु० (नः) धर्मराज.
**ययौ**,—गेला, २ आला.
**यवन**, पु० (नः) म्लेच्छ, मुसलमान.
**यवसान्नोदकेंधनं**,—गवत, अन्न, उदक आणि सर्पण.
**यशर्भरें**,—यशस्वी होऊन.
**यशस्कर**, वि० (रः रा- रं) नांवलौकिकाचे, कीर्तिकारक.
**यशस्तुलना**, स्त्री० (ना) कीर्तीची बरोबरी.
**यशस्विन्**, पु० (स्वी) कीर्तिमान.
**यशाचळा**,—यशोरूप पर्वतास.
**यशोधी**,—यशाचा समुद्र.
**यशोरस**, पु० (सः) यशाची गोडी.
**यशोहार**, पु० (रः) यशाचा हार.
**यस्मात्**,—ज्यामुळें.
**यस्मैकस्मैचित्**, अ० कोणाला तरी.
**यक्षेश्वर**, पु० (रः) यक्षांचा राजा. २ कुबेर.
**यज्ञकंकण**, न० (णं) मंगलकार्यामध्यें हातांत हळकुंड बांधतात तें.
**यज्ञछाग**, पु० (गः) होमाचा बोकड.
**यज्ञसूकर**, पु० (रः) वराह अवतार. २ होमाचा डुकर.
**या**,—जी.
**याचकी**,—भिक्षुकी.
**याचते**,—मागतो.
**याची**,—याचक.
**याजी**,—यज्ञकर्ता. २ यज्ञशील.
**याति**,—येतो जातो.
**यातुप**, पु० (पः) राक्षसेंद्र, रावण.
**यात्राकरण**, न० (णं) यात्रा करणें.
**यात्राप्रसंग**, पु० (गः) यात्रा करणें.
**यात्रार्थम्**, अ० स्वारीकरितां.
**यात्रोत्सव**, पु० (वः) यात्रेचा उत्साह.
**याथातथ्य**, न० (थ्यं) खरें, वास्तविक.
**यादृश**, जसें.
**यानि**, जीं.
**यानिकानिच**, जीं कोणीं.
**यापरि**, असें. २ या प्रकारचें.
**याम्**, जिला.
**यामि**, जातों.
**यामिनीदिस**, रात्रं दिवस.
**यावच्छक्य**, न० (क्यं) जितकें होऊं शकेल तितकें.
**यावज्जीव**, न० (वं) मरे पर्यंत.
**यावदायुःप्रमाण**, न० (णं) जों पर्यंत आयुष्याची दोरी आहे तों पर्यंत.
**यासांम्**, ज्यांचा.
**यासि**, जातोस.
**याज्ञसेनी**, स्त्री० (नी) द्रौपदी.
**याज्ञिक**, पु० (कः) होम करणारा.

**युक्त**, वि० (क्तः क्ता क्तं) नेमलेला. २ योजलेला.

**युज्यते**, जमतो, युक्त होतो.

**युत**, युक्त.

**युद्धकारित्व**, न० (त्वं) लढाई करणें.

**युद्धार्थिन्**, पु० (र्थी) लढाई इच्छिणारा.

**युद्धोद्योग**, पु० (गः) लढाईची तयारी.

**युद्धेत्**, लढो.

**युवराज**, पु० (जः) राजाचा पुत्र. २ प्रधान.

**युवाम्**, तुम्हां दोघांला.

**युष्मदर्थम्**, अ० तुम्हासाठीं.

**युष्मदायत**, न० (तं) तुमच्या स्वाधीन.

**युष्मान्**, तुम्हास.

**यूथपति**, पु० (तिः) कळपाचा स्वामी.

**यूथराज**, पु० (जः) समूहनायक.

**ये**, जे. २ येता झाला, आला.

**येथ**, येथें.

**येनकेनचित्**, कोणींही, कोणीं तरी. २ कशानें तरी.

**येर**, अन्य, दुसरा.

**येरु**, अन्य, दुसरा.

**येश**, यश.

**यो**, येवो.

**योगतन्य**, पु० (न्यः) योगापासून झालेला.

**योगसाधन**, न० (नं) योगाचें साधन.

**योगक्षेम**, चरितार्थ.

**योगिन्**, पु० (गी) योगी.

**योगिनिद्रा**, स्त्री० (द्रा) क्षणिक निद्रा.

**योजयितृ**, पु० (ता) योजना करणारा, योजक.

**योजयेत्**, नेमो, योजो.

**योद्धव्य**, न० (व्यं) लढावें.

**योधमुख्य**, पु० (ख्यः) योद्धयामध्यें. मुख्य सेनापति.

**योधयति**, लढवितो.

**यौवनदर्प**, पु० (र्पः) तारुण्याचा गर्व.

**यौवनवती**, स्त्री० (ती) तरुण स्त्री.



## र.

**र**, रुदन, रडणें.

**रंक**, पु० (कः) भिकारी, दीन.

**रक्षप**, पु० (पः) राक्षस.

**रग**, कळ.

**रंग**, सभामंडप. २ वर्ण.

**रंगती**, मिसळतात.

**रघुपति**, पु० (तिः) रामचंद्र.

**रज**, धूळ.

**रजतविकार**, पु० (रः) रुप्याचें नाणें, दागिने इत्यादि.

**रंजन**, न० (नं) अनुरक्त होणें २ संतोष.

**रंजयति**, संतोषवितो.

**रंजयंति**, स्त्री० (ती) रमविणारी.

**रंजली**, रमली. २ मोहिली.

**रजस्वला**, स्त्री० (ला) विटाळशी स्त्री.

**रण**, पु० (णः) समर भूमि.

**रणचत्वर**, न० (रं) रणांगण.

**रणधुरंधर**, पु० (रः) युद्धनिपुण.

**रणांगण**, न० (णं) युद्धस्थान.

**रत**, वि० (तः ता तं) गढलेला २ तल्लीन.

**रतिकांत** पु० (तः) मदन.

**रत्नप्रभा**, स्त्री० (भा) एका स्त्रीचें नांव. २ रत्नाचा प्रकाश.

**रत्नाकर**, पु० (रः) रत्नाची खाण.

**रत्नावली**, स्त्री० (ली) रत्नाची माळ.

**रथचरण**, न० (णं) रथचक्र.
**रंभापत्र**, न० (त्रं) केळीचें पान.
**रंभोरु**, स्त्री० (रु:) जिच्या मांड्या केळीसारख्या आहेत ती.
**रमभे**, संतोष पावला.
**रमले**, रममाण झाले.
**रमेश**, पु० (शः) श्रीकृष्ण.
**रवंदळी**, नाश, नासाडी.
**रविग्राव**, सूर्यकांत.
**रविभा**, स्त्री० (भा) सूर्याची प्रभा.
**रविमंडल**, न० (लं) सूर्यमंडळ.
**रविमंडळ**, आकाश.
**रसद**, पु० (दः) मेघ. २ द्रव्याचा भरणा.
**रसना**, स्त्री० (ना) जिव्हा.
**रसविपर्यास**, पु० (सः) वांकडेपणा.
**रसानाथ**, पु० (थः) राजा.
**रसाळ**, स्निग्ध. २ आंबा. ३ गोड.
**रसिकता**, स्त्री० (ता) गोडी.
**रहस्यभेद**, पु० (दः) गुप्त गोष्ट फोडणें.
**रहित**, वांचून.
**रक्षक**, पु० (कः) राखणारा.
**रक्षण**, न० (णं) सांभाळ.
**रक्षणोपाय**, पु० (यः) राखण्याचा उपाय.
**रक्षति**, राखतो.
**रक्षार्थम्**, अ० राखण्याकरितां.
**रक्षावें**, राखावें.
**रागिणी**, स्त्री० (णी) गाण्यांतील रागिणी. २ ज्या स्त्रीनें आपले अवयव रंगविले आहेत ती.
**राघव**, पु० (वः) रामचंद्र.
**राजकार्य**, न० (र्यं) राजाचें काम.
**राजकुल**, न० (लं) राजकूळ.
**राजगृह**, न० (हं) राजाचें घर.
**राजतः**, अ० राजापासून.
**राजता**, स्त्री० (ता) राजेपणा.
**राजताम्**, शोभो.
**राजदर्शन**, न० (नं) राजाची भेट.
**राजद्वार**, न० (रं) राजाचें दार.
**राजपुरुष**, पु० (षः) राजाचा माणूस.
**राजवसति**, स्त्री० (तिः) राजवाडा.
**राजसंश्रय**, वि० (यः या॰ यं) राजाचा आश्रित.
**राजसिंह**, पु० (हः) राजे लोकांत उत्तम.
**राजादेश**, पु० (शः) राजाज्ञा.
**राजाधिराज**, पु० (जः) सार्वभौम राजा.
**राजायते**, राजाचा डौल घालतो.
**राजावळ**, राजावळी.
**राजीवनयन**, वि० (नः ना॰ नं) कमलनेत्र.
**राजेंद्र**, पु० (द्रः) राजश्रेष्ठ.
**राज्य**, न० (ज्यं) राज्य.
**राजभंग**, पु० (गः) राज्यनाश.
**राज्यव्यवहार**, पु० (रः) राज्यकारभार.
**राज्यसुख**, न० (खं) राज्याचें सुख.
**राज्याधिकार**, पु० (रः) राज्याचा अधिकार.
**रांडोळी**, नाश, २ रांडपण.
**राणा**, राजा.
**राणिवस**, जनानखाना.
**रात**, रात्र.
**रात्र्यहनि**, रात्रंदिवस.
**राधेय**, पु० (यः) कर्णराजा.
**राममुग्रीव**, राम आणि सुग्रीव.
**रामाभा**, स्त्री० (भा) रामनाम.
**राव**, पु० (वः) शब्द.
**रावणारि**, पु० (रिः) रामचंद्र.
**रावणि**, पु० (णिः) इंद्रजित.
**रावणी**, पु० (णी) इंद्रजित.

**राघा**, पोपट.
**राशी**, ठेवा. २ ढीग.
**राष्ट्र**, राज्य.
**राह्या**, रहावयास.
**राज्ञी**, स्त्री० (ज्ञी) राज्यकर्ती.
**रिक्त**, न० (क्तं) रिकामें.
**रिघावें**, जावें.
**रिघे**, जाई. २ प्रवेश करी.
**रिचवी**, सांठवी, ठेवी.
**रिपुता**, स्त्री० (ता) शत्रुपणा, वैर.
**रिपुवर्जित**, वि० ( तः ता- तं ) शत्रु ज्यास नाहीं तो.
**रीघ**, शिरकाव.
**रुका**, पैसा.
**रुचली**, आवडली.
**रुचे**, आवडे.
**रुजु**, सरळ.
**रुंडमाला**, स्त्री० (ला) मनुष्यांच्या मुंडक्यांची माळ.
**रुंडमाळा**, मनुष्यांच्या मुंडक्यांची माळ.
**रुदन**, न० (नं) रडणें, शोक.
**रुदती**, स्त्री० (ती) रडणारी.
**रुद्रदेव**, पु० (वः) शिव, महादेव.
**रुष्ट**, वि० (ष्टः ष्टा- ष्टं) रुसलेला.
**रूपयौवनवत्**, पु० स्त्री० न० (वान्- वती- वत्) रूप व तारुण्य ह्यानीं युक्त.
**रूपवती**, स्त्री० (ती) सुंदरी, खुपसुरत.
**रे**, अ० अरे.
**रेखा**, रेषा. २ मर्यादा.
**रोगिता**, स्त्री० (ता) आजारपणा.
**रोगिन्**, पु० (गी) आजारी.
**रोचते**, रुचतो. २ गोड लागतो.
**रोदन**, न० (नं) रडणें, शोक.
**रोदिषि**, रडतोस.
**रोपित**, पु० (तः) रोंवलेला.
**रोहिणीवर**, पु० (रः) चंद्र.
**रौति**, आरडतो.

## ल.

**लंकानाथ**, पु० (थः) रावण. २ बिभीषण.
**लकेरी**, अलाप.
**लंकेश्वर**, पु० (रः) रावण. २ बिभीषण.
**लग**, ओळख.
**लगामी**, स्वाधीन.
**लगुडहस्त**, वि० ( स्तः स्ता- स्तं ) ज्याच्या हातीं दांडा आहे तो.
**लग्न**, वि० (ग्नः ग्ना- ग्नं) लागलेला.
**लग्न**, विवाह.
**लग्नवेला**, स्त्री० (ला) मुहूर्त.
**लंघन**, न० (नं) उल्लंघन. २ ज्वरामध्यें जें उपोषण करतात तें.
**लंघयेत्**,—पलीकडे जावो.
**लंघी**,—उल्लंघन करी.
**लघुचेतसाम्**,—हलक्या मनाचे.
**लघुपतननामा**,—लघुपतनक नांवाचा.
**लज्जमान**, वि० (नः ना- नं) लाजाळू, लाजणारा.
**लज्जावती**, स्त्री० (ती) लाजणारी.
**लडिवाळ**,—लाडिक.
**लतिका**, स्त्री० (का) वेल.
**लत्ता**,—लाथ.
**लंपट**, पु० (टः) मोहित.
**लपटुनी**,—वेष्टुनी.
**लंबमान**, लंबाकार. २ लोंबणारा.

लब्धावकाश, पु० ( शः ) स्त्री० ( शा ) न० ( शं ) ज्याला अवकाश मिळाला आहे तो.
लब्ध्वा, अ० मिळवून.
लभते, पावतो.
लय, पु० ( यः ) अंत, शेवट.
ललिता, स्त्री० ( ता ) स्त्री. देवीवि०
लय, पुष्कळ. २ अंत.
लव, लहु. कालमान.
लवलाहीं, सत्वर, लौकर.
लवलाहें, सत्वर, लौकर.
लहरी, लाट.
लहुवाग्रज, पु० ( जः ) कुश.
ळळा, सवय. २ प्रेम.
लक्षिला, पाहिला.
लक्षेना, समजेना.
लक्ष्य, न० ( क्ष्यं ) पाहण्यास योग्य. २ निशाण.
लक्ष्यते, वेधिला जातो. २ पाहिला जातो.
लाघव, न० ( वं ) हलकेपणा, लघुता.
लाघवी, दुसऱ्याचें मनरंजन करणारा.
लाजिरवाणें, लज्जास्पद.
लातें, लाथेनें.
लाधला, मिळाला.
लाधलास, मिळविलास.
लाधे, मिळे.
लाभतो, मिळतो.
लावण्य, न० ( ण्यं ) सौंदर्य.
लावण्यवती, स्त्री० ( ती ) सुंदर स्त्री.
लाहतां, लाभतां.
लाहो, लाभो, मिळो. २ छंद. ३ इच्छा.
लिखतु, लिहो.
लिगाड, अडथळा.
लिप्यते, लेपिला जातो.
लिप्सेत, मिळवो.
लुठति, लोळतो.
लुब्धक, वि० ( कः का- कं ) लोभी, कृपण.
लुब्धजन, पु० ( नः ) लोभी लोक.
लुब्धता, स्त्री० ( ता ) लालूच.
लुलुभे, लालचावला.
लुलोट, लोळला.
लेइली, धारण केली.
लेंकरूं, मूल, बालक.
लेख, पु० ( खः ) देव. दस्ताऐवज.
लेखर्षि, पु० (र्षिः) देवर्षि.
लेणें, दागिना, नग.
लेभे, पावला.
लोकत्रय, पु० ( यः ) त्रिभुवन.
लोकपाल, पु० ( लः ) इंद्रादि लोकपाल.
लोकप्रवाद, पु० ( दः ) लोकांतली आवाई.
लोकबंधु, पु० ( धुः ) लोकहितकर्ता.
लोकयात्रा, स्त्री० ( त्रा ) चौरस्ता.
लोकाचारी, लोकांसारखा वागणारा.
लोटू, लोट, समूह.
लोप, नाश.
लोपल्या, दिसेनाशा झाल्या.
लोप्तुम्, अ० कापावयास.
लोभ, पु० ( भः ) प्रीति. २ आशा.
लोभमोहित, वि० ( तः ता- तं ) लोभानें फसविलेला.
लोभाकृष्टन, वि० ( नः ना- नं ) लोभानें वळविलेला.
लोल, कल्लोळ. २ लहरी. ३ लोळण्याचा प्रकार. ४ उत्सुक.
लोष्ठवत्, अ० ढेकुळाप्रमाणें.

**लोहानाम**, लोखंडाचा.
**लोहार्गल**, न० ( लं ) लोखंडाचें मुसळ.
**लौल्य**, न० ( ल्यं ) चापल्य.

---

## व.

**वः**, तुमचा.
**वक्त्रांबुज**, न० (जं) मुखकमल.
**वचकार्थे**, ध्यार्वे.
**वंचन**, न० (नं) ठकबाजी.
**वचनकर**, पु० (रः) स्त्री० न० (रा- रं) आज्ञापालक.
**वचनक्रम**, पु० (मः) बोलण्याचा ओघ.
**वंचना**, स्त्री० (ना) ठकबाजी.
**वचनावलि**, स्त्री० (लिः) बोलणें.
**वचनीयता**, स्त्री० (ता) टपका, दोष.
**वंचयितव्यम्**, ठकवावें.
**वडवाग्नि**, पु० (ग्निः) समुद्रांतील अग्नि.
**वत्से**,— मुली.
**वदन्**, पु० (न्) बोलणारा.
**वदरिक**, पु० (कः) बोरीचें झाड,
**वदान्यजन**, पु० (नः) दाता.
**वदामि**,—बोलतो.
**वदूं**,—बोलूं.
**वंदूं**,—वंदन करूं.
**वंद्य**, वि० (द्यः द्या- द्यं) वंदन करावयास योग्य. २ मान्य.
**वनद**, पु० (दः) मेघ.
**वनदेवता**, स्त्री० (ता) वनाची देवता.
**वनवासी**,—वनांत रहाणारा.
**वनस्थ**, वि० (स्थः स्था- स्थं) वनांत रहाणारा.
**वनाळी**,—वनपंक्ति.
**वमति**,—ओकतो.
**वमन**,—ओकणें.
**वयम्**,—आम्हीं.
**वयस्क**, वृद्ध, म्हातारा.
**वर**, पु० (रः) देणगी, नवरा.
**वरतनु**, वि० (नुः नुः नु) सुंदर.
**वरद**, वि० (दः दा- दं) वर देणारा.
**वरदा** स्त्री० (दा) वर देणारी.
**वरम्**, अ० फार चांगलें.
**वरयतम्**,—निवडा. २ मागा.
**वरवर्णिनी**, स्त्री० (नी) सुंदर स्त्री.
**वरसुत**, पु० (तः) वडील पुत्र.
**वरी**, पर्यंत. २ वर.
**वरुणालय**, पु० (यः) समुद्र.
**वर्ग**, पु० (र्गः) जात.
**वर्जयेत्**, चुकवो. २ टाको.
**वर्जा**, टाका.
**वर्ण**, पु० (र्णः) रंग. २ जात.
**वर्णयितुम्**, अ० वर्णन करावयास.
**वर्तती**, वागती, चालती.
**वर्तते**, वागतो, राहतो.
**वर्तमान**, सांप्रत. २ बातमी.
**वर्तिका**, स्त्री० (का) दिव्याची वात.
**वर्तितव्य**, वि० (व्यः व्या- व्यं) वहिवाटावयाचें.
**वर्तिन्**, पु० (र्ती) वागणारा. २ राहणारा.
**वर्दळीस**, हातपिटीस.
**वर्द्धते**, वाढतो.
**वर्द्धयति**, वाढवितो.
**वर्म**, गुह्य. २ मर्म.
**वर्षति**, पाऊस पडतो. २ वृष्टि करतात.
**वर्षाकाल**, पु० (लः) पावसाळा, पाऊसकाळ.

वर्षांबु, न० (बु) पावसाचें पाणी.
वर्षाव, वृष्टि.
वर्षाविवर्णि, वृष्टिवांचून.
वर्षिन्, पु० (र्षी) वृष्टि करणारा.
वल्गा, लगाम.
वंशक्रमागत, वि० (तः ता-तं) पिढ्यान पिढीनें आलेले.
वंशविशुद्ध, वि० (द्धः द्धा-द्धं) खानदानीचा.
वशी, राहतोस.
वंशी, मुरली, पांवा.
वशीकृत, वि० (तः ता-तं) मोहित केलेला. २ ताब्यांत आणलेला.
वसति, राहतो.
वसनांचल, वस्त्राची आंचळी.
वसुधार, पु० (रः) खजिना राखणारा.
वसेत्, राहो.
वस्तव्य, वि० (व्यः व्या-व्यं) राहावयाचें.
वस्तु, न० (स्तु) पदार्थ.
वस्त्रवेष्टित, वि० (तः ता-तं) कापडांत गुंडाळलेला.
वहासि, वाहातोस, नेतोस.
वहिःकृत, वि० (तः ता-तं) जाती बाहेर टाकलेला.
वहिर, अ० बाहेर.
वळघले, चढले.
वळी, फिरवी. २ वेग. ३ सुरकुती.
वक्ष, न० (क्षं) हृदय.
वक्षस्थल, न० (लं) ऊर, छाती.
वक्षस्थळ, ऊर, छाती.
वक्ष्यामि, बोलेन.
वा, अ० किंवा, अथवा.
वांकुल्या, मिचकावणें.
वाक्पटुता, स्त्री० (ता) बोलण्याचें चातुर्य.
वाक्पारुष्य, न० (ष्यं) कठोर भाषण.
वाक्बाण, खोचून बोलणें.
वाक्य, न० (क्यं) भाषण.
वाखाणी, वाहावा करी.
वागवावें, वर्तवावें. २ ठेवावें.
वाग्दंड, दुर्भाषण.
वाग्दोष, पु० (षः) वाणीचा दोष.
वाग्निश्चय, पु० (यः) निश्चित बोलणें.
वांग्मधुर, वि० (रः रा-रं) बोलण्यांत गोड.
वाग्वधू, स्त्री० (धू) वाणीरूप स्त्री.
वाग्विलास, पु० (सः) वाक्चातुर्य.
वाग्व्यापार, पु० (रः) भाषणाचा व्यापार.
वाच्, भाषण.
वाचक, पु० (कः) बोलणारा.
वाचस्पत्य, न० (त्यं) पांडित्य.
वाच्यता, स्त्री० (ता) दोष.
वांछति, इच्छितो.
वाजट, पु० (टः) वाचाळ. २ वृथा.
वाजिवारणलोह, घोडा, हत्ती, आणि लोखंड.
वांझें, व्यर्थ, निष्फळ.
वांडेंकोडें, कौतुकानें. २ अत्यंत.
वाणूं, वर्णूं.
वातघ्न, वि० (घ्नः घ्ना-घ्नं) वायु हारक.
वाद, बोलणें.
वादक, वि० (कः का-कं) वाजविणारा.
वादयति, वाजवितो.
वादू, भाषण.
वाद्य, वाजविण्याचें यंत्र. २ वाजविणें.
वानवा, संशय.
वाने, वर्णी.
वापिका, स्त्री० (का) विहीर.
वाम, पु० (मः) डावा. २ मदन.

**वामनैकपद,** न० (दं) वामनाचें पाऊल-भर.
**वांया,** व्यर्थ.
**वारविलासिनी,** स्त्री० (नी) कळवंतीण, कसबीण.
**वारंगना,** स्त्री० (ना) कसबीण.
**वारिज,** न० (जं) कमळ.
**वारिराशी,** समुद्र.
**वारील,** निवारील, दूर करील.
**वारुणी,** स्त्री० (णी) वरुणोक्त विद्या.
**वारांशि,** पु० (शिः) समुद्र.
**वालीसुत,** पु० (तः) अंगद नामा वानर.
**वाव,** व्यर्थ.
**वावुगे,** वावगे.
**वावो,** व्यर्थ.
**वास,** राहणें. २ वस्त्र.
**वासभूमि,** स्त्री० (मिः) राहावयाची जागा.
**वासयेत्,** राहो.
**वासरमणि,** पु० (णिः) सूर्य.
**वासवचाप,** पु० (पः) इंद्र धनुष्य.
**वासित,** वि० (तः ता- तं) वास लावलेला.
**वासिना,** राहणाऱ्यानें.
**वास्तव्य,** राहणें.
**वाहति,** वाजविती.
**वाहिनी,** स्त्री० (नी) फौज, सैन्य.
**वाहो,** घेऊन जावो. २ वागवो.
**वाह्यमान,** वि० (नः ना- नं) ज्यास वाहून नेतात असा.
**वाळवी,** सुखवी.
**विकट,** पु० (टः) मोठा. २ भयंकर.
**विकत्थन,** न० (नं) बडबड.
**विकाल,** वि० (लः ला- लं) अयवाचा. २ व्याकुल, मूर्छित.
**विकल्पुनी,** योजूनी.
**विकल्पेत,** संशय घेवो.
**विकारित,** पु० (तः) ज्याला विकार झाला आहे तो.
**विकीर्ण,** वि० (र्णः र्णा- र्णं) पसरलेला.
**विकीर्य,** विखरून.
**विकृतबुद्धि,** पु० (द्धिः) रागावलेला.
**विकृताकार,** पु० (रः) स्त्री० (रा-) न० (रं) भयंकर.
**विकोश,** पु० (शः) नागवें शस्त्र.
**विक्रमलव,** पु० (वः) अल्प पराक्रम.
**विक्रीय,** अ० विकून.
**विख,** विष.
**विगतभा,** स्त्री० (भा) विशोभित.
**विगृणीयात्** , लढो,
**विग्रयितुम्** , अ० लढण्याकरितां.
**विग्राह्य,** अ० लढून.
**विघट्टित,** वि० (तः ता- तं) घांसलेला.
**विघडो,** नाहींसा होवो.
**विघातयेत्** , मारवो.
**विघ्न,** न० (घ्नं) संकट.
**विघ्नशताभिभूत,** वि० (तः ता- तं) शें-कडो विघ्नांनीं व्यापलेलें.
**विचरणें,** फिरणें.
**विचरत्** , पु० (त्) चालणारा.
**विचरे,** चाले, फिरे.
**विचार,** पु० (रः) मनन.
**विचारय,** तपास कर, विचार कर.
**विचारज्ञ,** वि० (ज्ञः ज्ञा- ज्ञं) विचारी.
**विचार्य,** अ० तपासून, विचारून.
**विचित्र,** वि० (त्रः त्रा- त्रं) नाना प्रकारचा. २ विलक्षण.
**विचिंत्य,** अ० मनन करून, विचार करून.

**विचेतन**, वि० (नः ना- नं) निर्जीव.
**विचेष्टित**, न० (तं) कांहीं क्रिया करणें.
**विजन**, न० (नं) अरण्य.
**विजय**, पु० (यः) अर्जुन.
**विजयंते**, जिंकतात.
**विजयिन्**, पु० (यी) जिंकणारा. २ कीर्तिमान.
**विजार**, इचार, चोळणा.
**विजिगीषु**, वि० (षुः षुः षु) जिंकावयास इच्छिणारा.
**विजेतुम्**, अ० जिंकावयास.
**विज्वर**, पु० (रः) दुःख रहित.
**विट**, पु० (टः) जार.
**विटंबा**, अप्रतिष्ठा पावे.
**विटे**, त्रास पावे.
**विडंबना**, स्त्री० (ना) फजिती. २ हाल.
**वितरी**, देतो.
**वितळे**, नाश पावे. २ पातळ होई.
**वित्तवत्**, वि० (वान् - वती- त्) पैसेवाला.
**वित्तहीन**, वि० (नः ना-नं) गरीब.
**वित्तेहा**, स्त्री० (हा) धनाची इच्छा.
**विदग्धता**, स्त्री० (ता) चतुरपणा.
**विदधाति**. करतो. २ धरतो.
**विदार्यमाण**, वि० (णः णा- णं) फाडलेला.
**विदीर्ण**, वि० (र्णः र्णा-र्णं) चिंधिलेला.
**विदीर्णा**, स्त्री० (र्णा) चिंधिलेली.
**विदीर्यते**, फाडला जातो.
**विदुः**, जाणतात.
**विदुषाम्**, विद्वानांचा.
**विंदेत**, मिळवो.
**विदेश**, पु० (शः) परदेश. २ प्रवास.
**विदेह**, पु० (हः) जनक राजा. २ वैराग्य.
**विदेही**, विरक्त.
**विद्यते**, आहे.
**विद्यमान**, सांप्रत कालचा.
**विद्या**, स्त्री० (द्या) ज्ञान, विद्या.
**विद्यागम**, पु० (मः) विद्या येणें.
**विद्याधरी**, स्त्री० (री) विद्याधराची स्त्री.
**विद्याधरिपरिजन**, पु० (नः) अप्सरांचे चाकर लोक.
**विद्यांत**, न० (तं) विद्येचा शेवट.
**विद्याफल**, न० (लं) विद्येचें फळ.
**विद्यावयोवृद्धेभ्यः**, विद्येनें व वयानें मोठे.
**विद्यावृद्ध**, वि० (द्धः द्धा- द्धं) विद्येनें मोठा.
**विद्याहीन**, वि० (नःना- नं) अडाणी, मूर्ख.
**विद्युल्लता**, स्त्री० (ता) वीज.
**विद्रुमभावना**, पोंवळ्यासारखा.
**विद्वज्जन**, पु० (नः) शहाणे लोक.
**विद्विष्**, शत्रु, वैरी.
**विधत्ते**, करतो.
**विधातव्य**, वि० (व्यः व्या- व्यं) करावयाचा.
**विधातव्या**, स्त्री० (व्या) करावयाची.
**विधातृवशात्** , दैव योगानें.
**विधास्यति**, करील.
**विधियोग**, पु० (गः) दैव.
**विधीयते**, सांगितलें जातें.
**विधुमणि**, पु० (णिः) चंद्रकांत मणि.
**विधुरदर्शन**, न० (नं) अपशकून, अभद्र.
**विधेया**, करावी.
**विधेहि**, तूं कर.
**विध्वंसिन्**, वि० (सी- सिनी- सि-) नाश पावणारा.

**विध्वस्त**, वि० (स्त: स्ता- स्तं) भग्न. २ न० (स्तं) चंद्रास्त.
**विनता**, स्त्री० (ता) गरुड माता.
**विनतानंदन**, पु० (न:) गरुड.
**विनय**, पु० (य:) नम्रपणा.
**विनश्यति**, नाश पावतो. २ मरतो.
**विनश्वर**, वि० (र: रा- रं) नाशवंत.
**विनष्ट**, वि० (ष्ट: ष्टा- ष्टं) नाश पावलेला.
**विनाशित**, पु० (त:) नाश पावलेला.
**विनाशिन्**, वि० (शी- शिनी- शि) नाश पावणारा.
**विनासा**, स्त्री० (सा) नकटी.
**विनिघ्नंति**, ठार मारतात.
**विनिपातित**, वि० (त: ता- तं) मारलेला.
**विनियोग**, पु० (ग:) योजना.
**विनियोजयेत्**, योजो.
**विनीतत्व**, न० (त्वं) नम्रपणा.
**विनीति**, स्त्री० (ति:) मुजरा.
**विनोद**, पु० (द:) मस्करी. २ कौतुक.
**विन्मुख**, पाठमोरा.
**विपति**, पु० (ति:) गरुड.
**विपत्काल** पु० (ल:) संकट काल.
**विपदा**, स्त्री० (दा) विपत्ति, हाल.
**विपद्दशा**, स्त्री० (शा) कमनशीब.
**विपद्यते**, संकटांत पडतो.
**विपन्नाय** वि० (य: या- यं) संकटांत पडलेला.
**विपन्नाया**, स्त्री० (या) संकटांत पडलेली.
**विपरित**. उलट.
**विपरितता**, स्त्री० (ता) विपरीतपणा.
**विपर्यय**, पु० (य:) उलटापालट, घालमेल, बदलणूक.
**विपश्चित्**, पु० (त्) पंडित.

**विपाक**, पु० (क:) परिणाम.
**विप्रयास**, पु० (स:) अनायास.
**विप्रिय**, पु० (य:) वांकडेपणा.
**विभक्त**. पु० (क्त:) निराळा. २ वांटलेला.
**विभाग**, पु० (ग:) वांटा.
**विभावयेत्**, शाबीत करो.
**विभिन्न**, वि० (न्न: न्ना- न्नं) निराळा केलेला.
**विभूत**, न० (तं) भस्म, राख.
**विभूति**, स्त्री० (ति:) मोठी शक्ति. २ ऐश्वर्य, महत्व. ३ पु० (ति:) जे महान महान पुरुष ते.
**विभ्रम**, पु० (म:) लाटेचें हालणें.
**विमर्द**, पु० (र्द:) नासणें, तोडणें.
**विमल**,, वि० (ल: ला- लं) स्वच्छ. २ पापरहित.
**विमानयानी**, विमानांतून जाणारे.
**विमुक्तकंठ**, वि० (ठ: ठा- ठं) शब्द फुटलेला.
**विमुख**, वि० (ख: खा- खं) उलटा, वांकडा.
**विमुंचति**, सोडतो.
**विमुच्यते**, सोडला जातो.
**विमुह्यति**, मोह पावतो, भुलतो.
**विमृश्य**, अ० विचार करून.
**विमृश्यकारिन्**, वि० (री- रिणी रि) विचारी.
**विमोचित**, वि० (त: ता- तं) सोडलेला.
**वियुक्त**, दूर.
**वियोग**, पु० (ग:) निराळेपणा.
**वियोगित**, ज्याला वियोग झाला आहे तो.
**विरक्त**, वि० (क्त: क्ता- क्तं) ज्याची प्रीति उडाली तो, उदासीन.

विरक्तप्रकृति, वि० (तिः तिः ति) ज्याणें सर्व संग सोडले आहेत तो.
विरंग, बेरंग.
विरमती, नाहींसे होतात.
विरलम् , अ० क्वचित.
विरस, पु० (स ) भग्नोत्साह.
विरह, पु० (रः) अभाव, नसणें. २ दुःख. ३ वियोग.
विरहानल, विरहाग्नि.
विरहित वि० (तः ता- तं) सोडलेला. वेगळा.
विरहिता, वियोग दुःखित.
विराग, पु० (गः) प्रीति.
विराम, पु० (मः) नाश. २ अवकाश.
विरुद्ध, उलट.
विरूपयितुम्, अ०. विरूप करण्यास.
विरोधी, शत्रु, द्वेषी.
विरौति, गोंगाट करतो.
विल, न० (लं) बीळ.
विलखा, शोभा.
विलंब, पु० (बः) खोळंबा, उशीर.
विलपन. न० (नं) शोक.
विलपसि, शोक करतोस,
विललास, खेळला.
विलिप्त, वि० (प्तः प्ता- प्तं) माखलेला.
विलुंपति, लुटतो.
विलोक, अवलोकन, पहाणें.
विलोकयति, पहातो.
विलोकी, पाहा.
विलोक्य, अ० पाहून.
विवदमानानाम्, भांडणाऱ्यांचा.
विवदेत्, भांडो.
विवरण, न० (णं) स्पष्टीकरण.
विवरलक्षास्तव, छिद्र पाडण्याविषयीं.
विवर्जित, वि० (तः ता- तं) टाकलेलें.
विवर्त, अन्यथा भास.
विवर्द्धन, न० (नं) वाढणें-
विवादिन्, पु० (दी) भांडणारा,
विवाहचतुष्टय, न० (यं) चार लग्नें.
विविक्तदेश, पु० (शः) एकांत स्थान.
विविक्तासन, वि० (नः ना- नं) एकांतीं बसणारा.
विवृत, वि० (तः ता- तं) पसरलेला. २ उघड केलेला.
विवृतास्य, वि० (स्यः स्या- स्यं) तोंड पसरलेला.
विवृद्धि, स्त्री० (द्धिः) वाढणें.
विशंति, आंत जातात.
विशालकुलसंभव, वि० (वः वा- वं) मोठ्या कुलांतला..
विशिष्ट, पु० (ष्टः) मुख्य. २ श्रेष्ट.
विशिष्टता, स्त्री० (ता) थोरपणा, श्रेटपणा.
विशिष्टवर्ण, पु० (र्णः) उत्कृष्ट रंगाचा.
विशीर्यन, विस्खलित करणें.
विशुद्ध, वि० (द्धः द्धा- द्धं) स्वच्छ. २ शुद्ध.
विशेष, विशेषें करून.
विशेषतः, अ० विशेषं करून.
विशेषज्ञ, वि० (ज्ञः ज्ञा- ज्ञं) अधिक जाणणारा.
विश्रब्ध, वि० (ब्धः ब्धा- ब्धं) विश्वास केलेला.
विश्रंभालाप, पु० (पः) विश्वासाची गोष्ट.
विश्रम्य, अ० विसावा घेऊन.
विश्रांति, स्त्री० (तिः) विसावा.

**विश्राम**, पु० (मः) आराम, विसावा.
**विश्रामा**, स्त्री० (मा) विसावा देणारी.
**विश्रूयते**, ऐकिलें जातें.
**विश्व**, न० (श्वं) जग.
**विश्वासिति**, विश्वासतो.
**विश्वासघातक**, पु० (कः) विश्वास घातकी.
**विश्वासपात्र**, वि० (त्रः त्रा- त्रं) विश्वासु.
**विश्वासभूमि**, स्त्री० (मिः) विश्वासाची जागा.
**विश्वास्य**, अ० विश्वासून.
**विषकुंभ**, पु० (भः) विषाचें भांडें.
**विषघ्न**, वि० (घ्नः घ्ना- घ्नं) विष घालविणारा.
**विषण्ण**, पु० (ण्णः) स्त्री० न० (ण्णा- ण्णं) उदास.
**विषदिग्ध**, वि० (ग्धः ग्धा- ग्धं) विखारलेला.
**विषद्रुम**, पु० (मः) विषाचें झाड.
**विषम**, वि० (मः मा- मं) कठीण.
**विषमेषु**, पु० (षुः) मदन.
**विषवृक्ष**, पु० (क्षः) विषाचें झाड.
**विषहृदय**, पु० (यः) स्त्री० न० (या- यं) कडू मनाचा.
**विषाद**, पु० (दः) खेद, पश्चात्ताप.
**विषीदति**, दुःख करतो, कष्टी होतो.
**विष्णुशर्मा**, विष्णु नांवाचा.
**विसर्जित**, वि० (तः ता- तं) सोडलेला, टाकलेला.
**विसर्पन्**, सरपटणारा.
**विस्तीर्णता**, स्त्री० (ता) विस्तार.
**विस्तीर्णम्**, पसरलेलें.
**विस्मित**, वि० (तः ता- तं) आश्चर्य पावलेला.
**विस्मृतसंस्कार**, पु० (रः) जो आपले संस्कार विसरला तो.
**विस्मृति**, स्त्री० (तिः) विसर.
**विहस्य**, अ० हसून.
**विहाय**, अ० टाकून, सोडून.
**विहारिणः**, मौजेनें फिरणारे.
**विहीन**, वि० (नः ना- नं) सोडलेला.
**विज्ञप्त**, कळविणें.
**विज्ञानविक्रमयशोभिः**, ज्ञान, पराक्रम, आणि यश यांहीं करून.
**विज्ञापित**, कळविणें.
**विज्ञाय**, अ० जाणून.
**विज्ञेय**, वि० (यः या- यं) जाणण्यास योग्य.
**वीतराग**, पु० (गः) शांत.
**वीरसमन्वित**, पु० (तः) योद्ध्या बरोबर असणारा.
**वीक्षते**, पाहतो.
**वृक्षाग्र**, न० (ग्रं) झाडाचा शेंडा.
**वृणते**, वरतो.
**वृत्त**, पु० (त्तः) बातमी. २ झालेला.
**वृत्ति**, स्त्री० (त्तिः) कसब, धंदा.
**वृत्तिता**, स्त्री० (ता) अस्तित्व.
**वृत्त्यर्थम्**, अ० उपजीविकेकारितां.
**वृद्धद्विजरूपिन्**, पु० (पी) म्हाताऱ्या ब्राम्हणाचा वेष घेणारा.
**वेत्ति**, जाणतो.
**वैकल्य**, न० (ल्यं) विकलता.
**वैचित्र्य**, न० (त्र्यं) नानातऱ्हा.
**वैराग्य**, न० (ग्यं) उदासीनपणा.
**वैषम्य**, न० (म्यं) भेद. २ विषमता.
**व्यज्यते**, स्पष्ट केला जातो.
**व्यतिकर**, पु० (रः) दुर्दैव.
**व्यपदेश**, पु० (शः) युक्ति, मिष.

**व्यपेत**, गेलेला.
**व्यपेयाताम्** , जावो.
**व्यभिचार**, पु० (रः) छिनाली.
**व्यभिचारिणी** स्त्री० (णी) छिनाल स्त्री.
**व्ययमान**, खर्चला जातो तो.
**व्ययिन्** , पु० (यी) खर्च करणारा.
**व्यर्थ**, पु० (र्थः) फुकट.
**व्यर्थयत्न**, न० (त्नं) स्त्री० (त्ना-) पु० (त्नः) ज्याची निरर्थक मेहेनत झाली आहे तो. २ न० (त्नं) व्यर्थ इलाज.
**व्यवसाय**, पु० (यः) मेहनत, व्यासंग.
**व्यवसायिन्** , पु० (यी) मेहनती, व्यासंगी.
**व्यवस्थाप्य**, अ० बसवून, ठरवून.
**व्यवस्थित**, बेताचा. २ ठरलेला.
**व्यवहारामि**, व्यवहार करतों.
**व्यवहर्तव्य**, वि० (व्यः व्या- व्यं) व्यवहार करण्याजोगा.
**व्यवहारांग**, न० (गं) लोकांची चाल, कायदा.
**व्यवाह्नियताम्** , चालूं द्यावें.
**व्यसनिता**, स्त्री० (ता) संकट.
**व्यसनिन्**, पु० (नी) ज्यास कोणतेंही व्यसन लागलें आहे तो.
**व्यसनीय**, पु० (यः) वाईट कृत्याविषयीं जो विमग्न तो.
**व्याघ्रता**, स्त्री० (ता) वाघपणा.
**व्यादान**, न० (नं) उघडणें.
**व्याधिदुर्भिक्षपीडित**, वि० (तः ता- तं) आजारानें व दुष्काळानें पीडलेला.
**व्यापादयति**, ठार मारतो.
**व्यापार**, पु० (रः) उद्योग, धंदा. २ व्यवहार.
**व्रजामि**, जातों.
**व्रणित**, वि० (तः ता- तं) जखमी झालेला
**व्रणितहृदय**, वि० (यः या- यं) जखमी उराचा.

---

## श.

**शकटार**, पु० (रः) विशेष नाम.
**शंकनीय**, पु० (यः) संशयाचा.
**शंका**, स्त्री० (का) संशय.
**शंकास्पद**, न० (दं) संशयाची जागा,
**शंकिन्**, पु० (की) शंका घेणारा.
**शक्तु**, पु० न० (क्तुः क्तु) सातु.
**शक्यते**, शकतात.
**शंक्यते**, शंकिला जातो.
**शक्यप्रतीकार**, पु० (रः) उपाय होण्याजोगा.
**शक्नोति**, शकतो.
**शत**, न० (तं) शंभर.
**शतद्वार**, न० (रं) शंभर दारांचें.
**शतमुख**, न० (खं) शंभर तोंडाचें.
**शतलक्ष**, शंभर लक्ष.
**शतायु**, पु० (युः) शंभर वर्षांचा.
**शत्रुविग्रह**, न० (हं) शत्रूवर स्वारी.
**शपमान**, वि० (नः ना- नं) शाप देणारा, शिव्या देणारा.
**शब्दमात्र**, पु० (त्रः) केवळ शब्द.
**शमयति**, शांत करतो, विझवितो.
**शरणागत**, वि० (तः ता- तं) शरण आलेला.
**शरन्मेघ**, पु० (घः) शरदकालचा मेघ.
**शरीरवैकल्य**, न० (ल्यं) शरीराचा आजारीपणा.

**शशांक**, पु० (कः) चंद्र.
**शशिदिवाकरौ**, पु० द्वि० (रौ) चंद्र व सूर्य.
**शशिनः**, चंद्राचा.
**शस्त्रपाणिनाम्**, हत्यारबंदाचा.
**शस्य**, न० (स्यं) दाणा, धान्य.
**शस्यभक्षक**, वि० (कः का- कं) दाणा खाणारा.
**शस्यक्षेत्र**, न० (त्रं) क्षेत्र.
**शांत**, पु० (तः) स्थिर. २ शांत.
**शांतचेतसाम्**, शांत मनाचे.
**शांति**, स्त्री० (तिः) स्थिरता, शांति.
**शाठ्य**, न० (ठ्यं) लुच्चेगिरी.
**शास्ति**, हांकतो, अम्मल करितो. २ हुकूम करतो.
**शास्त्र**, न० (स्त्रं) धर्म पुस्तक. २ कायदा. ३ विद्या.
**शास्त्रवत्**, अ० शास्त्रप्रमाणें.
**शास्त्रज्ञ**, वि० (ज्ञः ज्ञा- ज्ञं) शास्त्र जाणणारा.
**शास्त्राननुष्ठानेन**, शास्त्र न शिकल्यानें.
**शिथिल**, पु० (लः) सईल, ढिला.
**शिष्ट**, पु० (ष्टः) विद्वान.
**शिष्टसभा**, स्त्री० (भा) विद्वानांची सभा,
**शिक्षित**, पु० (तः) स्त्री० न० (ता- तं) शिकलेला.
**शीघ्रम्**, अ० लौकर.
**शीतकाल**, पु० (लः) हिवाळा.
**शीतता**, स्त्री० (ता) थंडपणा.
**शीतार्त**, वि० (र्तः र्ता- र्तं) थंडीनें पीडलेला.
**शीलगुणादि**, स्वभाव, गुण इत्यादि.
**शीलसंपन्न**, वि० (न्नः न्ना- न्नं) उत्तम स्वभावाचा.
**शुकवत्**, अ० पोपटासारखा.
**शुक्लीकृत**, वि० (तः ता- तं) पांढरे केलेलें.
**शुचित्व**, न० (त्वं) शुद्धपणा.
**शुद्ध**, पु० (द्धः) स्वच्छ. २ शुद्ध.
**शुद्धमन**, वि० (नः ना- नं) साफ मनाचा.
**शुध्यति**, साफ होतो, शुद्ध होतो.
**शुभलग्न**, पु० (ग्नः) उत्तम वेळ.
**शुभाशुभ**, न० (भं) चांगलें वाईट.
**शुश्राव**, ऐकिलें.
**शुश्रूषेत**, चाकरी करो.
**शुष्क**, पु० (ष्कः) वाळलेलें.
**शूकर**, पु० (रः) डुकर.
**शूरता** स्त्री० (ता) शूरपणा.
**शृंगाग्रप्रहरणाभिमुख**, पु० (खः) शिंगांनीं मारण्यास तयार झालेला.
**शृंगिणाम्**, शिंगाच्या जनावरांचा.
**शृणु**, ऐक.
**शेते**, निजतो.
**शैथिल्य**, न० (ल्यं) सईलपणा.
**शैलशिखर**, पु० न० (रः रं) पर्वताचा माथा.
**शोकचर्चा**, स्त्री० (र्चा) दुःखवार्ता.
**शोकाकुल**, वि० (लः ला- लं) दुःखांत गढलेला.
**शोकारातिभयत्राण**, न० (णं) शोक, शत्रु आणि भय यांपासून रक्षण करणें.
**शोकार्त**, वि० (र्तः र्ता- र्तं) दुःखानें पीडलेला.
**शोचितुम्**, शोक करावयास.
**शोधन**, न० (नं) शुद्ध करणें. २ शोध.
**शोभते**, शोभतो.
**शोभन**, वि० (नः ना- नं) शोभणारा.
**शौंडिकी**, स्त्री० (की) पिठेवाली.
**श्रद्दधताम्**, विश्वासणाऱ्यांचा.

श्रमणायते, भिकारी होतो.
श्रयते, आश्रयास जातो.
श्रवण, न० (णं) ऐकणें.
श्रांत, वि० (तः ता तं) थकलेला.
श्रीखंड, पु० न० (डः डं) चंदन,
श्रीपर्वत, पु० (तः) एका पर्वताचें नांव.
श्रीमद्देवपादाः, महाराजांचे पाय.
श्रुतवंतः, ऐकलेले.
श्रुतिविषय, पु० (यः) वेदांतील विषय.
श्रुत्वा, अ० ऐकून.
श्रूयते, ऐकिलें जातें
श्रेयान्, उत्तम, फार चांगला.
श्रेष्ठतम, पु० (मः) सर्वांहून चांगला.
श्रोतुम्, अ० ऐकावयास.
श्रोतृ, पु० (ता) ऐकणारा.
श्लाघ्यताम्, स्तवावें.
श्लिष्ट, पु० (ष्टः) चिकटलेला.
श्लोकद्वय, न० (यं) दोन श्लोक.
श्वपुछ, पु० (छः) कुत्र्याचें शेपूट.
श्वसन्, पु० (सा) श्वासोश्वास घेणारा.
श्वापद, पु० (दः) रानांतील जनावर.

---

## ष.

षट्, सहा.
षट्कर्ण, पु० (र्णः) सहा कानांचा.
षड्गुण, पु० (णः) सहापट.
षड्वर्ग, पु० (र्गः) सहांचा वर्ग.
षण्मासाभ्यंतरे, सहा महिन्यांत.
षाड्गुण्य, न० (ण्यं) सहा गुण.
षोढश, पु० (शः) सोळावा.

---

## स.

स, बरोबर.
सः, तो.
सकरुण, पु० (णः) दयाळू.
सकाशम्, अ० जवळ.
संकुल, वि० (लः ला- लं) गच्च भरलेला. २ व्यापलेला.
सकोप, पु० (पः) रागावलेला, रागाचा.
सकोपम्, रागानें. रागावून.
सक्तिमत्, पु० (मान्) ज्याला असक्ति आहे तो.
सखी, स्त्री० (खी) मैत्रीण, सोबतीण.
संख्यक, पु० (कः) गणना करणारा.
संख्यामात्र, न० (त्रं) बेरीज.
संग, पु० (गः) सोबत. २ योग ३ प्रेम.
संगत, पु० (तः) योग्य. २ भेट ३ न० (तं) स्नेह, सोबत.
संगति, स्त्री० (तिः) सोबत-
संगमयति, भेटवितो.
सगर, पु० (रः) एका प्राचीन राजाचें नांव.
संगृह्यते, संग्रह केला जातो.
संग्रह, पु० (हः) साठा, जमवणें.
संग्रहण, न० (णं) घेणें.
संग्राम, पु० (मः) लढाई.
संग्राह्य, पु० (ह्यः) घेण्यास योग्य.
संघात, पु० (तः) समुदाय, जमाव.
सचकितम्, भित्रेपणानें.
संचय, पु० (यः) संग्रह.
संचरति, फिरतो.
संचारक, पु० (कः) वाटाड्या.
संचारित, पु० (तः) फिरवलेला.
संचित, पु० (तः) सांचविलेला.

**संचिन्त्य**, अ० विचार करून.
**संजनयति**, उत्पन्न करतो.
**संजातकौतुक**, पु० (कः) आश्चर्य झालेला.
**संजातेर्ष्याः**, हेवा झालेले.
**सजारा**, स्त्री० (रा) आपले जारासह.
**संजीवक**, पु० (कः) एका बैलाचें नांव.
**सततम्**, अ० नेहमीं, निरंतर.
**सतीत्व**, न० (त्वं) पतिव्रतापणा.
**सत्कार**, पु० (रः) मान, आदर.
**सत्कृत्य**, अ० आदर करून. २ न० (त्यं) चांगलें कृत्य.
**सत्पात्र**, पु० (त्रः) योग्य स्थान.
**सत्पात्रवर्षिन्**, पु० (र्षी) योग्याला देणारा.
**सत्पुरुष**, पु० (षः) उत्तम पुरुष.
**सत्यता**, स्त्री० (ता) खरेपणा.
**सत्यमेव**, अ० खरेंच.
**सत्यवचनार्थम्**, अ० खऱ्या भाषणाकरितां.
**सत्यवाच्**, पु० (क्) खरें बोलणारा.
**सत्यवादित्व**, न० (त्वं) खरें बोलणें.
**सत्यवादिन्**, पु० (दी) खरें बोलणारा.
**सत्याभिधान**, न० (नं) खरें बोलणें.
**सत्यार्यौ**, पु० द्वि० (र्यौ) खरा आणि सद्गुण.
**सत्योत्कर्ष**, पु० (र्षः) खरा उत्कर्ष.
**सत्रासम्**, भयानें, त्रास पाऊन.
**सत्वरम्**, अ० लौकर.
**सत्वोत्साह**, पु० (हः) हुशारी, हिंमत.
**सत्समागम**, पु० (मः) चांगली सोबत.
**संदध्यात्**, सल्ला करो, जुळो.
**सदर्प**, वि० (र्पः र्पा र्पं) गर्विष्ठ, मस्त.
**सदर्पम्**, गर्वानें.
**संदर्शन**, न० (नं) भेट. २ दाखविणें.
**संदर्श्य**, अ० दाखवून.
**सदसि**, सभेमध्यें.
**सदारपुत्र**, पु० (त्रः) बायको व मुलगा ह्यासहित.
**संदिग्ध**, पु० (ग्धः) संशयाचा.
**संदीपन**, न० (नं) पेटवणें.
**सद्भाव**, पु० (वः) चांगला स्वभाव.
**सद्भिः**, चांगले लोकांनीं.
**सधन**, पु० (नः) मातबर.
**संधातव्य**, वि० (व्यः व्या व्यं) मिलाफ करण्या जोगा, सल्ला करण्याजोगा.
**संधाय**, अ० सल्ला करून.
**संधिकुशल**, पु० (लः) तहाचे कामांत हुशार.
**संधित**, पु० (तः) तह केलेला, जुळलेला.
**संधिविद्**, पु० (द्) तह जाणणारा.
**संधीयते**, तह केला जातो. २ सांधला जातो.
**संधेय**, पु० (यः) तह करावयाजोगा. २ जुळण्या जोगा.
**संध्याकाल**, पु० (लः) सायंकाल.
**संध्यासमय**, पु० (यः) सायंकाळ.
**सन्**, असतां.
**सनाथीक्रियताम्**, सनाथ करावें.
**सन्त**, पु० (न्तः) साधु.
**सन्तति**, स्त्री० (तिः) मुलें.
**सन्तर्पित**, पु० (तः) संतोष केलेला.
**सन्तापयति**, त्रास देतो.
**सन्ति**, आहेत.
**सन्तुष्ट**, न० (ष्टं) तृप्त झालेलें.
**सन्तोष**, पु० (षः) आनंद.
**सन्तोष्य**, अ० संतोष करून.
**सन्त्यज्यते**, टाकला जातो.
**सन्निपातक**, पु० (कः) सान्निपात ज्वर.

**सन्निमित्ते**, योग्य कारण असतां.
**सन्निहिता**, स्त्री० (ता) जवळची.
**सन्निहितापाय**, पु० (यः) क्षणिक.
**सन्मान**, पु० (नः) मान, आदर.
**सन्मार्ग**, पु० (र्गः) चांगला मार्ग.
**सन्मित्र**, पु० (त्रः) चांगला मित्र.
**सपत्नी**, स्त्री० (त्नी) सवत.
**संपद्यते**, प्राप्त होतो.
**संपन्न**, न० (न्नं) सिद्ध झालेलें. २ पु० (न्नः) मातबर.
**सपरिवार**, पु० (रः) इतमामा सकट.
**सपुत्रदार**, पु० (रः) मुलें माणसें सुद्धां.
**संपूज्य**, अ० पूजा करून.
**सप्त**, सात.
**संप्रदान**, न० (नं) देणगी.
**संप्रश्न**, पु० (श्नः) पुसणें, विचारणें.
**संप्रसाध्य**, पु० (ध्यः) साधावयाचा.
**संप्राप्त**, पु० (प्तः) आलेला.
**संप्राप्नुवंति**, मिळतात, पावतात.
**संप्रेषित**, पु० (तः) पाठविलेला.
**सफल**, पु० (लः) फलयुक्त.
**संबंध**, पु० (धः) मिलाफ, संबंध. २ नातें.
**संबंधिन्**, पु० (धी) नातलग.
**सबंधु**, पु० (धुः) मित्रासहवर्तमान.
**संबोध्य**, अ० जाणवून, कळवून.
**सभयम्**, भयानें.
**संभव**, पु० (वः) उत्पत्ती.
**संभवति**, संभवतो, होतो.
**संभावयेत्**, तर्क करो. २ आदर करो.
**संभाष**, पु० (षः) संभाषण.
**संभाषसे**, बोलतोस.
**संभुज्यते**, उपभोगिला जातो.
**संभूत**, पु० (तः) झालेला.
**संभूय**, अ० होऊन, मिळून.
**सम्**, अ० बरोबर.
**सम**, पु० (मः) सारखा.
**संमत**, न० (तं) मान्य.
**समतता**, स्त्री० (ता) सारखेपणा.
**संमति**, स्त्री० (तिः) रुकार.
**समधिक**, पु० (कः) पुष्कळ अधिक.
**समन्तः**, अ० सभोंवतीं.
**समन्वित**, पु० (तः) युक्त.
**समम्**, अ० बरोबर.
**समयोचित**, पु० (तः) प्रसंगास साजणारा.
**समर्थ**, पु० (र्थः) समर्थ. २ द्रव्यवान.
**समर्पयति**, देतो. २ वाहतो.
**समवाय**, पु० (यः) जमाव.
**समवीर्यौ**, पु० द्वि० (र्यौ) सारख्या बळाचे.
**समसंधि**, स्त्री० (धिः) सारखा तह.
**समहीधर**, न० (रं) पर्वतांसहवर्तमान.
**समा**, स्त्री० (मा) सारखी.
**समाकार**, पु० (रः) सारख्या आकाराचा.
**समाकुल**, पु० (लः) व्याप्त.
**समाख्यात**, पु० (तः) सांगितलेला.
**समागत**, पु० (तः) आलेला.
**समागम**, पु० (मः) संगत, सोबत.
**समाचरति**, करतो, आचरतो.
**समादिशति**, आज्ञा देतो.
**समाधत्ते**, समाधान करतो.
**समापन्न**, पु० (न्नः) पडलेला.
**समाप्त**, पु० (प्तः) संपलेला.
**समाप्ति**, स्त्री० (प्तिः) शेवट.
**समायात**, पु० (तः) आलेला.
**समायुक्त**, पु० (क्तः) जोडलेला.
**समारब्धा**, स्त्री० (ब्धा) आरंभलेली.
**समालंबते**, धरून रहातो.

**समालभ्यताम्**, मिळवावें.
**समालोच्य**, अ० पाहून.
**समावासित**, पु० (तः) स्थापलेला.
**समाश्वसिहि**, धीर धर, शांत हो.
**समाहत**, पु० (तः) ताडलेला.
**समाहूय**, अ० बोलावून.
**समाज्ञापयति**, हुकूम करतो.
**समीहित**, न० (तं) इच्छिलेलें.
**समीक्ष्य** अ० पाहून.
**समुच्छेतुम्**, अ० तोडावयास.
**समुच्छ्रित**, पु० (तः) उंच. २ उभारलेला.
**समुत्थाय**, अ० उठून.
**समुदीरित**, पु० (तः) म्हणालेला, सांगितलेला.
**समुद्दिश्य**, अ० उद्देशून, लक्षून.
**समुद्धृत**, पु० (तः) उचललेला.
**समुद्धृतलांगूल**, पु० (लः) उभारलेल्या शेपटाचा.
**समुद्धरेत्**, काढो.
**समुद्यत**, पु० (तः) तयार,
**समुद्रतीर**, न० (रं) समुद्राचा किनारा.
**समुन्नति**, स्त्री० (तिः) उंच पदवी, थोरपणा.
**समुन्मूलयितुम्**, अ० उपटून टाकण्याकरितां.
**समुपविष्ट**, पु० (ष्टः) बसलेला.
**समुपस्थित**, पु० (तः) आलेला.
**समुह्यते**, मोहिला जातो. २ ओढला जातो.
**समूल**, न० (लं) मुळासहवर्तमान.
**समृद्ध**, पु० (द्धः) वाढलेला, उदयास आलेला.
**समृद्धिसमय**, पु० (यः) उदय काळ.
**समेयात्**, जावो. २ येवो.

**सयत्न**, पु० (त्नः) यत्न करणारा.
**सरस्तीर** न० (रं) तलावाचा कांठ.
**सरोग**, पु० (गः) रोगी.
**सरोगता**, स्त्री० (ता) आजारीपणा,
**सरोरुह**, न० (हं) कमळ.
**सरोषम्** , रागानें.
**सर्पेश्वर**, पु० (रः) सापांचा राजा, वासुकी.
**सर्वकामसमृद्ध**, पु० (द्धः) ज्याच्या सर्व इच्छा पूर्ण झाल्या आहेत तो.
**सर्वगुणसंपन्न**, पु० (न्नः) सर्व गुणांनीं युक्त.
**सर्वतेजोमय**, पु० (यः) सर्वतेजाचा.
**सर्वत्र**, अ० सर्व ठिकाणीं.
**सर्वथा**, अ० सर्व प्रकारें.
**सर्वदान**, न० (नं) सर्वस्व देणें.
**सर्वद्रव्येषु**, सर्व पदार्थांत.
**सर्वभक्ष**, पु० (क्षः) सर्व खाणारा.
**सर्वभूतेषु**, सर्व प्राण्यांवर, प्राणिमात्रावर.
**सर्वशंका**, स्त्री० (का) सर्वांविषयीं संशय.
**सर्वसह**, पु० (हः) सर्व सोसणारा.
**सर्वस्वामिगुणोपेत**, पु० (तः) धन्याच्या सर्व गुणांनीं युक्त.
**सर्वांग**, न० (गं) सर्व अवयव.
**सलज्ज**, वि० (ज्जः ज्जा- ज्जं) लाजलेला.
**सलिलात्**, पाण्यापासून.
**सवितरि**, सूर्याचे ठायीं.
**सवितृ**, पु० (ता) सूर्य.
**सविद्य**, पु० (द्यः) विद्वान.
**सविनयम्**, अ० लीनपणानें.
**सविशेष**, पु० (षः) विशेषासह.
**सविशेषम्**, अ० विशेषें करून.
**सविस्मय**, पु० (यः) विस्मय झालेला.
**संवृत**, पु० (तः) झांकलेला.

**सव्यथ**, पु० (थः) त्रास झालेला, दुःख झालेला.

**सशंकम्**, अ० भयानें, भिऊन.

**संशयित**, पु० (तः) संशयाचा.

**सशोक**, पु० (कः) दुःखी.

**संश्रय**, पु० (यः) आधार.

**संश्रयंतु**, आधार घेवोत.

**ससंभ्रम**, पु० (मः) घाबरलेला.

**ससंभ्रमम्**, अ० घाबरून, घाईनें.

**संसर्ग**, पु० (र्गः) संबंध.

**ससर्प**, पु० (र्पः) सर्पाशीं सहवर्तमान.

**संसार**, पु० (रः) प्रपंच.

**संसूचयति**, सुचवितो.

**ससैन्यबलवाहन**, पु० (नः) सैन्य, शक्ति व वाहान यांशीं सहवर्तमान.

**संस्कार**, पु० (रः) पवित्र कर्म. २ सजविणें. ३ विधिविशेष.

**संस्कृतोक्ति**, स्त्री० (क्तिः) संस्कृत भाषण.

**संस्थानम्** , ठरलेलें. २ राहिलेलें.

**संस्थिति**, स्त्री० (तिः) राहणें. २ राहण्याची जागा.

**संस्पृष्ट**, पु० (ष्टः) शिवलेला, स्पर्श केलेला.

**सस्मित**, हांसून.

**सहज**, पु० (जः) बरोबर उत्पन्न झालेला, आंगचा.

**सहजं**, आयासाशिवाय.

**संहतत्व**, न० (त्वं) जूट.

**सहते**, सोसतो.

**संहरते**, नेतो, चोरतो. २ आवरतो.

**सहस्र**, न० (स्रं) हजार.

**सहायवत्**, पु० (वान्) मदतीनिशीं.

**सहित**, पु० (तः) युक्त.

**संहृष्ट**, पु० (ष्टः) आनंदलेला.

**सा**, स्त्री० (सा) ती.

**साकांक्षम्**, अ० इच्छेनें.

**सागरांता**, स्त्री० (ता) समुद्रानें वेष्टित. २ पृथ्वी.

**साटोपम**, अ० आवेशानें, डौलानें.

**सात्विक**, न० (कं) पु० (कः) चांगले गुणाचा, प्रामाणिक.

**सादरम्**, अ० आदरानें.

**साधयामि**, सिद्ध करतों.

**साधिका**, स्त्री० (का) सिद्ध करणारी.

**साधु**, अ० चांगलें. २ शाबास.

**साधुवृत्त**, पु० (त्तः) चांगल्या चालीचा.

**साधुशीलत्व**, न० (त्वं) चांगला स्वभाव.

**साधूक्त**, न० (क्तं) चांगलें सांगितलेलें.

**साध्यताम्**, साधलें जावो.

**साध्यसाधन**, न० (नं) उचलें काम साधणें.

**साध्यसिद्धि**, स्त्री० (द्धिः) उचललें काम सिद्धीस नेणें.

**साध्य**, पु० (ध्यः) साधण्याजोगें.

**साध्वस**, न० (सं) भय.

**सानंद**, पु० (दः) आनंदलेला,

**सानंदम्**, अ० आनंदानें.

**सान्निध्य**, न० (ध्यं) जवळपणा.

**साफल्य**, न० (ल्यं) परिणाम सफलता.

**सामग्री**, स्त्री० (ग्री) सामान. २ उपाय.

**सामन्**, न० (म) सामोपचार.

**सामर्थ्य**, न० (र्थ्यं) शक्ति.

**सामर्थ्यहीन**, पु० (नः) अशक्त.

**सामानाधिकरण्य**, न० (ण्यं) एका ठिकाणीं राहणें.

**साम्य**, न० (म्यं) बरोबरी.

**सारता**, स्त्री० (ता) जीव. २ हाशील, किंमत.

**सारवत्**, पु० (वान्) उत्तम. २ मुख्य.

**सारासार**, पु० (रः) चांगलें वाईट.

**साश्चर्य**, न० (र्यं) आश्चर्ययुक्त.

**साश्चर्यम्**, अ० आश्चर्यानें.

**साष्टांगपातम्**, साष्टांग नमस्कार करून.

**साष्टांगम्**, अ० आठ अवयवांनीं.

**साक्षात्**, अ० स्वतः, समक्ष.

**साक्षिन्**, पु० (क्षी) साक्षीदार.

**सिक्त**, पु० (क्तः) ओला. २ शिंपलेला.

**सितोत्पल**, न० (लं) पांढरें कमळ.

**सिद्ध**, पु० (द्धः) तयार झालेला. २ सिद्ध.

**सिद्धि**, स्त्री० (द्धिः) पूर्णता. २ जय.

**सिध्यति**, फल मिळवितो.

**सिंहल**, न० (लं) एका बेटाचें नांव.

**सिंहलद्वीप**, पु० (पः) लंका.

**सिंहायते**, सिंहासारखा वागतो.

**सीदसि**, बुडतोस. २ दुःख पावतोस.

**सीमंतिनी**, स्त्री० (नी) स्त्रीवि०.

**सु**, अ० चांगलें.

**सुकर**, न० (रं) सोपें.

**सुकृतिनाम्**, पुण्यवानांचा, धार्मिकांचा.

**सुखतर**, पु० (रः) फार सोपें.

**सुखदुःख**, न० (खं) सुख दुःख.

**सुखभागिनः**, सुखाचे वांटेकरी.

**सुखभेद्य**, पु० (द्यः) सहज फुटण्याजोगा.

**सुखयति**, सुख करतो.

**सुखशोभार्थम्**, अ० सुख आणि शोभा यांकरितां.

**सुखसाध्य**, पु० (ध्यः) सुखानें मिळण्याजोगा.

**सुखावह**, पु० (हः) संतोष देणारा.

**सुखासीन**, पु० (नः) स्त्री० न० (ना नं) सुखानें बसलेला.

**सुखास्वाद**, पु० (दः) सुखाचा अनुभव.

**सुखिस्वभाव**, पु० (वः) आनंदवृत्ति.

**सुखी**, जो नेहमीं सुख अनुभवितो तो.

**सुखोच्छेद्य**, पु० (द्यः) स्त्री० (द्या-) न० (द्यं) सहज मारण्याजोगा.

**सुखोपविष्ट**, पु० (ष्टः) सुखानें बसलेला.

**सुगत**, पु० (तः) स्त्री० न० (ता- तं) गेलेला. बुद्धवि०

**सुगुप्त**, पु० (प्तः) फार गुप्त.

**सुगुप्तलेख**, पु० (खः) फार गुप्तपत्र.

**सुगुप्ति**, स्त्री० (प्तिः) मोठा गुप्तपणा.

**सुग्रीव**, पु० (वः) वानरांचा सुग्रीव नामें राजा.

**सुघटित**, पु० (तः) चांगल्या रीतीनें योजलेला.

**सुचरित**, न० (तं) उत्तम कर्म, चांगलें कर्म.

**सुचिंतित**, न० (तं) चांगला विचार ज्या विषयीं केला आहे तें.

**सुचिरम्** अ० फार वेळपर्यंत.

**सुजन**, पु० (नः) चांगला मनुष्य.

**सुजला**, स्त्री० (ला) चांगल्या पाण्याची (विहीर वगैरे.)

**सुजीर्ण**, न० (र्णं) चांगलें जिरलेलें.

**सुतनिर्विशेष**, पु० (षः) पुत्राप्रमाणें.

**सुतप्त**, पु० (प्तः) फार तापलेला.

**सुतिनी**, स्त्री० आई.

**सुंद**, पु० (दः) एका राक्षसाचें नांव.

**सुदर्शन**, पु० (नः) सुंदर, खुपसुरत. २ न० (नं) शस्त्रविशेष.

**सुदुर्लभ**, पु० (भः) मिळण्यास फार कठीण.

**सुदुस्तर**, पु० स्त्री० न० (रः रा-रं) तरून जाण्यास फार कठीण.
**सुदूर**, न० (रं) फार दूर.
**सुनिभृतम्**, अ० गुप्त रीतीनें.
**सुनिरूपित**, न० (तं) ज्याविषयीं चांगला विचार केला आहे तें.
**सुनिश्चित**. न० (तं) चांगल्या रीतीनें ठरविलेलें.
**सुनिश्चितम्**, अ० खचित.
**सुपलायित**, पु० (तः) दूर पळालेला.
**सुप्त**, पु० (प्तः) निजलेला.
**सुप्रतिष्ठित**, पु० (तः) उत्तम प्रकारें स्थापलेला.
**सुप्रीत**, पु० (तः) खुष झालेला.
**सुबुद्धि**, पु० (द्धिः) शहाणा.
**सुभट**, पु० (टः) मोठा शूर—योद्धा.
**सुभाषित**, न० (तं) चांगलें बोललेलें.
**सुमंत्रित**, पु० (तः) उत्तम रीतीनें योजलेला.
**सुमहत्**, न० (त्) फार मोठें.
**सुयुद्ध**, न० (द्धं) चांगली लढाई.
**सुरक्त**, पु० (क्तः) नादावलेला.
**सुरलोक**, पु० (कः) देवलोक.
**सुरक्षित**, पु० (तः) स्त्री० न० (ता-तं) चांगला राखलेला.
**सुरांगना**, स्त्री० (ना) देवांच्या नायका, अप्सरा.
**सुलभ**, पु० (भः) सोपें.
**सुललित**, न० (तं) पु० (तः) बहुत सुंदर.
**सुवर्णदान**, न० (नं) सोनें दान करणें.
**सुवर्णवत्**, अ० सोन्याप्रमाणें.
**सुवर्णवत्**, वि० (वान् - वती - त्) सोनें बाळगणारा.
**सुवर्णवस्त्रादि**, सोनें कापड इत्यादि.
**सुविक्रम**, पु० (मः) मोठें धैर्य.
**सुविक्रांत**, पु० (तः) शौर्याचें.
**सुविचक्षण**, पु० (णः) मोठा हुशार.
**सुविचार्य**, अ० बरोबर विचार करून.
**सुविस्तरम्**, अ० विस्तारानें, तपशीलवार.
**सुव्यक्तम्**, अ० स्पष्ट रीतीनें, साफ.
**सुशासित**, पु० (तः) चांगल्या रीतीनें वागविलेली.
**सुशासिता**, स्त्री० (ता) चांगले रीतीनें वागविलेला.
**सुशिष्ट**, पु० (ष्टः) मोठा विश्वासु दिवाण.
**सुशील**, वि० (लः ला-लं) चांगल स्वभावाचा.
**सुष्वाप**, निजला.
**सुसंहत**, पु० (तः) अगदीं मिळालेला.
**सुसंहित**, पु० (तः) जुळलेला.
**सुसेवित**, वि० (तः ता-तं) विश्वासानें चाकरी केलेला.
**सुस्थ**, पु० (स्थः) सुखी.
**सुस्थित**, पु० (तः) चांगला राहिलेला.
**सुस्थितंमन्य**, पु० (न्यः) आपणास स्वस्थ मानणारा.
**सुहृत्तम**, पु० (मः) खरा मित्र.
**सुहृद्भेद**, पु० (दः) मित्रांत वांकडें आणणें.
**सुहृद्वाक्य**, न० (क्यं) मित्राचा उपदेश.
**सूची**, स्त्री० (ची) सुय, सुई.
**सूचीभेद्य**, पु० (द्यः) सुईनें फुटणारा.
**सूत्रधार**, पु० (रः) सुतार. २ नाटकांतील पात्रांचा अधिकारी, सूत्रधार.
**सूनृता**, स्त्री० (ता) चांगल्या चालीची.
**सृज्यते**, उत्पन्न केला जातो.
**सृष्टि**, स्त्री० (ष्टिः) जग. २ उत्पत्ति.

**सेक**, पु० (कः) शिंपणें.
**सेनापति**, पु० (तिः) फौजेचा अधिकारी, सेनापति.
**सेवेत**, चाकरी करो. २ उपभोग घेवो.
**सेव्यसेवक**, धनी आणि चाकर.
**सैनिक**, पु० (कः) शिपाई.
**सोढुम्**, अ० सोसावयास.
**सोत्साह**, पु० (हः) हिंमतीचा.
**सोद्योग**, पु० (गः) मेहेनतीचा.
**सौख्य**, न० (ख्यं) सुख.
**सौंदर्य**, न० (र्यं) सुरेखपणा.
**सौहार्द**, न० (र्दं) मित्रत्व.
**सौहृद्य**, न० (द्यं) मित्रत्व.
**स्कंधोपनेय**, खांद्यावर घेऊन नेण्याचा.
**स्तनकुड्मल**, न० (लं) स्तनावरील बोंडी.
**स्तब्ध**, पु० (ब्धः) स्थिर.
**स्तब्धकर्ण**, पु० (र्णः) उभारलेल्या कानाचा.
**स्तब्धीकृत्य**, थांबवून.
**स्तंभीभवति**, खांबाप्रमाणें होतो.
**स्तुवाति**, स्तुति करतो.
**स्त्रीकृत**, पु० (तः) स्त्रीनें केलेला.
**स्त्रीभृत्य**, स्त्री व चाकर.
**स्त्रीसेवा**, स्त्री० (वा) स्त्रीची चाकरी. २ लंपटपणा.
**स्थ**, पु० (स्थः) राहणारा.
**स्थलचर**, वि० (रः रा- रं) जमीनीवर फिरणारा.
**स्थलतः**, अ० जमीनीवरून.
**स्थलविग्रह**, पु० (हः) जमीनीवरची लढाई.
**स्थली**, स्त्री० (ली) जागा, जमीन.
**स्थविर**, पु० (रः) म्हातारा.
**स्थातव्य**, पु० (व्यः) बसावयाचा.
**स्थातुम्**, अ० बसावयास.
**स्थानभ्रष्ट**, पु० (ष्टः) पदच्युत, जागेवरून सुटलेला.
**स्थानांतर**, न० (रं) दुसरी जागा.
**स्थापयेत्**, बसवो. २ ठेवो.
**स्थायित**, पु० (तः) राहणारा.
**स्थास्यामि**, बसेन.
**स्थित**, पु० (तः) बसलेला.
**स्थित्वा**, अ० बसून.
**स्थिरात्मन्**, पु० (त्मा) दृढ मनाचा.
**स्थीयताम्**, बसावें.
**स्थेय**, पु० (यः) राहण्यास योग्य.
**स्नातक**, पु० (कः) गृहस्थ, घरंदाज.
**स्नाति**, आंग धुतो, स्नान करतो.
**स्नानवस्त्र**, न० (स्त्रं) ओलें वस्त्र.
**स्नानशील**, पु० (लः) स्नान करणारा.
**स्नायुबंधन**, न० (नं) शिरांचें बंधन.
**स्नेहछेद**, पु० (दः) मित्रत्वाचा बिघाड.
**स्नेहभूमी**, स्त्री० (मिः) प्रीतिपात्र.
**स्नेहवत्**, वि० (वान्-वती- त्) लोभ करणारा, प्रीति करणारा.
**स्नेहानुवृत्ति**, स्त्री० (त्तिः) स्नेह चालिवणें.
**स्पर्द्धा**, स्त्री० (र्द्धा) हेवा.
**स्पष्टार्थ**, न० (र्थं) उघड अर्थाचा.
**स्पृशामि**, शिवतों, स्पर्श करतों.
**स्पृष्टव्य**, पु० (व्यः) स्पर्श करावया जोगा.
**स्फटिक**, पु० (कः) एक जातीचा पांढरा दगड, स्फटिक.
**स्फुटम्**, अ० स्पष्ट, उघड.
**स्फुरत्**, दैदिप्यमान.
**स्मरण**, पु० (णः) आठवण.
**स्मृत**, पु० (तः) आठवलेला.

**स्यात्**, व्हावें, होवो.
**स्रोतस्**, न० (तः) ओढा, नाला.
**स्वकीय**, पु० (यः) आपला.
**स्वगतम्**, अ० आपले मनांत.
**स्वगृह**, न० (हं) आपलें घर.
**स्वच्छ**, पु० (च्छः) निर्मळ, स्वच्छ.
**स्वजन**, पु० (नः) आपलें गोत.
**स्वजाति**, स्त्री० (तिः) आपली जात.
**स्वदेशज**, पु० (जः) आपल्या देशांतला.
**स्वदेहदान**, न० (नं) आपलें शरीर देणें.
**स्वनाश**, पु० (शः) आपला तोटा, नुकसान.
**स्वपन**, न० (नं) झोंप.
**स्वपिति**, निजतो.
**स्वभावज**, पु० (जः) स्वाभाविक.
**स्वभूत्याग**, पु० (गः) आपली जमीन सोडणें.
**स्वभूमि**, स्त्री० (मिः) आपली जमीन.
**स्वयंकृत**, पु० (तः) आपण केलेला.
**स्वयत्न**, पु० (त्नः) आपला उद्योग.
**स्वरस्**, न० (रः) मोठा शब्द.
**स्वर्ग**, पु० (र्गः) आकाश, स्वर्ग.
**स्वर्गगामिन्**, पु० (मी) स्वर्गास जाणारा.
**स्वर्गपति**, पु० (तिः) इंद्र.
**स्वर्णरेखा**, स्त्री० (खा) सोन्याची रेघ. २ एका स्त्रीचें नांव.
**स्वल्प**, पु० (ल्पः) थोडा.
**स्वल्पक**, पु० (कः) फार थोडें.
**स्वल्पबल**, पु० (लः) थोड्या बळाचा, अशक्त.
**स्वविषय**, पु० (यः) स्वतःचा देश किंवा घर.
**स्वसा**, स्त्री० (सा) बहीण.
**स्वसैन्य**, न० (न्यं) आपलें सैन्य.
**स्वस्थान**, न० (नं) आपली जागा.
**स्वहस्तगत**, पु० न० (तः तं) आपले हातीं आलेला.
**स्वातंत्र्य**, न० (त्र्यं) स्वछंदपणा.
**स्वाद्वन्न**, न० (न्नं) गोडें अन्न.
**स्वाधीन**, हवाली.
**स्वानुरूप**, पु० (पः) आपणास योग्य.
**स्वामिकार्यार्थिन्**, पु० (र्थी) धन्याचें काम करणारा.
**स्वाम्य**, न० (म्यं) धनीपणा, स्वामित्व.
**स्वाम्यर्थम्**, अ० धन्यासाठीं.
**स्वीकृत्य**, अ० अंगीकारून.
**स्वीय**, पु० (यः) आपला.
**स्वेछा**, स्त्री० (छा) आपली इच्छा.
**स्वेछतः**, अ० आपल्या इच्छेनें.
**स्वेछाहारविहार**, पु० (रः) आपल्या इच्छेप्रमाणें खाणें व फिरणें.
**स्वेदन**, न० (नं) घाम आणणारें.
**स्वेदित**, वि० (तःता तं) घाम आलेला.

---

## ह.

**हतज्योतिर्निशीथ**, पु० (थः) काळोखी रात्र.
**हतज्योतिष्**, न० (तिः) काळोख.
**हंतव्य**, पु० (व्यः) ठार मारावयाचा.
**हंतार**, पु० (रः) ठार मारणारा.
**हत्वा**, अ० ठार मारून.
**हनिष्यसि**, ठार मारशील.
**हन्मि**, मारतों.
**हयारूढ**, पु (ढः) घोड्यावर बसलेला.

